पुस्तकाचे नाव : व्हिएतनाम अर्थ आणि अनर्थ
Vhietnam Arth Aani Anarth

लेखक : वि. ग. कानिटकर
V. G. Kanitkar



इ-बुक प्रकाशक : Vikram Bhagwat
Srujan Dreams Pvt. Ltd.
A - 3, Ashirwad Apartments
Opp. Lagu Bandhu Motiwale
Behind Garuda Hotel
Karve Road, PUNE : 411 004
Maharashtra, INDIA
E - mail : vikram.bhagwat@esrujan.com
Mob. : 08879115114

इ-बुक अक्षर रचना
व पुस्तक मांडणी : गिरीश जोशी,
साथीदार प्रिंटर्स,
४६१/१ सदाशिव पेठ, पुणे ४११०३०
Mob : 9423570060, 9595757225
E - mail : girishpvjoshi@gmail.com

इ-बुक प्रकाशन : नोव्हेंबर २०१६

मुखपृष्ठ : प्रभाकर पाटील

# प्रस्तावना : पहिली आवृत्ती

आजवर झालेल्या युद्धांतील, सर्वात प्रदीर्घ व संहारक युद्धाची ही कथा आहे. व्हिएतनाम, लाओस व कंबोडिया या प्रदेशात गेली तीस-एकतीस वर्षे संघर्ष आहे. अमेरिकेचे सैन्य दक्षिण व्हिएतनाममधून काढून घेतल्यानंतर दक्षिण व्हिएतनाम व कंबोडिया या देशात लढाई जोरात उफाळलेली आहे. 'नॉमपेन्ह' मध्ये प्रिन्स सिंहनुक याचे आगमन व सायगाव सरकारात 'राष्ट्रीय मुक्ती आघाडी'चा प्रवेश, या न्याय्य गोष्टी घडल्याखेरीज या दोन्ही देशात शांतता येणार नाही.

या झगड्यात अमेरिकेच्या अप्रबुद्ध जागतिक राजकारणाचे धागे, प्रथमपासून तो आजतागायत गुरफटलेले आढळतात. निवडून येताना प्रत्येक अमेरिकन अध्यक्षाने, व्हिएतनाम प्रश्नाशी सोईस्कर हिसकाहिसकी केलेली आढळून येते. परंतु हो-चि-मिन्ह याचे अनन्यसाधारण नेतृत्व अमेरिकेला पुरून उरले. हो-चि-मिन्ह म्हणजे लेनिन किंवा माओ नव्हता. लेनिनची दृष्टी, माओची कृतिशीलता, गांधीजींची सचोटी आणि इसापचे व्यावहारिक शहाणपण हे सर्व गुण त्याच्या ठिकाणी एकवटलेले आढळतात. त्याने व्हिएतनाममध्ये मार्क्सवादाची, नवी परिभाषा पत्करली. मार्क्सवादाचा, देशाच्या परंपरेशी मिळताजुळता असा सामाजिक संदर्भ प्रस्थापित केला आणि दोन बलाढ्य सत्तांशी लष्करी टकरा घेत घेत, राष्ट्र सचेतन केले; हा या संघर्षातील सर्वात रोमहर्षक भाग आहे.

या निवेदनात, सर्व विशेषनामे ही त्या शब्दाच्या इंग्रजी लेखनाच्या ध्वनिनुसारच मी ठेवली आहेत. ज्याचे इंग्रजी स्पेलिंग Diem असे आहे, त्याचा उच्चार 'दिअेम' असाच धरला आहे. मूळ उच्चार 'झिअेम' आहे असे म्हणतात. आणखी काही शब्दाबाबतीत, असेच स्वातंत्र्य मी घेतले आहे. ही सर्व विशेषनामे असल्याने, वाचनात कोणताही विक्षेप यामुळे येणार नाही.

व्हिएतनाम संघर्षाची ही कहाणी. 'सुधन्वा' या मासिकात, प्रथम १९७४ सालापासून प्रसिद्ध झाली. या नियतकालिकाचे संपादक श्री. सुरेश केळकर व श्री. नेने यांच्या आग्रहामुळेच मी हे लेखन त्वरित केले. 'सायगाव' अमेरिकनांनी सोडले, त्याच दिवशी या पुस्तकाचा प्रकाशन समारंभ झाला. पुस्तकरूपाने हा इतिहास प्रकाशित करणाऱ्या सौ. मंदाकिनी भावे-सरिता प्रकाशन यांचा मी आभारी आहे.

- वि. ग. कानिटकर

दि. ४ एप्रिल १९७५

# प्रस्तावना : दुसरी आवृत्ती

१९७५ मध्ये हा ग्रंथ प्रसिद्ध झाल्यानंतर पुढे सहा-सात वर्षे, पुस्तक बाजारात उपलब्ध राहिले. म्हणजे आवृत्ती संपल्यालाही आता जवळजवळ सतर वर्षे झाली.

अभ्यासक व वाचक या पुस्तकासाठी वारंवार माझ्याकडेच विचारणा करीत. परंतु पुस्तक उपलब्ध करणे माझ्या हाती नव्हते. 'मनोरमा प्रकाशन'ने ही दुसरी आवृत्ती वाचकांना उपलब्ध केली, याचा मला विशेषच आनंद होत आहे.

या इतिहासातील एक महत्त्वाचे पात्र, बाओ-दाई यांचे गुरुवार दि. ३१-०७-१९९७ ला, पॅरीसमधील एका लष्करी रूग्णालयात निधन झाले. मरणसमयी व्हिएतनामचा हा अखेरचा राजा ८३ वर्षांचा होता.

- वि. ग. कानिटकर

दि. १ जानेवारी २००१

# प्रस्तावना : तिसरी सुधारित आवृत्ती

औरंगजेबाच्या मोगली सत्तेशी, शिवाजी महाराजांनी शौर्याने व गनिमी काव्याच्या युद्धतंत्राने जो यशस्वी लढा दिला, त्या गनिमी युद्धतंत्राचा आंतरराष्ट्रीय स्तरावरील आधुनिक काळातील आविष्कार म्हणजे व्हिएतनामचा स्वातंत्र्यलढा होय. गनिमी काव्याने, हो-चि-मिन्ह जवळजवळ अर्धशतकाहून अधिक काळ धीरोदात्तपणे स्वातंत्र्यासाठी लढत होता. या संघर्षात, तो साम्राज्यवादी शक्तींनी आठ-दहा वेळा त्याच्यावर लादलेल्या देहदंडाच्या शिक्षेतून सुखरूप निसटला.

हो-चि-मिन्ह याने आपला देश सचेत केला. देशभक्तीने भारून टाकला. दोन युद्धे या आत्मिक बळावर पाठोपाठ जिंकली. फ्रेंचांचे वसाहतवादी साम्राज्य त्याने निकालात काढलेच, पण त्यापेक्षा अमेरिकेच्या प्रचंड, लष्करी सामर्थ्याला गनिमी तंत्राने नामोहरम केले व अखेर पराभूत केले. देशाची अखंडता प्राप्त केली. ही त्याची कामगिरी अतुलनीय आहे.

दुर्दम्य इच्छाशक्तीच्या बळावर राष्ट्रवादाची कास धरून, हिंसा-अहिंसेचा घोळ न घालता सत्ता वापरून, चेतनाहीन राष्ट्र परत उभे करता येते, याचा वस्तुपाठ म्हणजे, हो-चि-मिन्ह याचा लढा होय.

पुस्तकाचे महत्त्व लक्षात घेता, या पुस्तकाची तिसरी आवृत्ती निघत आहे ही समाधानाची गोष्ट आहे. ही आवृत्ती प्रकाशित करणारे ‘अस्मिता प्रकाशना’चे श्री. रवि बेहेरे यांचे यासाठी मी अभिनंदन करतो.

- वि. ग. कानिटकर

दि. १ ऑगस्ट २००८

सामान्यांचे आयुष्य
आणि मानवतेची कहाणी
हा इतिहासविषय असतो.
- लिओ टॉलस्टॉय

# अनुक्रम

# १ : परवशतेवर अणुबाँब

१० ऑगस्ट १९४५ नागासाकी या जपानी शहरावर दुसरा अणुबाँब पडून पुरते चोवीस तासही उलटले नव्हते. जपानची शरणागती हा आता केवळ काही तासांचाच प्रश्न उरला होता. कालांतराने जागतिक महत्त्व पावणारी एक घटना, याच दिवशी फ्रेंच-इंडोचायनामध्ये घडत होती.

आता व्हिएतनाम- परंतु पाव शतकापूर्वी 'फ्रेंच इंडोचायना' म्हणून ओळखल्या जाणाऱ्या पूर्व आशियातील या देशात 'तानत्राओ' या गावात सुमारे साठ व्हिएतनामी देशभक्तांची एक बैठक भरली होती. फ्रेंच-इंडोचायनामधील निरनिराळ्या वांशिक गटांचे प्रतिनिधी आणि सर्व प्रकारच्या राजकीय तत्त्वज्ञानांचे निवडक उपासक या सभेला हजर होते. सुमारे तीन कोटी जनतेचे प्रतिनिधित्व ही काही मंडळी करीत होती. तीन दिवसांच्या चर्चेनंतर व्हिएतनाम देशाच्या मुक्ततेसाठी 'राष्ट्रीय दास्यविमोचन समिती' (नॅशनल लिबरेशन कमिटी ऑफ व्हिएतनाम) या संघटनेचा जन्म झाला; आणि संघटनेने निर्णय केला-

> 'दोस्तांच्या फौजा पुनश्च आपल्या देशाचा कब्जा करण्यापूर्वीच जपानी झुंडांच्या हातातून सत्ता हिसकावून घेण्यात यावी.'

या निर्णयात 'दोस्तांच्या फौजा' असा जो उल्लेख आहे, तो असण्याचे कारण काय? कारण फ्रेंच-इंडोचायना कब्जा कुणी करायचा याचा निर्णय दोस्तांनी 'पोट्सडॅम परिषदे'त केलेला होता. अमेरिकेचे अध्यक्ष ट्रूमन, मार्शल स्टॅलिन आणि विन्स्टन चर्चिल यांनी २४ जुलै १९४५ या दिवशी 'पोट्सडॅम' येथे निर्णय घेतला होता की जपानचा पराभव होताच, फ्रेंच-इंडोचायनामधील जपानी सेनेची शरणागती सोळाव्या अक्षांश रेषेच्या वरच्या भागात चँग-कै-शैकच्या राष्ट्रीय चिनी सेनेने घ्यावी आणि सोळाव्या अक्षांशाखालील भागाचा कब्जा दोस्तांच्या फौजांनी करावा!

## स्टॅलिनला चकवा

वस्तुतः अणुबाँब टाकायला अजून पंधरवडा असतानाच हा निर्णय पोट्सडॅम परिषदेत घेण्याची घाई का केली गेली? याचे उत्तर असे आहे की अणुबाँब जन्माला आल्याची ट्रूमन यांची तार १७ जुलै १९४५ लाच चर्चिल यांना मिळालेली होती. पोट्सडॅम परिषदेत- या बाबतीत अंधारात होता- तो फक्त मार्शल स्टॅलिन! रशिया-जपानचे तर तोपर्यंत अधिकृत सख्य होते. यामुळे जपानविरुद्ध अणुबाँब वापरण्याचा निर्णय या परिषदेत ट्रूमन-चर्चिल या दुकलीने गुप्त ठेवला. कारण स्टॅलिनला तो सांगण्याची सोय नव्हती! फक्त चर्चिल-ट्रूमन

यांनी पूर्वीच ठरवल्याप्रमाणे ट्रूमन यांनी पोट्सडॅम परिषदेतील एक बैठक आटोपल्यावर 'आम्ही नुकताच एक नवा शक्तिशाली विध्वंसक बॉम्ब तयार केला आहे' असे मार्शल स्टॅलिन यांना सांगितले. सांगण्याची पद्धत अशी होती की यात महत्त्वाचे फारसे नाही. स्टॅलिनलाही वाटले- 'नवा बॉम्ब म्हणजे असेल थोडा जास्त विध्वंसक! कशाला चौकशी करा?'

यामुळे स्टॅलिन गाफील राहिला. जपानची शरणागती इतकी नजीक आलेली आहे, याची त्याला कल्पना आली नाही आणि 'फ्रेंच इंडोचायना'चे वाटप चर्चिल व ट्रूमन या दोघांनी आपल्या मनाप्रमाणे केले. स्टॅलिनने या बाबतीत फारशी खळखळ केली नाही. १६व्या अक्षांशावरील भूभागाचे म्हणजे उत्तर व्हिएतनामचे उदक चँग - कै - शैकच्या हातावर सोडून चर्चिल, ट्रूमन यांनी दक्षिण व्हिएतनाममध्ये मात्र फ्रेंचांबरोबर आपलेही चंबुगबाळे तिथे टाकण्याचा मोघम घाट पक्का केला!

परंतु उत्तर व्हिएतनाममध्ये जपान्यांनी एक नवाच डाव टाकलेला होता. जर्मनीचा पराभव होऊन द गॉलच्या हाती फ्रान्सची सूत्रे जाताच जपान्यांनी फ्रेंच्यांच्या इंडोचायनात जो नावापुरता अधिकार दिलेला होता तो सर्व अधिकार खतम करण्यास सुरुवात केली होती. फ्रेंचांविरुद्ध लढू पाहणाऱ्या व्हिएतनामी देशभक्तांच्या गनिमी फौजांना त्यांनी प्रोत्साहन दिले आणि जेव्हा कधी फ्रेंच-इंडोचायनामधून आपण निघून जाऊ, तेव्हा हा भूभाग पुनः काही झाले तरी फ्रेंच्यांच्या हातात जाणार नाही अशी सर्व हालचाल जपान्यांनी सुरू केली. फ्रेंच-इंडोचायना हा लढाई न करताच जपान्यांनी कब्जात घेतलेला होता! कारण फ्रान्स पराभवानंतर अस्तित्वात आलेले व्हिशी सरकार हे हिटलरचे बाहुले होते आणि जपानने हिटलरच्या शत्रूविरुद्धच पॅसिफिकमध्ये मारझोड सुरू केलेली होती. यामुळे युद्धातील डावपेचाचा भाग म्हणून जपानी सैन्य फ्रेंच इंडोचायनात कब्जा करून बसलेले होते. मुलकी कारभार आणि काही अधिकारी हे फ्रेंच होते, पण ती सर्व जपान्यांच्या हातची खेळणीच होती.

## लेनिन - क्षण

व्हिएतनामच्या स्वातंत्र्य लढ्यातला हाच तो क्षण होता की जेव्हा तो हातचा घालवणे ही स्वातंत्र्यभक्ताच्या दृष्टीने घोडचूक ठरली असती. लेनिनने अशा क्षणांची महती आपल्या तंत्रात विशद केलेली आहे. अखेरचा निर्णायक घाव घालण्यापूर्वी जे दोन विचार क्रांतिकारकांनी करावे असे लेनिन सांगतो, त्यातला पहिला 'मुख्य शत्रू कोण याची निश्चिती' आणि दुसरा 'आघातासाठी अचूक क्षणांची निवड.' हा क्षण निवडण्यातच खरे क्रांतिकारकत्व प्रकट होऊ शकते.

या क्षणाची अनेक तपे वाट पाहणारा एक व्हिएतनामी क्रांतिकारक आतापर्यंत एकटाच वनवासी जीवन कंठीत होता. १९२२ साली तो मॉस्कोत होता. रशियन क्रांती त्याने पाहिली. १९२५ साली तो कॅन्टोनला होता. चँग-कै-शैकने कम्युनिस्टांशी सुरू केलेल्या यादवीला तो साक्षी होता. बोरोडीनबरोबर १९२५ मध्ये तो चीनला आला आणि त्याचबरोबर तो पुनः मॉस्कोला गेला. तिथून तो थायलंडमध्ये कधी आला ते कुणालाच कळलेले नव्हते. त्याने थायलंडच्या सरहद्दीवर ठाण मांडून फ्रेंच-इंडोचायनात उठाव घडवून आणला. बंड फसले. त्याने मग पुनः १९४१ मध्ये मॉस्को गाठले. अनेक वेळा नावे बदलल्यामुळे आपले खरे नाव त्याचे त्यालाही स्मरत नव्हते, तिथे इतरांची काय कथा!

लेनिनचे घराणे सांगणारा हा वनवासी पुरुष १० ऑगस्ट १९४५ या दिवशी तानत्राओ येथे जन्मलेल्या मेळाव्याचा कर्ता करविता होता. परंतु त्याला नावाने फारसे कुणी ओळखतच नव्हते. या माणसाच्या अंगावर साधा पांढरा सुती शर्ट होता. कमरेला अर्धी खाकी पँट होती. लेनिनसारखी छोटी निमुळती दाढी हनुवटीवर रूळत होती. आत्मविश्वासाने त्याने मेळाव्याला सांगितले-

‘मित्रहो! हाच तो क्षण आहे. दोस्तांचे पाऊल इंडोचायनाला लागण्यापूर्वीच आपण जपान्यांना निःशस्त्र करून सत्ता हाती घ्यायची आहे. आपल्याला दोस्तांशी आत्ताच लढण्याचे कारण नाही, उलट या भूमीचे मालक म्हणून आपण दोस्त सेनेचे तूर्त स्वागत करू.’

सत्ता हिसकवण्यासाठी काढलेल्या आवाहनात त्याने म्हटले होते-

‘देशवासीहो! आमची दास्यविमोचन समिती हेच या क्षणी व्हिएतनाम देशाचे काळजीवाहू सरकार आहे. आमच्या पाठीशी सर्वांनी रहा. आमच्या आज्ञा पाळा. अजून दीर्घ मुदतीचा कठीण लढा द्यावा लागणार आहे. जपान्यांचा पराभव झाल्याने आपण आयतेच स्वतंत्र झालो या भ्रमात कुणी राहू नका.

‘बांधवहो उठा! आपण आपल्या पराक्रमानेच मुक्त होऊ. जगात अनेक दलित लोक आपापल्या स्वातंत्र्यासाठी झुंज करीत आहेत. आपण मागे राहून चालणार नाही-व्हिएतनामचे निशाण घेऊन आपण पुढे जात राहू.’

या पत्रकाखाली सही होती... नग्यूअेन अई क्कोकू!

यापुढे कधीही या नावाने त्याने सही केली नाही. कारण १३ ऑगस्ट १९४५ ला व्हिएतनामी क्रांतीचे नेतृत्व पत्करताच त्याने आपले अजरामर होणारे नाव जाहीर केले. हो-चि-मिन्ह!

या उठावाची हकीकत सांगण्यापूर्वी या माणसाचे थोडे पूर्वचरित्र आणि फ्रेंच-इंडोचायनाची पूर्वपीठिका ठाऊक असणे आवश्यक आहे.

## अन्नाम ते इंडोचायना

काही वर्षांपूर्वी फ्रेंच इंडोचायना या नावाने ओळखला जाणारा हा भूप्रदेश पूर्वी अन्नाम या नावाने ओळखला जात असे. अन्नामी जनतेवर चिनी संस्कृतीची संपूर्ण छाप होती आणि अन्नामचा राजा हा चीनच्या राजाचे मांडलिकत्व मान्य केल्याखेरीज गादीवर बसू शकत नसे.

अशा या अन्नाम देशात पंधराव्या शतकात फ्रेंच मिशनरी दाखल झाले. पाठोपाठ फ्रेंच व्यापारीही आले. एकीकडे धर्मप्रसाराबरोबर फ्रेंचांनी अन्नामच्या राजघराण्यात हस्तक्षेप सुरू केला. एकोणिसाव्या शतकाच्या मध्यापर्यंत फ्रेंचांना अन्नामच्या राजकारणावर कब्जा करण्याची संधीच मिळाली नाही म्हणा किंवा मिळूनही ती घेण्यास ते फारसे उत्सुक नव्हते म्हणून म्हणा, तोपर्यंत त्यांनी अन्नामच्या राजकारणात प्रत्यक्ष पदार्पण केले नाही.

त्यावेळी अन्नामची राजधानी हुए (Hue) ही होती. अन्नामचा राजा तू दक (Tu Duc) याच्या अमदानीत १८५१ च्या सुमारास फ्रेंच्यांच्या मनात पूर्वेकडे साम्राज्य निर्माण करण्याचे विचार डोकावू लागले. कारण आशियात आणि अतिपूर्वेकडे नवीन साम्राज्ये निर्माण करण्यात इंग्लंडबरोबर त्यांची चुरस आता सुरू झालेली होती. सम्राट तू दक याने फ्रेंचांवर दात धरला आणि फ्रेंच मिशनऱ्यांना आणि व्यापाऱ्यांना पकडून त्यांचा निःपात करण्यास त्याने सुरुवात केली.

फ्रेंचांना निमित्त हवेच होते. व्हिएतनामच्या दक्षिण भागाला त्यावेळी ‘कोचीनचायना’ म्हणत असत. सायगाव ही या भागाची राजधानी होती. फ्रेंच मिशनरी व व्यापारी यांच्या संरक्षणाचे निमित्त करून फ्रेंचांनी १८५९ मध्ये सायगाव कब्जात घेतले.

मेकाँग नदीच्या काठाकाठाने चीनच्या नैऋत्य भागातून चीनमध्ये शिरकाव करण्याचेही फ्रेंच्यांच्या मनात होते. परंतु मेकाँग नदी ही नौकानयनासाठी योग्य नव्हती. यामुळे नाईलाजाने फ्रेंच हनोईकडे वळले. त्यांनी हनोईचा कब्जा केला आणि लाल नदी म्हणून ओळखल्या जाणाऱ्या नदीच्या मुखावर अंमल बसवला.

अन्नामचा राजा घाबरून अखेर फ्रेंचांना शरण गेला आणि १८७४ मध्ये फ्रेंचांशी त्याने तह केला. अन्नामचे संरक्षण ही चिनी दरबारचीही जबाबदारी होती, परंतु फ्रेंचांविरुद्ध काहीही करण्याची ताकद पेकिंग राजवटीपाशी त्यावेळी नव्हती.

याचा फायदा घेऊन फ्रेंचांनी हनोई व हैपाँग येथे आपली ठाणी बसवली. १८८२ मध्ये फ्रेंचांनी टोंकीन घेतले आणि १८८४ मध्ये कॅप्टन फौर्नीर हा फ्रेंच सेनानी व चिनी

दरबारच्या वतीने ली-हुंग-चँग यांच्यात समझोता झाला. यानुसार टोंकीन-अन्नाम-कोचीन-चायना हा सर्व भूभाग संपूर्णपणे फ्रेंचांच्या अमलाखाली आला. या वर्षापासून व्हिएतनाम ही अक्षरे नकाशातून पुसली गेली. या सर्व भागाचा उल्लेख आता फ्रेंच-इंडोचायना या नावाने होऊ लागला. फ्रेंचांनी राज्यकारभाराच्या सोयीसाठी व्हिएतनामचे तीन तुकडे पाडले. टोंकीन हा उत्तरेचा तुकडा, त्याची राजधानी हनोई, अन्नाम हा मधला तुकडा, त्याची राजधानी हुए आणि दक्षिणेचा प्रांत कोचीन-चायना-त्याची राजधानी सायगाव.

राज्यकारभाराच्या दृष्टीने कोचीन-चायना या विभागाचे नागरिक हे संपूर्णपणे फ्रेंच कारभाराखालीच आणले गेले. टोंकीन व अन्नाम या ठिकाणी मात्र नामधारी गुलामी राजवटी चालू राहिल्या तरी सत्ता फ्रेंचांची राहील असे त्या राजवटींनी मान्य केले. लाओस आणि कंबोडिया ही लगतची राष्ट्रे पाठोपाठच फ्रेंचांची आश्रित राष्ट्रे झाली- तिथे फ्रेंचांनी आपले रेसिडेंट नेमून आपला अंमल सुरू केला.

## हो ची पूर्वपीठिका

अशा रितीने व्हिएतनामच्या स्वातंत्र्याच्या फ्रेंचांनी १८८५ पर्यंत संपूर्ण ग्रास केला. परवशतेची पाच वर्षे उलटल्यानंतर १९८० मध्ये हो-चि-मिन्हचा जन्म झाला. नानडान या प्रांतातील किम-लीन या छोट्या खेड्यात १९ मे १८९० या दिवशी 'हो' जन्माला आला. निदान आज तरी त्याची हीच जन्मतारीख समजली जाते. त्याचे पाळण्यातले नाव होते नग्युएन-तात्-थान. निवेदनाच्या सोयीसाठी यापुढे मात्र त्याचा उल्लेख 'हो' असाच केलेला बरा.

दोन डोंगरांच्या कुशीत किमलीन हे खेडे वसलेले आहे. गावातल्या वस्तीभोवती चौअंगानी बांबूची दाट बेटे उभी होती. सर्वच व्हिएतनामी खेड्यात वस्ती अशी बांबूच्या बेटांनी वेढलेली आढळते. किमलीनच्या भोवती भातशेते भरपूर होती आणि अधूनमधून मलबेरी, मका आणि उसाची शेती लावलेली असत.

हो ज्या घरात वाढला ती एक लहानशी झोपडीच होती. कारण हो चा बाप गरिबीतून वर आलेला शेतकरी होता. लहानपणी तो गुरे वळीत असे. ज्या शेतावर तो कामाला होता, त्याच्या मालकाच्या मुलीशीच त्याचे लग्न झाले आणि लग्नात आंदण म्हणून त्याला एक शेताचा तुकडा मिळाला होता. या शेतात उभी असलेली झोपडीही सासऱ्याने त्यालाच दिली. आणि याच झोपडीत 'हो' धरून त्याची पहिली तीन मुले जन्माला आली.

परंतु हो चा बाप नग्यु-एन-सिन हा सामान्य नव्हता. त्याने फावल्या वेळात चिनी साहित्याचा व्यासंग केला आणि सरकारी परीक्षा देऊन शिक्षकाचा व्यवसाय करण्याचा सरकारी परवाना त्याने मिळवला. हुए येथे तो शिकवण्यासाठी जाऊ लागला. त्याच्या सरस्वती-उपासनेला यश येऊन १९०५ मध्ये हुए येथील राजाच्या राजवाड्यात मँडारीन

म्हणून त्याने नोकरी मिळवली. ही नोकरी त्याने पत्करली कारण त्याची बायको व धाकटी मुलगी याच सुमारास निधन पावली होती.

हुए येथील राजवाड्यात मँडारीन म्हणून वावरणे मात्र हो च्या बापाला सुखाचे वाटेना. कारण यात लाचारी फार करावी लागते असा त्याला अनुभव आला. हुए येथील नोकरीवरून त्याची 'बिन्ह-खे' या गावी सरकारी अंमलदार म्हणून बदली झाली. परंतु फ्रेंचांची नोकरी करणे त्याला रूचेना. त्याने कामात हेळसांड सुरू केली. शेवटी त्याला फ्रेंच सरकारी अधिकाऱ्यांनी नोकरीवरून काढून टाकला. यानंतर हो चा बाप आज सायगाव तर उद्या नॉम्-पेन्ह तर चार दिवसानी ॲग-कॉर अशी भटकंती करीत राहिला. नाना प्रकारच्या नोकऱ्या तो करीत असे. अशी वीस वर्षे त्याने गरिबीत परंतु मुक्त अवस्थेत काढली. कोचीन चायनामधील एका पॅगोड्यात (देवस्थानात) १९३० मध्ये 'हो'चा बाप अखेर मरण पावला.

## बहिणीची विस्मयकारक भेट

सुदैवाने नग्यु-एन-सिनने घर सोडून भ्रमंती पत्करल्यानंतर हो, त्याची थोरली बहीण थान आणि भाऊ खिम या सर्वांचा प्रतिपाळ करण्यास त्याचा चुलता पुढे आला. चुलत्याच्या शिकवणुकीने ही तिन्ही भावंडे राष्ट्रवादी विचाराने भारून गेली. थान हिने वैद्यकीय शिक्षण घेऊन व्हिन शहरात लष्करी विद्यालयात नोकरी पत्करली. व्हिएतनामी क्रांतिकारकांना फ्रेंचांविरुद्ध लढण्यासाठी, या लष्करी विद्यालयातून शस्त्रास्त्रे चोरून आणण्यास तिने सुरुवात केली होती. तिचा हा उद्योग लवकरच अधिकाऱ्यांच्या नजरेस आला. प्रदीर्घ कारावासाची शिक्षा ठोठावताना न्यायधीशांनी तिला म्हटले, 'इतर स्त्रिया मुलांना जन्म देण्यात आयुष्य घालवतात, पण तुला मात्र बंदुकीचे डोहाळे लागले!'

थानने लग्न केले नाही. तिच्या तारुण्याचा मोहोर कारावासाच्या गजाआडच ओसरला. हो-चि-मिन्ह हा १९४५ च्या उठावानंतर हनोई येथील स्वतंत्र व्हिएतनामी सरकारचा अध्यक्ष झाला व त्याची छायाचित्रे वृत्तपत्रांतून झळकली, तेव्हा वृद्ध थानला आपल्या परागंदा भावाची पहिली बातमी लागली. एका टोपलीत थानने काही बदके घेतली, दोन डझन अंडी भरली आणि टोपली डोक्यावर घेऊन ती हनोईला दाखल झाली. हो ने तिला इतक्या वर्षांनी पाहिल्यामुळे तो अगदी भारून आला. स्वतंत्र व्हिएतनामच्या अध्यक्षाचा काही दिवस पाहुणचार घेऊन ती परत आपल्या घरी परतली. १९५४ मध्ये ती मरण पावली.

हो चा भाऊ 'खिम' हा देखील चळवळ्या देशभक्त होता. नगेआन या गावात तो राहात असे. भोवतालच्या जनतेचे विलक्षण दारिद्र्य पाहून त्याने फ्रेंच गव्हर्नर जनरलला संतापून पत्र लिहिले. परंतु पिण्याच्या व्यसनामुळे त्याच्या हातून फारसे काही घडू शकले नाही.

शिक्षक म्हणून त्याने आपले आयुष्य घालवले. १९५० मध्ये तो मरण पावल्याची बातमी हो ला कळली तेव्हा त्याने गावकऱ्यांना पत्राने कळवले-

> 'माझ्यापुढे अनंत कामे सतत वाढून ठेवलेली असल्यामुळे मी माझ्या भावासाठी त्याच्या आजारीपणातही काही करू शकलो नाही आणि त्याच्या अंत्यसंस्कारालाही मी येऊ शकत नाही. मी याबद्दल अतिशय दिलगीर आहे. देशाचे काम अधिक मोठे मानून मी माझ्या कौटुंबिक कर्तव्याला जागू शकत नाही याबद्दल आपण मला क्षमा करा.
>
> हो-चि-मिन्ह.'

## नावापुरती शाळा

हो चे बालपण खेड्यातील हूड पोरासारखेच गेले. तळ्याच्या काठी मासे धरावेत, शाळेला दांडी मारून कधी बापाबरोबर हुए शहरातच रमावे, जमेल तेवढी शाळा करावी. त्याला दहावे वर्ष लागले आणि त्याची आई वारली. व्हिएतनामी पोरांप्रमाणे त्याचे केस डोक्यावर बांधलेले असत. हुए आणि व्हिन यांना जोडणारा रस्ता खोदण्याचे काम याचवेळी फ्रेंचांनी सुरू केले आणि यासाठी वेठमजूर लावले. अधिकाऱ्यांच्या जाचाला कंटाळून कामगार पळून जात, आसपासच्या कुटुंबातून लपून राहात. हा सर्व प्रकार हो ने लहानपणीच फार जवळून पाहिला.

देशात लहानसहान स्वातंत्र्य-प्रयत्न होत होते. बंडे होत होती- फसत होती. प्रत्येक फसलेल्या प्रयत्नामागे फ्रेंचांची दडपशाही वाढत होती. हो च्या बापाची इच्छा मुलांनी फ्रेंच शिकून मोठे व्हावे.

पंधराव्या वर्षी हो 'क्वोक' येथील शाळेत दाखल झाला. या ठिकाणी व्हिएतनाम व फ्रेंच अशा दोन्ही भाषा शिकवल्या जात होत्या. या शाळेचा मुख्याध्यापक फ्रेंचांच्या परराष्ट्र खात्यातून नोकरी सोडलेला देशभक्त शिक्षक होता. क्रांतिकारकांशी त्याचे संबंध होते.

चार वर्षे हो ने शिक्षणाच्या नादात घालवली. काही ज्ञान जमा झाले होते. काही परीक्षा तो पास झाला, काही नापास झाला. अखेर शाळेला कंटाळला. शिक्षणाला रामराम ठोकला आणि घर सोडून तो 'फान-थिएट' या बंदरगावाकडे निघून आला. या गावाची ख्याती होती ती मसाल्याचे गाव म्हणून. 'न्यूऑक मॉम' नावाने ओळखला जाणारा जो मसाला व्हिएतनामी लोक मुबलक वापरीत असत, तो या ठिकाणी तयार होत असे. या बंदरगावात मसाल्याच्या कारखानदारांनी एक शाळा चालवलेली होती. या शाळेत व्हिएतनामी व फ्रेंच भाषा शिकवण्याचे काम हो ला मिळाले. जानेवारी १९११ ते सप्टेंबर

१९११ या काळात हे शिकवण्याचे काम हो ने केले. सप्टेंबर १९११ मध्ये हो 'फॉन-थिएट' येथून अदृश्य झाला.

हो ने सायगाव गाठले होते. नौकानयनाचे शिक्षण देणारी जी संस्था सायगावला होती, त्या संस्थेत हो-चि-मिन्हने आपले नाव दाखल केले. एकवीस वर्षाच्या या तरुणाला देशाबाहेरचे जग पाहायचे होते. फ्रेंचांच्या जोखडाखाली राहण्याचा त्याला उबग आलेला होता. हैपाँग-मार्सेल्स मार्गावर वाहतूक करणाऱ्या एका फ्रेंच बोटीवर हो-ने नोकरी पत्करली. बोटीवर त्याने आपले नाव नोंदवले ते 'बा' असे.

## साता समुद्रावर

साता समुद्रावर खेपा करणाऱ्या त्या फ्रेंच बोटीच्या अधिकाऱ्यांनी हा 'बा' कोण याची फारशी चौकशी केली नाही. बोटीच्या भटारखान्यात काम करायला आलेला एक नवा चुणचुणीत पोरगा एवढीच त्याची ओळख प्रवाशांनाही पुरेशी होती.

बोटीवर फ्रेंच प्रवाशांचा भरणाच जास्त असे. रजेवर सुटलेले किंवा पुन्हा मायदेशी परतणारे श्रीमंत फ्रेंच सनदी नोकर हे आपल्या सर्व लवाजम्यासह या बोटीने जाता येता प्रवसा करीत असत. आफ्रिकेची बंदरे करीत बोट भूमध्य समुद्रातून, ओरान, डाकार, पोर्टसैद, अलेक्झाँड्रीयावरून मार्सेल्सला पोचत असे. मग पुन्हा मार्सेल्स ते हैपाँग.

मार्सेल्सल हो प्रथम गेला तेव्हा त्याच्या ध्यानात आले की फ्रान्स देशातले फ्रेंच नागरिक आणि फ्रेंच वसाहतीत अधिकारी म्हणून येणारे फ्रेंच यांच्या मनोभूमिकेत जमीन अस्मानाचे अंतर आहे. मार्सेल्सला त्याला सर्वजण आदराने 'म' म्हणत असत. फ्रेंच भाषेत हे आदरवाचक संबोधन आहे. व्हिएतनाममध्ये आपल्या देशबांधवांचे आर्थिक शोषण करणारे, त्यांना साधी माणुसकी नाकारणारे उर्मट फ्रेंच हे खरोखर फ्रान्स देशातूनच येतात की नाही असा संशय मनात यावा इतके हे अंतर डोळ्यांत भरणारे होते. माणसे मुळात चांगली असतात परंतु त्यांच्या हाती सत्ता आली, सहजी पैसा आला की ती माणुसकी हरवून बसतात. व्हिएतनाममध्ये आपल्याला भेटणारे फ्रेंच वसाहतवादी हे दुसऱ्या प्रकारची माणसे आहेत; त्यांच्या वागण्यावरून सर्व फ्रेंच माणसांचा द्वेष करणे योग्य होणार नाही हा विचार हो च्या मनात यामुळे दृढ झाला. इंग्लंडला गांधीजी गेले तेव्हा नेमका असाच परिणाम त्यांच्या मनावर झाल्याचे नमूद आहे. आपल्या आत्मवृत्तात गांधीजींनी लिहिले आहे - 'कोणत्याही सभेला गेलो की 'गॉड सेव्ह द किंग'.... गायले जायचे. मला वाटले मीही ते म्हटले पाहिजे. ब्रिटिश राजवटीत मला त्यावेळीही दोष दिसत होते तरी एकंदरीत ती राजवट मला चांगली वाटे. ब्रिटिशांचे धोरण हे प्रजेला हितकारक आहे असे मला त्यावेळीही वाटत असे.'

गांधीजी आणि हो-चि-मिन्ह यांच्या विचारधारेत साम्य आढळते. अशा प्रसंगाप्रसंगाने ते ध्यानात येत जाईल.

## कट शिजण्यापूर्वी...

फ्रेंच बोटीवरच्या भटारखान्यातील चाकरी हो ने दोन वर्षे केली. या काळात त्याला विराट जगाचे पुष्कळ दर्शन घडले. विचार प्रगल्भ झाले. या समुद्रसफरीत बोस्टन-न्यूयॉर्क या अमेरिकन शहरांनाही भेटी देण्याची संधी हो ला मिळाली.

इतक्यात १९१४ चे महायुद्ध सुरू झाले आणि हो ने 'ल्-हार्व' बंदरात फ्रेंच बोटीला रामराम ठोकला. सुरू झालेल युद्ध भडकत जाणार होते. कदाचित फ्रान्सवर मरणसंकट कोसळण्याची शक्यता होती आणि असे झाले तर? व्हिएतनामी जनतेच्या गळ्याभोवतालचा परवशतेचा पाश खिळखिळा होण्याची सुवर्णसंधी येणार होती!

कट शिजवायचा क्षण समोर आला असताना फ्रेंच बोटीवर भटारखान्यात भाज्या उकडण्याच्या उद्योगात गुंतून पडायला हो चे क्रांतिकारी मन तयार नव्हते.

n

# २ : देशात शाळांपेक्षा तुरूंग अधिक

महायुद्धाची ठिणगी पडताच ल्-हार्व बंदरात हो याने फ्रेंच बोटीवरील नोकरीला रामराम ठोकला, तेव्हा त्याच्यापुढे मायदेशाच्या मुक्ती प्रयत्नांची दिशा स्पष्ट होती असे नाही. परंतु त्या दिशेने काही शोध घ्यायचा, तर हीच काय ती संधी आहे असा त्याचा मनाचा कौल झाला आणि एका क्षणात त्याने नोकरीचे बंधन तोडून टाकले. आता पुढे काय? पॅरीसचा रस्ता धरावा की अन्य कुठल्या देशात जावे? पॅरीसनगरी त्याला खुणावत होतीच; परंतु ज्या फ्रेंचांच्या टाचेखाली आपली मायभूमी ठेचली जात आहे, त्याच माणसांच्या सुखासीन राजधानीत आपण राहावे हे त्याला रूचेना आणि त्याने लंडनचा मार्ग धरला.

## लंडन नगरीत

लंडन शहराचा चेहराच गंभीर. या अवाढव्य शहराचा प्रचंड विस्तार आणि सर्व शहरावर असलेली औदासिन्याची वाटावी इतकी गंभीर कळा यामुळे प्रथम लंडनमध्ये हो ला गुदमरल्यासारखे होऊ लागले. पण पोटासाठी लगोलग काहीतरी करणे भाग होते. शरीरश्रमाला तयार असलेला कुणीही, औद्योगिक शहरात उपाशी राहात नाहीच. मालकाशी पटेल तोपर्यंत एखाद्या मोठ्या हॉटेलात कपबशा विसळाव्या, तर कधी रस्त्यावर साचलेला बर्फ उचलण्याची मजुरी करावी असा हो चा जीवनप्रवास इथेही सुरू झाला. सुप्रसिद्ध कार्लटन हॉटेलच्या भटारखान्यातही काही दिवस हो ने काढले.

पोट कसेतरी भरले जात होते. मनही मनमुराद उंडारत होते. लंडनमध्ये जमा झालेल्या आशियाई देशांतून आलेल्या मजुरांची एक संघटना लंडनमध्ये होती. लवकरच हो तिचा सभासद झाला; आणि त्यामुळे आयर्लंडचा स्वातंत्र्यलढा, फेबियन सोसायटी अशा निरनिराळ्या प्रश्नांवर त्याला अन्य सभासदांबरोबर चर्चा करण्याचा प्रसंग येऊ लागला. कारण त्याकाळी कामगार संघटना नव्यानेच जन्म पावत होत्या आणि नव्यानेच निर्माण झालेल्या चळवळीत जो एक प्रकारचा रसरशीत ओज सुरुवातीला असतो, त्यापासून दूर राहणे कुणाही कामगार तरुणाला तसे शक्य नसते.

युद्ध होण्यापूर्वी इंग्लंडभर समाजवादी विचारांचे वारे खेळत होते. नव्या युगाची पहाट होणार याबद्दल कुणाच्या मनात संशय नव्हता. सुरू झालेले युद्ध काही दिवसांतच संपेल हा अंदाज खोटा ठरून, युद्धाच्या ज्वाळा जसजशा भडकत गेल्या तसतसा मात्र 'प्रथम हे युद्ध जिंकले पाहिजे' हा एकच विचार ब्रिटनमध्ये सर्वत्र फैलावला आणि काही काळ समाजवादी चळवळीची हवा सर्द झाली! लंडनमध्ये राहून या परिस्थितीत आपण काहीही

करीत राहिलो तरी त्याचा परिणाम आपल्या देशाच्या स्वातंत्र्यलढ्यावर होऊ शकणार नाही याचे हळूहळू हो ला भान आले. जवळ जवळ तीन साडेतीन वर्षे अशीच वाऱ्यावर निघून गेली होती. युद्ध कधी संपणार याचा काहीच अंदाज लागत नव्हता. अखेर हो ने लंडन सोडून पॅरीसला येण्याचे ठरवले. १९१७ च्या प्रारंभीच्या काळवंडलेल्या दिवसात केव्हातरी हो पॅरीस येथे दाखल झाला.

## पुनश्च पॅरीसमध्ये

१९१७ साल उजाडले तेव्हा रशियातील असंतोषाच्या कोठारावर ठिणगी पडण्याचाच काय तो अवकाश होता. ३० डिसेंबर १९१६ या दिवशी रासपुतीनचा खून झाला. झारशाही वाचवणे आता तिथे परमेश्वरालाही शक्य नव्हते. हो हा पॅरीसला दाखल झाला तो बहुधा १९१७ च्या फेब्रुवारीत. काही आठवड्यातच म्हणजे १२ मार्च १९१७ ला पेटोग्राड शहरात झारशाही उलथवणाऱ्या बंडाची सुरुवात झाली. लोकप्रतिनिधींचे हंगामी सरकार स्थापन झाले... आणि १६ एप्रिलला परागंदा असलेला लेनिन हा क्रांतीचे नेतृत्व करण्यासाठी रशियात दाखल झाला. रशिया हा लवकरच युद्धातून अंग काढून घेणार याबद्दल कुणाच्या मनात आता संशय नव्हता. आणि असे झाले तर? जर्मनांचे पारडे जड होणार होते. अँग्लो-फ्रेंचाची परिस्थिती कठीण होणार होती.

## बोल्शेव्हिक क्रांतीचा संदर्भ

परंतु रशियातील कम्युनिस्ट क्रांतीचा जागतिक संदर्भ केवळ चालू असलेल्या महायुद्धापुरताच मर्यादित नव्हता. मार्क्स हा १८४३ मध्ये पॅरीस येथेच स्थायिक झालेला होता. त्याने आपल्या तत्त्वप्रणालीचे पहिले धडे समाजवादी विचाराच्या फ्रेंचांनाच दिलेले होते. पॅरीसमधून फ्रेंच सरकारने हाकलल्यानंतर तो पुढे जर्मनीला गेला असला, आणि १८४७ मध्ये सुप्रसिद्ध 'कम्युनिस्ट मॅनिफेस्टो' हा ब्रुसेल्सहून जाहीर झाला असला, तरी १८७० साली पहिली कम्युनिस्ट क्रांती घडवण्याचा प्रयत्न पॅरीसलाच झालेला होता. केवळ दोनच महिने हे 'पॅरीस-कम्यून' टिकले पण जगातले ते पहिले 'सोव्हिएट' होते! कार्ल मार्क्स १८८३ मध्ये निधन पावला. नंतर सहा वर्षांनी १८८९ मध्ये जी दुसरी कम्युनिस्ट इंटरनॅशनल स्थापन झाली तीही पॅरीस येथेच! पॅरीसचा आणि फ्रान्समधील डाव्या गटाचा कम्युनिझमशी असा सुरुवातीपासून घनिष्ठ संबंध होता.

बोल्शेव्हिकांनी झारशाही उलथवून रशियात सत्ता हाती घेतली आणि ३ मार्च १९१८ रोजी जर्मनीपुढे 'ब्रेस्ट-लिटॉव्ह' येथे सपशेल शरणागती पत्करून युद्ध संपवून टाकले. यामुळे फ्रेंचांची परिस्थिती चालू असलेल्या युद्धात अधिक दयनीय झाली. हे सर्व खरे असले तरी रशियासारख्या प्रचंड देशात सोव्हिएट सत्ता प्रस्थापित झाली, या घटनेचा

संदर्भ युद्धातील जयापराजयाला छेद देणारा आहे, ही गोष्ट डाव्या विचारसरणीच्या फ्रेंचांना मनोमन पटलेली होती. एकंदरीत कट्टर राष्ट्रवादी भूमिका फ्रेंच भूमीत फारशी रूजतच नाही असे दिसते.

जागतिक क्रांतीचे जे स्वप्न लेनिन पाहात होता, त्याच्या संदर्भात रशियातील क्रांती ही फक्त सुरुवात होती. या प्रेषितस्वरूप क्रांतिकारकाला वसाहतवाद साफ नामंजूर होता आणि स्वतंत्र आणि परतंत्र देशातील कामकरी वर्गाचे हितसंबंध एकच आहेत, यावर त्याची अढळ श्रद्धा होती. या नव्या विचारसरणीशी नाते जोडू पाहणारी अगणित तरुण मंडळी त्या युद्धकाळातही पॅरीसमध्ये होती.

हो हा त्यातलाच एक होता. आपल्या मायदेशात साम्राज्यवादी फ्रेंचांकडून अन्नामी कामगारांना मिळणारी वागणूक आणि त्यांची होणारी पिळवणूक ही युरोपात त्या त्या देशातील स्वकीय भांडवलदारांकडून, कामगारांच्या होणाऱ्या पिळवणुकीपेक्षा काही वेगळी आहे असे हो याला आढळले नव्हते. यामुळे कामगार संघटना आणि त्यांची डावी विचारसरणी याविषयी हो च्या मनात विलक्षण आकर्षण निर्माण झालेले होते. जर हो हा मायदेशातच राहाता तर कदाचित तो कडवा राष्ट्रवादी फार तर झाला असता, परंतु आपल्या राजकीय विचारांना निश्चित दिशा आणि संदर्भ त्याला सापडला असता की नाही याविषयी शंका आहे. डाव्या विचारसरणीच्या फ्रेंचांशी सतत संपर्क येत गेल्याने हो आता नुसता कडवा देशभक्त राहिला नाही तर सर्वार्थाने आणि विचाराने डाव्या विचारांचा क्रांतिकारक झाला. फ्रेंच वसाहतवाद त्याला अन्नामी देशभक्त म्हणून शत्रू मानणार असला, तरी फ्रेंच जनतेचे डावे नेते हे त्याला आपल्यातीलच एक समजणार होते.

## बेकारीचे दिवस

वस्तुतः पुढची पाच वर्षे हो याला अतिशय हलाखीची गेली. तो बराच काळ बेकार होता. या काळात त्याला जे अनुभव आले त्याने त्याच्या सहनशक्तीचा अंत पाहिला. या काळात आत्यंतिक दारिद्र्य अवस्था त्याने अनुभवली. राजकीय मारामाऱ्यात तो गुंतवला गेला. पोलिसांनी त्याला अनेक प्रकारे सतत त्रास दिला. तरीही वरवर आर्थिक अवनतीकडे जाणाऱ्या सामान्य फ्रेंच समाजाविषयी हो याच्या मनातील आकर्षण कधीही संपले नाही.

पॅरीस शहराच्या परिसरात मार्कादेत रोड, बोबेलीनस् रोड या भागात गोरगरिबांची वस्ती त्याकाळी असे. त्याच भागात हो राहात होता. वस्ती बरीचशी गलिच्छ, जागा अंधारी, भाडे बेताचे तरीही न परवडणारे, यामुळे भाडे तुंबल्यावर घरमालकाने हाकलले की दुसरी जागा पाहायची अशा रीतीने हो ने अनेकवेळा जागा बदलल्या. पण ही वस्ती काही तो सोडू शकला नाही.

यावेळी फोटोग्राफीचा धंदा नव्यानेच सुरू झाला होता आणि तो बरा चाले. स्वतःचा स्टुडिओ घालणे हो याला शक्य नव्हते. परंतु काढलेले फोटो खुलवण्याचे (touching) काम हो करी. त्यावेळच्या वृत्तपत्रात हो ची जाहिरात असे-

‘तुम्हाला तुमच्या कुटुंबाचा सदैव स्मरणात राहील असा सुंदर फोटो घरात असावासा वाटतो ना? मग फोटो ‘री-टच्’ करण्याचे काम ‘नग्यु-एन-अई-क्कोक’ यांचेकडे द्या. सुंदर फ्रेममध्ये बसवलेल्या फोटोची किंमत अवघी ४५ फ्रँक.’

सार्वत्रिक बेकारीचा प्रसंग असल्याने हो स्वतः अशा अनेक बेकारांपैकी एक होता. त्याच्याभोवती काही अन्नामी सैन्यात भरती झाले होते. ही सर्व माणसे युद्ध संपताच बेकार झालेली होती. अंगावर येऊ पाहणारा वेळ, ही मंडळी राजकारणी चर्चेत घालवू लागली. पॅरीसमध्ये हासफेल्ड नावाच्या एका चळवळ्या माणसाचे पुस्तकाचे दुकान होते. या माणसाच्या दुकानात सर्वजण जमत. या दुकानात ट्रेड युनियन चळवळीतील अनेक मंडळी नेहमी पुस्तकांसाठी येत असत. ट्रॉट्स्की देखील या दुकानात वारंवार येई. मोनात, बोर्जस, त्कॅपी हे त्यावेळचे डावे चळवळे, हो चे चांगले परिचित झाले. प्रसिद्ध फ्रेंच नियतकालिक ‘ल ह्यूमॅनिते’ (L ’Humanite) यामध्ये हो याने आपल्या ‘परदेशातील आठवणी’ या सुमारास लिहिल्या. लेखक म्हणून हो याला थोडेफार यश मिळताच, कार्ल मार्क्सचा नातू जीन याने आपल्या ‘ल पोप्युलेर’ (Le Populaire) या नियतकालिकात लिहिण्यासाठी हो याला आग्रह सुरू केला. याच सुमारास ‘यंग सोशॅलिस्ट’ या संघटनेचा हो सभासद झाला. या संघटनेचा हा पहिला अन्नामी सभासद होता.

## निष्प्राण देहावृत्ती

या काळात हो कसा दिसे याचे वर्णन त्याच्या एका समकालिनाने केलेले आहे. तो लिहितो –

‘निष्प्राण अशी ही देहावृत्ती होती. खाकेत नेहमी कसलेतरी पुस्तक धरलेले. झोला, शेक्सपिअर, डिकन्स, ह्यूगो, रोमा-रोलाँ किंवा असेच कुणाचे तरी. जूल्स राव्हेऊ नावाच्या एका बंडखोर वृत्तीच्या माणसाशी या स्वारीचा स्नेह तेव्हा जुळत चालला होता. हा जूल्स स्वित्झर्लंडमधून नुकताच परतला होता. तिथे म्हणे लेनिन आणि झिनोव्हीव बरोबर तो काम करीत असे. हो याला बोल्शेव्हिक चळवळीची माहिती देणारा, मार्गदर्शन करणारा आणि दंतकथा सांगणारा हा जूल्सच होता. या जूल्सच्या नादाने हो आता ‘ला व्ही उव्हरियेर’ (La Vie ouvriere) च्या संपादकीय कचेरीत वारंवार दिसू लागला. किरकोळ फोटोग्राफीची कामे करणारा हो अजून महिन्याची महिन्याला गाठही घालू शकत नव्हता. दिसायला बुटका, नाजूक यष्टी, चेहरा मात्र गंभीर, वृत्तीने अगदी मृदू, परंतु डोळ्यातले

चमकदार पाणी लपायचे नाही. एखादे वेड घेतलेल्या माणसाचे डोळे जसे धगधगते असतात तसे डोळे वाटायचे- थरथरणाऱ्या वातीचे. स्वभाव अतिशय भावनाप्रधान.'

'यंग सोशालिस्ट' संघटनेचा एकमेव अन्नामी सभासद आणि तीन डाव्या प्रमुख नियतकालिकांचा लेखक म्हणून हो आता अनेकांना माहीत झालेला होता. १९१८ मध्ये रशियन कम्युनिस्ट पक्षाने 'तिसरी कम्युनिस्ट इंटरनॅशनल' स्थापन केली. या इंटरनॅशनलची पहिली विश्व परिषद मॉस्को येथे लवकरच भरणार होती. या तिसऱ्या इंटरनॅशनलचा एक प्रमुख कार्यकर्ता यावेळी पॅरीसला आलेला होता आणि त्याने हो याचेबरोबर संबंध प्रस्थापित केले. या भेटीनंतर हो याने ज्या काही हालचाली केल्या, त्याचा संबंध या भेटीगाठीशीच लागतो.

कयो कोमात्सु हा जपानी लेखक या काळात पॅरीसला होता. त्याने आठवण सांगितली आहे.

'एका प्रचारसभेला मी गेलो होतो. माझ्या खांद्यावर एकदम थाप पडली. एक अगदी किरकोळ शरीराची व्यक्ती मला विचारत होती – 'तुम्ही चिनी की अन्नामी!' त्या व्यक्तीचे डोळे निखाऱ्यासारखे भेदक होते. चेहरा सुकलेला होता. मी सांगितले – 'जपानी.' माझी ही ओळख सांगितली. मग सभा सोडून आम्ही दोघे बाहेर पडलो. 'नग्युएन-अई-क्कोक' हीच ती व्यक्ती होती. आम्ही त्यानंतर अनेक वेळा भेटलो, भटकलो. आम्ही दोघे नेहमी आशियाई राष्ट्रांच्या भवितव्याचा विचार करीत असू.

## जादूची पेटी नाही!

याचा अर्थ आशियातील वसाहतवादाचे जोखड फेकण्याचे कार्य आपल्याला करावयाचे आहे, ही निश्चित अशी भूमिका हो याने या सुमारास पत्करली असावी. स्वतः हो यानेच या काळातील आपल्यातील बदल पुढे एका संभाषणात सांगितला. तो म्हणाला –

'सुरुवातीला नुसती देशभक्तीच होती! साम्यवाद वगैरे नव्हता. साम्यवादाने मला लेनिनवर आणि तिसऱ्या इंटरनॅशनलवर श्रद्धा दिली. परंतु हळूहळू पायरीपायरीने मी जसजसा लढ्यात आलो, तसतसा मी या निर्णयाला आलो की समाजवाद आणि साम्यवाद यांची कास धरल्याशिवाय कामगारांचा आणि दलितांचा उद्धार शक्य नाही. पूर्वी व्हिएतनाममध्ये म्हणा किंवा चीनमध्ये म्हणा, एका जादूच्या पेटीची दंतकथा प्रचलित होती. जर काही मोठा प्रश्न पुढे आला तर लगेच ही पेटी उघडली की झाले! त्यात त्या प्रश्नाचे उत्तर तयार असे. माझी खात्री पटली की व्हिएतनामी क्रांतीला आणि जनतेला, मार्क्सवाद-लेनिनवाद अथवा समाजवाद-साम्यवाद ही काही जादूची पेटी नाही, पण अंतिम यशाचा मार्ग उजळून टाकणारा हाच एक आदित्य आहे!'

या नव्या सूर्याच्या उपासनेचा छंद घेतलेला हा अन्नामी तरुण लवकरच पॅरीस पोलिसाचे लक्ष्य बनला. पॅरीसमधील अन्नामी चळवळ्यांवर नजर ठेवणारा पोलीसप्रमुख लुई ॲना म्हणून होता. त्याने हो याला गाठला आणि त्याच्याशी गप्पा मारीत त्याने त्याच्याकडून सर्व काही काढून घेण्याचा प्रयत्न सुरू केला. काही लपवून ठेवावे असा उद्योग अजून तरी हो याने सुरू केलेला नव्हता. यामुळे लुई ॲनाशी बोलताना हो स्पष्टपणे फ्रेंचांच्या साम्राज्यतृष्णेवर टीका करी. ॲना हा पोलीसप्रमुख होता खरा, परंतु हो हा माणूस काही सामान्य नाही, अशी त्याची खात्री पटली. त्याने वसाहतीच्या प्रश्नांचा मंत्री अल्बर्ट सरात यांच्यामागे लकडा लावला, की त्याने एकदा हो याला भेटीला बोलावावे.

मंत्री महाशय संशयी होते. त्यांना ही पोलिसांकडून आलेली सूचना स्वीकारावीशी वाटेना आणि दुर्लक्ष करण्याचाही धीर होईना! त्यांनी आपल्या चिटणीसांना हो याला भेटीस बोलवायला सांगितले.

हो भेटीला आला तेव्हा त्याचे पहिले अधिकृत छायाचित्र पोलिसांना घेता आले. तोपर्यंत फ्रेंच पोलिसांच्या दप्तरात 'नग्युएन-अई-क्वोक' या व्यक्तीचा फोटो नव्हता. फ्रेंचांबरोबर अन्नामी जनतेचा प्रतिनिधी म्हणून हो याने केलेली ही पहिलीच बोलणी होती.

हो याच्या परिवारात यावेळी आणखी दोन तरुण अन्नामी देशभक्त दाखल झाले. त्यांची नावे होती, फान-वान-ट्रुआँग आणि फान-चू-मिन्ह. या तिघांनी मिळून आता एक आठ कलमी कार्यक्रम आखला. अन्नामची स्वातंत्र्याच्या दिशेने कशी वाटचाल व्हावी याचा हा कार्यक्रम होता आणि तो संपूर्णपणे सनदशीर मार्गाने जाणार होता.

## पॅरीसची शांतता परिषद

आता १९१८ साल संपलेले होते. १० नोव्हेंबर १९१८ या दिवशी जर्मनीने शरणागती दिल्याने महायुद्धही संपले होते. जर्मनीचा रणांगणावर मोठा असा पराभव झालेला नसतानाही, शरणागती काहीशी अचानक आल्याने सर्वत्र आनंदाचे वातावरण घेऊन १९१९ साल उजाडले. लवकरच शांतता वाटाघाटीसाठी दोस्तांचे बडे नेते पॅरीसला जमा झाले. अमेरिकेचे अध्यक्ष वुड्रो विल्सन या वाटाघाटीचे प्रमुख म्होरके होते. त्यांनी आपली सुप्रसिद्ध चौदा तत्त्वे घोषित करून सर्वत्र दिलासा निर्माण केला होता. मात्र आशियातील गुलामगिरीत पडलेल्या देशांच्या दृष्टीने हा निव्वळ कागदी वाघ होता. याचा प्रत्यय अजून यायचा होता. यामुळे हो याने आपल्या दोन सहकाऱ्यांच्या मदतीने तयार केलेला अन्नामी जनतेच्या स्वातंत्र्याच्या आठ कलमी कार्यक्रम वुड्रो विल्सन यांच्याकडे धाडला. हा कार्यक्रम काय होता? आज हा कार्यक्रम आणि मागण्या वाचताना त्या अगदीच सौम्य वाटतात. हा काळाचा परिणाम आहे. मागण्या अशा होत्या-

१) फ्रेंच पार्लमेंटमध्ये अन्नामी जनतेला प्रतिनिधित्व मिळावे.

२) वृत्तपत्रस्वातंत्र्य असावे.

३) सभास्वातंत्र्य असावे.

४) संघटना बांधण्याची मुभा असावी.

५) जे देशभक्त कारावासात खितपत आहेत त्यांची मुक्तता व्हावी.

६) काहींना शिक्षेत सूट मिळावी.

७) अन्नाममध्ये घटनात्मक सरकार असावे.

८) अन्नामी व फ्रेंच यांना समान कायदे असावेत.

हो याने स्वतः वुड्रो विल्सन यांची भेट घेऊन या मागण्या फ्रेंचांना मान्य करायला लावा असा आग्रह धरला. थोड्याशा चर्चेनंतर लगेचच वुड्रो विल्सन यांनी हो याला उद्धटपणे दरवाजा दाखवला.

विनंती करताच अध्यक्ष वुड्रो विल्सन यांचा अन्नामच्या स्वातंत्र्यलढ्याला पाठिंबा मिळेल अशी अपेक्षा अर्थातच नव्हती. परंतु यामुळे अन्नामच्या स्वातंत्र्याचा एक नेता म्हणून हो याचे नाव फ्रान्सभर झाले. विल्सनसाहेबांना तरी इतका वेळ कुठून असणार? कारण अरब, कूर्द, अर्मेनियन्स, ज्यू, चिनी अशी सर्वच माणसे विल्सन यांना आळवण्यासाठी पॅरीसला जमलेली होती; आणि इंग्लंड-फ्रान्सला दुखवून या सर्वांच्या स्वातंत्र्याचा प्रश्न धसाला लावण्याची वुड्रो विल्सन यांच्यात धमक नव्हती.

हो याच्या नावाभोवती एक नवे वलय या घटनेने कसे निर्माण झाले, यासंबंधी एक अन्नामी विद्यार्थी बुई-लाय याने आपल्या आठवणीत लिहिलेले आहे. तो लिहितो –

> ‘व्हर्साय येथे सर्व साम्राज्यवादी जमलेले होते. जो तो आपल्या पोळीवर वसाहतीचे तूप ओढण्यात निमग्न असताना, नग्युएन-अई-क्वोक याने धीटपणे अन्नामच्या स्वयंनिर्णयाची मागणी पुढे मांडली. एखादी वीज लखकन् चमकावी किंवा मेघांचा गडगडाट वसंतऋतूत अचानक कानावर पडावा तसे आम्हाला वाटले! एक अन्नामी तरुण मागणी करत होता – अन्नामींच्या न्याय्य हक्काची! आम्ही या माणसाला मनोमन वंदन केले. कुणीही दोन अन्नामी भेटले तर नग्युएन-अई-क्वोक याचे नाव निघाल्याशिवाय आता राहातच नसे.’

आणखी एक आठवण बुई-लाय यांनी सांगितलेली आहे, ती अतिशय हृद्य आहे. बुई-लाय लिहितो-

> ‘हो याचे अनेक लेख मी वाचलेले होते. असे मनात आले की हा माणूस एकदा जवळून पाहावा. एके दिवशी उठलो आणि ६ रूदेस गोबलिन्स हा पत्ता हुडकून काढून दारावर थाप मारली. कसे काय आपले स्वागत होते या विचाराने माझे हृदय धडधडत

होते. दरवाजा उघडला गेला. समोर एक विशीचा तरुण उभा होता. अंगाने अगदी किरकोळ, रंग काहीसा उजळ, अंगावर गडद रंगाचा सूट चढवलेला परंतु हालचालीत एक नोकझोक होता. आपले पाणीदार डोळे त्याने माझ्यावर रोखले. मी माझी ओळख करून दिली. मग आमच्या गप्पा रंगल्या. त्याने मला व्हिएतनामसंबंधी अनेक प्रश्न विचारले. फ्रान्समधील कष्टकरी वर्ग आणि फ्रेंचांच्या वसाहतीतील कष्टकरी वर्ग यांचे हितसंबंध कसे एकच असू शकतात याबद्दल विस्ताराने बोलणे झाले. हो ची स्वारी मी गेलो तेव्हा कुठेतरी जाण्याच्या गडबडीतच होती. आर्ट गॅलरीत कसलेतरी प्रदर्शन पाहाण्यासाठी त्यांनी आपल्याबरोबर मलाही खेचून नेले. तिथे हो याचे असंख्य चाहते भेटले आणि आश्चर्य म्हणजे हे काही सगळे व्हिएतनामी नव्हते. त्यात अनेक थरातील फ्रेंच माणसेही होती.'

चांगले फ्रेंच मित्र गोळा करणे हा हो चा एक नादच होता. अन्नामी जनतेविषयी आस्था बाळगणारा कुणी आढळला की हो त्याच्याकडे धाव घेत असे. हो याचा सहकारी फान-चू-मिन्ह याला व्हिएतनामच्या स्वातंत्र्याची मागणी करणारा एक जळजळीत लेख लिहिल्याबद्दल फाशीची शिक्षा मिळालेली होती! परंतु मिन्ह याला या यमपाशातून सोडवण्यात एका फ्रेंचानेच पुढाकार घेतला! त्याचे नाव बाबत. जमेल तेव्हा औपचारिक आभार अशी हो याची वृत्ती नव्हती. हो हा स्वतः बाबत यांच्या घरी गेला आणि 'आपणच ते काय?' असे म्हणत त्याने आनंदाने मिठीच मारली. त्यांच्या उपकारांचे ऋण कसे फेडावे हे त्याला कळत नव्हते. त्याच्या डोळ्यांवाटे मात्र कृतज्ञतेचे अश्रू घळाघळा वाहात होते!

## आंतरराष्ट्रीय परिषदेत पहिले भाषण

मनाने हळवा असलेला हा अन्नामी देशभक्त वादविवाद सुरू झाल्यावर मात्र कणखरपणाने झुंजत असे. युरोपातील सोशालिस्टांची जी काँग्रेस तूर येथे भरली, तिला इंडोचायनाचा प्रतिनिधी म्हणून हो हजर होता. या काँग्रेसला जो फ्रेंच कम्युनिस्टांचा गट हजर होता त्यांच्याबरोबर हो बसत असे. २८ डिसेंबर १९२० या दिवशी या काँग्रेसमध्ये हो याचे भाषण झाले. या काँग्रेसचा समग्र वृत्तांत त्यावेळच्या वृत्तपत्रांतून आलेला आहे.

अध्यक्षांनी पुकारा केला – 'आता इंडोचायनाचे प्रतिनिधी भाषण करतील.'

हो याने व्यासपीठावर जाऊन भाषणाला सुरुवात केली. आपल्या भाषणात तो म्हणाला,

'कॉमरेडस्, आपण जी जागतिक क्रांतीची चळवळ उभारीत आहात त्यात मला मनःपूर्वक सामील होता आले असते, तर मला मोठाच आनंद झाला असता. परंतु दुर्दैवाची गोष्ट अशी की, मी आज एक समाजवादी म्हणून इथे जो उभा आहे, तो माझ्या

मायदेशात जे अत्याचार अन्नामी जनतेवर घडत आहेत त्यांच्याविरुद्ध आवाज उठविण्यासाठी.'

'आपल्याला हे माहीत आहे की अर्धशतकापूर्वी फ्रेंच भांडवलशाही इंडोचायनामध्ये अवतरली. बायोनेट रोखून त्यांनी आमच्यावर कब्जा केला आणि तेव्हापासून आमच्या छळाला सुरुवात झाली. आम्ही नुसते पिळले जात नाही तर अफू आणि अल्कोहोल यासारख्या व्यसनांच्या आयातीने आमच्या जनतेवर विषप्रयोगच सुरू झालेला आहे. काही मिनिटांचाच वेळ मला देण्यात आला आहे आणि इतक्या थोड्या वेळात माझ्या देशात फ्रेंचांनी चालवलेल्या जुलुमाची कहाणी समग्रपणे सांगणे कठीण आहे. आमच्या देशात शाळांच्या संख्येपेक्षा तुरुंगाची संख्या अधिक आहे! आणि हे सर्व तुरुंग भरभरून वाहत आहेत. जो जो कुणी समाजवादी विचारांचा आहे असे राज्यकर्त्यांच्या कानावर जाते, त्याला तुरुंगात फेकण्यात येते. तिथे न्याय असा काहीच उरलेला नाही.'

'आम्हाला आमच्याच देशात कसलेही स्वातंत्र्य नाही. वृत्तपत्रस्वातंत्र्य नाही, सभास्वातंत्र्य नाही, देशाबाहेर पडण्याचे स्वातंत्र्य नाही, शिक्षणाचे स्वातंत्र्य नाही. हजारो अन्नामी देशभक्तांना फासावर लटकवण्यात आलेले आहे आणि हजारो तुरूंगात खितपत आहेत. त्यांचा गुन्हा काय आहे? फ्रेंच भांडवलशाहीच्या हितासाठी हा सर्व अन्याय केला जातो आहे.'

'आम्ही लोकसंख्येने फ्रान्सच्या लोकसंख्येच्या निम्म्याहून अधिक आहोत. आमच्या वतीने या समाजवाद्यांच्या सभेने आवाज उठवला पाहिजे.'

हो याचे हे भाषण चालू असताना फ्रेंच प्रतिनिधी सारखा अडथळे आणून ओरडत होता –

'आम्ही पार्लमेंटमध्ये याबद्दल निषेधाचा ठराव आणलेला आहे!' हो त्याला ओरडून गप्प राहण्यास सांगत होता. अखेर अध्यक्षांनी अडथळा आणणाऱ्याला ओरडा थांबवण्याचा इशारा देताना म्हटले-

'गुलाम देशात होणाऱ्या अत्याचाराचा निषेध करायला फक्त पार्लमेंट ही एकच जागा नाही!'

हो याचे भाषण संपल्यावर टाळ्यांचा प्रचंड कडकडाट झाला. अध्यक्षांनी त्याला आश्वासन दिले –

'इंडोचायनाच्या प्रतिनिधीच्या भाषणाचे इथे जे प्रचंड कौतुक झाले आहे त्याचा अर्थ असा आहे की ही समाजवादी परिषद थैलीशहांनी केलेल्या अत्याचारांचा एकमुखाने निषेध करते आहे!'

# ३ : नव्या धर्माचा स्वीकार

'गुलाम देशात होणाऱ्या अत्याचारांचा निषेध करायला पार्लमेंट ही एकच जागा नाही-' हा समाजवाद्यांचा तूर येथील परिषदेत अध्यक्षांनी दिलेला इषारा, त्यावेळी समाजवादी विचारवंतात जी फाटाफूट माजली होती, त्याचा निदर्शक होता. अधिक डावा कल असलेल्या क्रांतिकारकांचा ओढा या रशियात कम्युनिस्ट पक्षाने स्थापन केलेल्या 'तिसऱ्या इंटरनॅशनल'कडे होता. याउलट समाजवादी व राष्ट्रवादी असलेले विचारवंत हे लोकशाही मार्गाने समाजवाद आणू इच्छिणारे आणि एका राष्ट्राने दुसऱ्या राष्ट्राच्या राजकारणात हस्तक्षेप करू नये या तथाकथित उदात्त विचाराने भारलेले होते.

## मॉस्को ही पंढरी, क्षेत्र व्होल्गातीर!

एका राष्ट्राने दुसऱ्या राष्ट्राच्या राजकीय धोरणावर टीका करायची नाही हा दंडक पत्करला तर प्रतिगामी राष्ट्रवाद्यांच्या अंतर्गत जुलुमाचा मुकाबला इतर देशातील साम्यवादी करणार कसा? पार्लमेंट हीच निषेधाची एकमेव जागा मानली तर सर्व देशांतर्गत क्रांती प्रयत्नांवर पाणी सोडायला नको का? असे हे प्रश्न होते. हो हा जात्याच हिंसात्मक चळवळीकडे ओढा नसलेला, हळवा देशभक्त होता. परंतु पूर्ण विचारांती त्याने 'तिसऱ्या कम्युनिस्ट इंटरनॅशनल'ला अभिप्रेत असलेला मार्ग हाच प्राप्त परिस्थितीत वसाहतवाद आणि भांडवलशाहीविरुद्ध झगडण्याचा एकमेव मार्ग आहे असा मनाशी निर्णय केलेला होता. जागतिक क्रांतीचे स्वप्न पाहाणाऱ्या वारकऱ्यांच्या दिंडीत सामील होणाऱ्यांच्या दृष्टीने मॉस्को हीच या मार्गाची एकमेव पंढरी होती. याक्षणी 'लेनिनीझम' चा मार्ग आपण का पत्करला यासंबंधी व्हिएतनाममधील एका वृत्तपत्रात जुलै १९२० मध्ये हो याने जे विवेचन केले आहे ते पुरेसे बोलके आहे. या लेखात हो याने म्हटले आहे-

'पहिले महायुद्ध संपले तेव्हा मी पॅरीसमध्येच उदरनिर्वाह करीत होतो. वसाहतवादाविरुद्ध आवाज उठवणारी पत्रके वारंवार काढणे हा माझा एक उद्योग होता. त्यावेळी मी ऑक्टोबर क्रांतीचा समर्थक होतो. कारण त्या क्रांतीविषयी एक प्रकारची उत्स्फूर्त ओढ सहवेदनेमुळे माझ्या ठिकाणी निर्माण झालेली होती. या क्रांतीचा संपूर्ण ऐतिहासिक संदर्भ मला कळलेला नव्हता. लेनिनवर माझी भक्ती जडली ती तो एक महान देशभक्त होता आणि त्याने आपल्या देशबांधवांना झारशाहीतून मुक्त केले म्हणून. मी अजूनपर्यंत त्याचे काहीही लिखाण वाचलेले नव्हते.

'मी फ्रेंच समाजवादी पक्षाचा सभासद झालो होतो याचे शुद्ध कारण इतकेच की भरडल्या जाणाऱ्या जनतेविषयी या मंडळींना अनुकंपा होती. समाजवाद वा मार्क्सवाद

यातील फरक मला तोपर्यंत कळलेला नव्हता.'

'तिसऱ्या कम्युनिस्ट इंटरनॅशनलचे सभासदत्व पत्करावे ही दुसऱ्या इंटरनॅशनलमध्येच राहावे की एक 'अडीच इंटरनॅशनल'च काढावी, यासंबंधाने कडाक्याचे वादविवाद चालतात. मला प्रथम तर हे सर्व काय चालू आहे तेच कळेना! इतक्या त्वेषाने ही मंडळी हमरीतुमरीवर कशी काय येतात? क्रांती करायची तर कुठल्याही इंटरनॅशनलखाली होणार नाही का? यासंबंधी एवढे वादंग कशाला आणि पहिल्या इंटरनॅशनलचे नेमके काय झाले?'

'मला ज्या प्रश्नाचे उत्तर हवे होते त्या प्रश्नाचे उत्तर या चर्चेत मला कधीही ऐकता येत नसे. मला उत्तर ऐकायचे होते तो प्रश्न असा होता – जुलुमाखाली चिरडल्या जाणाऱ्या जनतेच्या लढ्याला कुठल्या इंटरनॅशनलचा पाठिंबा आहे?'

'एका सभेत शेवटी मीच हा प्रश्न विचारला. एक साथी म्हणाला – तिसरी... तिसरी इंटरनॅशनल... दुसरी याबाबतीत थंड आहे!' एकाने मला सांगितले – 'लह्युमॅनिते' या नियतकालिकातील लेनिनचा 'राष्ट्रीयतेचे प्रश्न आणि वसाहतीतील जनता' हा लेख वाचा.

'आता लेनिनच्या लेखात राजकीय विचार मांडणारे असे काही शब्द समूह होते की त्याचा मला अर्थच कळेना! शेवटी पुनः पुन्हा तो लेख वाचून मी मतितार्थ अखेर समजावून घेतला. लेनिनच्या सिद्धांताने मी भारून गेलो. उत्साहाने न्हाऊन निघालो. माझे सर्व संदेह संपले. मला सर्व प्रश्नांची उत्तरे स्पष्ट दिसू लागली. मला इतका आनंद झाला की डोळ्यावाटे अश्रू ओघळू लागले. माझ्या खोलीत मी एकटाच असूनही जणू अफाट जनसंपर्कापुढे बोलावे तसे मी उद्गारलो – 'माझ्या देशभक्त परंतु दुर्दैवी देशवासीयांनाही आपली गरज होती... हाच आमच्या मुक्ततेचा मार्ग आहे!'

'यानंतर मी माझा सर्व विश्वास लेनिन आणि तिसऱ्या इंटरनॅशनलला अर्पण केला.'

## नव्या धर्माचा स्वीकार

लेनिनवादाचा उपासक होताच, हो याच्या ठिकाणची गोंधळलेली वृत्ती संपली. आतापर्यंत इतर जे सांगतील ते ऐकून घेणे हा हो याचा सहजधर्म होता. दोन बाजूंची तरफदारी ऐकून त्याला सत्य हे दोन्हीकडे आहे असे वाटून अखेर कसलाच निर्णय आतापर्यंत घेता येत नसे. आता त्याची ही संदेहाची-त्रिशंकू अवस्था संपली. जे जे लेनिनच्या विरोधी बोलत वा 'तिसऱ्या इंटरनॅशनल'ला नावे ठेवीत त्यांच्यावर हो आता तुटून पडू लागला. त्याचे वादाचे मुख्य सूत्र एकच-

'मित्रांनो, तुम्ही जर वसाहतवादाचा धिःकार करणार नसाल, गुलामगिरीत पडलेल्या जनतेला जर तुम्ही पाठिंबा देणार नसाल, तर कसली कपाळाची क्रांती तुम्हाला अभिप्रेत

आहे?’

या नव्या लेनिनप्रणीत धर्माच्या स्वीकारानंतर हो याला फ्रेंच कम्युनिस्ट पक्षापासून दूर राहणे अशक्य होते. तो फ्रेंच कम्युनिस्ट पक्षाचा सभासद झाला आणि त्याला ‘नऊ’ क्रमांकाच्या गटाचे सभासदत्व पक्षाने दिले. फ्रेंच कम्युनिस्ट पक्षातील ‘नऊ’ क्रमांकाचा गट हा मुख्यतः बुद्धिवादी विचारवंत तरुणांचा गट होता, याच गटात जॉर्जेस पिओच हा तिखट लेखणीचा पत्रकार आणि बेरिस सुवारीन हा मार्क्सवादाचा प्रमुख प्रवक्ता हे दोघे अंतर्भूत केलेले होते. मार्सेलिस येथे १९२१ च्या डिसेंबरात जी कम्युनिस्ट पक्षाची काँग्रेस भरली, तिला या दोघांसमवेत हो देखील हजर राहिला.

फ्रेंच कम्युनिस्ट पार्टीची सूत्रे हलवण्यात राडी हे एक प्रमुख होते. पक्षात नव्याने दाखल झालेल्यांचे शिक्षण बहुधा राडी यांचेकडे सोपवण्यात येत असे. राडी यांचे दोन मुलगे व्होल्टेर आणि रेनान हे लवकरच हो याचे मित्र झाले. यापैकी व्होल्टेर हा कम्युनिस्ट पक्षातील तरुणांचे नेतृत्व करणारा धडाडीचा कार्यकर्ता होता. जॉर्जेस पिओच याने हो याचे जवळ वादविवाद कौशल्य आणि वक्तृत्व या गुणांचा विशेष अभ्यास करण्याचा आग्रह धरला. कार्यकर्त्यांच्या ज्या चर्चा होत, त्यात हो याला भाग घ्यायला पिओच भाग पाडीत असे. लवकरच हो याच्या ठिकाणचे उरलेसुरले बुजरेपण संपुष्टात आले. शब्दासाठी अडखळणे संपले. हो याची भीती निकालात निघाली आणि उत्तम वक्तव्य त्याला जमू लागले.

## बांबू ड्रॅगन

१९२२ मध्ये अन्नामचा नामधारी सम्राट काई-दिन्ह फ्रान्सच्या दौऱ्यावर आला. मार्सेलिस येथे एका प्रदर्शनाला त्याची भेट जाहीर झालेली होती. ही संधी साधून हो याने ‘बांबू ड्रॅगन’ नावाने एका सम्राटाची टिंगल करणारे प्रहसन लिहून ते प्रसिद्ध केले. आणि शिवाय सम्राटाला लिहिलेले एक अनावृत्त पत्र वृत्तपत्रातून प्रसिद्ध केले. या उपरोधपूर्ण पत्रात याने काही बोचरे प्रश्न काई-दिन्ह याला विचारले होते –

‘युवर मॅजेस्टी, काव्यात्म वृत्तीच्या या फ्रान्सच्या भूमीवर आपली जी अभ्यासपूर्ण सफर सध्या सुरू आहे. या सफरीत लाँगचॅम्प येथील रेसचे घोडे आणि फ्रेंच ऑपेरातील फ्रेंचसुंदरी या व्यतिरिक्त अन्य कोणत्या गोष्टी पाहाण्याचा आपला विचार आहे?’

‘या फ्रेंचांना न्याय, स्वातंत्र्य आणि श्रम याचे मोठे अपुप आहे. युवर मॅजेस्टी, – आपण या सत्याची दखल घेणार आहात काय? परस्पर बंधुभाव, शांततेवरील नितांत श्रद्धा ह्या गोष्टी फ्रेंच जनतेच्या रोमारोमात आज खेळत आहेत, कारण या माणसांनी सम्राटाची आणि राजेराजवाड्यांची सिंहासने उलथीपालथी करून अनेक क्रांत्यांनंतर आपली मुक्तता साध्य केलेली आहे. या घटनांची वास्तपुस्त तरी महाराज आपल्याला आहे काय?’

'महाराज, औपचारिक सरकारी स्वागतपर भाषणे आणि बाजारी वृत्तपत्रे यांच्यापलीकडे आपण कुठे डोकावला आहात का? पाश्चर, व्हाल्टेअर, ह्युगो, अनातोल, फ्रान्स, यांच्या कर्तबगारीसंबंधी आपल्या कानावर कुणी काही घातले आहे का?''

## 'ल पारीय' कालखंड

हो याचे पहिले पुस्तक याच सुमारास प्रसिद्ध झाले. 'फ्रेंचांच्या वसाहतवादाचे स्वरूप' या शंभर पृष्ठांच्या छोटेखानी पुस्तकात दा होमी, मादागास्कर, वेस्ट इंडिज येथील फ्रेंच वसाहतीतील दडपशाहीची उदाहरणेही तुरळकपणे दिलेली असली तरी मुख्यतः या पुस्तकात फ्रेंच-इंडोचायनामधील जुलुमजबरदस्तीचीच कहाणी विस्तृतपणे सांगितलेली आहे. 'जगातल्या सर्व कामगारांनो एक व्हा, कारण हातातील बेड्यांखेरीज गमावण्यासारखे तुमच्यापाशी काहीच नाही-' या सुप्रसिद्ध लेनिन संदेशाने या पुस्तकाचे भरतवाक्य थाटलेले आढळते. या पुस्तकाची रचना विस्कळीत आहे आणि प्रामुख्याने या फ्रेंचांच्या इंडोचायनातील साम्राज्यनीतीवर कोरडे ओढलेले आहेत. अन्नामी तरुणांना फ्रेंच लष्करात भरती करून त्यांची स्वार्थासाठी हत्या घडवणाऱ्या फ्रेंचांच्या धोरणावर या पुस्तकात हो याने लिहिले आहे –

'बाल्कन्सच्या त्या वाळवंटात हे बिचारे अन्नामी तरुण गडप झाले! आपल्या मायभूमीने तुर्कांच्या जनानखान्यात मानाचे स्थान मिळवण्यासाठी आपलीच निवड का करावी याचे त्यांना मरताना आश्चर्य वाटत असावे! नाहीतर त्या बिचाऱ्यांना कापून काढण्यासाठी इतक्या दूरवर कशाला आणले गेले असते? इतर कित्येक अन्नामी तरुणांची मारने नदीच्या तीरावर अथवा चॅम्पेनच्या चिखलात कत्तल उडवण्यात आली, ती एखाद्या फ्रेंच कमांडरच्या छातीवरील पदकांना रक्ताने न्हावू घालण्यासाठीच ना? या हुतात्म्यांच्या हाडातूनच फ्रेंच मार्शलांच्या हातातील बॅटन्स बनवण्यात आली होती ना?...'

हो च्या या पुस्तकाची भाषा अशी अलंकृत असली तरी वसाहतवादाविरुद्ध त्यात शास्त्रशुद्ध टीकाही आढळते. या पुस्तकातील बहुतेक लेखन हे 'ल पारीय' या नियतकालिकात प्रसिद्ध झालेल्या हो च्या लिखाणाचेच पुनर्मुद्रण होते. हे नियतकालिक एप्रिल १९२२ ते एप्रिल १९२६ अशी चार वर्षे चालू राहिले असले तरी हो याने पहिली दोन वर्षे आपल्या बोचऱ्या आणि उपरोधिक लेखनाने या नियतकालिकाचे नाव केले. प्रथम हे एक पानाचे पत्र मासिक म्हणून निघे. कालांतराने त्याचे पाक्षिक झाले आणि बंद पडण्यापूर्वी ते जमेल तेव्हा निघत असे. विशेषतः १९२३ मध्ये हो मॉस्कोला निघून गेल्यानंतर या नियतकालिकांची दुर्दशाच झाली.

'ल पारीय' पत्राचा रंग हो ने कधी लपवला नाही. या पत्राच्या नजरेपुढे जागतिक कम्युनिस्ट क्रांतीचे स्वप्न तरळत होते, ही गोष्ट वारंवार स्पष्ट झालेली होती. लेनिन मरण

पावला तेव्हा 'ल पारीय' चा खास अंक निघाला होता. असा एकही अंक नसे की ज्यात सोव्हिएट रशियातील एखाद्या नव्या घटनेचे कौतुक नसे. मग कधी ही घटना सामुदायिक शेतीचा श्रीगणेशा असे तर कधी मॉस्कोमधील पौर्वात्य लोकांसाठी उघडलेल्या युनिव्हर्सिटीचे उद्घाटन असे. हो हा मध्यंतरी मॉस्कोला गेला असला तरी डिसेंबर १९२४ पर्यंत त्याच्या नावाने खास लेख या नियतकालिकातूनच येतच असत. 'ल पारीय' च्या तिसाव्या अंकात आलेल्या अॅग्लो-अमेरिकनांना चीनमधील हस्तक्षेपाबाबत इशारा देणारा 'हँडस् ऑफ चायना' हा हो याचा अखेरचा लेख होय आणि तो इंग्रजीत होता! हो याच्या राजकारणाकडे पाहण्याच्या दृष्टिकोणात मार्क्सवादाने केवढी क्रांती घडवली होती, याची प्रचीती देणारा हा लेख आहे.

## मॉस्को गाठले

हो याने १९२३ च्या मध्यास पॅरीसचा निरोप घेतला व तो मॉस्कोत दाखल झाला. तो नेमका कोणत्या दिवशी पॅरीसमधून बाहेर पडला याबाबतीत निश्चित माहिती अजून उपलब्ध झालेली नाही. रूथ फिशर या जर्मन कम्युनिस्ट पक्षाच्या स्त्री कार्यकर्तीने जे लेनिनविषयक पुस्तक 'लेनिन ते माओ' १९५६ मध्ये प्रसिद्ध केले, त्यात तर तिने म्हटले आहे की हो हा १९२२ मध्येच मॉस्को येथे आला व तिसऱ्या कम्युनिस्ट इंटरनॅशनलच्या चौथ्या काँग्रेसला तो हजर होता. शक्यता अशी आहे की हो याने १९२२ मध्ये मॉस्कोवारी केली असेल व तो पॅरीसला परतला असेल. नंतर जून १९२३ मध्ये त्याने पुनः पॅरीस सोडले असेल.

एक गोष्ट निश्चित की लेनिनच्या निधनानंतर काही दिवसातच हो मॉस्कोला पोचलेला होता. २७ जानेवारी १९२४ च्या प्रावदामध्ये हो याने लेनिनला श्रद्धांजली वाहिलेली आढळते. यात हो याने म्हटले होते....

'लेनिनचा मृत्यू झालेला आहे. आपण यापुढे काय करणार आहोत? भांडवलशाही राष्ट्रांच्या वसाहतीतील चिरडलेली जनता दुःखित अंतःकरणाने हा प्रश्न स्वतःलाच विचारीत आहे.'

पॅरीस सोडण्यापूर्वी कयो कोमात्सू या जपानी लेखक मित्राला हो याने मॉस्कोला चलण्याचा आग्रह केला. यावेळचे त्याचे संभाषण सांगण्यासारखे आहे. हो ने आग्रह चालवला –

'माझ्याबरोर मॉस्कोला चल...'

कोमात्सू याने म्हटले-

'मी कला आणि साहित्य या प्रांतात रमणारा माणूस. मी मॉस्कोला येऊन काय करू? मला माझ्या दृष्टीने पॅरीसच उपयुक्त आहे...'

'या असल्या सडलेल्या समाजात कसली कला शक्य आहे? ....' हो याने हा टोमणा देऊन सांगितले- 'प्रथम आपण क्रांतीला वाहून घेऊ या आणि मग वर्गविरहित समाजाच्या घटकांसाठी तुला मनसोक्त लिहिता येईल...!'

कला, साहित्याकडे पाहाण्याचा कम्युनिस्ट दृष्टिकोणाचा हा एक चांगला मासला आहे!

अखेर हो एकटाच मॉस्कोला पोचला. तिथे गेल्यावर पौर्वात्य कामकरी वर्गासाठी, मॉस्को विश्वविद्यालयाने सुरू केलेल्या अभ्यासक्रमात हो दाखल झाला. याशिवाय 'प्रावदा' पत्रात तो अधूनमधून लेखनही करू लागला. कोमिन्टर्नच्या वर्तुळात लवकरच हो चे व्यक्तिमत्त्व उठून दिसू लागले. रूथ फिशर म्हणते –

> 'हो प्रथम जेव्हा मॉस्कोला आला तेव्हा अगदीच शामळू वाटला. भारतीय क्रांतिकारक एम. एन. रॉय यांची धडाडी व चमक या माणसापाशी नव्हती. परंतु लवकरच तो सर्वांच्या आदराचे व प्रेमाचे स्थान झाला.'

याची काही कारणे होती. पहिली गोष्ट हो हा अत्यंत सुस्वभावी व मृदू अंतःकरणाचा साधासुधा माणूस असल्याने त्याच्याबद्दल कुणालाच दुरावा वाटत नसे. दुसरी गोष्ट कोमिन्टर्नमध्ये जी अंतर्गत मतभेदाची वादळे उठत त्यापासून हो हा दूर राहू शके. कारण आपले म्हणणे स्पष्टपणे मांडल्यानंतर त्याचा सर्व व्यवहार हा अतीव सभ्यतेचा असे. तिसरी गोष्ट सिद्धांताच्या चर्चेच्या बडबडीपेक्षा प्रत्यक्ष काम हे तो प्रमाण मानीत असे. चौथी गोष्ट 'रोकडा तो अनुभव' यावर त्याची भिस्त असे. कोण कुणाशी कसा वागला यापेक्षा तो आपणाशी कसा वागतो यावर त्याची निदाने आधारलेली असत. असे असूनही प्रत्येकाला त्याच्याविषयी आदर वाटे. पुढे त्याचे वजन पक्षात वाढतच गेले. आशियाई नेत्यांत फार मोठ्या गोष्टीत हो याचा मोठा वाटा आहे. परंतु रॉय इतका त्याचा गवगवा नाही. माओ तर त्यावेळी कुणाच्या खिजगणतीतही नव्हता.

लेनिन व हो यांची दुर्दैवाने प्रत्यक्ष भेट होऊ शकली नाही. परंतु लेनिनच्या सर्व सहकाऱ्यांशी त्याचे उत्तम संबंध जडले. रादेक, झिनोव्हिव, स्टॅलीन या सोविएट नेत्यांप्रमाणेच परदेशातून आलेले कम्युनिस्ट नेते डिमिट्रॉव्ह, थाएलमान, लिलिसान आणि रॉय या सर्वांशी हो याचा घनिष्ठ संबंध लवकरच जडला. फक्त एम. एन. रॉय यांच्या मताप्रमाणे 'हो याची आकलनशक्ती फारशी तीव्र नव्हती!' रॉय यांचा अपवाद करता इतर सर्वांना मात्र तसे वाटत नसे.

## माओ विचाराचा पूर्वसूर

१७ जून १९२४ ते ८ जुलै १९२४ पर्यंत चालू राहिलेल्या ‘तिसऱ्या कम्युनिस्ट इंटरनॅशनल’च्या पाचव्या काँग्रेसमध्ये हो याने महत्त्वाची भाषणे केली. कम्युनिस्ट चळवळीच्या इतिहासात ही भाषणे उद्धृत केलेली आहेत. एका भाषणात त्याने आता प्रामुख्याने माओ-विचार म्हणून ओळखला जाणारा शेतकऱ्यांच्या उठावाचा विचार आवेशाने मांडलेला दिसून येतो. या भाषणात हो याने म्हटलेले होते –

> ‘साम्राज्यवाद्यांच्या वसाहतीतील शेतकरीवर्ग बंडाच्या उंबरठ्यावर पोचलेला आहे. अनेक शेतकऱ्यांचे लहानमोठे उठाव हे रक्ताच्या नद्यात बुडून गेले आहेत! आज जर शेतकरी वर्ग काहीसा निराशामय अवस्थेत असेल, तर याला कारणे केवळ संघटनेचा आणि योग्य नेतृत्वाचा अभाव हीच आहेत. कम्युनिस्ट इंटरनॅशनलचे हे कर्तव्य आहे की वसाहतीतील गुलाम शेतकऱ्यांच्या संघटना बांधण्यासाठी त्यांनी काहीतरी हालचाल करायला हवी....’

या पाचव्या काँग्रेसमध्ये भाग घेतल्यानंतर लगेचच हो याचा मॉस्कोमधील वास्तव्याचा पहिला कालखंड संपुष्टात आला. यापुढची वीस वर्षे त्याने चीनमध्ये काढली. ज्या धोरणाचा पुरस्कार त्याने पाचव्या काँग्रेसमध्ये केला त्याच धोरणाचा पाठपुरावा करण्यासाठी कम्युनिस्ट इंटरनॅशनलने हो याला चिनी कम्युनिस्ट पक्षाच्या उभारणीत सहकार्य करण्यासाठी चीनमध्ये धाडण्याचा निर्णय घेतला.

## चिनी कम्युनिस्ट पक्ष

१९२१ च्या मे महिन्यात शांघाय येथे ठिकठिकाणचे चिनी कम्युनिस्ट कार्यकर्ते एकत्र येऊन ‘चिनी कम्युनिस्ट पक्ष’ निर्माण करण्याचा निर्णय झाला होता. शांघायलाच जुलैमध्ये पक्षाची रीतसर स्थापना होऊन पहिली काँग्रेस भरली. या पहिल्या परिषदेला लेनिनचा खास दूत ग्रिगार्जी व्हाइटनिस्कीजी व डच कम्युनिस्ट कार्यकर्ता मारिंग असे दोघे हजर होते. या पहिल्या परिषदेत चिनी कम्युनिस्टांनी असा निर्णय घेतला की, ‘तिसऱ्या कम्युनिस्ट इंटरनॅशनलशी आत्ता नाते जोडू नये. परंतु तिसऱ्या कम्युनिस्ट इंटरनॅशनलची अतिपूर्व भागातील काम पाहण्यासाठी इर्कूत्सक येथे जी कचेरी आहे, त्या कचेरीला चिनी कम्युनिस्टांनी आपल्या कामाचा अहवाल मात्र दरमहा द्यावा. या परिषदेतच हुनान प्रांतातील चिनी कम्युनिस्ट पक्षाचा चिटणीस म्हणून माओ यांची नियुक्ती झाली व माओ चांगशाला परतलेला होता. सर्व चिनी कम्युनिस्ट पक्षाचे मिळून ६०-७० तर सभासद होते आणि त्यातला मोठा गट हा माओच्या हुनान प्रांतातील होता. म्हणजे चिनी कम्युनिस्ट पक्षाचे भवितव्य हे प्रमुखतः माओच्या कर्तृत्वावरच अवलंबून होते.

चिनी कम्युनिस्ट पक्षाच्या कामाला हुनान प्रांतात जोराने सुरुवात झाल्यानंतर १९२२ च्या ऑगस्टमध्ये चीनमधील सोविएट वकील जॉफी याने डॉ. सन्यतसेनशी संबंध प्रस्थापित करून चिनी कम्युनिस्टांना कोमिंग्टांग पक्षात दाखल करून घ्या असा आग्रह सुरू केला. या प्रयत्नांना फारसे यश येण्याचे चिन्ह दिसत नव्हते. १९२३ च्या फेब्रुवारीत कॅन्टोन येथील स्वतंत्र सरकारचा 'ग्रँड मार्शल' म्हणून डॉ. सन्यतसेन याने सूत्रे हाती घेतल्याबरोबर त्याने मात्र लगोलग आपला एक प्रतिनिधी मॉस्कोला रवाना केला. हा त्याचा प्रतिनिधी म्हणजे पुढे माओविरुद्ध लढून पराभूत झालेला आणि आज तवान बेटावर चीनचे राष्ट्रीय म्हणवणारे परागंदा सरकार चालवणारा चँग कै शैक हा होय. १९२३ च्या मे महिन्यात चँग कै शैक मॉस्को येथे दाखल झाला. वर्षभरापूर्वी डॉ. सन्यतसेन याला चिनी कम्युनिस्टांचा कोमिंग्टांग पक्षातील प्रवेश हा त्रासदायक व गुंतागुंत निर्माण करणारा वाटत होता. परंतु आता परिस्थितीच अशी निर्माण झाली होती की कॅन्टोन सरकार जगवायचे, तर त्याला जास्तीत जास्त पाठिंबा मिळवण्याची गरज डॉ. सन्यतसेन यालाच भासू लागलेली होती आणि त्या दृष्टिने चिनी कम्युनिस्ट पक्ष आणि कोमिंग्टांग पक्ष यांच्यात काही समझोता व परस्पर सहयोग घडेल तर त्याची डॉ. सन्यतसेन याला अतिशय निकड लागलेली होती. डॉ. सन्यतसेन याच्या विनंतीवरून मॉस्कोहून मायकेल बोरोदीन याला कम्युनिस्ट इंटरनॅशनलतर्फे सल्लागार म्हणून चीनमध्ये पाठवण्याचे ठरले.

मायकेल बोरोदीनबरोबर १९२४ च्या डिसेंबरमध्ये जे काही आशियाई कम्युनिस्ट कार्यकर्ते चीनमध्ये आले, त्यातच हो-चि-मिन्ह हा एक होता. कॅन्टोन येथे डॉ. सन्यतसेनच्या क्रांतिकारी सरकारचे हे रशियातून आलेले सल्लागार कचेरी थाटून बसले. 'फार इस्टर्न इकॉनॉमिक रिव्ह्यू' या नियतकालिकाच्या जुलै १९६८ च्या अंकात सीझन लियाओ यांनी हो याच्या या कालखंडातील दिनचर्येचे वर्णन केलेले आहे. लियाओ म्हणतात-

"जून १९२६ मध्ये मी प्रथम हो-चि-मिन्ह याला भेटलो. कॅन्टोन येथे बोरोदीन या सोविएट सल्लागाराच्या कचेरीतच ही गाठभेट झाली. चीनमधील ज्ञानवृद्ध विद्वानांप्रमाणे हो यावेळी दिसत असे. उंच आणि किरकोळ यष्टी, हसतमुख चेहरा आणि छातीवर लांब अशी रूळणारी दाढी. त्याची राहणी अगदी साधी होती आणि कॅन्टोनमधील अन्नामी तरुणांना त्याची सतत मदत असे. उन्हाळ्यात त्याच्या अंगावर गुडघ्यापर्यंत येणारा पांढरा सफेद पातळ सदरा असे. ऑफिसमध्येही पायात फक्त चिनी पद्धतीच्या लाकडी खडावा असत.

'बोरोदीन याची पत्नी फॅनी बोरोदीन हिनेच माझी व हो ची मैत्री दृढ होण्यास मदत केली. आम्ही सर्वांनी पुढची दोन वर्षे बोरोदीनचे दुभाषे म्हणून काम केले. हो याला

त्यावेळी चीनमध्ये ली-थुय या नावाने ओळखत असत व त्याचे मित्रमंडळीतील टोपण नाव होते अन्नामी-ली.'

कॅन्टोन येथील वास्तव्यात हो याने आपले मुख्य लक्ष फ्रेंच इंडोचायनातील राजकारणावरच ठेवलेले होते. व्हिएतनाममध्ये या सुमारास राष्ट्रवादाला नवी चेतना मिळून तो देश पुनश्च काही चलनवलन करू लागलेला होता.

## क्रांतिकारकांचे मोहोळ - कॅन्टोन!

व्हिएतनाममधून परागंदा झालेल्या अन्नामी देशभक्तांना कॅन्टोनमध्ये सतत आसरा घेता आलेला असल्याने कॅन्टोन शहरात व्हिएतनामच्या स्वातंत्र्यासाठी सशस्त्र क्रांतीच्या मार्गाने जाऊ पाहाणारा एक गट कायम असे. 'ताम तामझा' नावाच्या अशाच व्हिएतनामी क्रांतिकारकांच्या संघटनेचा एक सभासद 'फ्राम होंग-थाई' याने इंडोचायनाचा गव्हर्नर जनरल मेरलीन हा कॅन्टोनला आलेला असताना त्याचे मोटारीवर हँडबाँब फेकला. मेरलीन हा या प्राणघातक हल्ल्यातून नशिबाने वाचला तरी व्हिएतनामी जनतेत यामुळे राष्ट्रवादी विचारांची एक नवी लाट उसळली. हो याला क्रांतिकारकांनी केलेला गव्हर्नर जनरलच्या वधाचा हा प्रयत्न रूचला का? उपलब्ध माहितीवरून तरी असे दिसते की, हो याने 'एखाद दुसऱ्या फ्रेंच अधिकाऱ्याचा वध करून काही फारसे साध्य होणार नाही' असेच मत खाजगीरित्या व्यक्त केले. स्वातंत्र्यासाठी प्रथम देशव्यापी राजकीय पक्ष बांधणीची नितांत गरज आहे असेही मत त्याने या संबंधात पुढे व्यक्त केलेले होते.

असंतोषाच्या म्यानातून अचानक उपसली जाणारी एखादी एकाकी लखलखती तलवार, ही तोफा-बंदुकांनी एखाद्या देशाला गुलाम करून ठेवणाऱ्या साम्राज्यशक्तीशी फार मोठा मुकाबला करू शकत नाही, ही गोष्ट सशस्त्र क्रांतिकारकांना समजत नाही अशातला भाग थोडाच असतो? परंतु कोणत्या तरी अतिभव्य त्यागाचे आणि पराक्रमाचे कृत्य करून लोकांची मने पेटवल्याखेरीज लोक उसळून उठायचे नाहीत याबद्दल त्यांच्या मनात संदेह नसतो आणि या प्राथमिक कामासाठी फाशीच्या खांबावरून स्वातंत्र्याचा वेद उच्चारवाने सांगण्यासाठी सशस्त्र क्रांतिकारक आपल्या प्राणाची कुरवंडी करून जातात. सशस्त्र क्रांतिकारकांचे हे अत्युच्च मनोगत हो चांगले जाणून होता. म्हणूनच या संबंधात हिंसा अहिंसेचा निरर्थक वाद न माजवता त्याने या ध्येयासक्त, राष्ट्रप्रेमी अन्नामी तरुणांना अधिक परिणामकारक अशा मार्गाने नेण्याची जबाबदारी त्याच क्षणी पत्करण्याचे ठरवले. हो याचा मार्ग सशस्त्र क्रांतीचा नसला तरी त्या मार्गावरून जाण्यासाठी जे साथी मिळवायचे, ते सर्व सशस्त्र क्रांतिकारकांचे समर्थन करणाऱ्या 'ताम तामझा' या अन्नामी संघटनेतूनच मिळू शकतील याबद्दल हो याचे मनात संशय नव्हता.

## क्रांतिदलाची स्थापना

जून १९२५ मध्ये हो याने कँटोनमध्ये वास्तव्य करणारे दोन व्हिएतनामी क्रांतिकारक, हो-तुंग-माऊ आणि ले-होंग-फोंग यांच्या सहकार्याने एक 'युवक-क्रांति-दल' स्थापन केले. हेच 'युवक क्रांति-दल' पुढे 'थान-निएन' या नावाने प्रख्यात झाले.

'थान-निएन' याच नावाचे एक नियतकालिक हो याच्या मार्गदर्शनाखाली सुरू झाले. या संघटनेत दाखल झालेले तरुण हेच इंडोचायना कम्युनिस्ट पक्षाचे आद्य सभासद होत. या नियतकालिकाचा चेहरामोहरा हा संपूर्णपणे राष्ट्रवादी असला तरी राजकीय विवेचनातून लेनिनप्रणीत मार्क्सवादाच्या मुलभूत कल्पना मोठ्या कौशल्याने मांडण्यात येत असत.

हो याने विचारपूर्वक आपल्या चळवळीचे दोन स्पष्ट भाग कल्पिलेले होते. पहिल्या टप्प्यात एक संपूर्ण राष्ट्रवादी चळवळ म्हणून सर्व अन्नामी जनतेपर्यंत पोचणे भाग होते. या कालखंडात परकीय सत्तेविरुद्ध सर्व जनतेला एकजुटीने उभे राहता येणे हीच गोष्ट प्रमुख राहणार होती. परंतु देशाच्या अर्थकारणाला आणि राजकारणाला विविक्षित दिशा देण्याचे महत्त्वाचे काम दुसऱ्या टप्प्यात जरी करावयाचे असले तरी त्या संबंधीचे सूचकदर्शक वेळोवेळी देशबांधवांना घडवणे हेदेखील नितांत आवश्यक होते. पहिला टप्पा गाठण्याच्या दृष्टीने 'थान-निएन' हे आदर्श पत्र होते आणि हो हा या कामासाठी लाभलेला अतियोग्य पुरुष होता. परंतु दुसऱ्या टप्प्याविषयी सतत मुग्धता बाळगणे हो सारख्याला शक्य नव्हते. १९२६ मध्ये 'क्रांतीचा मार्ग' या शीर्षकाखाली हो याने उघडपणे स्वतंत्र चळवळीला मार्क्सिस्ट-लेनिनिस्ट तत्त्वज्ञानाची डूब देणारा लेख आपल्या नावानेच प्रसिद्ध केला. या लेखात त्याने मूलग्राही अशा तीन कल्पनांवर भर दिलेला होता –

१) क्रांती ही मूठभर मंडळींनी होत नसते. हे काम कामकरी वर्ग आणि शेतकरी समाजच करू शकतो आणि यासाठी त्यांच्यामध्ये संघटना बांधणे ही क्रांतीची प्राथमिक गरज आहे.

२) क्रांतीचे नेतृत्व हे मार्क्सिस्ट-लेनिनिस्ट पक्षालाच करावे लागेल.

३) प्रत्येक देशातील क्रांतिकारक चळवळीने आंतरराष्ट्रीय क्षेत्रातील सर्व कष्टकरी जनतेशी संपर्क राखला पाहिजे.

'थान-निएन' संघटनेचा सूत्रसंचालक आणि त्याच नावे निघणाऱ्या पत्राचा संपादक या दोन्ही नात्याने, हो भोवती आता अन्नामी देशभक्तांचे एक कोंडाळे हळूहळू तयार होऊ लागले. हो हा या मंडळीचा अनभिषिक्त नेता मानला जाऊ लागला. मार्क्सवादावर हो आपले विचार पुनः पुन्हा मांडीत असे आणि व्यापक वेध घेणाऱ्या हालचालीही त्याने सुरू केल्या होत्या.

हो-तुंग-माऊ या आपल्या सहकाऱ्याला त्याने चिनी कम्युनिस्ट पक्षाचे सभासदत्व पत्करण्यास सांगितले ते या स्वच्छ हेतूने, की भविष्यात चिनी कम्युनिस्ट पक्षाशी व्हिएतनामी जनतेचे प्रेमाचे नाते राहावे. ले-होंग-फोंग या आपल्या दुसऱ्या सहकाऱ्याला हो याने 'मॉस्को मिलिटरी ॲकॅडमीत' शिक्षण घेण्यासाठी पाठवून दिले. रशियातील या ॲकॅडमीतून शिकून आलेल्या चँग-कै-शैक याने व्हाम्पोआ येथे जी चिनी तरुणांसाठी एक लष्करी अकादमी उघडली होती, त्या ठिकाणी निवडक व्हिएतनामी क्रांतिकारकांना शिक्षणासाठी दाखल होण्यास हो याने सांगितले. याच अकादमीत त्यावेळी चाऊ-एन-लाय आणि चँग-कै-शैक हे एकत्र शिक्षक म्हणून काम करीत असत. या अकादमीतून बाहेर पडणाऱ्या व्हिएतनामी तरुणांना, इंडोचायनात जाऊन 'थान-निएन' चळवळीशी केव्हाही उघडपणे संलग्न होऊ शकतील असे लहान लहान गट तयार करण्याची कामगिरी पुढे देण्यात येऊ लागली. ही गुप्त रीतीने इंडोचायनात प्रवेश करणारी मंडळी जेव्हा पकडली जात, तेव्हा त्यांना मृत्यूदंडच मिळत असे! पुढे नावारूपास आलेला फाम-व्हान-डाँग हा व्हिएतनामी नेता, हा या तऱ्हेने जिवावर उदार होऊन इंडोचायनात घुसलेल्या तरुणातीलच एक होय.

## अघटित घडले

कँटोनमध्ये हो याचे चांगले बस्तान बसत चालले होते. आपल्या चळवळीची सूत्रे तो मोठ्या कौशल्याने हाकू लागलेला होता. परंतु मध्यंतरी १२ मार्च १९२५ ला डॉ. सन्यतसेनला मृत्यूने गाठले होते आणि कोमिंग्टांग पक्षाची सूत्रे चँग-कै-शैक याच्या हाती आली होती. चिनी कम्युनिस्ट पक्ष हा वरवर कोमिंग्टांग पक्षाचा आतून कब्जा करू लागला हे असा संशय चँग-कै-शैक याच्या मनाला वाटू लागला होता. दोन वर्षांत चँग-कै-शैक याने लष्करी पराक्रम करून चीनमधील लष्करी धटिंगणांच्या कारवाया हाणून पाडण्यात बरेच यश मिळवले. परंतु या यशाबरोबर ज्याप्रमाणे चँग-कै-शैकच्या कर्तृत्वाची सावली मोठी होत होती, त्याचप्रमाणे चिनी कम्युनिस्ट कार्यकर्त्यांचा डावा गट हा आपल्या पाठीमागे आपला घात करण्याच्या योजना आखीत आहे, या संशयाने पिशाच्च त्याला अधिकाधिक अस्वस्थ करू लागले होते.

चँग-कै-शैक शांघायकडे वळला तेव्हा शांघायमध्ये डाव्या गटाचा नेता चौ-एन-लाय याने आतून उठावणी करून लढाईविनाच शांघाय शहर चँगच्या ताब्यात दिले. या सहकार्याबद्दल चँग-कै-शैक हा शाबासकीचे चार शब्द उच्चारील अशी कम्युनिस्ट कार्यकर्त्यांची अपेक्षा होती, परंतु सत्तेची आणि यशाची धुंदी चढलेल्या चँग-कै-शैकने अघटित घडवले!

डाव्या गटाची आणि कम्युनिस्टांची चँग-कै-शैकने सरसकट कत्तलच सुरू केली. या बेताल नरसंहाराची सुरुवात झाली ती १२ एप्रिल १९२७ या दिवशी!

१२ एप्रिल १९२७ ची भीषण रात्र शांघायवर पसरली आणि जे शांघायला घडले तेच थोड्याफार फरकाने पाठोपाठ निंगपो, फुचौ, अमॉय, कँटोन या शहरात घडू लागले.

या भीषण हत्याकांडाने निर्माण केलेल्या गोंधळात कँटोनमधील 'थान निएन' चळवळ, वृत्तपत्र आणि हो ची सर्वच संघटना वाहून गेली. सुदैवाने शांघायला जे घडले ते कँटोन येथे घडणार याचा अचूक अंदाज योग्यवेळी आल्याने हो आणि त्याचे अनुयायी कँटोनहून निसटले. काही हँकोला गेले आणि काहींनी शांघायमार्गेच हाँगकाँगचा रस्ता पकडला.

हो याने या पळापळीत १९२८ च्या वसंतऋतूत पुनश्च मॉस्को गाठले.

n

# ४ : येतानच्या दिशेने

चीनमध्ये जनरल चँग-कै-शैक याने अनपेक्षितपणे कम्युनिस्टांचे जे शिरकाण सुरू केले, त्यात कँटोन येथील हो-चि-मिन्ह यांची 'थान-निएन' चळवळ-वृत्तपत्र आणि संघटना निकालात निघाली खरी, परंतु हो हा स्वतः निसटल्यामुळे वाचला. जनरल चँगच्या कम्युनिस्टविरोधी धोरणामुळे जनरल चँगचे सोविएट युनियनशी वितुष्ट आले. १९२८ च्या वसंत ऋतूत हो जेव्हा मॉस्को येथे पोहोचला, तेव्हा कोमिन्टर्नच्या जबाबदार नेत्यांबरोबर त्याने पुढील कार्यक्रमाची चर्चा आरंभली. काही दिवसांतच ब्रुसेल्स येथे 'साम्राज्यवादी युद्धविरोधी मेळावा' भरणार होता. या मेळाव्यासाठी हो गेला. या मेळाव्याला मादाम सन्यतसेन, पंडित नेहरू आणि मोहंमद हाटा ही मंडळीही हजर होती. इथेच पंडितजींना हो याने प्रथम पाहिले.

काही दिवस युरोपात काढून १९२८ च्या नोव्हेंबरात हो अखेर सयाममध्ये अवतीर्ण झाला. दक्षिण पूर्व आशियात कोमिन्टर्नचे धागे विणावे हा त्याचा त्यात एक हेतू असला तरी सयामला लागून असलेल्या आपल्या मायदेशात राजकीय असंतोष पसरवणे, हाच त्याचा सयाम वास्तव्याचा प्रधान हेतू होता. साखो-नाखो या गावात राहून हो याने 'थान-ऐ' (मैत्री) या नावाने एक वृत्तपत्र सुरू केले. थाई आणि व्हिएतनामी या दोन्ही भाषातून शिक्षण देणारी एक शाखाही हो त्याच्या नेतृत्वाखाली याच गावात सुरू झाली. जंगल मजुरांची एक सहकारी सोसायटी पाठोपाठ स्थापन झाली. हो याच्या या चौफेर चळवळीमुळे हो याला सयाममधील सर्व व्हिएतनामी मंडळी ओळखू लागली.

## बुद्धांनाही दीक्षा

बँकॉक येथील बुद्धमंदिरात काही दिवस बुद्ध भिक्षुंचे कपडे अंगावर घालून हो राहात होता. भिक्षू दीक्षेसाठी त्या ठिकाणी येणाऱ्या व्हिएतनाममधील तरुण बुद्ध भिक्षुकांना हो याने सामाजिक तत्त्वज्ञानाच्या चर्चेच्या निमित्ताने समाजवादाचे प्राथमिक धडे द्यायला सुरुवात केली. १९४५ आणि नंतर १९६३-१९६६ या काळात पुढे इंडोचायनामध्ये बुद्ध भिक्षूंची जी बंडे झाली, त्यात भाग घेणारे जे बुद्ध भिक्षू होते, त्यांचेपैकी अनेकांचे राजकीय शिक्षण हो यानेच केलेले होते.

इंडोचायनामधील अंतर्गत परिस्थिती मात्र आता बाहेरून असंतोष भडकवण्याची जरूर वाटावी इतकी शामळू राहिलेली नव्हती. असंतोष खदखदू लागलेला होता आणि याचे कारण, कामकरी वर्गात प्रचंड वाढ आता झालेली होती. कारखानदारी वाढलेल्या भागात कामगार वस्तीची मोठमोठी केंद्रे निर्माण झाली होती. कोळसा खाणीच्या उद्योगात

३०,००० कामगार काम करीत होते आणि यातले सुमारे २५,००० हे एकाच क्षेत्रात म्हणजे टोंकिन विभागात रोजगारी करीत होते. 'नाम-दिन्ह' शहरात गिरणी कामगारांची संख्या साडेतीन हजाराच्या घरात गेलेली होती आणि याशिवाय घराघरांतून विणकाम करणारे सुमारे चार हजार कामगार होते.

## बंद-बंद

या कामगारांना मिळणारा रोजगार हा अल्प होता. त्यांच्या राहाण्याच्या वस्त्या गलिच्छ होत्या. यामुळे कामगारांत सदैव असंतोष नांदत असल्याने मालक-मजूर तंटे वारंवार उद्भवू लागले होते. संप झाले की प्रकरणे चिघळू लागत. १९२८ या एका वर्षात सायगाव येथे फेब्रुवारीत दारू गाळणाऱ्या कामगारांचा संप झाला. मार्चमध्ये हैपाँग येथे पेट्रोलियम रिफायनरीत काम बंद पडले. एप्रिलमध्ये नाम-दिन्ह येथे रबर मळ्यातून संप जारी राहिला तर मे मध्ये पुनश्च हैपाँग येथे सिमेंट कारखान्याला टाळेबंदी झाली. हनोई येथे ऑक्टोबरात रिक्षावाले संपावर गेले तर नोव्हेंबरात नाम-दिन्ह येथे विणकरांनी काम बंद पाडले. १९२९ साल उजाडले आणि व्हिन येथे रेल्वे कामगारांनी संप पुकारला.

या सर्व 'बंद'चे नेतृत्व करण्यासाठी एक राष्ट्रव्यापी कम्युनिस्ट पक्ष निर्माण होणे ही आता एक आवश्यक बाबच झाली. असा पक्ष इंडोचायनाच्या भूमीवर स्थापन करावा वा करू नये यासंबंधी जोरदार चर्चा थान-निएनच्या सभासदात इंडोचायनाबाहेर, चीनमध्ये व सयाममध्ये चालू झालेली होती.

यावेळी हो स्वतः सयाममध्ये असला तरी त्याचा निकटचा सहकारी हो-तुंग-माऊ, ज्याने हो च्या सांगण्यावरून चिनी कम्युनिस्ट पक्षाचे सभासदत्व पत्करल्याचे पूर्वीच्या प्रकरणात सांगितले आहे, तो हो-तुंग-माऊ मात्र चीनमधून निसटू न शकल्याने जनरल चँगच्या तडाख्यात सापडून तुरूंगात फेकला गेलेला होता. हाँगकाँग येथे यावेळी हो याचा एक कनिष्ठ सहकारी लाम-डक्-थु याने पुढाकार घेऊन 'थान-निएन' च्या सभासदांचा एक मेळावा भरवला. या मेळाव्यासाठी टोंकिन येथून जे प्रतिनिधी आले, त्यांनी इंडोचायनाचा कम्युनिस्ट पक्ष स्थापन करण्याचा आग्रह धरला. १ मे ते ९ मे मात्र या आठवड्यात ही परिषद भरली होती. टोंकिन प्रतिनिधींना पुरेसा पाठिंबा मात्र या मेळाव्यात मिळू शकला नाही व ते निराश होऊन व्हिएतनामला परतले. हे प्रतिनिधी गेल्यानंतर 'थान-निएन' च्या उरलेल्या सभासदांनीच मार्क्सिस्ट-लेनिनिस्ट पक्ष स्थापन करण्यासाठी परवानगी मागणारे पत्र मॉस्कोला रवाना केले.

## पक्षाची स्थापना

टोंकिनचे प्रतिनिधी निराश मनाने हनोईला पोहोचले तेव्हा त्यांना आपल्यामागे काय घडले हे कळू शकलेले नव्हते. 'थान-निएन' संघटना ही आता पुढच्या वाटचालीत निरूपयोगी ठरणार आहे याविषयी या मंडळींची इतकी खात्री पटलेली होती की हनोई येथे आल्या आल्या त्यांनी 'रु हॅम लोंग' या मार्गावरील एका घरात एकत्र बसून इंडोचीनच्या कम्युनिस्ट पक्षाची स्थापना केली. हे एकंदर सातजण होते आणि ही पक्ष स्थापना १७ जून १९२९ या दिवशी झाली. पक्षाचे व्हिएतनामी नाव होते – डाँग-दुआँग-काँग-सान-डाँग. या पक्षाचे कार्यक्षेत्र उत्तर अन्नाममधील टोंकिन विभागात राहाणार होते.

उत्तर अन्नाममध्ये कम्युनिस्ट पक्ष स्थापन झाल्याचे वृत्त हळूहळू दक्षिणेकडे झिरपले आणि दक्षिण अन्नाम आणि कोचीन चायना या दोन्ही ठिकाणी 'थान-निएन' च्या सभासदांनी कम्युनिस्ट पक्षाची स्थापना केली. या पक्षाचे दक्षिणेतील नाव ठरले – 'अन्नाम-काँग-सान-डाँग.'

'थान-निएन' संघटनेत सामील न झालेल्या राष्ट्रवादी लोकांचा जो चळवळ्या गट होता त्यांनीही या घटना पाहून एक नवा पक्ष जन्माला घातला. त्याचे नामकरण झाले – 'तान-व्हिएत-काच-माँग-डाँग' म्हणजे 'नव्या व्हिएतनामचा क्रांतिकारी पक्ष.'

व्हिएतनामी क्रांतिकारक पक्षाच्या या ज्या अनेक चिरफळ्या तयार होत होत्या, त्याबद्दल साहजिकच मॉस्को येथे कोमिन्टर्नला चिंता वाटू लागली. अशा तऱ्हेने क्रांतिकारक शक्तीचे विकेंद्रीकरण होणे हे अंतिम यशाला घातक ठरणार होते. मॉस्को येथे स्वतंत्र व्हिएतनामचा प्रतिनिधी म्हणून एक साधा शाळा शिक्षक त्यावेळी काम करीत होता. 'थान-निएन' पक्षाचेच प्रतिनिधीत्व तो करीत असल्याने, कोमिन्टर्न मार्फत त्याला काही सूचना करण्यात आल्या. या शिक्षकाचे नाव होते ट्रान-फू. ट्रान-फू याने हो याची गाठ घेतली. व्हिएतनाममध्ये स्थापन झालेल्या तिन्ही डाव्या पक्षांचे विलीनीकरण घडवून आणण्याची कामगिरी प्रथम उरकावी अशा अर्थाच्या सूचना त्याने आणल्या होत्या.

हो याने तडकाफडकी मात्र पाऊल उचलले नाही. घाईघाईने निर्णय घेतले तर काय परिणाम होतात याचा थोडाफार अनुभव आपल्या अनुयायांना यावा अशी त्याची इच्छा होती. १९३० साल उजाडताच जानेवारीमध्ये हो हा पुनश्च हाँगकाँग येथे गेला. व्हिएतनाम भूमीवर स्थापन झालेल्या दोन्ही कम्युनिस्ट पक्षांना त्याने निरोप पाठवला की उभयतांनी आपले दोन-दोन प्रतिनिधी हाँगकाँग येथे धाडावे. ३ फेब्रुवारी १९३० या दिवशी हाँगकाँग येथील स्टेडियमवर एक फुटबॉल सामना चालू असताना, तो पाहण्याच्या निमित्ताने हो याची व व्हिएतनाममधून आलेल्या कम्युनिस्ट पक्षाच्या प्रतिनिधींची गाठ पडली. या प्रतिनिधींना हो याने सांगतले, 'तुमचे दोन्ही पक्ष एकत्र कराच परंतु 'तान-व्हीएत' पक्षालाही तुमच्यात अंतर्भूत करून घ्या.'

## पक्षाचा जाहीरनामा

नव्या पक्षाचा जाहीरनामा हो यानेच तयार केला व तो १८ फेब्रुवारीला प्रसिद्ध करा अशा सूचना या प्रतिनिधींना त्याने दिल्या. हा जाहीरनामा दहा कलमी होता. ती कलमे अशी –

१) व्हिएतनाम भूमीवरून साम्राज्यवाद्यांना हाकलण्यात यावे.

२) इंडोचायनाला संपूर्ण स्वातंत्र्य मिळवून द्यावयाचे आहे.

३) कामकरी-सैनिक आणि शेतकरी यांच्या प्रतिनिधींचे सरकार स्थापन करण्यात यावे.

४) बँकांचे राष्ट्रीयीकरण करण्यात यावे व बँक व्यवहारावर कष्टकरी जनतेचा अधिकार राहावा.

५) जमीनदारांकडील शेतजमीन शेतमजुरांना वाटण्यात यावी.

६) कामाचा दिवस आठ तासांचा राहावा.

७) शेतीची कर्जे आणि दंडवजा कर रद्द करण्यात यावे.

८) जनतेला सर्व लोकशाही अधिकार असावे.

९) शिक्षण सर्वांना घेता येईल याची सोय करावी.

१०) स्त्री-पुरुषांत समानता राहावी.

नव्या पक्षाचा हा जाहीरनामा सर्वस्वी मार्क्सवादी होता. पक्षाचे नाव 'डाँग-दुआँग काँग-सान-डाँग' (इंडोचायना कम्युनिस्ट पक्ष) हे नक्की करण्यात आले आणि पक्षाची मध्यवर्ती कचेरी हैपाँगहून सायगाव येथे न्यावी असे ठरवण्यात आले. हो याला भेटून व्हिएतनामी प्रतिनिधी परतले व हो याच्या व्यक्तिगत वजनामुळे नवा पक्ष स्थापन करण्यात त्यांना चटकन यशही आले. इंडोचायनाच्या भूमीवर लाल निशाण फडफडू लागले आणि सायगाव येथून पक्षाची सूत्रे हलू लागली.

फ्रेंच सरकारची हो याचेवर पाळत होती. ही कामगिरी ज्या फ्रेंच पोलीस अधिकाऱ्यावर सोपवण्यात आली होती त्याचे नाव अर्नोक्स. पॅरीस येथे हो याचेवर नजर ठेवण्याचे काम हाच पोलीस अधिकारी करीत असे. अर्नोक्स आपल्या आठवणीत सांगतो –

> 'हो हा बँकॉकहून हाँगकाँगला जावो वा ताश्कंद-सिंगापूरला जावो मी त्याच्या पाळतीवर असेच. त्याला हे कळून चुकले होते की जोपर्यंत मी जिवंत आहे व अधिकारावर आहे तोपर्यंत त्याला इंडोचायनात पाऊल टाकण्याची संधी मिळणार नव्हती....'

अर्नोक्स याचा हा आत्मविश्वास पुढे खोटा ठरला. जपान्यांनी १९४१ मध्ये अर्नोक्स यालाच अधिकारावरून हाकलले हे खरे असले तरी तत्पूर्वी तीन वर्षे हो याने उत्तर टोंकीनमध्ये जा-ये सुरू केलेली होती.

## फसलेल्या बंडाची फलश्रुती

१९३० साली इंडोचायनात कम्युनिस्ट पक्ष स्थापन झाला आणि त्याच वर्षी फ्रेंच सत्ताधाऱ्यांविरुद्ध एक मोठा उठावही घडून आला. या उठावाशी कम्युनिस्ट क्रांतिकारकांचा सुतराम संबंध नव्हता. टोंकीन येथील हॉक नावाच्या एका शाळामास्तराने सुमारे तीन वर्षांपूर्वी एक राष्ट्रवादी क्रांतिकारकांचा पक्ष स्थापन केलेला होता. डॉ. सन्यतसेन यांच्या कोमिंग्टांग पक्षाच्या धर्तीवर या पक्षाची उभारणी होणार होती. या पक्षाच्या काही धाडसी क्रांतिकारकांनी 'येन बे' या ठिकाणी फ्रेंचांची जी व्हिएतनामी शिबंदी होती, त्यात शिरकाव करून घेऊन या सैनिकांना चिथवले. 'येन बे' येथील छावणीतून बंडाची ठिणगी उडाली की सर्वत्र उठाव होणार होता. परंतु प्रत्यक्षात काही निराळेच घडले. व्हिएतनामी शिपायांनी बंड पुकारताच फ्रेंचांनी छावणीवर बॉम्बफेक करून सर्व परिसर बेचिराख करून टाकला. अनेकांचा गलिटोनवर शिरच्छेद करण्यात आला. असंख्यांना पकडण्यात आले.

हे शिपायांचे बंड इंडोचायनात प्रथमच चळवळ करू पाहणाऱ्या कम्युनिस्टांना अतिशय बोधप्रद ठरले. अपुऱ्या तयारीनिशी आणि अविचारीपणाने केलेल्या उठावाची काय भीषण परिणती होते याचे हे बंड एक उदाहरण होते. हाँगकाँग येथे इंडोचायनाच्या कम्युनिस्ट पक्षाच्या कार्यकारिणीची पहिली बैठक झाली. त्यासाठी इंडोचायनाचा मॉस्को येथील प्रतिनिधी ट्रान-फू हा स्वतः तिथे आलेला होता. या बैठकीत महत्त्वाची खलबते झाली. परिणामी पुढील दोन-चार महिन्यात उत्तर अन्नाममध्ये ठिकठिकाणी 'सोव्हिएट' स्थापन झाली. 'सोव्हिएट' म्हणजे कष्टकरी जनतेचे स्वतंत्र राज्य! ज्या प्रांतातून वीस वर्षांपूर्वी हो-चि-मिन्ह परागंदा झाला होता, त्याच अमाप लोकसंख्येच्या आणि दारिद्र्याच्या उंबरठ्यावर आचके देणाऱ्या प्रांतात शेतकऱ्यांनी हे उठाव जागोजाग निर्माण केले होते. १२ सप्टेंबर १९३० या दिवशी सुमारे ६००० शेतमजुरांचा एक प्रचंड भूकमोर्चा निघाला. दिन्ह या गावी तो विसर्जित करण्यात आला. या मोर्चात सहभागी झालेल्यांनी जमीनदारांच्या मोठमोठ्या इस्टेटींचे सक्तीने वाटप करून टाकले. या सोव्हिएटस्ना 'व-झो-व्हिएटस्' असे नामकरण लाभले.

ही जी छोटी छोटी सोव्हिएटस् उत्तर व्हिएतनाममध्ये स्थापन झाली, त्यामागे कम्युनिस्ट कार्यकर्त्यांचा हात किती आणि दारिद्र्याने गांजलेल्या शेतकऱ्यांचा स्वाभाविक उद्रेग किती याविषयी वेगवेगळी मते असली तरी ज्या सफाईने ही सर्व क्रांती घडवून

आणली गेली, त्यावरून यामागे सुसज्ञ यंत्रणेचे अस्तित्व गृहीतच धरावे लागते. ही यंत्रणा उभी करण्यात व्हिएतनामी कम्युनिस्टांचा मोठाच वाटा असले पाहिजे याविषयीही मग संशय राहात नाही.

फ्रेंचांना इतके निर्णायक आव्हान यापूर्वी कुणी दिलेले नव्हते. शेतकरी कामकऱ्यांच्या सामुदायिक शक्तीचा हा पहिलाच हुंकार होता. साहजिकच फ्रेंच साम्राज्यवाद्यांकडून दडपशाहीचा वरवंटा लगोलग सुरूच झाला. एखाद दुसऱ्या क्रांतिकारकाने जिवावर उदार होऊन केलेले राष्ट्रप्रेमी हिंसक कृत्य आणि जनतेचा उठाव यात जमीन अस्मानचा फरक असतो. फ्रेंचांना हा पहिलाच मोठा तडाखा होता आणि याचे मानसशास्त्रीयदृष्ट्या मोठेच महत्त्व होते. अशा तऱ्हेची लोकशक्ती 'जागृत झाली आहे - संघटित झाली आहे - प्रतिकाराला सिद्ध आहे' याची फ्रेंचांना कल्पनाच नव्हती.

लवकरच दडपशाहीची चक्र हलू लागली. हो याचे कित्येक सहकारी अटकेत पडले. पुढे पंतप्रधान झालेला फाम व्हान-डाँग हा पकडला जाऊन एका निर्जन बेटावर फ्रेंचांनी त्याला अटकेत ठेवला. पुढे उपराष्ट्राध्यक्ष झालेला डॉन-डक-थांग हा देखील असाच काळ्या पाण्यावर पाठवला गेला. मॉस्को येथून परतून पक्षाच्या चिटणीस पदावर काम करणारा नेता ट्रान-फू याला फ्रेंचांनी पकडून त्याचे इतके हालहाल केले की चोलान येथील सरकारी हॉस्पिटलात एप्रिल १९३१ मध्ये तो मरण पावला.

## हो याला फाशी!

हो हा स्वतः अजून इंडोचायनाच्या भूमीवर उतरलेला नव्हता. परंतु व्हिन्ह येथील कोर्टाने त्याच्या गैरहजेरीत खटला चालवून हो याला मृत्यूदंड ठोठावला. फ्रेंच अधिकाऱ्यांनी हाँगकाँगच्या ब्रिटिश अधिकाऱ्यांमागे लकडा लावला की हो याला पकडून आमच्या स्वाधीन करा.

फ्रेंच सरकारला याची कल्पनाही नव्हती की ज्या दोन व्यक्तींनी हो याला या काळात संरक्षण देऊ केले होते, त्या दोन्ही व्यक्ती फ्रेंचच होत्या. जोसेफ दुक्रोस्क आणि त्याचा सहकारी नोलन या दोघा फ्रेंच कम्युनिस्ट कार्यकर्त्यांनाच हो याचा निश्चित ठावठिकाणा माहीत होता. इंडोचीनचा नवजात कम्युनिस्ट पक्ष, मॉस्को आणि फ्रेंच कम्युनिस्ट पक्ष यांच्यात दुवा असणारे हे दोघे फ्रेंच नागरिक होते. इंडोचायनात प्रवेश करण्यापूर्वी जोसेफ दुक्रोस्क याने हो ची हाँगकाँगमध्ये जी भेट घेतली, त्याचा वृत्तांत दुक्रोस्क याने लिहिलेला आहे. तो सांगतो –

> 'यावेळी हो याने गुळमुळीत दाढी केलेली होती. ओठावर थोडीशी मिसरूड तेवढी शिल्लक होती. कमालीच्या बारीक देहयष्टीचा हो यामुळे अतिशय तरतरीत वाटत होता.

आपल्या देशाच्या स्वातंत्र्याचा विचारच त्याच्या मनात सदैव घोळत असे. याचा अर्थ तो आंतरराष्ट्रीय दृष्टिकोण नसलेला क्रांतिकारक होता असा नाही. परंतु व्हिएतनामची स्वातंत्र्यप्राप्ती यालाच त्याच्या विचारात अग्रहक्क होता.

'फ्रेंच राजकारणातील घडामोडींवर त्याचे सतत लक्ष असे व तिकडे घडणारी प्रत्येक गोष्ट तो काळजीपूर्वक पाहात होता. मी जेव्हा सायगावला जायला निघालो, तेव्हा हो याने मला दोन कॉम्रेडसचे पत्ते दिले. हे दोघे अतिशय विश्वासू कार्यकर्ते निघाले. त्याची हो याचेवर अतिशय भक्ती होती. या दोन कॉम्रेडच्या सहकार्याने मला इंडोचायनात मुक्त रीतीने सर्वांच्या भेटीगाठी घेता आल्या.

'अखेर सिंगापूरला मी गेलो असताना मला अटक केली ती फ्रेंचांनी नाही! ब्रिटिश हेरखाते अधिक चाणाक्ष असल्याने मला ब्रिटिशांनी अटक केली. माझ्या ध्यानात आले की याच क्षणी नोलन व हो या दोघांनाही अटक केली. माझ्या ध्यानात आले की याच क्षणी नोलन व हो या दोघांनाही अटक झाली असणार! मला अठरा महिने तुरुंगात काढावे लागले-'

## हो अटकेत

दुक्रोस्क याचा तर्क बरोबर होता. हो व नोलन यांना त्याचवेळी हाँगकाँग येथे ब्रिटिशांनी अटक केली होती.

हो, नोलन आणि दुक्रोस्क या तिघांना ब्रिटिश हेरखात्याने पकडले ते फ्रेंच सरकारच्या सांगण्यावरूनच. परंतु या तिघांना ब्रिटिश पोलीस फ्रेंचांच्या हवाली करणार की नाही हाच मोठा प्रश्न होता. हो यावेळी फ्रेंच साम्राज्यवाद्यांच्या हाती सुपूर्त होता, तर आधीच दिलेल्या शिक्षेनुसार त्याची मान गलिटोनखाली दिली जाणार होती. ब्रिटिश कामगारांवर चहूबाजूंनी दडपण सुरू झाले की त्यांनी अधिकारावर असलेल्या मजूर सरकारला बजावावे की काही झाले तरी हो व त्याचेबरोबर पकडलेले दोघे फ्रेंच कम्युनिस्ट यांना फ्रेंचांच्या हवाली केले जाता कामा नये. या तिघांची ब्रिटिश सरकारपुढे वकिली केली ती सर स्टॅफोर्ड क्रिप्स यांनी! इंग्लंडच्या मजूर सरकारने हो याला फ्रेंचांच्या हवाली करण्यास नकार दिला, याला आणखी एक गंभीर कारण घडले.

हो याला टी.बी. झाल्याने हॉस्पिटलात दाखल केले गेल्याचा वृत्तांत, फ्रेंच सरकारला मिळाला. अत्यवस्थ झालेल्या क्षयरोग्याचे काय होते? तो बहुधा मरतो! तसाच आता हो देखील मरून जाणार अशीच सर्वांची अपेक्षा होती. जी अपेक्षा होती ती प्रत्यक्षात उतरली असा गैरसमज कालांतराने पसरू लागला. फ्रेंच सरकारने मरू घातलेल्या हो याचा नाद सोडला. काही दिवसांनी इंडोचायनातील फ्रेंच पोलिसांनी हो याच्या फायलीत नोंद केली,

'नग्युएन-अई-क्वोक हाँगकाँग तुरूंगात मरण पावला.'

बातमी खरीच वाटावी असे सर्व नाटक रचले गेले होते. 'ल ह्यूमॅनिते' पत्रात आणि सोव्हिएट वृत्तपत्रात हो चा ठळक गृह्यसंस्कार छापण्यात आला होता. आता शंका कसली? हो मेला. त्याचा अवतार संपला. कसली क्रांती आणि कसले व्हिएतनामचे स्वातंत्र्य! संपले सगळे. फ्रेंच पोलीस आनंदात होते.

१९४५ साली तब्बल चौदा वर्षांनी हो-चि-मिन्ह या नावाने हो पुनश्च प्रगट होईपर्यंत इंडोचायनातील फ्रेंचांच्या हिशेबी हो हा मेलेला होता! प्रत्यक्षात काय घडले होते?

फ्रँक लूझनी नावाच्या एका मजूर कार्यकर्त्याने आणि त्याच्या पत्नीने हो याला हाँगकाँग तुरूंगाच्या रूग्णालयातून गुप्तपणे बाहेर काढून जलमार्गाने अमॉय बेटावर पळून जाण्यास साहाय्य केले. फ्रँक लूझनी हा ब्रिटिश असावा व हो याचा चाहता असावा. सहा महिने हो याने अमॉय बेटावर भूमिगत स्थितीत काढले. १९३३ साल उजाडताच हो पुनश्च चीनमध्ये शांघाय येथे दाखल झाला. जनरल चँग-कै-शैक याचा कम्युनिस्टांवर यावेळीही दात होता व चीनमध्ये राहणे हे धोक्याचे आहे हे हो याच्या लक्षात आले. सुदैवाने शांघायमध्ये चिनी कम्युनिस्ट पक्षाशी त्याला संधान बांधता आले व तो चीनमधून सहीसलामत निसटू शकला! एका सोव्हिएट बोटीवर चढून तो व्हलाडीव्होस्टॉक बंदरात पोचला आणि तेथून गाडीने तो मॉस्कोत दाखल झाला.

## पुन:श्च मॉस्को

आता त्याने नवे नाव धारण केले – लिनॉव्ह.

काही काळ लेनिन इन्स्टिटट्यूटमध्ये या लिनॉव्हने अध्ययन-अध्यापनाचे काम केले. आपली व्याख्याने तो पद्यपंक्तींनी भरून टाकीत असे. ही छोटी छोटी काव्ये लक्षात ठेवायला सोपी जात व विद्यार्थ्यांना पाठांतराच्या दृष्टीने मोठी उपयुक्त वाटत.

१९३५ साली मॉस्को येथे जी कम्युनिस्ट इंटरनॅशनलची सातवी काँग्रेस झाली, त्या काँग्रेसमध्ये इंटरनॅशनलच्या केंद्रीय कार्यकारणीवर ले-होंग-फोंग या व्हिएतनामी कार्यकर्त्याची निवड झाली. कारण हो याला काही काळ अज्ञातवासी राहणेच आवश्यक होते. हा ले-होंग-फोंग १९४० साली फ्रेंचांच्या तडाख्यात सापडून त्याला अटक झाली व तो तुरूंगातच निधन पावला. या सातव्या काँग्रेसमध्ये हो याने आज आघाड्याचे राजकारण म्हणून ज्याचा निर्देश होतो, तशा पद्धतीच्या राजकारणाचा आवेशाने पुरस्कार केला. देशात कम्युनिस्ट पक्ष पुरेसा बलवान नसेल तर समान आकांक्षांसाठी साम्राज्यशाही विरोधी लोकशाही आघाड्या निर्माण केल्या पाहिजेत असा त्याचा आग्रह होता.

१९३६ साली फ्रान्सच्या राजकीय चित्रात मोठा बदल झाला. पंतप्रधान लेऑं ब्लूम यांच्या नेतृत्वाखाली कम्युनिस्टांच्या पाठिंब्यावर नवे सरकार सत्तेवर आले. पंतप्रधान ब्लूम याने लगोलग व्हिएतनाममधील परिस्थितीची पाहणी करण्याकरता एक फ्रेंच शिष्टमंडळ सायगावला धाडले. या शिष्टमंडळाचे नेतृत्व गोडार्ट याने केले. याचबरोबर ब्लूम याने फाम-व्हान-डाँग आदी प्रमुख नेत्यांची तुरूंगातून सुटका केली. इंडोचायनात घुसलेले हो याचे अनेक अनुयायी अचानक अशा रितीने तुरूंगातून बाहेर पडले.

कम्युनिस्ट पक्षावरील बंदी पाठोपाठ फ्रेंच सरकारने उठवली आणि इंडोचायनाचा कम्युनिस्ट पक्ष पुनः राजकारणात उघडपणे वावरू लागला. फाम-व्हान-डाँग याच्या संपादकत्वाखाली एक नवे वृत्तपत्र हनोईहून सुरू झाले. वस्तुतः हो यावेळी इंडोचायनात परतेल अशीच सर्वांची अपेक्षा होती. परंतु हो याने विवेकाने मॉस्कोतच राहण्याचे ठरवले. कम्युनिस्ट पक्षाच्या चळवळींनी जोर धरताच, सुरू झालेला मधुचंद्र संपेल अशी त्याची अचूक अटकळ होती. शिवाय युरोपात राजकारणाला धोकादायक वळण लागलेले होते. हिटलरने युरोपला धक्के द्यायला सुरुवात केलेली होती.

१९३८ च्या मे दिनाच्या निमित्ताने हनोई येथे कम्युनिस्ट व समाजवादी यांच्या नेतृत्वाखाली कामगारांची एक प्रचंड मिरवणूक प्रथमच उघडपणे निघाली. यात हजारो कामगार सामील झाले होते. या सभेत फ्रेंच आणि व्हिएतनामी यांचे प्रतिनिधी एकाच व्यासपीठावर होते, कारण पॅरीसमधील ब्लूमचे सरकार हे कम्युनिस्टांचा पाठिंबा असलेले सरकार असल्याने, या मे दिनाला सर्व सरकारी सहानुभूती मिळालेली होती.

## हिटलरचा दणका

३० सप्टेंबर १९३८ ला मध्यरात्री म्युनिच येथे शांतता करारावर सह्या झाल्या. हिटलर, चेंबर्लेन, मुसोलिनी, दलाँदिया यांच्या सह्या मिरवणारा हा शांतता करार म्हणजे हिटलर पुढे इंग्लंडने दिलेली शरणागती आहे, असा इशारा ५ ऑक्टोबरला चर्चिल यांनी दिला. त्याने बजावले – 'आपला संपूर्ण असा लाजिरवाणा पराभव झालेला आहे! एका महाभयंकर संकटाच्या मध्यभागी आपण उभे आहात-'

युरोपच्या राजकारणात यापुढे रशिया कुणाच्या बाजूने उभा राहतो, याला आता अनन्यसाधारण महत्त्व प्राप्त झाले. अखेर या डावपेचात हिटलरने मात केली आणि स्टॅलीनबरोबर वीस वर्षांच्या अनाक्रमणाचा करार घडवून आणून एक अतर्क्य गोष्ट हिटलरने जगाला दाखविली! जग स्तिमित झाले. रूसो-जर्मन कराराच्या दणक्याखाली हादरू लागले. जगभरच्या कम्युनिस्टांना रातोरात आपले डावपेच उलटेपालटे करावे लागले.

फ्रान्समध्ये फ्रेंच कम्युनिस्ट हे फ्रेंच जनतेचे शत्रू म्हणून आता ओळखले जाऊ लागले. ब्लूम मंत्रिमंडळ आधीच गडगडले होते; आणि परिणामी फ्रेंच इंडोचायनात व्हिएतनामी कम्युनिस्ट आणि तिथले फ्रेंच सरकार यांच्यातील सलोखा संपुष्टात येऊन, व्हिएतनामी कम्युनिस्ट क्रांतिकारक भूमिगत होऊ लागले होते, फाम-व्हान-डाँग आणि पुढे जनरल जिॲप म्हणून ख्याती पावलेला जिॲप हे दोघे युरोपात युद्ध सुरू होताच चीनला निसटले! तरीसुद्धा दुसरे महायुद्ध १ सप्टेंबर १९३९ ला सुरू झाल्यावर सुमारे हजार कम्युनिस्ट कार्यकर्त्यांना फ्रेंचांनी तुरूंगात टाकले. वर्षभरात इंडोचायनामधील राजकारणाचा रंग असा साफ पालटून गेला. १९३८ च्या मे दिनाला सरकारी सहकार्य लाभलेले कम्युनिस्ट आता भूमिगत झाले, परागंदा झाले वा तुरूंगाआड कोंडले गेले.

हो याला या घटनांपूर्वी प्रकृतीस्वास्थ्यासाठी सोची या कोरड्या हवेच्या ठिकाणी ठेवण्यात आलेले होते. लिन्... ... या 'लिनॉव्ह' नावाच्या संक्षेपित नावाने त्याचे लेख यावेळी प्रसिद्ध होत असत. १९३८ च्या मध्यापर्यंत हो खडखडीत बरा झाला खरा, परंतु युरोप आशियातील राजकारणाला वर सांगितल्याप्रमाणे भलतेच वळण मिळाले होते. फ्रेंच कम्युनिस्ट पक्षाने खेळलेले आघाड्यांचे राजकारण ब्लूम अधिकारावरून फेकला जाताच कोसळले होते. चीनमध्ये जपान्यांनी जनरल चँग-कै-शैक याला घाईला आणला होता. जपानशी लढण्यासाठी माओबरोबर समझोता करण्यावाचून त्याला गत्यंतर उरले नव्हते. लालसेनेविरुद्ध सुरू केलेले युद्ध स्थगित करून जनरल चँगने कम्युनिस्टांशी समझोता केला. माओ-चँग युतीमुळे जपानी लष्करशहा अधिकच खवळले व जपानी सैन्याचे दक्षिणायन जोराने सुरू झाले. ९ नोव्हेंबर १९३७ ला जपान्यांनी शांघाय घेतले. डिसेंबर १९३७ मध्ये नानकिंग सर केले. १९३८ साल संपले तेव्हा पेकिंग, शिंगटो, तिअनस्टीन, शांघाय, हँको, नानकिंग आणि कँटोन ही सर्व शहरे जपान्यांच्या कब्जात गेलेली होती.

## येनानला आगमन

ऑगस्ट १९३८ मध्ये हो याने मॉस्को सोडले व माओने स्थापन केलेल्या येनान येथील स्वतंत्र राज्यात आश्रय घेण्याच्या इराद्याने हो चीनमध्ये उतरला. एका हातगाडीवर सामान घालून हा शरीराने दुबळा वाटणारा व्हिएतनामी क्रांतिकारक नेता पायवाट तुडवीत आणि हातगाडी ढकलीत येनानच्या दिशेने वाटचाल करू लागला. वाटचालीच्या प्रवासात तो ओळखला जाता तर जपान्यांनी ठारच केला असता!

युरोपात युद्ध भडकण्यापूर्वी काही महिने हो येनानला पोचला. या वास्तव्यात त्याने माओला जवळून पाहिला. माओच्या जीवनातील नेमका हाच काळ चिंतनाचा आणि ग्रंथकर्तृत्वाचा काळ होता. गनिमी युद्धाची प्राथमिक तंत्रे आणि डावपेच सांगणारे पुस्तक (बेसिक टॅक्टिक्स) याच कालखंडात माओने लिहिले. माओचा व हो याचा या काळात

प्रत्यक्ष संबंध किती आला ते कळत नाही, परंतु येनानचे वास्तव्य हे हो याचेवर दृढ परिणाम करून गेले यात शंका नाही.

जनरल चँग व माओ यांची जपान्यांविरुद्ध संयुक्त आघाडी निर्माण झालेली असल्याने काही तज्ज्ञ पाठवा अशी मागणी जनरल चँगच्या कोमिंग्टांग सरकारकडून आली. तेव्हा माओने जनरल यिंग याला येनानहून पाठवले. जनरल यिंग याचेबरोबर तज्ज्ञ राजकीय अभ्यासक म्हणून हो-चि-मिन्ह याचीही परवानगी माआने केली. यावरून असे दिसते की माओला हो याच्या कर्तृत्वाची चांगली ओळख पटलेली असावी.

फेब्रुवारी १९४० मध्ये जनरल यिंगबरोबर हो दक्षिण चीनमध्ये आला. व्हिएतनाममधून परागंदा झालेले फाम-व्हान-डाँग व जिॲप हे दोघे यावेळी युनानक्वांगसी भागात पोचले होते.

हो-चि-मिन्ह, फाम-व्हान-डाँग आणि जिॲप यांची दक्षिण चीनमध्ये गाठ पडावी हे जणू पूर्वीच कुणी ठरवलेले असावे अशा पद्धतीने सर्व घडून आले.

व्हिएतनामच्या स्वातंत्र्यलढ्याची ही मार्गदर्शक त्रिमूर्ती अशा रीतीने एकत्र येताच व्हिएतनामच्या स्वातंत्र्याचे क्षितीज उजळू लागले...

n

# ५ : चिन्यांच्या कैदेत आणि मरणाच्या छायेत!

हो हा दक्षिण चीनमध्ये आल्याचे वृत्त जिॲप व फाम-व्हान-डाँग या दोघांना १९४० च्या मे महिन्यात कळले. फाम-व्हान-डाँग याचा व हो चा पूर्वपरिचय होता. तरी जिॲप व हो या दोघांची अजून प्रत्यक्ष भेट झालेली नव्हती. यामुळे डाँग यांचेबरोबर जिॲप हा मोठ्या उत्सुकतेने हो याच्या भेटीसाठी निघाला.

युनान प्रांतातील कुनमिंग शहरात यावेळी हो याचा मुक्काम असे. डाँग व जिॲप हे भेटीसाठी येत असल्याचे कळताच हो याने एक होडके भाड्याने ठरवले व गावातील जलाशयात जलविहार करीत करीत या तिघांची पहिली बोलणी झाली. जिॲप याला हो कसा दिसला? जिॲप आठवणीत म्हणतो –

> "अनुभवी वयाचा एक पुरुष एकदम माझ्यापुढे आला. अंगावर पाश्चात्य पद्धतीचे कपडे आणि डोक्यावर एक मुलायम हॅट होती. मूर्तिमंत उत्साह आणि सावध नजर. हो याने दाढी वाढवायला सुरुवात केलेली दिसत होती. नजरेत ठसावा असा साधेभोळेपणा त्याच्या वागणुकीत अनुभवाला येऊ लागला. मी त्याला प्रथमच पाहत होतो परंतु जन्मांतरीचे संबंध असावे असे दोघांना भासत होते."

## अघटित घडले होते

व्हिएतनामच्या स्वातंत्र्याच्या दिशेने झेप घेता यावी अशी मोठी घटना नुकतीच घडलेली होती. व्हिएतनामला शतकभर गुलामगिरीत पिचवणारी फ्रेंचांची साम्राज्यशाही युरोपात जमीनदोस्त झालेली होती. हिटलरपुढे पाहता पाहता फ्रेंचांनी लोळण घेतलेली होती. असे काही घडेल आणि पत्त्यांचा बंगला कोसळावा त्याप्रमाणे नाझी झंझावातात फ्रेंचांची सत्ता युरोपात भुईसपाट होईल अशी कुणाचीच अपेक्षा नव्हती. मोठे अघटित-अनपेक्षितपणे घडले होते. आत्तापर्यंत जे हो याच्या मनात होते, याला प्रत्यक्ष आकार देण्याचा हा क्षण होता. हो याने झटक्यात निर्णय घेतला- मायदेशात परतायचे!

फाम-व्हान-डाँग व जिॲप हे दोघे हो याला भेटून गेल्यानंतर पुढील ४-६ महिन्यात सर्व पूर्वतयारी पुरी झाली आणि 'पाक-बो' या डोंगराळ भागात- चिनी सरहद्दीला लागून, परंतु व्हिएतनामच्या भूमीवर हो याने ठाण मांडण्याचे ठरवले. काओ-बांग प्रांतातील हा डोंगराळ भाग अनेक दृष्टीने सोयीचा होता. या ठिकाणी डोंगराच्या कुशीत 'पाक-बो' नावाची एक मोठी निसर्गनिर्मित घळी होती. या घळीत हो याचा निवास सुरक्षितपणे होणार होता. या घळीच्या जवळून एक ओढा वाहत होता. या ओढ्याच्या अष्टौप्रहर खळाळाची या घळीला उत्तम जाग होती. येथे राहावयास आल्यानंतर हो याने घळीमागे उभ्या असलेल्या

डोंगराला ‘कार्ल-मार्क्स’ म्हणायला सुरुवात केली आणि प्रवाहाचे नाव त्याने ‘लेनिन’ ठेवले!

‘पाक-बो’ येथील गुहेत राहण्यासाठी हो आला होता तो १९४१ च्या जानेवारीत. मध्यंतरीच्या कालखंडात जगाचा नकाशा युद्धाच्या हाणामारीत ठिकठिकाणी फाटत चालला होता. या काळात व्हिएतनामच्या दृष्टीने काय काय घडले ते प्रथम सांगितले पाहिजे.

## इंडोचायनाचा ग्रास

१९४० च्या जूनपासून जपान्यांनी इंडोचायनाचा घास घ्यायला सुरुवातच केली. इंडोचायनाचा १२०० मैलांचा समुद्रकिनारा सांभाळण्यासाठी फ्रेंचांपाशी त्यावेळी फक्त एक क्रुझर आणि काही सटरफटर लहान जहाजे होती. पोलीस बरे ठरावे असे सैन्य होते! वायुदल शून्य होते. जर जपान्यांशी वाकडे पत्करायचे तर फ्रेंचांना कोण मदत देणार होते? ब्रिटन आणि अमेरिका यांना जपान्यांशी युद्ध नको होते. मदतीचा हात पुढे आला तो फक्त चँग-कै-शैक याचा. चँग-कै-शैकने अट घातली की त्याचे चिनी सैन्य इंडोनेशियात उतरून जपान्यांशी लढायला तयार आहे, परंतु मार्शल पेताँ यांच्या पराभूत व्हिशी सरकारने ही अट फेटाळली. पॅरीसहून परागंदा होऊन फ्रान्सचे वैधव्य सांभाळणाऱ्या व्हिशी सरकारला, इंडोचायनाच्या भूमीवर चिनी नको होते. आधीच सर्व बाजूने आकाश फाटलेले होते, त्यात ही नवी आफत त्यांना नको होती. म्हणून अखेर व्हायचे ते घडू लागले!

१९ जून १९४० या दिवशी टोकियोमधील फ्रेंच वकिलाला जपान सरकारने मागणी कळवली. ‘इंडोचायना-चीन सरहद्द बंद करून सर्व व्यापारी व्यवहार ताबडतोब बंद झाला पाहिजे आणि याची तामिली करण्यासाठी जपानी अधिकाऱ्यांना इंडोचायनात येण्याची मुभा राहिली पाहिजे!’

ही मागणी नव्हतीच, ही तंबीच होती. टोंकीन आखातात जपान्यांनी जहाजातून सैन्य आणायला सुरुवातच केली. बावचळलेल्या व्हिशी सरकारचा अमेरिकेतील वकील वॉशिंग्टनला अध्यक्ष रूझवेल्ट यांचे दार खडखडवू लागला. अमेरिकेचे अंडर सेक्रेटरी वेट्स यांनी फ्रेंच वकिलाला सांगितले –

‘सॉरी, युद्ध युरोपातच मर्यादित ठेवण्याचे आमचे धोरण आहे. जपानबरोबर युद्ध पेटवण्याची आमची इच्छा नाही. आमचा सल्ला असा आहे की तूर्त जपान्यांशी जमवून घ्या.’

फ्रेंचांनी जमवून घेतले! इंडोचायना-चीन सरहद्द बंद केली. जपानी अधिकारी इंडोचायनात वावरू लागले.

साधारण दोन महिने गेले. २ ऑगस्ट १९४० ला जपान्यांचे दुसरे प्रेमपत्र फ्रेंच सरकारला आले! नवी मागणी होती – 'आम्हाला टोंकीन प्रांतात येऊन तेथील फ्रेंच विमानतळ वापरायची परवानगी असावी!' पुनः अमेरिकेच्या अध्यक्षांच्या दाराशी खडखडाट झाला. पूर्वीचाच सल्ला मिळाला – 'जमवून घ्या.'

टोंकीन प्रांतातील फ्रेंचांचे विमानतळ जपान्यांनी कब्जात घेतले. फ्रेंचांनी जमवून घेण्याचे ठरवल्याचा सुगावा लागताच जपान्यांनी पत्राद्वारे मागणी करण्याचा उपचार मग रद्दच केला. २२ सप्टेंबरला जपानी सेना इंडोचायनात उतरली आणि हैपाँग बंदराचाच तिने कब्जाच करून टाकला!

अमेरिकेचे सेक्रेटरी ऑफ स्टेट यांनी २३ सप्टेंबर १९४० ला जाहीरपणे या घटनांबद्दल दुःखोद्गार काढले. 'दमदाटीने नकाशात बदल घडवले जात आहेत. आम्हाला हे मुळीच पसंत नाही.' जपान्यांनी या अशुपतनाकडे लक्षच दिले नाही आणि फ्रेंचांना त्याचा उपयोग नव्हता.

## भाबडी आशा

राजकारणात पारडी कशी गंमतीने फितरता! जपान्यांशी लढण्यासाठी म्हणून हो हा दक्षिण चीनमध्ये आला आणि तेथून व्हिएतनाम भूमीवरी येऊ पाहत होता. परंतु इकडे व्हिएतनामी जनतेला जपानच्या या सुरुवातीच्या लष्करी पावलांनी सुखाच्या उकळ्या फुटत होत्या. फ्रेंच तुडवले जात होते आणि यातच आमच्या एकीची बीजे आहेत अशी साहजिक भाबडी आशा व्हिएतनामी जनतेला वाटायला लागली होती म्हणजे एका बाजूने जपान्यांना व्हिएतनामी जनतेची सहानुभूती वाढू लागली होती आणि लष्करीदृष्ट्या इंडोचायनाचा लष्करी कब्जा जपान्यांना विलक्षण फायद्यात पडला होता.

चीनच्या दक्षिण भागाची जपान्यांनी पुरती नाकेबंदी करून दोस्तांशी चीनचे सुलभ दळणवळण अशक्य केले. बर्मारोड-लेडोरोड या लांब पल्ल्याच्या खुष्कीच्या त्रासदायक डोंगराळ मार्गांनीच आता काय ती मदत चीनला पोहोचू शकणार होती. व्हिएतनामची सर्व बंदरे ही लष्कराच्या व सामग्रीच्या हालचालीकरता जपानी बिनधोकपणे वापरू लागले. इंडोचायनातील रबर, खनिजे आणि तांदूळ हे सर्व जपान्यांना उपलब्ध झाले आणि हे सर्व घेऊन त्यांना किंमत काय द्यावी लागणार होती? शून्य. कारण सर्व लष्करी फायदे जपानी लुटत असताना फ्रेंचांचा मुलकी अधिकार बाकीची सर्व काळजी वाहणार होता!

## झोपडीतली काँग्रेस

या सर्व घटना घडत असतानाच हो हा पाक-बो घळीत १९४१ च्या जानेवारीत दाखल झाला. खऱ्या अर्थाने व्हिएतनामी क्रांतिकारकांचा तळ त्याने मायभूमीवर आणला

होता. पाक-बो येथेच १० मे १९४१ ते १९ मे १९४१, इंडोचायना कम्युनिस्ट पक्षाची आठवी काँग्रेस हो याने आखली. एक लहानशी झोपडी उभारण्यात आली होती. या झोपडीला पालापाचोळ्यांचे छप्पर होते आणि झाडाच्या फांद्यांची कुडे होती. झटपट तयार केलेली बांबूची टेबले मांडण्यात आली होती. झाडांचे बुंधे खुर्च्या म्हणून ठेवलेले होते. जमलेल्या कार्यकर्त्यांत फाम-व्हान-डाँग, ट्रुआँग-चिन्ह, जिऑप इत्यादी मंडळी प्रमुख होती. मार्क्सवादाचे हे सर्व कट्टर अभिमानी असूनही त्यांनी एकमताने निर्णय केला की 'व्हिएतनामचा स्वातंत्र्यलढा लढविण्यासाठी केवळ कम्युनिस्ट पक्ष अपुरा आहे. देशभर उठाव करायचा तर पक्षाची भूमिका रूंद व थोडीफार सैल केली पाहिजे. इतकी ढिली की सर्व राष्ट्रवाद्यांना त्यांच्या वर्गाचा विचार मनात न येता या नव्या पक्षात सामील होण्यास उत्सुकता वाटली पाहिजे. केवळ शेतकरी-कामकरी नव्हेत तर दुकानदार, व्यापारी, राष्ट्रीयवृत्तीचे जमीनदार देखील या पक्षाकडे आले पाहिजेत.

## नवी दिशा लागली

इतके दिवस मॉस्कोच्या वर्चस्वाखाली दबून राहिलेला हो या क्षणी प्रथमच त्या पाशातून अंग झटकीत बाहेर येताना दिसतो. स्वतंत्रबुद्धीने निर्णय घेण्याचे भान व्हिएतनामच्या स्वातंत्र्यलढ्याच्या मोक्याच्या क्षणी त्याला राहिले ही गोष्ट ध्यानात घेतली पाहिजे. दुसऱ्या महायुद्धाच्या कालखंडात भारतातील कम्युनिस्ट मॉस्कोच्या तालावर नाचण्यातच केवळ भूषण मानीत होते आणि आजतागायत त्यांना दुसरे काही सुचत नाही ही गोष्ट आपण पाहिलेली आहे. राष्ट्रवादाला हो स्वतः सामोरा गेला ही त्याची बहाद्दुरी आणि यासाठी त्याने पक्षाचे निशाण आणि पक्षाची पोथीही दूर केली. मार्शल स्टॅलिन हा अंतर्यामी पक्का राष्ट्रवादीच आहे असा हो याला संशय होताच. या घटनेनंतर काही आठवड्यांतच हिटलर-मॉस्को मधुचंद्र संपला आणि नाझी सेना मॉस्कोच्या दिशेने टकरा देऊ लागल्याबरोबर, स्टॅलिनला पुनश्च पीटर-दी-ग्रेट, पवित्र व्होल्गा इत्यादींचा घोष सुरू करावाच लागला.

'पाक-बो' च्या घळीशेजारी अशा रितीने मूळच्या इंडोचायना कम्युनिस्ट पक्षाची पुनर्रचना करण्यात येऊन नवा पक्ष स्थापन करण्यात आला. या पक्षाचे नाव ठरले 'व्हिएतनामा-डॉक-डॉग-मिन्ह' म्हणजे व्हिएतनामच्या स्वातंत्र्यासाठी निर्माण झालेली आघाडी. लीग फॉर व्हिएतनामियन इंडिपेंडन्स! पक्षाच्या नावाचे व्यवहारी छोटे नामकरण झाले. 'व्हिएत-मिन्ह.' पक्षाचे उद्दिष्ट स्पष्ट करताना जाहीरनाम्यात म्हटलेले आहे –

'जपानी फॅसिस्टांना आणि फ्रेंच साम्राज्यवाद्यांना हाकलून दिल्यानंतर लोकशाहीप्रणीत व्हिएतनाम प्रजासत्तकाची निर्मिती करण्यात येईल. या नव्या देशाचे निशाण असेल- लाल ध्वजावरील सोनेरी तारा.'

उदयास येणाऱ्या स्वतंत्र व्हिएतनामच्या प्रजासत्तकाच्या पताकेचे वर्णन वाचल्यानंतर लक्षात येते, की या मार्क्सवाद्यांनी पक्ष विसर्जित केला तरी ते मार्क्सला विसरले मात्र नाहीत. स्वतंत्र व्हिएतनामचे निशाण मार्क्सवाद्यांनी सोयरीक जाहीर करणारेच राहणार होते. परंतु ६ जून १९४१ या दिवशी लिओ-चाऊ या सरहद्दीनजीकच्या चिनी खेड्यातून हो याने नभोवाणीवरून जे पत्रक वाचून दाखवले. त्यात सर्व समावेशक भावनाच खेळवलेली होती. या जाहीरनाम्याची सुरुवातच हो याने अशी केली होती –

वंदनीय बंधूनो,

देशभक्त सैनिकांनो,

बुद्धिवानांनो, शेतकऱ्यांनो, कामकऱ्यांनो, व्यापाऱ्यांनो, प्रिय देशभक्तांनो–

फ्रेंचांना जर्मनांनी धूळ चारल्यानंतर त्यांचे अवसान गळालेले आहे. परंतु त्या भ्याडांनी आपला देश आता जपान्यांच्या हवाली करून टाकलेला आहे. आपल्या पूर्वजांनी पूर्वी चाचेगिरी करणाऱ्या फ्रेंचांचे जू मानेवर मिरवले तर आज आपण जपान्यांचे गुलाम झालेले आहेत. आज मुक्तीचा क्षण दार ठोठावीत आहे. पूर्वी मंगोली लोकांची स्वारी झाली. आपले आबालवृद्ध वंशज प्राणपणाने लढले, त्यांची आठवण ठेवून आपण त्यांचे उदाहरण गिरवायचे आहे.

जपान्यांचे आणि फ्रेंचांचे जोखड झुगारून देण्यासाठी आपण एकजुटीने लढू या.

बंडाचे निशाण उंच फडकू द्या. पितृभूमीची पवित्र हाक तुमच्या कानात सतत घुमत राहू द्या.

व्हिएतनाम क्रांतीचा विजय असो!

जागतिक क्रांतीचा विजय असो!

या जाहीरनाम्यातील भरतवाक्य हे जागतिक क्रांतीचे आहे. परंतु यावेळी जगात इतकी उलथापालथ घडण्याची चिन्हे होती की व्हिएतनामचाच काय, जगातील कुठलाही कानाकोपऱ्यातील लढा हा जगाला हादरवून टाकणाऱ्या महायुद्धाच्या परिणामांपासून वेगळा राहणे शक्य नव्हते. ६ जून १९४१ ला हो ने हा जाहीरनामा नभोवाणीवरून प्रसृत केला आणि आठवड्याभराच्या आतच हिटलरने रशियावरील हल्ल्याची लष्करी खलबते बर्लिनमध्ये सुरू केली. २२ जूनला पहाटे ३.३० वाजता हिटलरने रशियन सरहद्दीवर सरबत्ती सुरू केली.

इंडोचायनात जपान्यांनी केलेले आक्रमण अमेरिका डोळ्यांवर कातडे ओढून आत्तापर्यंत पाहत होती. आज ना उद्या जपानी आक्रमकांचा मुकाबला अमेरिकेला करावाच लागेल हे हो याला स्पष्ट दिसत असल्यामुळे एका जाहीरपत्रकात हो याने म्हटले होते, 'इंडोचायनाची जनता बड्या राष्ट्रांना आणि विशेषतः अमेरिकेला अशी विनंती करीत आहे की त्यांनी आम्हाला आमच्या स्वातंत्र्य-लढ्यात सहाय्य द्यावे. जपान्यांविरुद्ध लढण्यासाठी आम्हाला दारूगोळा द्यावा. शस्त्रे द्यावीत. लष्करी सहाय्यक पाठवावेत, शिक्षक पाठवावे-'

## येनानची आवृत्ती

हे सर्व एकीकडे करत असता हो याने पाक-बो येथे माओच्या येनानचीच एक आवृत्ती सुरू केली. 'सोविएट कम्युनिस्ट पक्षाचा इतिहास' आणि चिनी लेखक सनत्सु याचे 'आर्ट ऑफ वॉर' या पुस्तकांचे असे दोन अनुवाद हो याने मातृभाषेत केले. पक्षात भरती होणाऱ्या तरुणांसाठी लष्करी शिक्षणाची सोय पाक-बो येथे करण्यात आली आणि या नवगतांपुढे हो याची व्याख्याने होऊ लागली. ज्या पद्धतीने येनान येथे माओने लहानसे आदर्श सोव्हिएट राज्यच स्थापन केले. तेच उद्दिष्ट ठेवून हो याची वाटचाल सुरू झाली.

अमेरिका व जपान यांच्यात कुरबुर सुरू झालेली होती. इंडोचायनाचा जपान्यांची कब्जा केल्याने फिलिपाईन्समधील अमेरिकेचे तळ आणि ब्रिटिशांची मलाया, सिंगापूर ही ठाणी धोक्यात आली होती. अध्यक्ष रूझवेल्ट यांनी जपान सरकारला २४ जुलै ४१ ला सूचना पाठवली – 'इंडोचायनाचे आंतरराष्ट्रीयीकरण करू या. यासाठी तेथून जपानी सैन्य प्रथम काढून घेण्यात यावे...' ६ ऑगस्टला जपानने उत्तर धाडले – 'चीनशी आमचे युद्ध सुरू आहे. ते संपेपर्यंत इंडोचायनातून आमचे सैन्य काढून घेता येणार नाही, चीनशी समझोता करण्यासाठी अमेरिकेनेच पुढाकार घ्यावा...'

अध्यक्ष रूझवेल्ट यांनी जपान सरकारला कळवले की मिळालेला जबाब समाधानकारक नाही. युरोपात जर्मन सैन्य मॉस्कोनजीक येऊन ठाकताच रूझवेल्ट यांनी चर्चिल यांच्याशी बोलणी करण्याचे सूतोवाच केले. ९ ऑगस्टला अटलांटिक महासागरात ही जगप्रसिद्ध भेट झाली आणि १२ ऑगस्टला 'अटलांटिक चार्टर' हा जाहीरनामा बाहेर पडला. या वाटाघाटीतच यापुढे जपान्यांचेही नवे आक्रमण इंग्लंड-अमेरिका सहन करणार नाही असे दोघांनी ठरवले. ठरवले ते ठरवले परंतु अमेरिकेत परतताच हा निर्णय जपान सरकारला मुद्दाम कळवण्यात आला. अमेरिका आता युद्धसन्मुख होत चालली होती. १६ ऑक्टोबर १९४१ या दिवशी प्रिन्स कनोये याचे मंत्रिमंडळ टोकियोत गडगडले आणि जनरल हिडेकी टोजो याचे युद्धखोर मंत्रिमंडळ अधिकारावर आले.

## अमेरिकेचे युद्धात पदार्पण

युद्धाच्या दिशेने जपानची वाटचाल सुरू होत आहे हे पुरतेपणी लक्षात येताच, कार्डेल हल यांनी २५ नोव्हेंबर ४१ ला जपान सरकारला कळवले की, जपानने इंडोचायना व चीनमधील आक्रमण त्वरित मागे घ्यावे. अमेरिकेचे सरकार जागे होऊ लागले होते परंतु उशीर झाला होता. २५ नोव्हेंबरलाच जपानी विमानवाहू बोटी पर्ल हार्बर बंदराकडे मार्गस्थ झालेल्या होत्या. ७ डिसेंबरच्या रविवारी जपान्यांनी पर्ल हार्बरवर हाहाःकार उडवून अमेरिकेविरुद्ध युद्ध घोषित केले.

अमेरिका जपानविरुद्ध युद्धात उतरली याचा अर्थ, जपान्यांविरुद्ध लढणारी एक घटक म्हणून व्हिएतनामी स्वातंत्र्यलढा लढवणाऱ्यांना आता ती सर्वतोपरी साहाय्य करणार असाच होत होता. पॅसिफिकमधील युद्ध भडकत चाललेले पाहताच हो याने चीनमध्ये परतण्याचा निर्णय घेतला. चीनमध्ये परतण्यात हो याचे दोन हेतू होते.

१. चँग-कै-शैक याच्याशी वाटाघाटी करून व्हिएतनामी क्रांतिकारकांसाठी लष्करी मदत मागणे आणि

२. चिनी कम्युनिस्ट पक्षाशी आणि पर्यायाने मॉस्कोशी पुनश्च घनिष्ट संबंध जोडून ठेवणे.

जुलै १९४२ मध्ये हो याने पाक-बो ची घळ सोडली. चीनमध्ये जाण्यापूर्वी त्याने अखेरचे नाव बदलले. हो या नावापुढे त्याने चि-मिन्ह जोडले. हो-चि-मिन्ह म्हणजे ‘प्रकाश देणारा हो.’

## चिन्यांच्या कैदेत हो

चिनी पत्रकार म्हणून हो याने नव्या नावाने चीनशी सरहद्द ओलांडली मात्र आणि दैवाने तडाखा दिला. क्वांगसी प्रांताचा लष्करी स्वामी मार्शल चांग – फाकुई याने, हा कुणीतरी भूमिगत चिनी कम्युनिस्ट आहे असा संशय येऊन हो याला पकडले... व तुरूंगात डांबले; हो याला मार्शल चांग याने अटक केली यासंबंधात एक शक्यता अशी आहे, की हो हा कोण आहे हे मार्शल चांग याला ठाऊक असावे व चीनच्या दक्षिणेकडील भागात दुसरे येनान तयार होणे मार्शल चांगसारख्यांना मानवणारे नव्हते. म्हणून त्याने हो याला तुरूंगात डांबले असावे. पुढील पंधरा महिने हो गजाआड झाला. हातापायात हातकड्या घालून त्याला ठिकठिकाणी फरफटण्याचे नशिबी आले. नानिंगपासून त्सिन-एसीपर्यंत आणि क्वेइलीनपासून लिओथुपर्यंत मैलच्या मैल त्याला चालवण्यात आले. प्रसंगी मानेवर जू ठेवून गाडी ओढावी लागली. मृत्युदंड झालेली माणसे त्याच्या सहवासात असत. यापैकी एक तर एका रात्री त्याच्या अंगावर रेलूनच मरण पावला. असे भयंकर दिवस हो याने धैर्याने काढले.

## जिवंतपणीचे मरण

जिॲप व डाँग या त्याच्या मागे राहिलेल्या सहकाऱ्यांना हो पकडला गेल्याचे लगेचच कळले. काही महिन्यांतच बातमी आली की हो तुरूंगातच मरण पावला! जिॲप सांगतो –

'एके दिवशी फाम-व्हान-डाँगकडून मला पत्र आले. या पत्रात हो हा कोमिंग्टांग तुरूंगात निधन पावल्याचे त्याने कळवले होते. दुःखातिशयाने आमचे हातपायच गळाले. आमच्या पूज्य नेत्याला श्रद्धांजली वाहण्यासाठी आम्ही एक समारंभ घडवला. डाँग यानेच या सभेत प्रमुख भाषण केले. आमच्या एका सहकाऱ्याला हो चाचा याच्या मृत्यूची, आणि त्याला कुठे पुरले असेल त्या स्थानाची माहिती काढण्यासाठी आम्ही चीनमध्ये धाडला. असेच काही दिवस गेले... आणि एक दिवस चीनमधून पोस्टाने पाठवलेले एक वृत्तपत्र आमचे हाती आले. त्या वृत्तपत्राला गुंडाळलेल्या कव्हरवर पाच काव्यपंक्ती होत्या. अक्षर ओळखीचे होते. हो चाचा जिवंत आहे हे कळताच आम्हाला अत्यानंदाने अश्रू आवरेनात. कविता हो याच्या हस्ताक्षरातच होती.

गिरीशिखरे झगमगत आहेत – ढगांच्या किमयेने
ढग मिठीत आहे शिखरांच्या
मी एकटा भटकतो आहे – अनावर भावनांनी भरलेला
दक्षिणेचे आकाश धुंडाळीत
मित्रांच्या आठवणी मनात घोळवीत...

कॉम्रेड कॅप याने प्रथम हो याच्या निधनाचे वाईट वृत्त आणले. आम्ही त्याला प्रश्न विचारून धारेवर धरला. कॅप सांगत होता – 'मला चिनी गव्हर्नरने स्वतः सांगितले – 'साऊ लेऊ!' (केव्हाच मेला! केव्हाच मेला!) आम्ही त्याला सांगत होतो, 'तुझी ऐकण्यात चूक झाली असावी' तो म्हणाला असेल 'लेऊ चाऊ! लेऊ चाऊ! (प्रकृती छान आहे!) तुला ऐकू आले 'साऊ लेऊ'

## गजाआडचे काव्य

'तुरुंगातील दिवस' या शीर्षकाखाली हो याने या पंधरा महिन्यात केलेल्या कविता आता प्रसिद्ध झाल्या आहेत. हो याने या कविता 'क्वाक-नगु' या आपल्या मातृभाषेत न लिहिता त्या चिनी भाषेत लिहिल्या आहेत. परंतु याचे आश्चर्य नाही. कारण जेव्हा माणूस एकांतवासात विचार करतो, तेव्हा तो विचार परक्या भाषेतून व्यक्त करणे अधिक सोयीचे असते असा अनेकांचा अनुभव आहे. चर्चिल यांनी म्हटले आहे की, 'मी माझे विचार फ्रेंच भाषेत अधिक नेटकेपणाने व्यक्त करू शके.' यामुळेच हो यानेही आपले गजाआडचे काव्य हे चिनी भाषेत लिहिले असावे. सुमारे शंभर कविता या काळात हो याने लिहिल्या. कविता

अगदी साध्या भाषेतील आणि सरळ भिडणाऱ्या आहेत. बहुधा पहिल्याच शब्दपंक्तीतून आशय कळतो. उदाहरणार्थ –

तुमचे शरीर तुरूंगात असते

पण मन कधीच नसते

आसपास उवा-लिखांनी त्रस्त झाल्याने अखेर दमून शांतपणे झोपी गेलेल्या कैद्यांची वर्णने काही ठिकाणी आहेत. कधी भयाण एकांतवासाचे दुःख अनावर झालेले आहे –

चार महिन्यांचे अमानुष जिणे

शरीर पोखरणे आहे

दहा वर्षांचे!

कधी कधी लहान लहान स्वप्ने मांडलेली आढळतात. तर मधूनच दुर्दम्य क्रांतिकारकत्व उफाळून आलेले दिसते. आशा-निराशांची, जीवन-मृत्यूंची ही गाणी आता अमर झालेली आहेत. तुरुंगातील कवितांना अमत्व लाभलेले आपले असे कवी म्हणजे स्वातंत्र्यवीर विनायक दामोदर सावरकर. या दोन्ही क्रांतिकारकात कवित्वशक्ती हा एक समान धागा आढळतो.

परंतु ज्यावेळी या कविता निर्माण होत होत्या त्यावेळी हो याच्या अवतीभवती सर्वत्र निराशाच भरून राहिलेली होती. मार्शल चांग यांच्या कैदेतून आपण सुटू अशी आशा त्याला वाटत नव्हती. कदाचित व्हिएतनामचा स्वातंत्र्यसूर्य उगवण्यापूर्वीच मृत्यू आपल्याला गाठील अशी भीती हो याच्या मनात सदैव वसत असावी.

सुदैवाने लवकरच असे काही घडले की तुरुंगाचे दार अचानक उघडले जाऊन, हो पुनश्च मुक्त झाला.

n

# ६ : पुनश्च वनवासात

एकांतवासाचे, शरीर पोखरणारे जिणे हो हा तुरूंगात कंठीत असताना त्याचा जेलर चिनी लष्करी धटिंगण मार्शल चांग हा काही स्वस्थ बसलेला नव्हता. क्वांगसी प्रांताच्या या लष्करी हुकूमशहाने व्हिएतनाममध्ये जपान्यांना विरोधी परंतु चिनी राजकर्त्यांशी इमान ठेवणारी एक संघटना पोसायला सुरुवात केली. १९४२ सालीच हो-चि-मिन्ह याला विरोधी असलेली एक राष्ट्रवादी संघटना इंडोचायनात स्थापन झालेली होती. 'डाँग-मिन्ह-होई' (रेव्होल्युशनरी लीग व्हिएतनाम) या नावाने ही संघटना- संघटना म्हणण्यापेक्षा संस्था हयात होती. याचे नेतृत्व राष्ट्रवादी नेता नम्यूएन थान याचेकडे सोपवून मार्शल चांग याने या संस्थेत प्राण ओतला. हा नग्यूएन थान अनेक वर्षे देशासाठी परागंदा असल्याने, त्याच्या नावाभोवती देशभक्तीचे मोठे तेजोवलय आयतेच उपलब्ध होते. जपान्यांचा जो जो शत्रू तो तो आपला मित्र या सरळसोट राष्ट्रवादी विचाराने थान याने मार्शल चांग याची मैत्री, पैसा आणि लष्करी साहाय्य पत्करले.

## फ्रेंचांनी मलई खाल्ली

मार्शल चांगने हा जो नवा डाव टाकला होता त्याला अनुकूल अशी घटना चँग-कै-शैक व अध्यक्ष रूझवेल्ट यांच्या पत्रापत्रीतून निष्पन्न होऊ लागली होती.

१९४४ च्या फेब्रुवारीमध्ये वॉशिंग्टनच्या राज्यकर्त्यांनी युद्धोत्तर फ्रेंच इंडोचायना हा 'फ्रेंच' ठेवावा की नाही याचा विचार सुरू केलेला होता. अध्यक्ष रूझवेल्ट यांनी फ्रान्सच्या भूमीवरील व्हिशी सरकारला जशी मान्यता दिलेली नव्हती, त्याचप्रमाणे जनरल द-गॉलचे सरकारही त्यांनी मान्य केलेले नव्हते. अध्यक्ष रूझवेल्ट यांनी याच सुमारास अमेरिकेच्या युद्धखात्याला, जे पेंटॅगॉन या नावाने विख्यात आहे - संदेश पाठवला - 'इंडोचायनाच्या राजकारणात अडकू नका-'

अमेरिकेचा जनरल वेडेमेयर हा चँग-कै-शैकच्या मदतीसाठी चीनमध्ये गेलेला होता. त्याने पेंटॅगॉनला लेखी विचारले होते –

'फ्रेंचांनी भारताच्या भूमीवर तळ स्थापन केलेला आहे. तेथून ते इंडोचायनात घुसण्याचा इरादा बाळगून आहेत. त्याचप्रमाणे युनान प्रांतातही फ्रेंचांचे मिशन आहे, ते इंडोचायनाचा युद्धोत्तर कब्जा करण्याचे आराखडे आखित आहेत. याबाबतीत अमेरिकन सरकारचे धोरण काय आहे?'

अमेरिकेच्या युद्धखात्याने लेखी खलिता धाडला नाही. चीनमधील अमेरिकेचा वकील पॅट्रीक केले याला सूचना आली –

‘जनरल वेडेमेयरला कळवा की इंडोचायनाचे भवितव्य दोस्तांच्या आगामी बैठकीतून ठरणार आहे. तोपर्यंत स्वस्थ रहा.’

वस्तुतः अध्यक्ष रूझवेल्ट हेच दोस्तांमधील मुख्य प्रवक्ते होते. अमेरिकेतील ब्रिटिश वकील लॉर्ड हॅलिफॅक्स यांनी जानेवारी १९४४ मध्येच इंडोचायनासंबंधी अध्यक्ष रूझवेल्ट यांची गाठ घेतली होती. हॅलिफॅक्स यांना अध्यक्ष रूझवेल्ट यांनी स्वच्छ शब्दांत सांगितले होते –

‘इंडोचायना पुनश्च फ्रेंचांच्या हवाली केला जाऊ नये असेच माझे मत आहे. जवळ जवळ शंभर वर्षे या भूभागावर फ्रेंचांनी राज्य केले आणि आज तिथल्या जनतेची काय स्थिती त्यांनी करून टाकली आहे! फ्रेंचांनी मलई खाल्ली, तिथले लोक मात्र अधिकाधिक दयनीय होत गेले.’

यावेळी लॉर्ड हॅलिफॅक्स साहेबांना चेहरा हसरा ठेवणे किती कठीण गेले असेल याची कल्पना करा! इंडोचायनाबाबत अध्यक्ष रूझवेल्ट यांनी हा जो पवित्रा घेतला तोच सर्व भारताला लागू नाही का? उद्या रूझवेल्ट ब्रिटिशांनादेखील म्हणतील – ‘तुम्ही मलई खाल्लीत. भारतीय जनेतीची स्थिती दयनीय झाली, आता चंबुगबाळे उठवा!’ लॉर्डसाहेब इंग्लंडला गेले. चर्चिल यांना त्यांनी रूझवेल्ट यांच्या या फ्रेंचांबाबतच्या नवमताचा कानोसा दिला.

## महाठक चर्चिल

चर्चिल यांची गुर्मी कायम होती. साम्राज्याचे दिवाळे फुंकण्यासाठी आपण पंतप्रधान झालेलो नाही, या त्यांच्या चढेल पवित्र्यात इंचभरही फरक झालेला नव्हता. शिवाय चर्चिल यांना आणखी एक गोष्ट ठाऊक होती – म्हातारा रूझवेल्ट फार दिवस काही आता जगत नाही. मग आजच तंटा कशाला? हो ला हो म्हणत दिवस ढकलू. अजून इंडोचायनाची मुक्ती खूप दूर आहे आणि मधल्या काळात फ्रेंचांना हाताशी धरू ना!

भारताच्या भूमीवर असलेला फ्रेंचांचा तळ हा हळूहळू इंडोचायनात काड्या घालू लागला तो चर्चिल यांच्या पाठिंब्यामुळे. १९४४ च्या मे महिन्यात ब्रिटिशांनी साळसूदपणे अमेरिकेला पुनश्च विचारले –

‘इंडोचायनाच्या मुक्तीसाठी फ्रेंच सैन्य उत्सुक आहेच. त्यांना ब्रिटिशांच्या बरोबरीने जपान्यांशी लढू द्यायला हरकत नसावी-’

रूझवेल्ट यांनी कार्डेल हल यांना पुनः स्पष्टपणे सूचना दिली –

‘युद्धोत्तर प्रश्नावर आताच निर्णय करता येणार नाही. इंडोचायनाच्या मुक्ती प्रयत्नात मला राजकारण नको आहे. तुम्ही हॅलिफॅक्स यांना सांगा की मी चर्चिल यांना या बाबतीत

सर्व स्पष्टपणे सांगितले आहे.'

## विश्वस्त योजना

इंडोचायना मुक्त झाल्यानंतर काही झाले तरी तो पुन:श्च फ्रेंचांच्या ताब्यात द्यावयाचा नाही, हा अध्यक्ष रूझवेल्ट यांचा निर्धारच झाल्यासारखा होता. मग इंडोचायनाचे करायचे काय? इंडोचायना हो चीनच्या कक्षेखाली जायला रूझवेल्ट यांची हरकत नसावी असे वाटते. कारण अध्यक्ष रूझवेल्ट व चँग-कै-शैक या दोघांत इंडोचायना संबंधात काही बोलणी यावेळी सुरू होती. त्याचे नेमके स्वरूप अद्यापही स्पष्ट झालेले नाही. परंतु इंडोचायनाचा ट्रस्टी (हितकर्ता) म्हणून चीनने जबाबदारी घ्यावी अशी ही काहीतरी विश्वस्त योजना होती.

मार्शल चांग याने आपला नवा पवित्रा याच संभाव्य योजनेच्या दृष्टीने टाकलेला होता. सुदैवाने नग्यूएन थानसारखा राष्ट्रवादी क्रांतिकारक नेता त्याच्या अचूक गळाला लागलेला होता. डाँग-मिन-होई या संघटनेला मार्शल चांगकडून सर्व प्रकारचे सहाय्य होऊ लागले होते.

बंदीवासात पडलेल्या हो याला मार्शल चांगच्या अंतरंगाची कल्पना होती. आपण असेच तुरूंगाआड राहिलो तर 'डाँग-मिन्ह-होई' ही संघटना व्हिएतनामच्या जनतेला, जपान्यांच्या पाशातून मुक्त होताच चिनी साम्राज्यवाद्यांच्या जोखडाला जखडून टाकील हा धोका त्याला स्पष्ट दिसू लागला. विचाराने पाऊल उचलण्याची ही वेळ होती आणि हो याने अचूक प्रतिडाव केला.

मार्शल चांग याला हो याने तुरूंगातून पत्र लिहिले. या पत्रात त्याने कोमिंग्टांग सरकारच्या आधाराने इंडोचायनात स्थापन झालेल्या डाँग-मिन्ह-होई या संघटनेचे काम करण्याची इच्छा व्यक्त केली व यासाठी आपल्याला मुक्त करावे अशी विनंती केली.

## हो याची सुटका

मनस्वी क्रांतिकारक हा उत्तम संघटक असतोच असे नाही. डाँग-मिन्ह-होईचा राष्ट्रवादी क्रांतिकारक नेता नग्यूएन थान याची संघटक म्हणून यावेळेपर्यंत अग्निपरीक्षा होऊन चुकली होती. संघटनेचा फजितवाडा होऊ लागलेला होता. पहिली गोष्ट, आयुष्यभर परागंदा अवस्थेत असल्याने थान याला व्हिएतनामी भाषा मुळीच येत नव्हती आणि व्हिएतनामी जनतेशी त्याचे सांस्कृतिक नाते पुरते उद्ध्वस्त झालेले होते. मार्शल चांग काहीशा चिंतेतच असताना त्याला हो याचे पत्र मिळाले.

मार्शल चांग याने हो याच्या मुक्ततेचा हुकूम सोडला आणि हो याला डाँग-मिन्ह-होई या संस्थेचा सर्वाधिकारी नेमून टाकले! ज्या व्हिएत-मिन्ह संघटनेला शह देण्यासाठी

'डाँग-मिन्ह-होई' संघटना चिन्यांनी हाताशी धरली होती, त्या 'होई' संघटनेचा प्रमुख आता कोण झाला? तर व्हिएतमिन्ह संघटनेचा आद्य प्रवर्तक आणि नेता हो-चि-मिन्ह! चिनी राजकारणात तर्क कुंठीत करण्याची शक्ती सनातन दिसते. तर्कात न बसणारा एक मूर्खपणा मार्शल चांग याने यावेळी केला आणि हो पुनश्च मुक्त झाला.

जपान्यांशी चाललेल्या लढाईत चिन्यांना संपूर्ण साहाय्य या अटीवर हो-चि-मिन्ह- 'होई' संघटना, व्हिएतनामच्या स्वातंत्र्यासाठी वापरू शकत होता. महिन्याला मार्शल चांगकडून मिळणाऱ्या एक लाख डॉलर्स या अवाढव्य आर्थिक सहाय्याचा, आता हो हा एकमेव उत्तराधिकारी झाला.

मार्शल चांगच्या कैदेतून सुटका होताच हो हा युनान प्रांतात होआंगबिन्ह या आपल्या मित्राच्या भेटीला गेला. बिन्ह याने या भेटीचे वर्णन करून ठेवले आहे.

'गॅस-बर्नरशेजारी हो लवंडलेला होता. दिव्याच्या फिक्कट प्रकाशात पडल्या पडल्या तो बोलत होता. त्याची गालहाडे आता चांगलीच वर आलेली दिसत होती. खोबणीत बसवावे तसे डोळे खोल गेल्यासारखे दिसत होते. अंगात ताप होताच. अंगावरचे ब्लँकेट थरथरत होते. दाढी काळीभोर असली तरी केसांतून रूपेरी चमक डोकावू लागलेली होती. त्याचे वारेमाप वाढलेले केस उशाखाली घेतलेल्या तरटाच्या पोत्यावर पसरले होते. त्याची ही अवस्था पाहून मला तर गलबलून येत होते. हा माणूस इतक्या आर्ततेने काही गोष्टींवर आणि जनतेवर कसे काय प्रेम करू शकतो?'

'त्या रात्री गप्पांच्या आघात हो याने कबुली दिली की डाँग-मिन्ह-होई संघटनेत तो घुसला आहे, तो संघटनेचा कब्जा करून तिला क्रांतिकारक मार्गावर नेण्यासाठीच. चिन्यांच्या मांडलिकत्वात त्याला काडीचा रस नव्हता.'

यावेळी जिॲप हा देखील स्वस्थ बसलेला नव्हता. उत्तर टोंकीन विभागात थो जमातीची वस्ती होती. या जमातीने फ्रेंच सत्तेविरुद्ध उठाव केला होता. चु-व्हान-टॅन हा थो नेता भूमिगत झाला होता. जिॲप याने चू-व्हान-टॅन याचेशी संपर्क प्रस्थापित केला.

### घोटाळा झाला होता

हनोई येथे व्हिशी सरकारचा प्रतिनिधी म्हणून ॲडमिरल द क्रॉक्स हा होता. याशिवाय युनान प्रांतात द गॉल यांच्या सरकारने जे एक लष्करी मिशन पाठवले होते ते युनानच्या राजधानी शहरातच होते. ॲडमिरल द कॉक्स व द गॉल प्रतिनिधी, या दोघांच्या हे ध्यानात आले की मार्शल चांग याने घोटाळा केलेला आहे. हो-चि-मिन्ह किंवा जिॲप या दोन माणसांवर विसंबण्यात धोका आहे. चँग-कै-शैकच्या कोमिंग्टांगला या दोघांचे इमान

कधीही मिळणार नाही. चिन्यांचा पैसा हा कम्युनिस्ट विचारधारेला जवळ असलेल्या व्हिएतनामी क्रांतिकारकांच्या हातात पडत आहे हे चांगले नाही.

मार्शल चांग हा आता काहीसा गोंधळून गेला. लिऊ चौ या ठिकाणी गनिमीकाव्याच्या पद्धतीने लढायचे शास्त्रोक्त शिक्षण व्हिएतनामी तरुणांना दिले जात असे त्याच ठिकाणी, मार्शल चांग याने सर्व व्हिएतनामी स्वातंत्र्यभक्तांची एक परिषद बोलावली. या परिषदेत भाग घेण्यासाठी हो-चि-मिन्ह, फाम-व्हान-डाँग हे एकाच विचारधारेचे नेते वगळता, जमलेल्या राष्ट्रवादी नेत्यांत काही जपानधार्जिणे तर काही चिनीधार्जिणे तर काही नुसते सरळसोट राष्ट्रवादी होते. ट्रुआँग-बोई-काँग हा चिन्यांना वश असलेला नेता, हो व फाम व्हान-डाँग यांचेवर टीकास्त्र सोडणाऱ्यात अग्रभागी होता. परिषद सुरू झाली आणि सर्वांनी हो याचेवर आरोप केला – 'तुम्ही सर्व मनाने कम्युनिस्ट आहात आणि राष्ट्रवाद्यांना मागे ढकलणाऱ्या कारवाया तुम्ही करीत असता. राष्ट्रवादी हे सहन करणार नाहीत-' हो-चि-मिन्ह याने होई संघटनेतून दूर सारलेला नग्यूएन थान याचा तर परिषदेत या आरोपाला सर्वस्वी पाठिंबा होता. वातावरण विरोधी होत चाललेले पाहून आपापसात दुफळी नको या न्यायबुद्धीने हो याने नमते घेण्याचे ठरवले. या परिषदेत स्वतंत्र व्हिएतनामचे एक काळजीवाहू सरकार निर्माण करण्यात आले. त्याचे पंतप्रधानपद चिन्यांचा मि. ट्रुआँग-बोइकाँग याला देण्यात आले व हो याला या सरकारात साधा मंत्री म्हणून घेण्यात आले.

## सिंहासन वनवासात घडते

या तथाकथित क्रांतिकारी सरकारातील मंत्री लवकरच परस्परांचे पाय ओढू लागले. या सरकारात हो याला तर रस नव्हताच. त्याने केव्हाच इंडोचायनाच्या सरहद्दीकडे मोर्चा वळवलेला होता. नामधारी पंतप्रधान टिकत नसतात हे त्याला ठाऊक होते. इंडोचायनाच्या सरहद्दीवर व्हिएतमिन्ह संघटनेचे तरुण, जिॲप यांच्या नेतृत्वाखाली गनिमी लढाया खेळत होते. व्हिएतनामच्या भावी पंतप्रधानाचे सिंहासन तिथे घडत होते.

काही काळापूर्वी व्हिएत-मिन्ह संघटनेला अशी आशा वाटत होती की हिटलरचे आश्रित व्हिशी सरकार हे इंडोचायनावर परत फ्रेंच वर्चस्व प्रस्थापित करण्याचे स्वप्न पाहात असले तरी जनरल द गॉल व फ्रान्समधील लोकशाहीवादी नेते यांना इंडोचायनावर गुलामी लादण्याची इच्छा नाही. यामुळे त्यांच्या प्रचारात नेहमी साम्राज्यवादी फ्रेंच व पुरोगामी द-गॉल असा स्पष्ट फरक दाखवण्यात येत होता.

परंतु आश्चर्य घडले होते! जर्मनीच्या टाचेखालून फ्रान्स देशाला मुक्त करण्यासाठी धडपडणारा द गॉल हे त्याचे एक दर्शन होते. पण त्याच्याच मनात इंडोचायनावर पुन:श्च फ्रेंचांचे जोखड लादण्याचे स्वप्नही तरळत असेल याची कुणाला कल्पना नव्हती. ८

डिसेंबर १९४३ या दिवशी अल्जीअर्स येथे द गॉलने इंडोचायनावर परत फ्रेंच अंमल चालू करण्याची भाषा प्रथम काढली.

ही भाषा द गॉल याने याच वेळी का काढली? द गॉल याचा बोलविता धनी कोण होता?

१९४३ च्या अखेरीस लष्करीदृष्ट्या जर्मनीने युद्ध गमावलेले आहे, ही गोष्ट स्पष्ट झालेली होती. जर्मन यू बोटीचे संपूर्ण शिरकाण होऊन फ्रान्समध्ये उतरण्याची दोस्तांची तयारी निर्वेधपणे चालू झालेली होती. दोस्तांची विमाने जर्मन शहरांवर राक्षसी बाँबहल्ले चढवून सूडाचे समाधान उपभोगीच होती. रशियनांनी जर्मन सैन्याला निपर नदीपार पिटाळले होते. महिनाभरात रशियन सैन्याची अखेरची धडक सुरू होण्याच्या बेतात होती. जर्मनांचा पराभव आणि फ्रान्सची मुक्ती हा आता काही महिन्यांचाच प्रश्न होता.

## वसाहतवादी द-गॉल

केवळ फ्रान्स मुक्त होऊन उपयोग काय? युद्धोत्तर उद्ध्वस्त अर्थकारणाला सावरण्यासाठी एखादे साम्राज्य हाताशी नको का? शंभर वर्षे ज्या व्हिएतनामवर राज्य करून फ्रान्सने मलई पळवली होती, त्याची चटक त्यावेळी न आठवती तरच आश्चर्य! आता तर इंडोचायनाला अधिकच पिळावे लागणार होते. कारण फ्रान्स पुन:श्च उभा राहायला हवा होता. दोस्तांच्या बाजूचे महत्त्वाचे प्यादे अमेरिकेचे अध्यक्ष रूझवेल्ट! यांनी स्पष्ट शब्दांत, इंडोचायना फ्रेंचांना परत देता कामा नये असा पवित्रा घेतलेला होता. परंतु चर्चिल यांचा द-गॉलचा साम्राज्यस्वप्नांना भरपूर आशीर्वाद होता!

कॅसाब्लांका परिषदेहून जानेवारी १९४३ मध्ये परतताना अध्यक्ष रूझवेल्ट हे प्रवासात आपल्या मुलाजवळ म्हणाले होते –

> ‘इंग्लिशांना त्यांच्या वसाहती सोडण्याची इच्छा नाही. फ्रेंचांच्या हातातून निसटलेल्या वसाहती पुनश्च त्यांच्या ताब्यात देण्यासाठीही ब्रिटिश उत्सुक आहेत. विनी (विन्स्टन चर्चिल) हा थोर स्थितीप्रिय माणूस आहे. त्याची स्थितीप्रियता त्याच्या शरीराकडे पाहूनही लक्षात येते!
>
> ‘आपण हे युद्ध जिंकल्यावर मी सर्व शक्तीनिशी एक गोष्ट करणार आहे. काही झाले तरी फ्रान्सची साम्राज्यतृष्णा आणि ब्रिटिशांची साम्राज्यतृष्णा भागवणाऱ्या कसल्याही योजनेत मी अमेरिकेला सहभागी होऊ देणार नाही.’

अध्यक्ष रूझवेल्ट युद्धाचा जय दृष्टिपथात आल्यापासून फ्रेंचांबद्दल असे परखडपणे बोलत असत. एकाजवळ एक आणि दुसऱ्याजवळ एक हे त्यांच्या स्वभावात नव्हते. यामुळे रूझवेल्ट यांचा मनाचा सुगावा चर्चिल आणि द गॉल यांना अचूक लागलेला होता. चर्चिल

हे आपली खेळी द गॉलमार्फत खेळू लागले होते. त्यांची द गॉल याला चिथावणी होती की इंडोचायना फ्रेंच वर्चस्वाखाली यायला हवा, ही मागणी वेळीच करा!

## अचूक भाकित

द गॉल यांची साम्राज्यलालसा अशी अचानक उफाळून आलेली पाहताच हो याचे एक पत्रक इंडोचायनात सर्वत्र वाटले जाऊ लागले. या पत्रकातील सर्व भाकिते पुढे इतकी तंतोतंत खरी ठरलेली पाहून अचंबा वाटतो. जून १९४४ मध्ये काढलेल्या या पत्रकात हो याने म्हटले होते –

'युद्धाची अखेर जवळ येत आहे. जर्मनी जवळ जवळ नेस्तनाबूत झालेला आहे. जर्मनीचा पराभव होताच जपानच्या पराभवाला फारसा वेळ लागणार नाही. मग चिनी व अमेरिकन इंडोचायनात घुसतील व द गॉल पक्षाचे सैन्य जपानविरुद्ध लढू लागेल. इंडोचायनातून जपानी जातील, परंतु इथे सगळी अंदाधुंदी माजेल. आपल्याला सत्ता हस्तगत करावीच लागणार नाही. कारण हस्तगत करावी अशी इथे कुणाची सत्ताच असणार नाही!'

याच पत्रकाच्या अखेरीस व्हिएतनामी जनतेने सशस्त्र उठावासाठी तयारीत राहावे असे आवाहन हो याने केलेले आहे.

हो आता पुनश्च पाक-बो येथे आपल्या पूर्वीच्या घळीत वस्तीला आला. सप्टेंबर १९४४ मध्ये हो व जिॲप याची येथे पुनश्च भेट झाली. जिॲपने आग्रह सुरू केला – 'अगदी या क्षणापासून आपण उठाव करू नया...' जिॲप हा फक्त इंडोचायनातील परिस्थिती पाहून हे म्हणत होता. परंतु हो याच्यापुढे जागतिक चित्र होते. त्याने सल्ला दिला – 'शांततामय चळवळीची वेळ संपलेली आहे. परंतु सर्वंकष सशस्त्र लढा सुरू करण्याचा क्षण अजून आलेला नाही. सबूर!'

सशस्त्र लढा सुरू करण्याचा क्षण आलेला नव्हता याचा दुसरा अर्थ लढण्याची सर्वांगीण तयारी करण्याची ही वेळ होती. जिॲप याला हो याने कार्यक्रम दिला –

'आज आपल्यापाशी पुरेशी लष्करी शक्ती नाही, म्हणून आपण स्वस्थ मात्र बसू शकत नाही. आपण असे थबकलो तर चिरडले जाऊ. डोंगराकडे चला. शत्रूवर छापे मारा, परंतु शत्रूचा हल्ला येण्यापूर्वी पसार व्हा...'

## स्वातंत्र्याचे अग्रदूत

यावेळी जिॲपजवळ फक्त ३४ सशस्त्र स्वातंत्र्य सैनिक होते. याच सैनिकांनी जिॲपच्या नेतृत्वाखाली 'आर्म्ड प्रापोगांडा ब्रिगेड' म्हणजे व्हिएतनामच्या स्वातंत्र्याचा

प्रचार करणारे सशस्त्र पथक स्थापन केले. टोंकीनच्या डोंगराळ भागात जिऑपच्या नेतृत्वाखाली हे पथक रवाना झाले. या पथकाला हो याने लेखी सूचना दिलेल्या होत्या.

१. पथकाच्या नावावरून हे स्पष्ट आहे की आपल्याला लष्करी शक्तीपेक्षा राजकीय डावपेचावरच भर द्यायचा आहे. आपली कमी असलेली लष्करी शक्ती आज विखुरलेली आहे. लष्करी विजय मिळतात हे संघटित लष्करी प्रयत्नांना. ठिकठिकाणी लष्करी शक्तीकेंद्रे निर्माण करून, ती ताकदवान करीत राहणे हे आजचे काम आहे. म्हणजे वेळ येताच संघटित उठाव शक्य होईल. शक्य असेल तेथे तेथे पोचा... आणि या गटाचे राजकीय शिक्षण दुर्लक्षू नका.
२. प्रशिक्षण केंद्रात शिक्षित झालेले लष्करी संघटक देशाच्या अंतर्भागात पाठवीत राहा.
३. युद्ध गनिमी काव्यानेच खेळायचे आहे. छापा आकस्मिक हवा, तो चपळाईने उरकता यावा, आणि स्वतःची मुळीच हानी होऊ नये – या गोष्टी या युद्धतंत्रात महत्त्वाच्या.
४. तुम्ही तीस-पस्तीसजण हे स्वातंत्र्य सैनिकांच्या विस्तारणाऱ्या कुटुंबाचे कुटुंबप्रमुख आहात, स्वतंत्र व्हिएतनामच्या सैन्याचे अग्रदूत आहात. उत्तरेपासून दक्षिणेपर्यंत अखंड व्हिएतनाम हे तुमचे कार्यक्षेत्र यापुढे राहील.

'जिऑप ब्रिगेड' अशा रितीने १९४४ च्या मध्याला टोंकीनच्या उत्तर भागात भूमिगत झाली. याच भागात आणखी दोन गट जपान्यांना सतावण्यासाठी दाखल झालेले होते. यातला एक गट फ्रेंच होता आणि दुसरा अमेरिकन होता.

लेफ्टनंट बर्नीयर या फ्रेंच लष्करी अधिकाऱ्याच्या हाताखाली काही फ्रेंच तुकड्या, जपान्यांच्या युद्ध प्रयत्नात विक्षेप निर्माण करणारी घातपाती छापामारी करीत असत. या गटात सर्व फ्रेंच सैनिकच होते.

परंतु अमेरिकेचा गट हा बिनसरकारी अर्धलष्करी असा मुक्त गट होता. या गटातील लोकांना O.S.S. ऑफिसर्स 'ऑफ स्ट्रॅटिजिक सर्व्हीसेस' असे कागदोपत्री म्हटले जात असे. प्रत्यक्ष छापामारी करण्यापेक्षा अमेरिकन शस्त्रास्त्रे मोठ्या प्रमाणात भूमिगत स्वातंत्र्यसैनिकांना उपलब्ध करणे, जपान्यांवर हेरगिरी करणे, घडणाऱ्या हकीगतीची टाचणे वॉशिंग्टनला पाठविणे अशी कामे ही माणसे करीत. ही सर्व मंडळी काही सैनिक, काही पत्रकार, काही निमलष्करी माणसे, पॅराशूटच्या साहाय्याने टोंकीनच्या डोंगराळ प्रदेशात उतरलेली होती.

जिऑप ब्रिगेड, फ्रेंच सैनिक आणि ओ.एस.एस. ही सर्व माणसे जपान्यांना हैराण करण्यासाठीच या विभागात आलेली असल्याने लवकरच तिन्ही गटात संपर्क निर्माण होऊन अवघे मिळून सुपंथ धरू लागले. हो हा अनेकवेळा ओ.एस.एस. मंडळींना भेटत

असे. अमेरिकन शस्त्रास्त्रांचा न संपणारा ओघ जिॲपला आता सुरू झाला. हा मुलुख जिॲपच्या पायाखालचा असल्याने जिॲपचे नाव हळूहळू हनोईमधील जपानी लष्करीशहा आणि त्यांचेबरोबर काम करणारे फ्रेंच अधिकारी यांच्या कानावर सतत आदळू लागले. एखादा छापा पडला, तर फ्रेंच अधिकारी जपान्यांना सांगत, 'हे जिॲपचे काम!' काहीवेळा हा छापा बर्नीयरचा असे, पण नाव जिॲपचे पुढे येई.

हनोईमधील फ्रेंच राज्यकर्ते (अंमल जपान्यांचा, मुलुख फ्रेंचांचा अशी परिस्थिती या काळात झालेली होती हे पूर्वी निवेदनात सांगितले आहेच.) टोंकीन भागात होणाऱ्या धडाक्यांनी लवकरच हादरू लागले.

## पुनःश्च वनवास

हो याला आता टोंकीन भागात स्वतः जाण्याची आवश्यकता वाटू लागली. २९ ऑक्टोबर १९४४ या दिवशी हो-चि-मिन्ह याने पाक-बो येथील घळ सोडली व तो थाय-नम्युएन प्रांतातील एका डोंगरी निवासात दाखल झाला.

या भागाचे नाव आहे 'दिन्ह का.' या ठिकाणी आसपासची दोन तीन खेडी ही जिॲपच्या सैनिकांनी खेडुतांना स्वातंत्र्यभक्त करून ताब्यता घेतली होती. यामुळे 'दिन्ह का' येथील ही नवी गुहा जिॲपने अगदी सुरक्षित केलेली होती.

जिॲप ब्रिगेडची संख्या आता दिवसागणिक वाढत चालली. नव्या रिक्रुटांना लष्करी शिक्षण देणे, त्यांचे प्राथमिक, राजकीय, लष्करी शिक्षण करणे यासाठी मोठे केंद्रच सुरू करण्यात आले. हो तिथे वारंवार जाऊन मार्गदर्शन करू लागला. हो हा कोण आहे याची चटकन कुणाला कल्पना येत नसे. एखादा नवा रिक्रुट अधिकाऱ्याला म्हणे, 'हा एवढा म्हातारा माणूस आपल्या कामात काय उपयोगाचा? राजकारणात या वयात याला इतका रस वाटतो हे आश्चर्यच आहे!'

दुसऱ्या महायुद्धाने मधल्या काळात मोठाच हेलकावा घेतलेला होता. ६ जून १९४४ ला पहाटे दोस्तसैन्ये फ्रान्सच्या किनाऱ्यावर नॉर्मंडी येथे उतरली होती! हिटलरच्या 'अटलांटिक वॉल'ला भगदाड पडले होते. १० जूनला नवी रशियन चढाई सुरू झाली. लाटांमागून लाटा याव्यात तसे रशियन सैन्य पसरू लागले आणि केवळ दीड महिन्यात चारशे मैलांचे अंतर कापून रशियनांनी व्हित्सुला नदी गाठली. कीव्हच्या दक्षिणेस क्रिमियात जर्मन सैन्य कोंडीत पकडले गेले. वॉर्सा शहराला रशियनांचा शह लागला.

जर्मनांनी पॅरीस खाली केले – २४ ऑगस्ट १९४४. द-गॉल पॅरीसमध्ये दाखल झाला. ११ नोव्हेंबर १९४४ ला विन्स्टन चर्चिल यांचे द-गॉल याने पॅरीसमध्ये भव्य स्वागत केले.

## याल्टा परिषदेचे फलित?

अध्यक्ष रूझवेल्ट यावेळी अमेरिकन निवडणुकीत गुरफटलेले होते. बड्यांची परिषद घाटत होती. २० जानेवारीला अध्यक्ष रूझवेल्ट यांचा नव्याने शपथविधी झाला आणि क्रिम्रियात याल्टा येथे चर्चिल, स्टॅलिन व रूझवेल्ट यांची भेट ४ फेब्रुवारी १९४५ ला निश्चित झाली.

या याल्टा परिषदेत अनेक प्रश्नांची चर्चा झाली. युद्धोत्तर जग बड्यांच्यात वर्चस्वाखाली कसे राहील याचा सर्वांगीण विचार झाला आणि आज सिक्युरिटी कॉन्सिलमध्ये नेहमी गाजणाऱ्या 'व्हेटो' अधिकाराचा जन्म झाला. या परिषदेत अध्यक्ष रूझवेल्ट इंडोचायनाचा प्रश्न काढून, इंडोचायनासाठी चीनला विश्वस्त नेमावे ही कल्पना मांडणार होते अशी बोलवा होती.

द-गॉल यांच्याशी झालेल्या भेटीत चर्चिल यांनी बहुधा आश्वासन दिले होते, की इंडोचायनाचा प्रश्नच याल्टा परिषदेत येऊ देणार नाही! कारण याल्टा परिषदेत हा प्रश्न रूझवेल्ट यांनी काढला तो चर्चिल यांच्या अपराक्ष!! त्यांनी स्टॅलिनबरोबर, मोलोटोव्हबरोबर ही विश्वस्त कल्पना विस्ताराने मांडली. स्टॅलिनने बहुधा म्हटले असेल, 'उत्तम कल्पना आहे. फ्रेंचांना त्या भूमीवर सद्गती मिळणार आहे ना? आमचा पाठिंबा आहे.'

काय घडले याची नोंद कुठेही नाही. याल्टा परिषदेचे सूप वाजून जो फतवा निघाला त्यात इंडोचायनाचा उल्लेखही नव्हता! मौनं संमति लक्षणम् या न्यायाने हनोईमधील फ्रेंच अधिकाऱ्यांनी याचा अर्थ असा घेतला की इंडोचायनावर युद्धानंतर पुनश्च कब्जा करण्याच्या दृष्टीने आतापासूनच पावले उचलली पाहिजेत. जिॲपची गडबड आताच मोडून काढून स्वातंत्र्यप्रयत्न चिरडला पाहिजे. द-गॉलचा याला पाठिंबा आहेच. हनोईत फ्रेंचांनी आपले सैन्य एकत्र करायला सुरूवात केली. टोंकीन भागातील जिॲप ब्रिगेडची पाळेमुळे खणून काढण्यासाठी सुरू होणाऱ्या स्वारीचा मुहूर्त ठरला. १२ मार्च १९४५.

परंतु तत्पूर्वी चार दिवस जपान्यांनी घोटाळा केला –

n

# ७ : रूझवेल्ट निधन – प्रागतिक धोरण नेस्तनाबूद

टोंकीन भागात दांडगाई करणाऱ्या 'जिॲप-ब्रिगेड'ची पाळेमुळे खणून काढण्यासाठी सुरू होणाऱ्या फ्रेंचांच्या लष्करी स्वारीचा मुहूर्त १२ मार्च १९४५ हा ठरला होता. फ्रेंचांची तयारी मजबूत होती. जिॲपच्या सैनिकांना हां हां म्हणता चिरडून टाकील एवढे हे सैनिकी बळ निश्चित मोठे होते. शक्यता अशी होती की या टोळधाडीशी मुकाबला करणे अशक्य आहे हे ध्यानांत येताच, जिॲप व त्याचे साथीदार हे पुनश्च भूमिगत होऊन परागंदा झाले असते.

## ईश्वरी सहाय्य

परंतु कसचे काय! ९ मार्च १९४५, या दिवशी पहाटे जपान्यांनी हनोई येथील सर्वच्या सर्व फ्रेंच अधिकाऱ्यांची सरसकट उचलबांगडी करून त्यांना कारावासात डांबले. परमेश्वरी शक्ती हो-चि-मिन्ह याला साथ करू लागली होती. एवढाच याचा अर्थ! कारण असे काही होईल, जपान्यांची बुद्धी एकदम फिरेल याची फ्रेंचांना कल्पना नव्हती. फ्रेंचांत आणि जपानी लष्करी अधिकाऱ्यांत बेबनाव व्हावा असे नवीन काहीच घडलेले नव्हते. जपान्यांच्या या विश्वासघातामुळे, व्हिएत-मिन्हचे टोंकीन भागातील तळ शाबूत राहिले, त्यांचे नेते पकडले जाण्याचा धोका टळला आणि जिॲपला श्वास टाकायला आणि नव्या लष्करी तयारीला फुरसत मिळाली.

जपानी लष्करशहांनी हनोईमध्ये फ्रेंचांचा गळा आवळला असला तरी त्यांच्याही मनात व्हिएत-मिन्ह चळवळ मोडून काढण्याचेच मनसुबे आहेत, ही गोष्ट हो विसरला नाही. या घटनेच्या दुसऱ्याच दिवशी म्हणजे १० मार्चला व्हिएत-मिन्ह नेत्यांनी या घटनेचा अर्थ स्पष्ट करणारा निर्णय घेतला. या ठरावात म्हटलेले होते –

> 'आता जपानी सैन्य हेच आपल्या क्रांतीचा प्रधान शत्रू झालेले आहे. यापुढे जे जे कुणी फ्रेंच, जपान्यांविरुद्ध लढण्यासाठी उत्सुक असतील, त्यांच्याशी आपण संपर्क साधला पाहिजे. आता सर्व व्हिएतनामभर जमतील तेथे लष्करी उठाव करायला हरकत नाही.'

टोंकीन भागात निरनिराळ्या नेत्यांच्या नेतृत्वाखाली व्हिएतनामी देशभक्त आता लढू लागलेले होते. यापैकी जिॲप व चू-व्हान-टॅन या दोघांच्या हाताखाली लढणाऱ्या ब्रिग्रेडस् आता जलद गतीने दक्षिणेकडे सरकू लागल्या. निरनिराळ्या दिशांनी पुढे सरकत ही सैन्ये थाई नग्यूएन प्रांतातील तानत्राओ या ठिकाणी एकत्र झाली. सर्व गनिमी सैनिकांचे नेतृत्व

करणारे पुढारी तिथे एकत्र जमले व सर्वांचा विचार ठरला की आता थांबायचे नाही. दक्षिणेकडील भागात उतरून सरळ लढाईलाच तोंड फोडायचे.

हो याला जिॲपकडून असा निर्णय होत असल्याचे कळताच हो याने जिॲपला भेटीसाठी बोलावले. ना-किथू या ठिकाणी ही भेट झाली. त्यावेळी एप्रिल महिना संपून मे ४५ चा पहिला आठवडा सुरू झालेला होता. युरोपात नाझी सैन्याच्या चौफेर शरणागतींना सुरुवात झालेली होती. हो याच्या डोळ्यांसमोर ही घटना प्रामुख्याने होती. जिॲप या भेटीबद्दल आपल्या आठवणीत सांगतो –

> ‘मी मिळालेल्या यशाने फुलून येऊन त्याला अहवाल देत होतो. त्याची मुद्रा ध्यानस्थ वाटत होती. अर्धमिटल्या डोळ्यांनी आमच्या ब्रिगेडच्या हकिकती ऐकताना त्याचा चेहरा विलक्षण सुखावलेला होता. आंतरराष्ट्रीय परिस्थिती सध्या किती अनुकूल आहे हे त्यांनी स्पष्ट केले. तो म्हणाला की, आता आपल्याला राजकीयदृष्ट्या सुरक्षित आणि वेळ पडली तर लढवायला सुकर असे एखादे कायम ठाणे निर्माण केले पाहिजे. बाहेरच्या जगाशी संधान ठेवायला याची अतिशय गरज आहे – ’

हो याने थोडक्यात जिॲपकरवी सर्व गनिमी सैनिकांना निरोप दिला की, ‘उघड्यावर येऊन लढाई करण्याची वेळ अजून आलेली नाही.’

महिन्याभरात परिस्थिती जास्तीत जास्त अनुकूल होऊ लागली. युरोपात युद्ध संपले आणि जपानचा पराभव होणार याविषयी आता शंका उरली नव्हती.

## चर्चिल-रूझवेल्ट मतभेद

९ फेब्रुवारीला संपलेल्या याल्टा परिषदेहून अध्यक्ष रूझवेल्ट अमेरिकेत परतले. परंतु इंडोचायनाबाबत तिथे काय ठरले यासंबंधी काहीच खुलासा वॉशिंग्टनहून न आल्याने चीनमधील अमेरिकेचा वकील हर्ले हा गोंधळात पडला होता. त्याने ११ मे १९४५ ला सेक्रेटरी ऑप स्टेट कार्डेल हल् यांना तार पाठविली व विचारणा केली ‘इंडोचायना संबंधात याल्टा परिषदेत काय निर्णय झाला तो कळवा.’ उलट उत्तर आले, ‘काहीही ठरले नाही.’

अखेर कंटाळून हर्ले व चीनमधील अमेरिकेन सेनेचा प्रमुख जनरल वेडेमेयर असे दोघे वॉशिंग्टनला जातीने हजर झाले. हे दोघे वॉशिंग्टनमध्ये असतानाच चर्चिल यांनी एक धूर्त खलिता वॉशिंग्टनला पाठविला. त्यात म्हटले होते –

‘जनरल वेडेमेयर आणि ब्रिटनचे दर्यासारंग लॉर्ड माऊंटबॅटन, यांच्यात इंडोचायनात करावयाच्या लष्करी कारवाईबाबत काही मतभेद निर्माण झालेले आहेत. याबाबतीत

दोन्ही बाजूंनी एकत्र बसून विचारविनिमय करावा असे आदेश तुम्ही व मी दोघांनी द्यावेत असे वाटते.'

यापूर्वी बरेच रामायण घडलेले होते. अध्यक्ष रूझवेल्ट यांनी चर्चिल यांना स्पष्टपणे कळवलेले होते की जनरल वेडेमेयर हेच इंडोचायना भागातील सर्व हालचालींचे नियंत्रण करतील आणि आपण माऊंटबॅटन यांना ही व्यवस्था कळवावी. या व्यवस्थेनुसार चुंकींगला परत जाताना वेडेमेयर हा माऊंटबॅटन यांच्या आग्नेय आशियातील लष्करी केंद्रावर त्यांना भेटला. त्याने माऊंटबॅटन यांना स्पष्ट सांगितले होते –

'ब्रिटिश-फ्रेंचांच्या ज्या लष्करी हालचाली जपान्यांना नामोहरम करण्यासाठी केवळ असतील त्यांनाच माझी परवानगी मिळेल. ज्या हालचाली इंडोचायनाच्या युद्धोत्तर व्यवस्थासंबंधात हस्तक्षेप करण्यासाठी आहेत असे मला वाटेल त्यांना परवानगी मिळणार नाही.'

परंतु माऊंटबॅटन व चर्चिल दोघे मुद्दामच वेड पांघरूण पेडगावला निघालेले होते. जनरल वेडेमेयरला जे नको होते, तेच माऊंटबॅटन यांना साधायचे होते! चर्चिल यांनी माऊंटबॅटन यांना कळवले –

'इंडोचायनाच्या मुक्तीत आपण फ्रेंचांना सहभागी करून घेतले नाही, तर इतिहासातील ही एक वाईट घटना उद्या ठरेल. त्यांच्याच देशात शिरताना आपल्याला फ्रेंचांचे सर्व सहकार्य घ्यायलाच हवे...'

माऊंटबॅटन यांना चर्चिल यांनी दिलेल्या या सूचनांवर निराळे भाष्य करण्याची जरूर नाही. फ्रेंच हे चर्चिल यांच्या दृष्टीने त्यांच्यात ताब्यातील देशात शिरणार होते! म्हणजे इंडोचायनावर युद्धोत्तर व्यवस्थेत पुनश्च फ्रेंच सत्ता लादण्याचा चर्चिल कंपनीचा विचार कायम होता! या सूचनांची एक प्रत रूझवेल्ट यांना माहितीसाठी पाठवायला चर्चिल विसरले नव्हते. या पत्राच्या प्रतीबरोबर चर्चिल यांचे रूझवेल्ट यांना निराळे पत्रही होते आणि त्यात जनरल वेडेमेयर यांना योग्य त्या सूचना देण्यासंबंधी विनंती होती.

## कटकटींना प्रारंभ

चर्चिल यांचे रूझवेल्ट यांना गेलेले हे अखेरचे पत्र ठरले. हे पत्र अमेरिकेत पोचले तेव्हा रूझवेल्ट हे ते वाचण्याच्या स्थितीत नव्हते. १२ एप्रिल १९४५ रोजी वयाच्या केवळ ६३ व्या वर्षीच रूझवेल्ट यांचे जॉर्जिया येथे निधन झाले होते. ट्रूमन यांनी अध्यक्षपदाची सूत्रे हाती घेतल्यानंतर काही तासांच्या आतच म्हणजे १४ एप्रिलला चर्चिल यांच्या पत्राला त्यांनी अध्यक्ष नात्याने उत्तर धाडले. या पत्रात – 'ब्रिटिश-फ्रेंचांनी

काहीही लष्करी हालचाल करण्यापूर्वी जनरल वेडेमेयर यांना पूर्वसूचीत करण्याचे ठरलेले आहे व याप्रमाणे माऊंटबॅटन यांनी वागावे' असा रोखठोक जबाब दिला.

या पत्रापत्रीतून नवे खेंगटे निर्माण होणार ही गोष्ट स्पष्टच होती. जनरल वेडेमेयर व माऊंटबॅटन यांच्यात कटकटींना सुरुवातच झाली. कुठलाही निर्णय फेरविचारासाठी पुढे घ्यायचा असेल तर प्रथम खऱ्याखोट्या कटकटींना सुरुवात करावी हे राजकारणातले एक सूत्रच असते.

माऊंटबॅटन यांनी जनरल वेडेमेयर यांना नुसते कळवले की फ्रेंचांच्या भूमिगत क्रांतिकारकांना शस्त्रास्त्रे व रसद पोचविण्यासाठी २६ विमाने पाठवण्यात येत आहेत. जनरल वेडेमेयरने कळवले -

'कुठल्याही लष्करी हालचालीला जनरल चँग-कै-शैक यांची अनुमती असल्याखेरीज ती करता येणार नाही. चीफ-ऑफ-स्टाफ या नात्याने इंडोचायनात पाठवण्यात येणारी मदत ही इंडोचायनावर फ्रेंच वर्चस्व प्रस्थापित करू पाहणाऱ्यांच्या हातात पडत नाही ना, हे पाहणे चँग-कै-शैक यांचे काम आहे.'

माऊंटबॅटन यांनी आपल्या अधिकारातच ही विमाने पाठवण्याची हालचाल सुरू करताच जनरल वेडेमेयर संतापला व वॉशिंग्टनला स्वतःच जाऊन याबद्दल काय तो निर्णय मिळवावा म्हणून चीनमधील अमेरिकेचे वकील हर्ले यांच्याबरोबर तो वॉशिंग्टनला दाखल झालेला होता. परंतु ही सर्व यातायात फुकटच गेली.

## राजकीय कोलांटी

या रस्सीखेचीत अखेर अँग्लो-फ्रेंचांनी रूझवेल्टचे इंडोचायनाबाबतचे प्रागतिक धोरण नेस्तनाबूत करण्यात यश मिळवले! रूझवेल्ट मृत्युमुळे दूर होताच, वॉशिंग्टनमध्ये अधिकाऱ्यांत खांदेपालट झाला. सेक्रेटरी ऑफ स्टेट म्हणून स्टेटीनिअस हे अधिकारावर आले. त्यांनी फ्रान्सचा नवा परराष्ट्रमंत्री जॉर्जेस बिडाल्ट याला ८ मे १९४५ रोजी तारेने कळविले होते –

'फायली चाळता, आमच्या सरकारने अगदी दूरान्वयाने देखील फ्रेंचांच्या इंडोचायनावरील सार्वभौमत्वाबद्दल शंका घेतली आहे असे दिसत नाही.'

अमेरिकेच्या धोरणाने आता पूर्ण पलटी खाल्लेली होती. जनरल वेडेमेयरला वॉशिंग्टनहून स्पष्टपणे खुलासा आला...

'इंडोचायनावरील फ्रेंचांचे सार्वभौमत्व अमेरिकन सरकारला मान्य आहे, परंतु अमेरिकेचे एकंदर धोरण असे आहे, की वसाहतीतील जनतेला हळूहळू राज्यकारभारात स्थान मिळून अंती त्यांना स्वतःचे सरकार बनविण्याच्या दृष्टीने धोरण ठरवण्यात यावे.'

इंडोचायनाबाबत अध्यक्ष रूझवेल्ट यांनी अनेकवेळा तोंडी नामोल्लेख केलल्या विश्वस्त योजनेचा त्यांच्या मृत्यूनंतर महिना-दोन महिन्यात असा मुडदा पाडण्यात अँग्लो-फ्रेंचांनी यश मिळविले होते. पडद्याआड घडलेल्या घटनांची अर्थात हो याला त्यावेळी यत्किंचितही कल्पना असण्याची शक्यता नव्हती. इंडोचायनात जपान्यांना सतावण्यासाठी उतरलेले ओ.एस्.एस्.चे अमेरिकन स्वयंसेवक आणि वॉशिंग्टनहून किल्ल्या फिरवणारे नवे अमेरिकन अधिकारी यांच्यात इंडोचायनाच्या भवितव्याबाबत असलेल्या दृष्टीकोणात मुलभूत फरक या वेळेपासून निर्माण झाला.

८ मे १९४५ ला जर्मन जनरल जोडल् याने रिमस् येथे आयसेनहॉवरपुढे बिनशर्त शरणागती दिली व युरोपात युद्ध संपले. निर्णायक हालचालींचा क्षण आता नजीक येतो आहे असा अंदाज बांधून हो याने महत्त्वाची हालचाल सुरू केली. सर्व गनिमी सैनिकांना एका अधिपत्याखाली आणून, या सैन्याच्या आधारावर स्वतंत्र व्हिएतनामचा ठिपका इंडोचायनाच्या नकाशात निर्माण करण्यासाठी सर्व स्वातंत्र्य सैनिकांची एक परिषद 'तानत्राओ' या ठिकाणी मुक्रर करण्यात आली.

## अमेरिकेशी नाते जुळले

या आधी चार महिने म्हणजे १९४५ च्या फेब्रुवारीतच हो याने कुनमिंग येथील अमेरिकन ओ.एस.एस. संघटनेचा त्या विभागातील प्रमुख कर्नल हेलीवल यांची अचानक भेट घेतली होती. हो याने शस्त्रास्त्रांची मागणी पुढे मांडताच कर्नल हेलीवेल याने दोन अटी घातल्या.

१) ही शस्त्रे फ्रेंचांविरुद्ध वापरली जाता कामा नयेत आणि

२) व्हिएतनामी क्रांतिकारकांनी मुक्त केलेल्या प्रदेशात अमेरिकेच्या हस्तकांना मोकळेपणाने संचार करता यावा.

हो याने दोन्ही अटी मान्य केल्या. कारण फ्रेंचांविरुद्ध अकारण लढण्याचा त्याचा इरादाच नव्हता आणि शस्त्रास्त्रे हस्तगत करणे ही निकडीची बाब होती. प्रत्यक्षात हो याला अमेरिकेच्या ओ.एस्.एस्. संघटनेने किती शस्त्रास्त्रे दिली यासंबंधात मतभेद आहेत. कुणी म्हणतात मुबलक शस्त्रास्त्रे हो याला मिळाली. कुणी म्हणतात थोडेफार रिव्हॉल्वरच काय ते त्याच्या पदरात पडले. एक गोष्ट मात्र निश्चित की या भेटीत हो याने अनेक अमेरिकन मित्र जोडले. रॉबर्ट शेपलीन हा एक ओ.एस्.एस्. अधिकारी सांगतो...

'हो हा विलक्षण गोड माणूस निघाला. जंगल भागात, डोंगरात राहणाऱ्या या वृद्धाचा कोणता एकच गुण स्मरणात राहिला म्हणाल, तर त्याच्या स्वभावातला अकृत्रिम गोडवा.'

या भेटीनंतर अमेरिकन अधिकाऱ्याच्या मध्यस्थीसाठी हो याला अनेकदा त्याच्या भेटीस जाण्याचा प्रसंग येऊ लागला. फ्रेंचांबरोबर समझोता घडला तर तो हो याला हवा होता. मेजर गॉर्डन आणि लेफ्ट. फेलान या दोन अमेरिकन अधिकाऱ्यांच्या मार्फत व्हिएत मिन्ह संघटनेने दक्षिण चीनमधील फ्रेंच लष्करी मिशनचा प्रमुख जीन सेंटनी याला हो याने एक समझोत्याचा प्रस्ताव पाठवला. या मसुद्यात खालील मुद्दे होते.

१. व्हिएतनामची संसद निवडणुकीने निर्माण करण्यात यावी. व्हिएतनामचे स्वातंत्र्य सिद्ध होईपर्यंत एका फ्रेंच गव्हर्नरने मुख्यमंत्री या नात्याने राज्यकारभार करावा. या गव्हर्नरला एक सल्लागार मंडळ असावे व ते व्हिएतनाम संसदेने नेमावे.
२. कमीत कमी पाच आणि जास्तीत जास्त दहा वर्षांत व्हिएतनामला स्वातंत्र्य देण्यात यावे.
३. देशात अफू विक्रीला बंदी करण्यात यावी.
४. युनायटेड-नेशन्स संघटनेने पुरस्कारलेली सर्व प्रकारची स्वातंत्र्ये व्हिएतनामी जनतेला उपभोगता यावीत.
५. व्हिएतनामची निसर्ग संपत्ती आज ज्यांच्या कब्जात आहे त्यांना योग्य ती किंमत देऊन ही संपत्ती पुनश्च व्हिएतनामकडे सुपूर्त करण्यात यावी.

तान त्राओ येथील क्रांतिकारकांची परिषद बोलावण्याचे पाऊल हो याने उचलले ते जुलै १९४५ मध्ये. त्यापूर्वीच तीन चार महिने वरील मसुद्यावर फ्रेंचांबरोबर वाटाघाटीचा घोळ हो याने सुरूही केलेला होता. हे सही सही गांधीजींचे तंत्र होते. वरील प्रस्ताव वरवर पाहता अतिशय सौम्य वाटतो. परंतु वाटाघाटीसाठी फ्रेंचांना उद्युक्त करण्यासाठी हो याने टाकलेला हा एक गळ होता. फ्रेंचांना एकदा वाटाघाटीच्या रिंगणात खेचणे हे त्याला महत्त्वाचे वाटत होते. फेब्रुवारी १९४५ मध्ये हो याला अशी आशा वाटत होती की आपल्या मायभूमीची दास्यमुक्ती ही फ्रेंचांबरोबर वाटाघाटी करूनच हस्तगत करता येईल. अमेरिकन सेनानी जनरल वेडेमेयर याला हो याचे सहकार्य जपान्यांविरुद्ध मोलाचे वाटत होतेच आणि म्हणून कुनमिंग येथील फ्रेंच लष्करी मिशनमार्फत हो व फ्रेंच यांच्यात काही समझोता झाला तर तो त्याला हवा होता.

## वाटाघाटींवर अणुबॉम्ब

जनरल वेडेमेयर, मेजर गार्डन आणि फ्रेंच कमांडंट रेव्होल या सर्वांच्या प्रयत्नाने फ्रेंच मिलिटरी मिशनचा प्रमुख जीन सेंटनी याने हो याची भेट घेण्याचे मान्य केले. ही भेट कुनमिंग येथे व्हावी किंवा हो याला सोईस्कर अशा ठिकाणी जिॲपने मुक्त केलेल्या टोंकीन

भागात व्हावी अशी सूचना हो याने केलेली होती. जीन सेंटनी याने दुसरा पर्याय मान्य केला व ही भेट लवकरच घडून येणारही होती.

परंतु जीन सेंटनी व हो या दोघात सरळ वाटाघाटी व्हाव्यात असा योगच नव्हता! सेंटनी याच्या स्वागताची सर्व तयारी व्हिएतमिन्ह नेत्यांनी चालवलेली असतानाच टोंकीन भागात इतका मुसळधार पाऊस सुरू झाला की सेंटनी यांचे विमानाने होणारे आगमन जबर पावसामुळे सारखे पुढे ढकलावे लागले.

जुलै महिना पावसाने भेट अडवून धरली. ऑगस्ट उजाडला आणि ५ ऑगस्ट १९४५ ला हिरोशिमावर अमेरिकेने अणुबॉम्ब फोडला! अमेरिकेने अण्वस्त्र वापरताच सैनिकी हालचालींना फारसा अर्थच उरला नाही. ९ ऑगस्टला नागासाकी शहर दुसऱ्या अणुबॉम्बने भस्मसात झाले. १० ऑगस्टला सकाळी जपानने शरणागती जाहीर केली.

इंडोचायनामधील फ्रेंचांची सत्तास्थाने हिसकवल्यानंतर केवळ पाचच महिन्यांनी जपान्यांनी एकाएकी गुडघे टेकले होते. गेले चार-पाच महिने जिॲप आदी क्रांतिकारक नेते हो याला आग्रह करीत होते की स्वातंत्र्यलढा ताबडतोब सुरू करून लढाईला तोंड फोडू या. हो हा अशा क्षणाची वाट पाहत होता की जेव्हा जपान तर जमीनदोस्त झालेला असेल आणि फ्रेंचही पुरते सावरलेले नसतील! तो क्षण अण्वस्त्रांच्या वापरामुळे ध्यानीमनी नसता हो याच्यापुढे येऊन थडकला होता. जपानने लोळण घेतली होती. फ्रेंच अजून काही हालचाल करण्याच्या स्थितीत नव्हते. ९ ऑगस्टला दुसरा अणुबॉम्ब फुटून जपानच्या शरणागतीची बातमी येण्यापूर्वीच १० ऑगस्टलाच हो याने 'तान त्राओ' येथे क्रांतिकारकांची बैठक घेतली; आणि १३ ऑगस्टला क्रांतीचे शिंग फुंकले. दोस्तांच्या सेना जपान्यांकडून व्हिएतनामाचा कब्जा स्वीकारण्यासाठी पोचण्यापूर्वीच सत्ता हस्तगत करण्याचा निर्णय झाला. 'तान त्राओ' येथे हो याने सशस्त्र क्रांतिकारकांना आदेश दिला –

'मित्र हो! हाच तो क्षण आहे. दोस्तांचे पाऊल इंडोचायनाला लागण्यापूर्वी आपणच जपान्यांना निःशस्त्र करून सत्ता हाती घ्यायची आहे. आपल्याला दोस्तांशीही लगेच लढायचे कारण नाही. उलट या भूमीचे यजमान म्हणून आपण तूर्त त्यांचे स्वागत करू या...'

देशवासीयांना उद्देशून दास्यविमोचन समितीचा (नॅशनल लिबरेशन कमिटी) अध्यक्ष या नात्याने काढलेल्या पत्रकात त्याने आवाहन केले –

'आमची दास्यविमोचन समिती हेच या क्षणी व्हिएतनामचे काळजीवाहू सरकार आहे. आमच्या पाठीशी सर्वांनी राहा. आमच्या आज्ञा पाळा अजून दीर्घ मुदतीचा कठीण लढा द्यावा लागणार आहे. जपान्यांचा पराभव झाल्याने आपण आयतेच स्वतंत्र झालो या भ्रमात कुणी राहू नका.'

'बांधव हो उठा! आपण पराक्रमाने मुक्त होऊ. जगात अनेक दलित लोक आपापल्या स्वातंत्र्यासाठी झुंज करीत आहेत. आपण मागे राहून चालणार नाही. व्हिएतनामचे निशाण घेऊन आपण पुढे जात राहू.'

या पत्रकाच्या हजारो प्रति हुअे, सायगाव आणि खुद्द हनोईत देखील वाटल्या गेल्या. सगळीकडे स्वातंत्र्यभक्तीचा ज्वर वाढू लागला. व्हिएतनाम देश प्रत्यक्ष कब्जात असलेले, परंतु शरणागती देऊन संपवलेले जपानी लष्करशहा, हो-चि-मिन्हच्या हालचालींकडे काणाडोळा करीत होते. त्यांना व्हिएतनाम हा आशियाई हो याच्या हातात पडला तर ते अधिक प्रिय होते. फ्रेंचांना पुनश्च हा घास मिळू नये अशीच जपान्यांची इच्छा होती.

## सेंटनी हनोई येथे अटकेत

जीन सेंटनी - हो ही भेट आता उधळली गेली होती. कुनमिंग येथून जीन सेंटनी हा हनोईला येण्याची गडबड करू पाहत होता. हनोईला जाऊन फ्रेंचांचे अधिपत्य सिद्ध करण्याची त्याला घाई होती. परंतु जनरल वेडेमेयर याने २२ ऑगस्टपर्यंत सेंटनी याला हनोई येथे जायला बंदी घातली. जनरल वेडेमेयर हा प्रथमपासून अध्यक्ष रूझवेल्ट यांच्या इच्छेनुसार व्हिएतनाम युद्धोत्तर व्यवस्थेत स्वतंत्र व्हावा, यासाठीचे धोरण आखीत आला होता. अगदी महत्त्वाच्या क्षणी त्यांनी फ्रेंचांवर हा प्रहार केला. जनरल वेडेमेयरचे पाय धरल्याखेरीज कुनमिंग येथील फ्रेंच हनोईला पोहचू शकत नव्हते.

१२ ऑगस्ट ते २२ ऑगस्ट या दहा दिवसात हनोई येथील व्हिएतमिन्ह हस्तकांनी शहराचा नूरच पालटून टाकला. सर्वत्र कोणत्याही क्षणी बंडाळी सुरू करण्याच्या ते तयारीत आलेले होते. १६ ऑगस्टला जपान्यांनी व्हिएतनामा नामधारी राजा बाओ-दाई याच्या तात्पुरत्या सरकारच्या हवाली सर्व सूत्रे दिली.

जपानी बाजूला झाले आणि ठिणगी पडलीच!

## बाओ-दाईला शह

१७ ऑगस्टपासून सर्व व्हिएतनामी सरकारी नोकरवर्ग संपावर गेला. त्यादिवशी दिवसभर हनोईत मनस्वी उकाडा होत होता. हजारोंच्या संख्येने सर्व नोकरवर्ग म्युनिसिपालिटीच्या थिएटरच्या पटांगटात जमा झाला. तिथे बाओ-दाई याचे लाल पिवळे निशाण उंच फडफडत होते. पाहता पाहता सोनेरी तारा अंगावर मिरवणाऱ्या लालभडक व्हिएत-मिन्ह निशाणांचा समुद्र या निशाणांभोवती निर्माण झाला!

ही स्वातंत्र्यसंग्रामाचीच पहिली लाट पसरत चाललेली होती. अजून हनोईत या उठावाला अधिकृत नेता लाभलेला नव्हता. मुसळधार पाऊस सुरू होताच हा मेळावा

पांगला. १८ व १९ तारखेला अधिकाधिक मोठ्या प्रमाणावर हे मेळावे याच आवारात जमू लागले. आता यात स्त्रिया, मुले, हमाल, कामगार सर्वच सामील होऊ लागले.

अजून बाओ-दाईच्या निशाणाची अवहेलना मात्र सुरू झालेली नव्हती! व्हिएतमिन्ह निशाणांबरोबर राजसत्तेचे निशाणही फडफडत होते. त्याला लोकांची हरकत नव्हती. कारण बाओ-दाई झाला, तरी अखेर व्हिएतनामी राजा होता.

शहरात १९ ऑगस्टला रात्री फ्रेंचांच्या घरादारांवर जमावाने हल्ले करायला सुरुवात केली. त्या रात्री १०-१२ फ्रेंचांना रस्त्यावर ओढून ठार मारण्यात आले. जमावाने रक्त पाहिले होते. पुढील सहा महिन्यात कुणाही फ्रेंच माणसाचा जीव केव्हाही घेतला जाणार होता, याची त्या रात्री बचावलेल्यांना मात्र कल्पना आली नाही.

हनोईमधील विद्यार्थी संघटनांनी नकळत व्हिएत-मिन्हचे नेतृत्व मान्य केले. खवळू पाहाणाऱ्या जनलाटेला हनोईतील व्हिएतमिन्ह हस्तकांनी कलाकलाने कब्जात घेतले. हनोईतील महत्त्वाच्या सरकारी इमारतींचा त्यांनी कब्जा केला. या सर्व इमारतींवरून व्हिएतमिन्ह निशाणे फडफडू लागली.

२० ऑगस्टला हो-चि-मिन्ह आणि त्याचे निकटचे सरकारी हनोईत दाखल होईपर्यंत सर्व हनोई शहर हे मुक्त होऊन त्याच्या स्वागतासाठी उत्सुक झालेले होते.

## राजत्याग

दक्षिणेत अन्नाम विभागाची राजधानी हुअे येथे बाओ-दाईचे वास्तव्य होते. एकंदर रागरंग पाहून २५ ऑगस्टला बाओ-दाई याने राज्यत्याग केला! लगेच काढलेल्या जाहीरनाम्यात बाओ-दाईने स्पष्ट म्हटले होते – "परमेश्वरी कृपेने लाभलेले आणि वंशपरंपरेने चालत आलेल्या राज्यशकटाची धुरा आज मी 'लोकशाहीधिष्ठीत प्रजासत्ताका'च्या स्वाधीन करण्यासाठी राज्यत्याग करीत आहे."

हनोई कब्जात आली, हुअे येथे राज्यसिंहासन रिकामे झाले आणि सायगावला ट्रान-व्हान-थिऊ हा डाव्या गटाच्या नेत्याने तेथील राज्यकारभार ताब्यात घेतला.

२५ ऑगस्ट १९४५ या दिवशी समग्र इंडोचायना अशा रीतीने व्हिएतमिन्ह क्रांतिकारकांच्या संपूर्णपणे कब्जात आलेला होता.

हे सर्व चमत्कार घडवणारा जादूगार कोण आहे याची सामान्य व्हिएतनामी माणसाला अजून कल्पना नव्हती. हो हा स्वतः धुके निवळेपर्यंत पडद्याआडच राहणार होता. २२ ऑगस्टला जीन सेंटनी हा अखेर हनोईला पोहोचला. त्यापूर्वी चोवीस तास हो-चि-मिन्ह हनोईला आलेला होता.

जीन सेंटनीने हनोईला पाऊल टाकताच जपान्यांनी त्याला पकडले व डांबून टाकले. म्हणजे निदान हनोईत आल्या आल्या त्याची व हो याची गाठ पडायची, ती देखील पडली नाही. जीन सेंटनी हा हनोईला येऊन व्हिएतमिन्ह यांच्या सुरू झालेल्या क्रांतीत कोलदांडे घालू लागणार याची अटकळ जपान्यांना होती. अजून पोलीस व्यवस्थेवर जपान्यांचे वर्चस्व होते. याचा फायदा घेऊन त्यांनी जीन सेंटनी त्याला तुरूंगाची हवा दाखवली होती.

## हे काय चालले आहे?

२० ऑगस्टपासून हनोईतील क्रांतीचा कब्जा जिॲपने केला. फ्रेंच नागरिकांविरुद्ध सुरू होऊ पाहणाऱ्या अत्याचारांना त्याने तत्काळ पायबंद घातला. नव्याने स्थापन झालेल्या स्वतंत्र व्हिएत-मिन्ह सरकारातील प्रचारमंत्री त्रानलिऊ याने शहरात लाऊडस्पीकरवरून फ्रेंचविरोधी आक्षेपार्ह घोषणा देण्याची व्यवस्था केली आहे, हे जेव्हा हो-चि-मिन्ह याला कळले तेव्हा त्याने त्याची कानउघाडणी केली. हो म्हणाला –

‘हे काय चालले आहे? वसाहतवाद्यांना शिव्यागाळी करून आज तुम्हाला काय साधायचे आहे...?’

हो-चि-मिन्ह याला या फ्रेंचविरोधी घोषणांमुळे सरकारी आशीर्वादाने, निरपराध फ्रेंच नागरिकांची होऊ पाहणारी हत्या टाळायची होती. फ्रेंचांशी वाटाघाटी करून झालेल्या सत्तांतरावर त्याला रीतसर शिक्कामोर्तब करून घेण्याची अजून इच्छा होती. किंबहुना किमान हिंसाच तो सहन करू शकत होता, की लोकक्षोभात जी टाळणे कुणालाच शक्य होत नाही. परंतु थंड माथ्याने केवळ हिंसेकरता त्याला हिंसा नको होती. आंधळ्या द्वेषापोटी होणारे अत्याचार त्याला मंजूर नव्हते. सभ्यता, नम्रता, मार्दव या गुणांचा तो मनोमन चाहता होता.

हनोईत नव्याने अधिकारावर आलेल्या क्रांतिकारी सरकारचा अध्यक्ष म्हणून पत्रकारांनी हो याला घेरले. पत्रकारांनी विचारले –

‘तुमची समग्र माहिती सांगा. तुम्ही कम्युनिस्ट आहात का?’

हो-चि-मिन्ह याने शांतपणे उत्तर दिले –

‘मी क्रांतिकारक आहे. माझी मायभूमी दास्यात असताना माझा जन्म झाला. तरुणपणापासून माझा देश स्वतंत्र व्हावा यासाठी मी झगडतो आहे. तो स्वतंत्र व्हावा यासाठी लढाई करावी लागली ती देखील मी पत्करली आहे. माझ्याविषयी सांगण्यासारखे एवढेच आहे! माझा हा गतेतिहास असल्यामुळे मला माझ्या सहकाऱ्यांनी या नव्या स्वतंत्र सरकारचा प्रमुख निवडलेला आहे.’

हो ची छायाचित्रे एकाएकी जगातील सर्व प्रमुख वृत्तपत्रांनी प्रसिद्ध केली. व्हिएतनामी जनतेला हा वृद्ध नेता एकदम आपला जवळचा नातेवाईक वाटू लागला. लोक प्रेमाने त्याचा उल्लेख 'हो-काका' (अंकल-हो) असा करू लागले. ही वृद्धत्वाची-प्रेमाची जवळीक हो याने आनंदाने पत्करली. सप्टेंबर १९४५ मध्ये हनोई रेडिओवरून जनतेला उद्देशून भाषण करताना अध्यक्ष हो-चि-मिन्ह याने भाषणाची सुरुवात केली-

'माझ्या मुलांनो!

हो काकाची ही हाक लाखो देशवासीयांच्या काळजाला जाऊन तत्क्षणी भिडली. त्याचे पुढील शब्द जिवाचा कान करून सर्वजण ऐकू लागले. या शब्दांतून जिव्हाळा ठिबकताना जाणवतो. कणखरपणा न लपवताही त्याचे मृदुत्व मोह पाडते.

'तुम्ही भाग्यवान आहात. स्वतंत्र व्हिएतनामचे नागरिक म्हणून तुम्हाला यापुढे जगता येणार आहे! ऐंशी वर्षांच्या गुलामीने आपल्या देशाचे खच्चीकरण झालेले आहे. आता आपल्याला कष्टपूर्वक पुनश्च झेप घ्यायची आहे. जगातील इतर राष्ट्रांच्या बरोबरीने उभे राहावयाचे आहे. व्हिएतनाम हा कीर्तिसंपन्न आणि गौरवशाली होईल का? पंचखंडांतील इतर देशातील जनतेच्या बरोबरीने आपली जनता ताठ मानेने उभी राहू शकेल का? या प्रश्नांची उत्तरे मुलांनो तुमच्यापाशी आहेत. तुमच्या प्रयत्नांवर हे सगळे होणार आहे.'

व्हिएतनामी वृत्तपत्रात त्याने जे आणखी एक निवेदन प्रसिद्धीला दिले, त्याची सुरुवातही हो याने अशी केली होती –

'सभ्य पुरुषहो – एक वृद्ध माणूस तुम्हाला काही सांगू इच्छितो आहे!'

हे नवे नेतृत्व क्रांतिकारी असून मृदू होते. कणखर असून नम्र होते. आग्रही असले तरी दुराग्रही नव्हते.

तरीही पुढचा अनर्थ टाळण्यात मात्र त्याला यश येऊ शकले नाही.

n

# ८ : अमेरिकेचा आधार सुटला!

जपानचा पराभव होईपर्यंत आणि नंतरही काही काळ अध्यक्ष रूझवेल्ट जगले असते तर व्हिएतनाममधील पुढील सर्व अनर्थ हजार हिश्श्याने टळला असता. परंतु पोट्सडॅम परिषदेला अध्यक्ष, ट्रूमन दाखल झाले आणि तिथे जो व्हिएतनामचा सौदा उरकण्यात आला, त्यात तेही एक भागीदार झाले. पोस्डडॅम परिषदेत बड्यांनी असा निर्णय केला की जपानचा पराभव होताच जपानी सेनेचे शरणागती दोन भागात पत्करावी. यासाठी १६ व्या अक्षांशावर व्हिएतनामचे दोन तुकडे करण्यात आले. उत्तर व्हिएतनाममध्ये चँग-कै-शैकच्या सेनानींनी ही शरणागती घ्यावी आणि दक्षिण व्हिएतनाममध्ये ब्रिटिश-फ्रेंचांनी जपान्यांची शरणागती स्वीकारावी.

अमेरिकेचे जनरल जॉर्ज मार्शल यांनी मॅकऑर्थर याला डावलून ब्रिटिशांना स्वतः होऊन ही सूचना पोट्सडॅम येथे केली. ब्रिटिश-फ्रेंचांच्या हातावर दक्षिण व्हिएतनामचे उदक सोडण्यात अध्यक्ष ट्रूमन केवढी घोडचूक करीत आहेत याची त्यावेळी कुणाला कल्पना आली नाही.

जपानचा प्रत्यक्ष पराभव होताच ऑगस्ट १९४५ मध्ये जनरल द-गॉल याने वॉशिंग्टनवारी केली.

## बाओ-दाईच अरण्यरुदन

अध्यक्ष ट्रूमन यांची द गॉल यांचेशी मुलाखत होण्यापूर्वी सम्राट बाओ-दाई याने दोघांना तातडीचे संदेश धाडले होते. द गॉल यांना पाठवलेल्या संदेशात बाओ-दाई याने प्रार्थना केली होती –

'आपण कृपया हे समजून घ्या, इंडोचायनामध्ये फ्रेंचांसंबंधी जी चांगलेपणाची भावना अजून शिल्लक आहे, तिला जपण्यासाठी तरी व्हिएतनामचे स्वातंत्र्य मान्य केल्याचे ताबडतोब जाहीर करणे आवश्यक आहे. पुन्हा आमच्या जनतेवर फ्रेंचांची सत्ता लादण्याचा विचार मनातून काढून टाका. यातूनच अन्नामी जनता व फ्रेंच जनता यांच्यात अक्षयमैत्री संबंध निर्माण होऊ शकतील.

अध्यक्ष ट्रूमन यांना सम्राटाने लिहिले –

> 'फ्रान्सचा प्रमुख नेता आपल्याला भेटतो आहे असे कळते. मी आपल्या हे निदर्शनास आणू इच्छितो की इंडोचायनाच्या विविध भागांनी स्वातंत्र्य घोषित केलेले आहे आणि ते रक्षण करण्याचा सर्वांचा निर्धार आहे. भलेपणाने फ्रेंचांनी हा निर्णय मान्य केला नाही तर आमच्या देशात युद्ध सुरू झाल्याशिवाय राहणार नाही. आमचा काही संबंध

नसताना आमच्या देशात उपऱ्यांनी येऊन जे युद्ध भडकवले त्याचे दुष्परिणाम आम्ही भोगलेले आहेत. आता शांततेसाठी जगण्याची संधी आम्हाला हवी आहे. फ्रेंचांशी आमचे शत्रुत्व आता नाही परंतु जर आमच्यावर पुनश्च राज्य करण्यासाठी आमच्या देशात ते येऊ म्हणतील तर त्याला प्रखर प्रतिकार होईल. आमच्या या भावना आपण ब्रिटन, चीन, रशिया या सर्वांना कळवाव्या...

बाओ-दाई चे हे संदेश म्हणजे विजयाने धुंद झालेल्यांना पालथ्या घड्यावरील पाणी होते.

## सेंटनीची धूर्त पावले

जीन सेंटनी हा हनोई येथे आल्यानंतर त्याला थोडा काळ जपान्यांच्या बंदिवासात काढावा लागला. तरी लवकरच त्याची सुटका जपान्यांनी केली. कारण जपान्यांना आता शरणागतीनंतर कशातच रस उरलेला नव्हता. जिॲप याने २७ ऑगस्ट ला भेट देऊन सेंटलीला सांगितले –

'आपणच आम्हाला यापुढे मार्गदर्शन करावे.'

अर्थात हा वरवर स्वीकारलेला राजकीय पवित्रा होता. फ्रेंचांच्या पावलांचा अंदाज अजून जिॲपला आलेला नव्हता. ती मुलाखत झाली तेव्हा मेजर पट्टी हा अमेरिकन अधिकारी तेथे हजर होता. त्याच्या देखत सेंटनीने सांगितले –

जपान्यांकडून शरणागती स्वीकारण्यासाठी चीनी सैन्य येत आहे.

जिॲप उमगला. हे सर्व चोरांचे वऱ्हाडी आहेत. दक्षिण व्हिएतनामवर फ्रेंचांना कब्जा करणे ताबडतोब शक्य आहे. कारण ब्रिटिश त्यांच्या दिमतीला आहेत. इथे मात्र आज चिनी सैन्य येणार आहे आणि सोईनुसार उत्तर व्हिएतनामही फ्रेंचांच्या हवाली करण्याचे बहुधा ठरलेले असेल.

हा नवाच पेच व्हिएत-मिन्ह नेत्यांपुढे निर्माण झाला. संतापाची लाट सर्वांना अस्वस्थ करू लागली. एक-दोन दिवसांतच फ्रान्सचा कमांडर इन चीफ जनरल, लेक्लेर्क हा फ्रेंचांचे वर्चस्व इंडोचायनावर पुनश्च प्रस्थापित करण्याकरिता निघालेला अधिकारी कोलंबो येथे पोहोचला. जनरल लेक्लेर्क याने उघडपणे मुलाखत दिली –

इंडोचायनामधील आमचे अधिकार परत मिळवण्याचा आमचा निर्धार आहे. त्यासाठी सैन्याची कारवाई करावी लागली तरीही आम्ही ती करू.

या मुलाखतीने आगीत तेल पडले. ही आग बाहेर टाकण्याची संधी लवकरच येत होती. येणारा २ सप्टेंबर युद्ध संपल्यानंतरचा पहिलाच २ सप्टेंबर होता. ६ वर्षांपूर्वी याच

दिवशी हिटलरने युरोपात ॲग्लो-फ्रेंचांचे कंबरडे ढिले करण्यास सुरुवात केली होती. यादिवशी 'बा-दिन्ह' चौकात जिॲप आणि हो या दोघांची जाहीर भाषणे होणार होती.

त्या दिवशी हनोई शहरात सकाळपासून मिरवणूका निघू लागल्या. सभास्थानाकडे सर्व अबाल स्त्री-पुरुष निघाले होते. जमावाची शिस्त वाखाणण्यासारखी होती. गव्हर्नर जनरलच्या प्रासादातून सेंटनी ही सर्व गडबड पाहत होता. जनतेचा उत्साह अमाप असला तरी फ्रेंच द्वेष कुठेही प्रत्यक्ष दिसत नव्हता.

## स्वातंत्र्याचा निर्धार

सर्व हनोई शहर या सभेला लोटले होते. जाहीर सभेतून जनतेला हो-चि-मिन्ह याचे पहिलेच दर्शन होणार होते. जो तो त्याला पाहायला उत्सुक होता. प्रचंड जयघोषांचे साद शमल्यानंतर हो हा व्यासपीठावर उभा राहिला. त्याची रूळणारी दाढी वाऱ्यावर हालत होती आणि भावना उचंबळून आल्याने त्याच्या आवाजाला निराळीच धार चढत होती.

'या फ्रेंचांच्या निशाणावर तीन रंग आहेत, स्वातंत्र्य-समता-बंधुत्व यांचे ते निदर्शक आहेत असे म्हणतात. परंतु वसाहतवादी फ्रेंच दरोडेखोरांनी हे निशाण खांद्यावर मिरवीत आमची मायभूमी बळकावली. आमच्या जनतेला पिळून काढले. इथे शाळांपेक्षा तुरूंग अधिक आहेत! आमचे स्वातंत्र्य प्रयत्न चिरडताना त्यांनी इथल्या नद्यांचे पाणी लाल केलेले आहे. आमच्या गरीब जनतेला त्यांनी अफू आणि दारूत बुडवून टाकले आहे. आमची दाणा-वैरण, आमच्या इस्टेटी, आमची जंगले, आमच्या खाणी या फ्रेंचांनी लुबाडून आम्हाला अन्नाला मोताद केलेले आहे. त्यांनी लादलेल्या अन्याय्य करांनी आमचा जीव मेटाकुटीला आलेला आहे. आता हे सगळे संपलेच पाहिजे.

आम्ही जनतेचे प्रतिनिधीत्व करतो. आमच्या स्वतंत्र सरकारच्या वतीने आणि तुमच्या साक्षीने आम्ही आज फ्रेंच वसाहतवादाचे जोखड फेकून देत आहोत. फ्रेंचांनी केलेले करारमदार आम्ही मानीत नाही. यासाठी प्रदीर्घ लढा देण्याचा आमचा सर्वांचा निर्धार आहे.'

सभेतील भाषणे सोपी असतात. प्रत्यक्ष राजकारणातील अडचणी लवकरच 'आ' वासून उभ्या ठाकल्या. आदल्या वर्षी व्हिएतनाममध्ये मोठा दुष्काळ पडलेला होता. नवी पीके अजून हाती यायची होती आणि जनतेला ताबडतोब काहीतरी दिलासा हवा होता. ३ सप्टेंबरला हो-चि-मिन्ह याने सरकारतर्फे एक दुष्काळनिधी सुरू केल्याची घोषणा करवली. प्रत्येक दहाव्या दिवशी म्हणजे महिन्यातून तीनदा सर्व जनतेने उपास करावा. यासाठी आवाहन करण्यात आले आहे. तांदुळापासून आणि मक्यापासून दारू गाळणे हा मृत्यूदंडाचा गुन्हा ठरविण्यात आला.

उपासाच्या आवाहनाला नाही म्हटले तरी धार्मिक भावनांचे अस्तर होते. व्हिएतमीन्हच्या राजकारणात हे आवाहन नक्कीच गांधीतंत्राचे स्मरण देणारे होते. जनता स्वेच्छेने उपास काढू लागली, परंतु जे उपाशीच होते ते मरू लागले. काही महिन्यात २ लाख माणसे मृत्यूमुखी पडली. हे घडत असताना फ्रेंच तुकड्या घेऊन निघालेला फ्रेंच जनरल लेक्लर्क हा सायगावच्या वाटेवर होता. तिथे फ्रेंच सैन्य येऊन पोहोचेपर्यंत ब्रिटिश सैन्याने जपान्यांकडून दक्षिण व्हिएतनाममध्ये शरणागती स्वीकारलेली होती. जनरल लुहान या कोमिंग्टांग जनरलच्या चिनी तुकड्या टोंकीनच्या दिशेने उत्तर व्हिएतनामच्या हद्दीकडे सुटलेल्या होत्या.

## संकटांना सुरुवात

हो सरकारवर चारही दिशांनी वावटळे येऊ पाहत होती. जे काही करायचे ते विचारपूर्वक करायला हवे होते. माओ च्या फौजा अजून उत्तर चीनमध्येच अडकलेल्या होत्या. मॉस्कोहून काही मदत अशक्य होती. आशा एकच होती की अमेरिकेने दबाव आणला तर राष्ट्रीय, चिनी सैन्याचे उत्तर व्हिएतनाममध्ये येणे थोपविता येणार होते. जिॲप त्या प्रयत्नांत होता. मेजर पट्टी, जनरल गलोगेर या हनोईतील अमेरिकन सेनांनीशी तो संपर्क ठेऊन होता.

हनोईत प्रथम आलेला जीन सेंटनी हा देखील फ्रान्सचे इंडोचायनात वर्चस्व प्रस्थापित करण्यासाठीच आलेला होता. जपानच्या आकस्मिक पराभवाने त्याच्या मार्गात सर्व अडचणी निर्माण झालेल्या होत्या. जपानचा स्वतः लष्करी पराभव करून फ्रेंच हे इंडोचायनात येते तर गोष्ट निराळी होती. सेंटनी वाट पाहत होता, ती हनोईला जनरल लेक्लर्क यांचे टँकदल पोचण्याची! व्हिएतनामच्या पटावर फ्रेंच सत्ता अजून शक्तीकेंद्र म्हणून नाही, याची त्याला जाणीव होती आणि तो नुसता दिवस ढकलीत होता. जनरल लेक्लर्कच्या सैन्याची मार्गप्रतिक्षा करीत होता.

हो याच्यापुढे सर्व चित्र स्पष्ट होते. उत्तरेकडून येणाऱ्या चिनी राष्ट्रीय सैन्याशी जुळवून घेणे त्याला अशक्य होणार होते, कारण या सैन्याशी त्याने गेली अनेक वर्षे शत्रुत्व पत्करलेले होते. अखेर हो हा माओ चा पक्षपाती आहे, ही गोष्ट पूर्वीच स्पष्ट झालेली होती. हनोईला लेक्लर्क आधी पोहोचला तर? प्राप्त परिस्थितीत नमते घेऊन फ्रेंचांशी जमवून घेण्यात कमीत कमी धोका आहे. याच निर्णयावर विचाराअंती हो हा पुन्हा पुन्हा येत होता. चँग-कै-शैकच्या चिन्यांचे अनंतकाळ गुलाम होण्यापेक्षा, काही काळ फ्रेंचांची शार्गिदी कमी तापदायक ठरणार होती. अनेक फ्रेंच नेते हो याचे मित्र होते. काही पुरोगामी नेत्यांचे फ्रेंच राजकारणातील अस्तित्व हा मोठाच आशेचा किरण होता.

## जीन सेंटनीची पहिली भेट

अखेर हो-चि-मिन्ह याने जीन सेंटनीशी वाटाघाटीचा मार्ग पत्करला. २८ सप्टेंबरला जीन सेंटनीचे प्रतिनिधी आणि हो यांची पहिली भेट झाली. जुलै महिन्यात, पाच ते दहा वर्षांत फ्रेंचांनी इंडोचायनाला स्वातंत्र्य द्यावे अशी जी मृदू मागणी हो-चि-मिन्हने केलेली होती, त्याची आठवण या फ्रेंच प्रतिनिधींनी काढताच हो म्हणाला –

'मला यातले काही स्मरत नाही. त्यावेळी काहीही म्हटले असले तरी आज आमचे स्वतःचे सरकार प्रत्यक्ष हनोईत अधिकारावर असताना पुन्हा मागे कसे जाता येईल?'

१५ ऑक्टोबरला हो हा जीन सेंटनी याला भेटायला आला. या भेटीसंबंधी सेंटनी याने लिहून ठेवले आहे –

'माझ्या पहिल्याच भेटीनंतर माझी खात्री पटली की हा ऋषितुल्य माणूस आहे. त्याच्या चेहऱ्यावर त्याची बुद्धिमत्ता, मार्दव आणि चाणाक्षता सर्व दृगोचर होत होती. मला तो अतिशय उच्च दर्जाचा पुरुष वाटला. त्याच्या बोलण्या वागण्यावरून हे ध्यानात येत होते, की खरोखरच सर्व हिंसात्मक मार्गाचे याला वावडे आहे. या कालखंडात इंडोचायनाचा गांधी, म्हणूनच वावरण्याचा त्याचा प्रयत्न होता यात शंका नाही!'

एकाच भेटीत या वाटाघाटी सफल होतील ही शक्यता अर्थात नव्हतीच. हो व जीन सेंटनी हे दोघे अगदी विरुद्ध टोकाकडून विचार करीत होते. हो-चि-मिन्ह याला शक्यतो शांततेच्या वाटाघाटीच्या मार्गाने फ्रेंचांकडून स्वातंत्र्यावर मोर्तब हवे होते आणि हनोईतील व्हिएतमिन्ह सरकार दूर करून तिथे फ्रेंचांचा अंमल पुन्हा एकदा स्थापित करणे हे जीन सेंटनीचे काम होते. दोघांमध्ये वाटाघाटीचा व्यवहार सुरू झाला होता याचे कारण इतकेच, की लष्कराच्या बळावर सर्व व्हिएतनामचा कब्जा करणे फ्रान्सला शक्यच नाही – आज यासाठी लागणारे सुमारे तीन लाख सैन्यदेखील फ्रान्सपाशी नाही याची स्पष्ट कल्पना सेंटनी याला होती.

सुदैवाने सायगावमध्ये पाऊल टाकल्याबरोबर जनरल लेक्लेर्क याचीही मिजास थोडी उतरली. त्याचा इंटेलिजन्स प्रमुख पॉल पॉमस हा आशियातील समाजस्थितीवरील तज्ज्ञ अभ्यासक होता. त्याने जनरल लेक्लेर्क याला स्पष्ट सांगितले की – 'भारतासारखे आशियाई देश लवकरच स्वतंत्र होत आहेत. वसाहतवादाला यापुढे फ्रेचांव्यतिरिक्त अन्य कुणा राष्ट्रांचा पाठिंबा मिळणे दुरापास्त गोष्ट आहे.' परंतु जनरल लेक्लेर्क याला ही गोष्टही स्पष्ट दिसत होती की इंडोचायनातील काही प्रमुख शहरांत फ्रेंचांचा अंमल बसवण्याखेरीज व्हिएतमिन्ह नेत्यांशी होणाऱ्या वाटाघाटीत, आपण काय बोललो याला किंमत येणार नाही. या दृष्टीने प्रथम उत्तर व्हिएतनाममध्ये येऊ पाहणाऱ्या चिनी सैन्याला पाय रोवू देता

कामा नये, आणि करायचे तर हनोईतील व्हिएतमिन्ह सरकारशी काहीतरी पक्का समझोता ताबडतोब होणे अगत्याचे आहे.

हनोईत जीन सेंटनी आणि व्हिएतमिन्ह नेते यांच्यात वाटाघाटीचे गुऱ्हाळ चालू असताना नव्या नव्या मसुद्यांचा विचार होत होता. मुख्य अडथळा हा होता की २ सप्टेंबरला व्हिएतमिन्ह नेते स्वातंत्र्य जाहीर करून बसले होते. त्या भूमिकेपासून ते मागे कसे जाणार? सेंटनी याने सुचवले की नव्याने स्थापन होणाऱ्या फ्रेंच फेडरेशनचा व्हिएतनाम सभासद देश राहिला तर प्रश्न सुटेल, परंतु फ्रेंच फेडरेशनचे स्वरूप काय राहील हे स्पष्ट होत नव्हते.

## ६ मार्चचा समझोता

हो घोळ चाललेला असताना पॅरीसमध्ये मोठा खांदेपालट झाला. २० जानेवारी ४६ ला द गॉल पंतप्रधानपदावरून गेला आणि त्याची जागा फेलीक्स गॉईन यांनी घेतली. द गॉल दूर झालेला पाहताच हो-चि-मिन्ह याने सेंटनी याला १६ फेब्रुवारी १९४६ ला कळवले –

‘फ्रेंच युनियनचे सभासदत्व स्वीकारण्याची अट मला मान्य आहे’ चक्रे भराभर फिरू लागली. सेंटनी व जनरल लेक्लेर्क यांनी पॅरीस येथे कळवले, की हनोई सरकार फ्रेंच फेडरेशनचे सभासदत्व पत्करील, या तत्त्वावर समझौता करायला परवानगी मिळावी. गॉईन सरकारने कळवले –

‘स्वतंत्र परंतु फ्रेंच युनियन अंतर्गत अशा व्हिएतनामी सरकारला फ्रान्स मान्यता देईल ती दोन अटींवर. एक जेव्हा फ्रेंच सैन्य चिनी सैन्याकडून उत्तर व्हिएतनामचा कब्जा घेण्यासाठी येईल, तेव्हा व्हिएतमिन्ह सरकार त्याचे स्वागत करील आणि दुसरी गोष्ट – नोम-बो (दक्षिण व्हिएतनाममधील कोचीन चायना) विभागाचे भवितव्य हे सार्वत्रिक मतदानाने ठरवायला हनोई सरकारने तयार व्हावे.’

हो-चि-मिन्ह याने तडकाफडकी या अटी स्वीकारल्या नाहीत. तत्पूर्वी त्याला एक गोष्ट करायची होती. फ्रेंचांचे नामदारी वर्चस्व तरी का पत्करले, अशी हाकाटी देशात राष्ट्रवादी आता सुरू करतील, याची त्याला अटकळ होती. यासाठी त्याने प्रथम मंत्रिमंडळात काही तथाकथित राष्ट्रवादी नेत्यांची भरती केली आणि मग मंत्रिमंडळापुढे फ्रेंचांचा प्रस्ताव ठेवला. २६ फेब्रुवारीला मंत्रिमंडळाने फ्रेंचांच्या अटी मान्य केल्या. या पुनर्रचीत मंत्रिमंडळात हो-चि-मिन्ह याचा जुना प्रतिस्पर्धी चीनप्रेमी नेता नग्यूएन थान याला उपपंतप्रधानपद हो याने दिले व कम्युनिस्टांना देशातून हुसकू पाहणाऱ्या दोन राष्ट्रवाद्यांकडे परराष्ट्रखाते व संरक्षण खाते हो याने दिले.

एकीकडे फ्रेंचांनी चिनी सरकारशी वाटाघाटी सुरू केलेल्या होत्या, परंतु ती देवाणघेवाण होती. शांघाय, कँटोन, तिअनस्टीन, हँको या ठिकाणी फ्रेंचांकडे असलेले वर्षानुवर्षाचे सर्व विशेषाधिकार फ्रान्सने सोडले, तर उत्तर व्हिएतनाम फ्रेंचांच्या हवाली करायला 'चुंगकिंग' सरकार तयार होते.

६ मार्च १९४६ या दिवशी व्हिएत-मिन्ह सरकार व फ्रेंच सरकार यांच्यातील करारावर सह्या झाल्या. हो, जीन सेंटनी, त्याचे फ्रेंच सहकारी पिगनॉन आणि सालान, तसेच हो याचा नवा परराष्ट्रमंत्री आणि नवा संरक्षणमंत्री या सर्वांचा एकत्र फोटो काढण्यात आला. या करारानुसार खालील गोष्टी कलमवार ठरल्या –

१. स्वतःचे स्वतंत्र सरकार असलेला प्रजासत्ताक व्हिएतनाम फ्रान्सला मान्य आहे.
२. प्रजासत्ताक व्हिएतनाम हा फ्रेंच युनियनचा सभासद राहील.
३. कोचीन-चायना भागात (दक्षिण व्हिएतनाम) मतदानाने जो कौल तेथील जनता देईल, त्यानुसार फ्रेंच सरकार वागेल.
४. चिनी सेनेकडून उत्तर व्हिएतनामचा अधिकार घेण्यासाठी जेव्हा फ्रेंच सैन्य येईल तेव्हा व्हिएतनामचे सरकार त्याचे स्वागत करील.
५. व्हिएतनाममधील फ्रेंचांच्या हितसंबंधाचा विचार करण्यासाठी आणखी वाटाघाटी करण्यात येतील.

या करारावर सह्या होताच जीन सेंटनी हो कडे वळून म्हणाला –

'संघर्ष टळला आणि समझोता झाला याचा मला फार आनंद होतो आहे..' हो याने शांतपणे म्हटले –

'मला तुमच्याएवढा आनंद झालेला नाही! कारण या कराराने तुमचा सर्वस्वी फायदा झालेला आहे. माझ्या मताप्रमाणे मला फारसे मिळवता आलेले नाही हे तुम्हाला ठाऊक आहे. अर्थात हवे ते सगळे रातोरात मिळत नसते याची मला कल्पना आहे.'

एवढे म्हणून हो याने पिगनॉन आणि सेंटनी यांना आलिंगन दिले व पुढे म्हणाला –

'तुमची मैत्री लाभली हे एक मोठे समाधान मात्र आहे.'

फ्रेंच सरकारशी जुळवून घेताना ज्या तडजोडी कराव्या लागल्या त्याची खंत हो याला वाटत होतीच. देशातील जनता हा आपला निर्णय कसा काय स्वीकारते याची त्याला काळजी वाटत होती. अशावेळी मोकळेपणाने जनतेशी संवाद साधणे हा एकच मार्ग त्याला दिसत होता.

## जनता संवाद

७ मार्च १९४६ रोजी हनोई शहरातील मध्यवर्ती नाट्यगृहात (प्लास टू थिएट्रे) हो याने सभा घेतली. झालेल्या कराराविषयी शहरात अद्वातद्वा बोलले जात होते. काही खून पडणार अशी बोलवा होती. जनसंमर्द तुफान लोटला होता. वातावरण अतिशय संशयाचे व तप्त होते.

प्रथम जिॲप लोकांसमोर बोलायला आला. गरजल्यासारख्या आवाजात त्याने सुरुवात केली –

'संपूर्ण स्वातंत्र्याचे ध्येय लवकर साध्य व्हावे म्हणून देशात काही विशिष्ट परिस्थिती निर्माण करणे आवश्यक होते. यासाठी वाटाघाटीचा मार्ग आम्ही पत्करला. १९१८ साली ब्रेस्टलिटोव्हस्क येथे रशियनांनी जर्मनीपुढे शरणागती देऊन शस्त्र म्यान केले. उसंत मिळावी, सैन्याची शक्ती वाढावी, राजकीय शक्ती वाढावी, त्यासाठी घेतलेली ही विश्रांती होती. या तहानंतर जो रशिया निर्माण झाला, तो सामर्थ्यसंपन्नच ठरला नाही का?'

संदर्भ बरोबर नव्हता, तरीपण अस्वस्थ मनांना दिलासा द्यायला भाषण ठीक होते. समुदाय हळूहळू शांतपणे ऐकू लागला. याचक्षणी बाल्कनीचा जिना चढून हो जिॲप शेजारी येऊन बसला. त्याच्या दर्शनाने उल्हासाची एक मोठी लाट सर्वत्र फिरली. जिॲपने आवरते घेतले. हो बोलायला उभा राहिला.

बाल्कनीवरून फडकणाऱ्या आणि सोनेरी तारा मिरवणाऱ्या प्रचंड लाल राष्ट्रध्वजाशेजारी हो याची देहाकृती अगदी खुजी व किरकोळ दिसत होती. डोक्यावरचे पांढरे केस वाऱ्याच्या झुळकीबरोबर उडत होते. काहीसे झुकलेले खांदे आणि अंगातला वापरून जुना झालेला मळका ट्युनिक, ही आकृती पाहाताना अनेकांना त्याच्यावर रस्त्यावर उघडपणे केले जाणारे आरोप आठवत होते. 'या माणसाने फ्रेंचांना आपला देश विकला आहे.' 'याने देशाशी द्रोह केला आहे.' 'जनतेचा विश्वासघात केला आहे.' परंतु तो उभा राहताच जो उल्हासाचा प्रचंड जल्लोष झाला, तो पाहून या शंका वाऱ्यावर विरून गेल्या. यातले काहीच खरे नव्हते तर!

'आपण वाटाघाटी पत्करल्या- संघर्ष टाळला ही गोष्ट आपल्या शहाणपणाची साक्ष देणारी आहे. जर वाटाघाटींनी चारपाच वर्षांत संपूर्ण स्वातंत्र्य येत असेल तर लाख-अर्धा लाख माणसांचा बळी कशासाठी द्यायचा? मी आतापर्यंत तुम्हाला स्वातंत्र्याच्या मार्गाने बोट धरून आणले आहे. देशाच्या स्वातंत्र्यासाठी सर्व आयुष्यभर मी लढलेला आहे. तुम्हाला हे माहीत आहे की देशाचा घात करण्यापेक्षा मी मरण पत्करीन. मी तुम्हाला शपथपूर्वक सांगतो की तुमचा कसलाही विश्वासघात केलेला नाही – करणार नाही...!'

या सभेला हजर असलेल्या माणसाने सभेचे हे वर्णन करताना म्हटले आहे –

'यावेळी हो काकाच्या गालावरून अश्रू ओघळत होते. आम्हाला ते दिसत नव्हते पण त्याच्या आवाजातून आम्हाला हे सर्व स्पष्ट कळत होते. जनसंमर्दावर विलक्षण परिणाम झालेला दिसत होता. करार जनतेने स्वीकारला आहे हे सर्वांना कळून चुकले होते.'

## बाओ-दाई बिथरला

राज्यत्याग केलेला सम्राट बाओ-दाईला व्हिएतमिन्ह सन्माने वागवत होते. हनोई सरकारचा वरिष्ठ सल्लागार म्हणून त्याला मान्यता देण्यात आलेली होती. बाओ-दाई मात्र फ्रेंचांनी हो याचेशी म्हणजे पर्यायाने कम्युनिस्टांशीच वाटाघाटी करून आपल्याला डावलले याविषयी नाराज झाला. सेंटनी याचेबरोबर बोलणी झाली. त्यावर बाओ-दाई याने बहिष्कार टाकला होता. करारावर त्याने कडाडून टीका केलेली होती. यामुळे हा करार करूनही हो याची लोकप्रियता अढळ राहिलेली पाहून त्याचा चडफडाट शिगेला पोचला. करार होताच तो एकाकी हनोई सोडून हाँगकाँग येथे चालता झाला.

हाँगकाँग येथे बाओ-दाईचे कसे काय चालले आहे याची जेव्हा हो याने काही दिवसांनी चौकशी केली, तेव्हा त्याला कळले की बाओ-दाई हा हाँगकाँगला पुनश्च सुखासीन उपभोगात दंग झालेला आहे. हो याने त्याचा वैयक्तिक-राग-द्वेष विचारात न घेता त्याला पत्र लिहिले. यात हो याने लिहिले–

'व्हिएतनाम आणि त्याचा इतिहास याचेशी तुमचे नाव निगडीत आहे हे विसरू नका. मातृभूमीला कमीपणा आणील असे काही आपल्या हातून घडू नये याची काळजी घ्या आणि देशाला गौरव वाटेल अशा तऱ्हेने जीवन व्यतीत करा.'

हो चे हे पत्र त्याच्या व्यक्तिमत्त्वावर चांगले प्रकाश टाकणारे आहे. त्याच्या गाढ सद्बुद्धीचे अनेकवेळा कौतुक वाटते.

जानेवारी ४६ मध्ये सर्व दक्षिण व्हिएतनाम सर्वस्वी फ्रेंचांच्या हवाली करून ब्रिटिश व त्यांचेबरोबर गेलेले हिंदी सैन्य माघारी आले. पंडित नेहरूंनी उद्गार काढले.

'इंडोचायनात ब्रिटिशांनी केलेला हस्तक्षेप आम्हाला चीड येऊनही अगतिकपणे पाहावा लागला. ब्रिटिशांच्या वतीने हे घाणेरडे काम हिंदी सैनिकांना अशांच्या विरुद्ध करावे लागले की जे आमच्याप्रमाणे स्वातंत्र्यासाठी लढत होते – याची आम्हास शरम वाटते आहे.'

## जिॲपची कोपरखळी

१८ मार्च १९४६ या दिवशी जनरल लेक्लेर्कच्या फ्रेंच फौजा हैपाँग बंदरातून हानोईला आल्या, तेव्हा त्यांच्या स्वागतासाठी हो याला आपल्या सहकाऱ्यांसह कराराप्रमाणे हजर राहावे लागले. जनरल लेक्लेर्क यांच्या स्वागतासाठी जमलेल्यात हनोईमधील फ्रेंच

नागरिकांचा साहजिकच मोठा भरणा होता. अनेक दिवस त्यांनी मोठ्या संकटात काढलेले होते. सैन्य उतरले, पाठोपाठ टँक्स उतरले, चिलखती गाड्या उतरल्या. हे सर्व पाहत असताना हो याने लोकांना संयमाने सर्व सहन करण्याची विनंती केली. यामुळेच केवळ काही अपप्रसंग निर्माण झाला नाही.

हैपाँग येथे जिॲप स्वागताला गेला होता. जनरल लेक्लेर्क याला लष्करी सलाम ठोकताना जिॲप म्हणाला – 'एक व्हिएतनामी प्रतिकारक म्हणून मी एका थोर फ्रेंच प्रतिकारकाला सलाम करतो आहे.'

या वाक्यातला विखार समजणाऱ्यांना समजला. जनरल लेक्लेर्क जपान्यांशी कधी लढला होता? जपान्यांशी मुकाबला केला होता तो जिॲपने आणि याची आठवण जर्मनीपुढे लोटांगण घातलेल्या फ्रेंचांच्या प्रतिनिधीला जिॲप देत होता.

जनरल साहेबांचा चेहरा तत्क्षणी लाल झाला, पण त्याने सगळे हसण्यावारी नेले. दुसऱ्या दिवशी सायंकाळी हनोई येथे अध्यक्ष हो याला भेटताना मात्र जनरल साहेबांचा चेहरा प्रफुल्ल होता. हो च्या निवासाबाहेरच्या पायऱ्यावरच हो चा हात हातात घेऊन तो प्रेमभरात दाबीत जनरल लेक्लेर्क म्हणाला –

'अध्यक्षमहाराज – अखेर आपण मित्र म्हणूनच भेटतो आहोत...'

पलीकडच्या खोलीतून जिॲप हे पाहत होता. तो उद्गारला –

'आम्हाला आता पुढे सरसावलेच पाहिजे! We must forge ahead!' या उद्गाराचा अर्थ काढावा तसा लागतो.

अध्यक्ष हो याने मात्र जनरल साहेबांबद्दल उद्गार काढले 'लेक्लेर्क? मोठा इमानी आणि सरळ माणूस! अशा माणसांजवळ नेहमी वाटाघाटीची संधी मिळाली तर काय बहार होईल!'

## अमेरिका युरोपात अडकली

इंडोचायनातील राजकारणाने केवढे मोठे अतर्क्य वळण घेतले होते! हे सगळे घडत असताना ज्या देशाने जपानचा पराभव केला आणि इंडोचायनातील स्वातंत्र्याचा सुरुवातीला मोठा आग्रह धरला, तो अमेरिका देश कुठे होता? वॉशिंग्टनचे राज्यकर्ते कोणत्या कामात इतके गढले होते की त्यांना इंडोचायनाकडे पाहायलाही आता फुरसत नसावी? हनोईमधील अमेरिकेच्या व्हाईस कौन्सलची कचेरी सोडली तर एकही अमेरिकन राजकारणी मुत्सद्दी वा लष्करी अधिकारी एवढी उलथापालथ घडत असताना हनोईला कधी आला नाही! असे का घडले?

याला तशीच महत्त्वाची कारणे होती. पोटस्डॅम परिषद उरकून २५ जुलै १९४५ ला चर्चिल लंडनला परतले आणि २६ जुलै ४५ ला सकाळी जाहीर झालेल्या ब्रिटिश पार्लमेंटच्या निकालानुसार हुजूर पक्षाचा पराभव झाला. चर्चिल पंतप्रधान राहिले नाहीत. मजूरपक्षाचे ॲटली सरकार अधिकारावर आले. युरोपची युद्धोत्तर व्यवस्था कशी राहावी या महत्त्वाच्या निर्णयांची जबाबदारी आता अमेरिकेवर येऊन पडली. बड्या चारांपैकी रूझवेल्ट निधन पावलेले, चर्चिल हे अधिकारावरून दूर झालेले, चँग-कै-शैकला माओने ग्रहण लावलेले! यापुढे अध्यक्ष ट्रूमन हे आता सर्वस्वी युरोपियन राजकारणात बुडालेले राहू लागले.

जपान आणि प. जर्मनी या देशात स्थिर लोकशाही सरकारे कशी रूजतील, युरोपात स्टॅलिनच्या पंजाखालून जास्तीत जास्त देशांना कसे वाचवता येईल, फ्रान्सची आर्थिक हलाखी कशी सुधारता येईल, चँगला अजून कसे सावरता येईल, असे नानाविध प्रश्न अमेरिकेच्या पुढे होते. वॉशिंग्टनचे राज्यकर्ते या सर्व उलाढालीत गर्क झालेले होते. स्टॅलीनबरोबर युद्धोत्तर वाटाघाटी करताना फ्रान्सला आपल्या बाजूला राखणे हे महत्त्वाचे राजकारण होते आणि या निकडीचा बरोबर फायदा फ्रेंचांनी उठवला असे नंतर ध्यानात येऊ लागले. डीन ॲचेसन यांनी नंतर स्पष्ट कबुली दिली –

> “We come to the help of the French in Indochina not because we approved of what they were doing but because we needed their support for our policies in regard to NATO and Germany. The French blackmailed us.”

> (आम्ही फ्रेंचांना इंडोचायनात परतण्यासाठी मदत केली, ते आम्हाला त्यांचे तेथील जाणे पसंत होते म्हणून नाही, तर नाटो संबंधात आणि जर्मनीच्या प्रश्नात आम्हाला फ्रेंचांची मदत हवी होती म्हणून. फ्रेंचांनी या परिस्थितीचा गैरफायदा उठवला.)

इंडोचायनाच्या राजकारणातून अमेरिकेने अंग काढून घेतले. ब्रिटिशांनी तर फ्रेंचांना सर्वतोपरी मदतच केली आणि परिणामी हो-चि-मिन्ह याला फ्रेंचांशी काही काळ नमते घेण्यावाचून गत्यंतर उरले नाही.

परंतु फ्रेंचांनी हो याच्याबरोबर सुरू केलेला हा मधुचंद्र सायगाव येथे असलेल्या फ्रेंच नाविकदल प्रमुखाला अजिबात पसंत नव्हता. त्याचे नाव ॲडमिरल अरजेनलीय. त्याने हनोई करार म्हणजे ‘दुसरे म्युनिच आहे’ अशी कठोर टीका खाजगीरित्या सुरू केली. दक्षिण व्हिएतनाममध्ये तो फ्रान्सचा हाय कमिशनर म्हणूनही काम पाहत असे. परंतु सर्वांनीच ज्या कराराचे स्वागत केले, त्याला उघडपणे लाथाडण्याचे त्याला धैर्य नव्हते.

तेव्हा त्याने हो याला भेटीला बोलावले. मात्र सायगावमध्ये हो याचे पाऊल पडायला नको म्हणून ही भेट अलाँग उपसागरात उभ्या असलेल्या 'एमिलबर्टीन' या क्रूझरवर ठरवली.

या भेटीत फारसे काही निष्पन्न झाले नाही. जिॲप आणि हो यांची अशी समजूत होती की दक्षिण व्हिएतनाममध्ये होणारे सार्वमत हे निश्चित विलिनीकरणाच्या बाजूने झुकणार आणि दक्षिण व उत्तर व्हिएतनामाचे एकत्रीकरण हा फक्त काही कालावधीचाच प्रश्न आहे. परंतु राजकारणातील चकवे आता सुरू झाले होते. हाय कमिशनरबरोबर झालेल्या चर्चेत असे ठरले की फ्रेंच आणि व्हिएतनाम यांच्या भावी संबंधाबाबतची करारानुसार होणारी पुढील बोलणी ही पॅरीसमध्ये व्हावी.

व्हिएतनामच्या वतीने पॅरीसला जाणाऱ्या शिष्टमंडळाचे नेतृत्व हो यांच्याकडे न येता ते फाम-व्हॉन-डाँग यांच्याकडे आले. परंतु अध्यक्ष हो यांनी यावेळी पॅरिसमध्ये विचारविनिमयासाठी लागल्यास हजर राहावे असेही फ्रेंचांनी सुचविले.

३० मे १९४६ या दिवशी हो-चि-मिन्ह याने पॅरिसला जाण्यासाठी विमानात पाऊल ठेवले. विमानात हो याच्याशेजारी वाटाघाटीत फ्रेंचांच्या वतीने भाग घेतलेला जनरल सालान बसलेला होता. १ जूनला सायंकाळी त्यांचे विमान दमास्कसवरून जात असताना हो याने सहज रेडिओचे बटन दाबले. रेडिओवरून बातमी सांगण्यात आली –

'कोचीन-चायनाचे स्वतंत्र सार्वभौम प्रजासत्ताक स्थापन करण्यात आले असून, तशी घोषणा आज सायगावमध्ये करण्यात आली. या प्रजासत्ताकाचे सरकार, संसद आणि सैन्य हे संपूर्णपणे स्वतंत्र राहील.'

हो या बातमीने चमकला. त्याच्या तोंडून शब्द फुटेना. हा तर शुद्ध विश्वासघात होता!

n

# ९ : शांततापूर्ण प्रयत्नांना खग्रास

सायगावच्या फ्रेंच राजकारण्यांनी आपली पाठ फिरताच दक्षिण व्हिएतनामचे स्वतंत्र प्रजासत्ताक निर्माण केल्याचे घोषित करावे व आत्तापर्यंतच्या आपल्या सर्व चांगुलपणाचा गैरफायदा घ्यावा याचा विचार हो याच्या चेहऱ्यावर उमटला नसता तरच नवल! त्याच्याबरोबर प्रवास करणाऱ्या जनरल सालान याला असे काही घडणार आहे याची कल्पना नसावी. व्हिएतनामची फाळणी पक्की करण्याचा हा नवा फ्रेंच प्रयत्न बहुधा त्याला पूर्वज्ञात नसावा.

## सक्तीची विश्रांती

या धक्क्यापाठोपाठ दुसरा एक धक्का हो याला देण्यात आला. त्याचे विमान पॅरीस विमानतळावर न उतरता ते बिआरिट्झ विमानतळावर उतरेल असे त्याला सांगण्यात आले. हो याची आता मात्र खात्री झाली की फ्रेंचांनी हा काहीतरी मोठा कटच शिजवलेला दिसतो आहे. तसे काही नव्हते. २ जूनला फ्रेंच निवडणुकांचे निकाल जाहीर झाले आणि गॉईन हा आता पंतप्रधान राहणार नव्हता. नवा पंतप्रधान मंत्रिमंडळ बनवीपर्यंत व्हिएतनामी शिष्टमंडळाशी वाटाघाटीही सुरू होणार नव्हत्या. तेव्हा हो याला पॅरीसमध्ये ताबडतोब नेण्यात अर्थ नव्हताच. त्याने बिआरिट्झ येथे काही काळ विश्रांती घ्यावी असे फ्रेंचांनी ठरवले होते.

बिआरिट्झ येथील विमानतळावर हो विमानातून खाली उतरला तो तेथे जीन सेंटनी स्वागतासाठी आलेला होताच. विमानात ऐकलेल्या बातमीचा उल्लेख करून हो याने म्हटले – 'मला फ्रान्समध्ये कशा करता यायला लावलेत? मी फ्रान्समध्ये राहण्यात काहीच अर्थ नाही. वाटाघाटीची वेळ निघून गेलेली आहे. मी परत जातो...'

जीन सेंटनीनेही पाहिले की हो हे सांगताना रागावलेला वाटत नव्हता. फक्त हे सर्व तो निराश मनाने म्हणत होता. जीन सेंटनी मोठा आशावादी होता. त्याने हळूहळू बोलून हो याची समजूत घालण्याचा प्रयत्न सुरू केला. तो म्हणाला –

'ॲडमिरल अरजेनलीय याने जे काही सायगावला केले आहे ती सर्व तात्पुरती व्यवस्था आहे. ६ मार्चच्या करारानुसार तिथे सार्वमत घेतले जाणारच आहे. दक्षिण व्हिएतनाममधील काही नेत्यांनी जोराची मागणी केल्यानेच हाय कमिशनर साहेबांना हे पाऊल उचलावे लागलेले आहे. आता ही मागणी करणाऱ्यांना जनतेचा पाठिंबा आहे की नाही या सर्व प्रश्नांचा निकाल सार्वमतात लागणारच आहे. तेव्हा वाटाघाटीची वाट आजच बंद का करता?'

जीन सेंटनीच्या रदबदलीला यश येऊन हो हा फ्रान्समध्ये राहण्यास अखेर तयार झाला. ज्या हॉटेलात हो उतरला होता ते पॅलास हॉटेल साधारणच होते. परंतु उपनगरात यापेक्षा चांगला निवास असणार कसा? कुणीतरी भेटायला आलेला त्याला म्हणे –

'हॉटेल अगदीच रद्दी दिसते आहे-'

तेव्हा हो म्हणाला – "इथे वर छप्पर आहे, दोन वेळा जेवायला आहे. मी यापेक्षा शतपट हलाखीत दिवस काढलेले आहेत."

बिआरिट्झ येथे हो याचा जवळजवळ तीन आठवडे मुक्काम झाला. त्याला गाव आवडले. गावातल्या शेतकऱ्यात आणि कोळ्यात तो मिसळू लागला. हो हा फिरायला बाहेर पडे तो त्यांच्यात रमून जाई. हवा छान होती. त्याची प्रकृतीही जरा सुधारली.

पॅरिस येथे नवे मंत्रिमंडळ अधिकारावर आले. नवा पंतप्रधान झाला होता जॉर्जेस बिडॉल्ट. पूर्वी हा परराष्ट्रमंत्री होता. २२ जूनला सेंटनी बरोबर हा बिआरिट्झ सोडून पॅरिसला आला. विमानतळावर मारीयस मोतेत् या मंत्र्याने त्याचे स्वागत केले. समाजवादी नेता पॉल रिवेत हा देखील हजर होता. प्रथमपासून त्याने व्हिएतनामच्या संपूर्ण स्वातंत्र्याचा पुरस्कार केलेला असल्याने हो याने त्याला मिठीच मारली. कम्युनिस्ट नेतेही त्याच्या स्वागताला आलेले होते.

खुद्द पॅरिसला हो याची उतरण्याची सरकारी व्यवस्था उत्तम होती. सारखी मंडळी भेटायला येत असत. फेरत अब्बास, बेन-गुरियन या चळवळ्यांप्रमाणे संपादक, पत्रकार, विविध पक्षाचे पुढारी त्याच्याशी बोलायला येत. एखादे पत्र पोस्टाने येई, त्यात फ्रेंचांशी वाटाघाटी करून क्रांतीचा विश्वासघात केल्याचा आरोप असे. धमक्यांची पत्रेही येत. आरोप करणाऱ्यांनी खाली सही करून पत्ता दिलेला असला तर हो त्यांना बोलावून घेऊन आर्जवपूर्वक सांगे –

> "इथे पॅरिसमध्ये राहून तुम्हाला आपल्या देशाची सत्यस्थिती कळणार नाही. आपण अतिशय विस्कळित आहोत. आपली ताकद फार नाही. या परिस्थितीत फ्रान्सशी सोयरिक हीच आपल्या हिताची आहे."

त्यांनी मित्रांना एक खाना आयोजित केला. १३ जुलैला पत्रकार परिषद बोलावली. वृत्तपत्रकार त्याच्या वागण्या बोलण्याने खुश झाले. 'ल-मॉंडे' सारख्या पत्रांनी त्याची खूप स्तुती केली. मजेदार संभाषणाचे अनुभव वृत्तपत्रातून आले. एका पत्रकाराला त्याने सांगितले – "मी आत्तापर्यंत अज्ञातवासीच होतो. २० ऑगस्टला अज्ञातवासातून मी प्रथम बाहेर आलो –"

"कधी तुरूंगात गेला होता?" कुणीतरी विचारले.

“अनेक वेळा. जिथे जिथे गेलो तिथे तिथे तुरूंगातच पडलो.”

“किती काळ?”

“तुरूंगात काढलेला अगदी अल्पकाळसुद्धा खूपच वाटतो ना?”

हो याने दिलेली प्रश्नांची उत्तरे, त्याने विचारलेले गमतीदार उपप्रश्न, त्याचे साधेसुधे बोलणे, मर्यादशील वागणे या सर्वांमुळेच पत्रकार अगदी भारावून गेले.

मध्यंतरी सायगाव येथे एक खून पडला होता. ता-तू-थाऊ हा ट्रॉटस्की पंथाचा पुढारी. त्याला काही कम्युनिस्टांनी ठार केला होता. एका पत्रकाराने हो याला मुद्दामच यावर मतप्रदर्शन करायला लावले. हो म्हणाला –

“ता-तू हा फार थोर देशभक्त होता. त्याच्या निधनाचे आम्हालाही दुःख होत आहे.”

क्षणभर थांबून हो पुढे म्हणाला, “जी जी माणसे मी आखून दिलेल्या मार्गाने यायचे नाकारतील, ती मोडून पडतील.”

२ जुलैला अध्यक्ष हो व फ्रेंच पंतप्रधान विडॉल्ट याची पहिली भेट झाली. ही भेट फक्त औपचारिकच होती. बोलणे फारसे झाले नाही. दोघांनी आपले फोटो काढू दिले. वाटाघाटी सफल होतील असा विश्वास व्यक्त केला.

६ जुलैला फाऊंटनब्लो येथे व्हिएतनामी शिष्टमंडळ व फ्रेंच सरकार यांची अधिकृत बोलणी सुरू झाली. व्हिएतनामचा नेता फाम-व्हान-डाँग याच्या लक्षात आले की ही बोलणी यशस्वी होणे कठीण आहे. सायगावला जे स्वतंत्र प्रजासत्ताक ॲडमिरल अरजेनलियो याने जाहीर केले होते तोच वादाचा प्रमुख मुद्दा झाला.

हो पत्रकामागून पत्रके काढीत होता. इकडे वाटाघाटी चालू असताना सायगाव येथे हाय कमिशनर अरजेनलीय याने दुसरी घोषणा केली –

कांबोडिया, लाओस आणि कोचिन-चायना (सायगाव) या राज्यांचे इंडोचायनाच्या फेडरेशनशी काय संबंध असावे, याचा विचार करण्याकरिता लवकरच दलात येथे परिषद भरेल.

ही घोषणा होताच व्हिएतनामी शिष्टमंडळाने बोलणी पुढे चालू ठेवण्यास स्पष्ट नकार दिला. एका बाजूने फ्रेंच सरकार दक्षिण व्हिएतनामला उत्तर व्हिएतनामपासून कायमचा फोडण्याचा उद्योग करीत आहे असा आरोप करून बोलणी बंद करण्यात आली.

हो याने २५ ऑगस्टला पत्रक काढले, त्यात त्यांनी म्हटले –

मी शांतता निर्माण करण्यासाठी इथे आलो. रिकाम्या जातीला हनोईला परत जाण्याची मला इच्छा नाही.

## मिशनऱ्याची चिकाटी

व्हिएतनामचे शिष्टमंडळ पॅरिसहून मायदेशी निघून आले, परंतु हो याला तसेच परत जाणे इष्ट वाटत नव्हते. आत्तापर्यंत त्याने वाटाघाटीचा शांततामय मार्ग पुरस्कारला होता. त्याला स्वगृही टिकाकारांची वाण नव्हती. जहाल राष्ट्रवादी, कडवे कम्युनिस्ट या सर्वांनी हो याला गेल्या गेल्या धारेवर धरले असते. आपण काही पदरात पाडून न घेता परत जाणे म्हणजे आपण आत्तापर्यंत शांततेच्या दिशेने केलेली वाटचाल फुकट जाण्यासारखी आहे याची हो याला जाणीव होती. त्याने फ्रेंच मंत्रिमंडळातील त्याला स्वागताच्या वेळी भेटलेला मंत्री मारियस मोतेत याच्यामार्फत स्वतःच्या जबाबदारीवर पुनश्च चर्चासत्र सुरू केले. पुढले दहा-बारा दिवस ही बोलणी चालू राहिली. तेरा, चौदा सप्टेंबरला बोलण्याची अखेर जवळ आली असे सर्वांना वाटू लागले. मोतेत हा कंटाळून घरी निघून गेला. परंतु अपरात्री त्याच्या उशागतीचा फोन घणघणला.

'मी हो बोलतोय. मला वाटते समझोता दृष्टीक्षेपात आला आहे. थोडा तपशील अजून ठरतो आहे. कुठल्याही क्षणी मी तुमच्या घरी येतो आहे-'

मोतेत झोपेत होता. त्याने सांगितले –

'उद्या सकाळी बघू...'

आडवा होऊन तासभर झाला नाही तो पुन्हा हो याचा फोन!

'मी तुमच्याकडे यायला निघालो आहे.'

मोतेत तडफडत दिवाणखान्यात आला. अंगावर नाईटड्रेस तसाच ठेवून कोचावर पेंगत बसला. इतक्यात हो आणि फ्रेंच अधिकारी बंगल्यात पोचलेच.

कोचावर रेलल्यारेलल्याच मोतेत याने करारावर सही केली. अध्यक्ष हो याची सही झाली. हाच तो नंतर गाजावाजा झालेला १४ सप्टेंबरचा मार्गदर्शक करार!

करारात मुख्य कलमे दोन –

१) उत्तर व्हिएतनाम सरकार, फ्रेंचांच्या सर्वहितसंबंधांना संरक्षण देईल.

२) कोचीन-चायना म्हणजे दक्षिण व्हिएतनामच्या व्यवहारात सर्व लोकशाही स्वातंत्र्याचा योग्य तो मान ठेवला जाईल.

या करारात विशेष काहीच नव्हते. फक्त या कराराने ६ मार्चच्या कराराची भावना शाबूत राहिल्याचा काही काळ भास निर्माण झाला. हा फक्त भास आहे असे अर्थात हो याला त्यावेळी वाटले नव्हते.

१९ सप्टेंबरला अध्यक्ष हो याने टुलोन बंदरात मायदेशी जाण्यासाठी बोटीवर पाय ठेवला. कराराने फारसे काही मिळालेले नाही हे त्याचे त्यालाही समजत होतेच. त्यामुळे तो काहीसा खिन्नच होता. मात्र वरवर तो तसे भासवीत नव्हता.

सायगावच्या वाटेवर फ्रेंच हायकमिशनर ॲडमिरल अरजेनलीय याने भेटीची इच्छा प्रदर्शित केली. अन्नाम जवळच्या समुद्रात एका जहाजावर १८ ऑक्टोबरला दोघांची भेट झाली. तासाच्या बोलण्यानंतर दोघे पत्रकारांना भेटले. हो याने सांगितले –

'माझे आणि ॲडमिरलसाहेबांचे याबद्दल एकमत आहे की सायगाव व हनोई येथील वृत्तपत्रे, व्हिएतनामी काय आणि फ्रेंच वृत्तपत्रे काय, ही उगाचच अतिशय जहालपणे लिहितात. फ्रेंचांचे व आमचे नेहमीच जमेल असे नाही; परंतु यासाठी एकमेकांना शिव्यागाळी कशाला? संतप्त मनांना शांत करण्यासाठी माझ्या मित्रांनो तुम्हाला शक्य असेल तेवढे करा. दक्षिण व्हिएतनाममध्ये जे दहशतवादी प्रकार घडत आहेत त्याचा मी निषेधच करीन...'

हो बोलत असताना ॲडमिरल म्हणाला –

'समझोता व्हावा या दिशेने नुकतेच एक पाऊल आम्ही टाकलेले आहे.'

ॲडमिरलच्या तोंडून हे शब्द येताच हो सद्गदीत झाला आणि त्याने त्याच्या गळ्यात हात घातले. ॲडमिरल साहेबाला अशा अंगचटीची सवय नव्हती! इतकी सलगी त्याच्या कोशात नव्हती. त्याचा चेहरा काय झाला असेल याची कल्पना करावी. गांधीजींनी जिनांच्या गळ्यात हात टाकल्यावर जिनांचा चेहरा असाच होत असे.

भेट संपली. हो सायगावला निघाला, ॲडमिरल साहेबांच्या मोटारलाँचने मागे राहिलेल्या एका पत्रकाराने साहेबांच्या अंतरवर्तुळातील माणसाला विचारले –

'ॲडमिरलसाहेब कुणाशी बोलत होते अशी त्यांची समजूत होती?'

त्या माणसाने क्षणात सांगितले –

'कम्युनिस्टाशी...!'

## वाघाचे ठिपके लपत नाही

आपल्याकडे सर्वजण कम्युनिस्ट म्हणूनच पाहतात या कारणास्तव पॅरीसच्या मुक्कामात अध्यक्ष हो याने कोणत्याही कम्युनिस्ट नेत्याशी कटाक्षाने संपर्क टाळलेला होता. युरोपात त्यावेळी कम्युनिस्ट गटाशी अमेरिकनांचे थंडे युद्ध अटीतटीने सुरू झालेले होते. उत्तर व्हिएतनाम उद्या कम्युनिस्ट गटातच जाणार या भयास्तव वाटाघाटींना अपयश यायला नको म्हणून हो याने सर्व काळजी घेतली होती. कारण फ्रान्स अखेर अमेरिकेच्या गटातीलच एक राष्ट्र होते. परंतु अंगावरचे ठिपके जसे वाघाला लपवता येत नाहीत तसेच झाले होते. ॲडमिरल अरजेनलीय हो याचेकडे पाहात होता तो एक कम्युनिस्ट म्हणूनच.

हनोईला पोचताच हो याने २३ ऑक्टोबरला आपल्या फ्रान्सभेटीचा अहवाल जनतेला देणारे निवेदन प्रसिद्ध केले. या निवेदनातील प्रांजळपणा उठून दिसणारा आहे.

'देशबांधवहो... मी ज्या कामासाठी परदेशी गेलो होतो, त्यासंबंधी हे निवेदन आहे. फ्रेंच सरकारने संपूर्ण मानमरातबाने माझे स्वागत केले. फ्रेंच जनतेला आपल्याविषयी मनापासून प्रेम वाटत असल्याने वातावरण खेळीमेळीचे राहिले. तुम्हा सर्वांच्या वतीने मी त्यांना धन्यवाद देतो.

'मी पॅरिसला गेलो तो आपल्या स्वातंत्र्याचा प्रश्न आणि देशाच्या एकीकरणाचा प्रश्न धसास लावण्यासाठी. आज फ्रान्समध्ये जी परिस्थिती आहे त्या परिस्थितीत या प्रश्नावर तोडगा निघणे दुरापास्त झालेले आहे. आपल्याला वाट पाहावी लागणार आहे.

'अनेक फ्रेंच माणसे ही व्हिएतनामची मित्र आहेत. आपण याला प्रतिसाद दिला पाहिजे. फ्रेंच सैनिकांशी आपण मर्यादशीलपणाने व्यवहार करायचा आहे... जगाला हे कळू द्या की आपण सुसंस्कृत माणसे आहोत!'

'नाम-बो (दक्षिण व्हिएतनाम) क्षेत्रात व्हिएतनामी सैनिक आणि फ्रेंच सैनिक यांच्यात उडणाऱ्या चकमकी थांबल्या पाहिजेत. सूडाच्या भावनेच्या आहारी न जाता क्षमाशील राहण्याचीच ही वेळ आहे. प्रत्येक माणूस हा देशभक्त असतोच. परंतु काही वेळा अशा येतात की मनातील विकृत हेतू डोके वर काढतात आणि माणसे आपली सर्वोच्च कर्तव्ये विसरतात. परंतु चुकलेली कोकरे परत आल्याशिवाय राहणार नाहीत. त्यांना कठोरपणे वागवता कामा नये-'

## व्हिएतनामचे गांधी

सायगावहून हनोईला परतताना हो याचा समुद्रप्रवास हैपाँग बंदरात संपला. हैपाँग ते हनोई हा ६३ मैलांचा प्रवास त्याने रेल्वेनेच केला. स्वागतासाठी हैपाँग येथे आलेले त्याचे काही फ्रेंच मित्र त्याच्याबरोबरच रेल्वेने हनोईला आले. एकाने या प्रवासात जी दृश्ये पाहिली त्यासंबंधी लिहिले आहे –

'हैपाँग ते हनोई हे ६३ मैलांचे अंतर काटायला गाडीला बारा तास लागले. प्रत्येक अर्ध्या मैलावर गाडीला थांबायलाच लागे. कारण आसपासच्या शेतातून हजारोंनी शेतकरी गाडीपुढे धावत सुटत. गाडी थांबली की हो याच्या दर्शनासाठी डब्याभोवती माणसांची गर्दी उसळे!'

'वृद्ध हो शांतपणे उठून गाडीच्या दरवाजात येई. खिशातला लाल रूमाल काढून डोळ्यात गर्दी करणारे आनंदाश्रू टिपून घेत, दारात उभा राहून सर्वांना दर्शन देई... हो हा फार मोठा नट होता!'

हो याच्या हातातील अखंड असलेला लाल रूमाल आणि डोळ्यांतील अश्रू हे सर्व जनतेला हलवून सोडण्याचे हुकमी एक्के होते. परंतु हे नाटक आहे असे जरी मानले; तरी लोकप्रिय नेत्यांना ते करावेच लागते. भारतात होणारा महात्मा गांधींचा रेल्वेप्रवास काय निराळा असे? गांधीजींना पक्का बनिया म्हणणारी माणसेही होतीच.

हो याचे दोन्ही सहकारी फाम-व्हॉन-डाँग आणि जिॲप हे दोघे मात्र वाटाघाटी करून परतले होते ते कडवट निराश होऊन. डाँग पॅरीसहून आला होता तर दलात येथील परिषदेहून जिॲप परतलेला होता. हो याच्या गैरहजेरीत त्याने सर्वाधिकाराची चवही घेतलेली होती. संपूर्ण देशावरील सत्तेपासून फ्रेंच आपल्याला वंचित करीत आहेत त्याची बोच यामुळे अधिकच वाढलेली होती.

शिवाय काही महत्त्वाची पडझड झालेली होती. जनरल लेक्लेर्क हा जुलै महिन्यातच फ्रान्सला परत गेलेला होता. त्याची जागा जनरल व्ह्यूय याने घेतलेली होती. ही पाटी नवी होती. अजून कोरी होती.

जीन सेंटनी याने पॅरीसमध्येच असताना आपला राजीनामा सादर केलेला होता. तो परत हनोईला आलेलाच नव्हता. त्याचा राजीनामा अजून स्वीकारला मात्र गेलेला नव्हता. २३ ऑक्टोबरच्या आपल्या निवेदनात हो-चि-मिन्ह याने दक्षिण व्हिएतनाममध्ये चालू झालेल्या फ्रेंच सैनिक व व्हिएतमिन्ह सैनिक यांच्यातील चकमकीचा जो उल्लेख केला होता त्याचा संदर्भ सांगितल्याखेरीज सप्टेंबरपूर्वी परिस्थिती कशी स्फोटक झालेली होती याची कल्पना येणार नाही.

## हिंसक कलागतींची सुरुवात

ऑगस्ट महिन्यात दक्षिण व्हिएतनाम क्षेत्रात ‘बाक-मिन्ह’ या गावाजवळ काही व्हिएतमिन्ह सशस्त्र लोकांनी ‘लॅगसॉन’ ठाण्याकडे निघालेल्या फ्रेंच सैनिकांचा पगारच लुटून नेला! पगार नेणाऱ्या फ्रेंच सैनिकांशी यासाठी चांगलीच झटापट करावी लागली. परंतु अखेर फ्रेंच सैनिक थोडे होते आणि त्यांना फारसे काही करता आले नाही.

१४ सप्टेंबरला पॅरीस येथे झालेल्या मार्गदर्शक करारानंतर ऑक्टोबरच्या मध्यापर्यंत, दक्षिण व्हिएतनाममध्ये भूमिगत राहून फ्रेंचांना सतावणाऱ्या व्हिएत-मिन्ह सशस्त्र लोकांच्या उपद्रवी उद्योगांना आळा बसला. दक्षिणेतील या व्हिएतमिन्ह चळवळ्यांच्या नेता नग्यूएन बिन्ह हा होता. हा कडवा राष्ट्रवादी होता आणि कम्युनिस्टांचा तसा वैरी होता. अपेक्षा अशी की फ्रेंचांशी पुनश्च लढाईला तोंड लागलेच तर ते बहुधा बिन्ह यांचे नेतृत्वाखाली दक्षिण व्हिएतनाममध्येच लागेल. परंतु अगदी विपरीत लवकरच घडले!

हैपाँग बंदरात लवकरच फ्रेंचांनी एक नवे जकात नाके बसवले. यासंबंधी हनोई सरकारला फ्रेंचांनी नुसते विचारलेदेखील नाही. ११ नोव्हेंबरला अध्यक्ष हो याने फ्रेंच पंतप्रधान बिडॉल्ट यांचेकडे निषेध पाठवला व हे जकातनाके हनोई सरकारच्या संमतीशिवाय बसवल्याबद्दल नापसंती कळवली. ओढाताणीला ही सुरुवात होत होती.

हे नवे नाके फ्रेंचांनी बसवले कशासाठी? फ्रेंचांना असा संशय आला होता की हैपाँग बंदरामार्गे हनोई पाठीराख्यांना दारूगोळा व शस्त्रास्त्रे येत असतात. याला आळा बसावा हा तर हे नाके बसवण्याचा उद्देश होता – हा उद्देश फ्रेंच हनोई सरकारला कसा सांगतील?

२० नोव्हेंबरला एक चिनी जहाज लष्करी सामान घेऊन हैपाँग बंदरात शिरले. यावरील सर्व सामान हे चिनी व्यापाऱ्याकडे जायचे होते. फ्रेंचांना संशय आला व मिलीटरी पोलिसांनी झडती घेण्याची तयारी सुरू केली. तिथे हनोई सरकारचा संरक्षक गार्ड उभा होता. त्याने या झडतीला आडकाठी केली. फ्रेंच पोलीस ऐकेनात. हनोई सरकारच्या रक्षकाने तत्काळ सामान उतरवणाऱ्या फ्रेंच लाँचवर गोळ्या झाडायला सुरूवात केली. लाँचमधून फ्रेंचांनी प्रत्युत्तराला सुरूवात केली. दोन्ही बाजूंनी गोळ्या सुटल्या. रक्षक एकटा होता. त्याचा, गोळ्यांचा स्टॉक पाहता पाहता संपला आणि हे प्रकरण तिथल्या तिथेच विझले.

परंतु हैपाँगचा फ्रेंच कमांडर कर्नल डेबेस् याला या प्रकरणात फ्रेंचांच्या लष्कराची अब्रू गेली असे वाटले. त्याने गावात व्हिएतनामी जनतेने रस्त्यांत निषेधार्थ उभे केलेले अडथळे दूर करण्यासाठी बुलडोझर आणले! हैपाँगमधील सर्व व्हिएतमिन्ह सैनिकांना आणि चळवळ्यांना धडा शिकवण्याचा त्याचा इरादा होता. प्रकरण मग चिघळू लागले. त्यादिवशी दुपारी एका फ्रेंच अधिकाऱ्याचा खूनही पडला. हनोई सरकारचे सैन्य आणि फ्रेंच सैन्य यांच्यात चांगलीच लढाई होऊन मोठा रक्तपात घडणार असे दिसू लागले. हे लवकरच घडणार होते. मात्र अजून काही दिवसांचाच अवधी होता.

हनोईतील फ्रेंच अधिकाऱ्यांना मध्यंतरी शहाणपण सुचले. त्यानं हैपाँग येथील हनोई सरकारच्या पलटणी व फ्रेंच सैन्य यांनी आपापल्या विभागात त्वरित परत जावे या अटीवर समझोता केला. पण समझोता झाला ही गोष्ट सायगा येथे हंगामी गव्हर्नर जनरल म्हणून नव्याने अधिकारावर आलेल्या जनरल व्ह्यूय याला रूचली नाही. त्याने हैपाँग येथील फ्रेंच लष्करी प्रमुखांना तारेने आज्ञा दिली की हैपाँगमधून हनोईच्या पलटणी हुसकून लावा! ही तार २१ नोव्हेंबरला आली. कर्नल डेबेस् याला हनोईहून लादला गेलेला समझौता मनातून नकोच होता. जनरल व्ह्यूय याने हनोई येथील लष्करी प्रमुख जनरल मोर्लीएर यालाही तार दिली – “Exploit the incident to the full as a meanans of improving position in Haipong.” या तारेवरून हे स्पष्ट होते की

हैपाँगमध्ये जो प्रकार घडला त्याचा फायदा घेऊ, हैपाँगमधूनच हनोई सरकारच्या पलटणींना कायमचे हाकलून काढण्याचे राजकारण फ्रेंच गव्हर्नर जनरल आता खेळू पाहत होता. जनरल मोर्लीएर याने हनोई येथून गव्हर्नर जनरलला कळवले – 'हैपाँगमध्ये आपण से काही करू तर याचा अर्थ आपण ६ मार्चचा समझौता ठोकरीत आहोत असा होईल.' गव्हर्नर जनरल व्ह्यूय याने अधिक खुलासा तारेने केला.

'ज्यांनी आपल्यावर द्रोह करून हल्ला केला त्यांना धडा शिकवलाच गेला पाहिजे. सर्व सामर्थ्यानिशी हैपाँगचा संपूर्ण कब्जा करा आणि हनोई सरकारला आणि त्यांच्या सैन्याला पश्चात्ताप करू द्या –'

या तारेची एक प्रत हैपाँग येथे जनरल डेबेस् यालाही पाठवण्यात आली. हेतू हा की त्याने हनोईहून काही सूचना येण्याची आता वाट पाहू नये! हैपाँगमध्ये जनरल डेबेस् हा आता चांगलाच चेवला. 'चिनी क्वार्टर्स' म्हणून ओळखल्या जाणाऱ्या विभागात व्हिएतनामी सैनिकांची बरीच संख्या एकवटलेली होती. या विभागातून या सर्व सैन्याने ताबडतोब निघून जावे अशी मागणी जनरल डेबेस् याने २३ नोव्हेंबरला केली. त्याने पुढे असाही इशारा दिला की जर ही आज्ञा पाळली गेली नाही तर गोळ्या चालवल्या जातील. तीन तासाचा अवधी केवळ यासाठी देण्यात आला होता.

## हैपाँगमधील कंठस्नाने

पुढे काय घडवणार आहे याची कल्पना नसलेल्या व्हिएतनामी सैनिकांनी जनरल डेबेसच्या धमकावणीला भीक घातली नाही. जनरल डेबेस याने हैपाँगला जालीयनवाला बागेची एक आवृत्ती घडविण्याची सगळी जय्यत तयारी केलेली होती. एक यंत्रसज्ज फ्रेंच सैनिकी दळ चिनी क्वार्टर्सवर चढाई करण्यासाठी सज्ज होते. हैपाँग बंदरात 'सुफ्रेन' हे फ्रेंच लष्करी जहाज, बंदुका रोखून सज्ज होते. दिलेला अवधी संपताच जनरल डेबेस् याने हुकूम दिला – 'फायर...'

धुमश्चक्रीला तोंड फुटले खरे; परंतु फ्रेंचांच्या सापळ्यात व्हिएतनामी नागरिकांचा आणि सैनिकांचा हळूहळू खच पडू लागला. जहाजावरून सुटणाऱ्या गोळ्यांनी आणि अंगावर चालून येणाऱ्या फ्रेंच टँकदलांनी रक्ताचा सडा शिंपला. काही तासांच्या अवधीत सुमारे ६००० व्हिएतनामींना फ्रेंचांनी कंठस्नान घातले! मृतांचा हा आकडा पॉल म्यूस याच्यासारख्या अभ्यासकांनी चौकशीअंती नक्की केला आहे. तेव्हा त्यात शंका घेण्याचे काही कारण नाही. ६ मार्चचा समझौता फ्रेंचांनी व्हिएतनामी सैनिकांच्या आणि निरपराध नागरिकांच्या रक्ताने मढवून काढला.

हो-चि-मिन्ह याला हे हत्याकांड हा धक्काच होता. परंतु याचा उगम हा एका व्हिएतनामी रक्षकाच्या उतावळ्या वृत्तीमुळे झालेला आहे हे तो विसरला नाही. जे हैपाँगला फ्रेंचांनी केले त्याचीच पुनरावृत्ती पुन्हा हनोईत करण्याची संधी फ्रेंचांना देण्यात अर्थ नव्हता. हैपाँग येथे गडबड सुरू झाल्याचे वृत्त पॅरीसला जाताच, पॅरीस सरकारच्या वतीने जीन सेंटनी हा वाटाघाटासाठी हनोईला यायला निघाल्याचे वृत्त आलेले होते. हो जीन सेंटनीची वाट पाहत स्वस्थ राहिला.

जीन सेंटनी विमानाने २३ नोव्हेंबरलाच सायगावला आला. हंगामी गव्हर्नर जनरलला भेटल्याखेरीज हो-चि-मिन्ह पर्यंत तो पोचू शकत नव्हता. दरबारी रितीरिवाज टाळणार कसे? गव्हर्नर जनरल व्ह्यूय याने जीन सेंटनी याला सायगावलाच झुलवत ठेवला. त्याच्या हिशेबाने ६००० व्हिएतनामींना कंठस्नाने घातल्यानंतर हैपाँग येथे फ्रेंचांची प्रतिष्ठा पुनः प्रस्थापित झाली! २ डिसेंबरला त्याने जीन सेंटनी याची हनोईला जायची सरकारी व्यवस्था केली. तिथे गेल्या गेल्याच अमेरिकन व ब्रिटिश कान्सुलेटस्नी त्याला सांगितले की 'गोष्टी आता विकोपाला गेलेल्या आहेत. जीन सेंटनी हो याचा मित्र असूनदेखील ६००० व्हिएतनामींच्या हत्येनंतर तो आता समझौता करू शकणार नाही.'

परंतु तिथे गेल्यानंतर दुसऱ्याच दिवशी जीन सेंटनी याला हो याने लिहिले होते –

> 'आज सायंकाळी पाच ते सहाच्या दरम्यान मी आपल्याला भेटू शकलो तर मला आनंद होईल. माझी प्रकृती सध्या बरी नाही. अशा स्थितीत ही केवळ दोन मित्रांची भेटच राहील.'

## वॉर डझ नॉट पे

सायंकाळी जीन सेंटनी हो याला भेटायला आला. हो हा अंथरूणावरच होता. गेल्या गेल्या हो याने मित्राचा हात बराच वेळ हाती घेतला. सेंटनी याला हो याचा हात चांगलाच गरम लागला. हो याचे दोन सहकारी खोलीत होतेच. त्यांना हो याने बाहेर जाण्यासाठी सांगितले नाही. हो याच्या प्रकृतीसंबंधी बराच वेळ बोलणी झाली. अगदी उठता उठता हो याने हैपाँगचा विषय काढला. झाल्या घटनासंबंधी हो याच्या चेहऱ्यावर तीव्र विषाद स्पष्ट दिसत होता. जीन सेंटनी याने म्हटले –

'मी तुम्हाला पॅरीसमध्ये इतके दिवस राहू नका म्हणत होतो ते एवढ्यासाठीच. शेवटी व्हायचे तेच झाले –'

हो याने खेदपूर्वक म्हटले –

'खरं आहे – पण तुम्हीदेखील इथे यायला फार विलंब केला!'

बस् एवढाच काय तो हैपाँगसंबंधी या भेटीत विषय झाला.

फ्रेंच वृत्तपत्रांचे स्तंभलेखक, काही फ्रेंच पत्रकार अशी अनेक मंडळी हो याच्या समाचाराला सारखी येतच होती. या प्रत्येकाशी झाल्या प्रकाराबद्दल अति तीव्र प्रतिक्रिया, कडवट प्रतिक्रिया हो व्यक्त करीत होता. बर्नाड-ड्रॅन्बर या एका फ्रेंच संपादकाला त्याने स्पष्ट सांगितले –

> 'आम्हाला हे होऊ पाहणारे युद्ध काहीही करून टाळावे असेच वाटते. आम्हाला स्वातंत्र्याची आस आहे आणि हे स्वातंत्र्य फ्रेंच वर्चस्व अंतर्गत असले तरी आमची त्याला तयारी आहे – War does not pay युद्धाने प्रश्न सुटत नाहीत. नव्याने जाग्या होणाऱ्या व्हिएतनामी जनतेला या कत्तली आणि यातना नको आहेत.'

त्याच दिवशी बर्नार्ड-ड्रॅन्बरने जीन सेंटनीचीही भेट घेतली. जीन सेंटनीने हो याचेसाठी कळकळीचा निरोप सांगितला –

> '६ मार्चचा समझौता फ्रान्सला मान्य आहे. अध्यक्ष हो याचे माझे संबंध मैत्रीसंबंधापेक्षाही निकटचे आहेत. अध्यक्षांनी आपल्या सहकाऱ्यांना आवर घातला, परिस्थितीचे गांभीर्य गळी उतरवले तर विनाश टाळता येईल.'

आठवडाभरातच फ्रान्समध्ये लेआँ ब्लूम याला मंत्रिमंडळ बनवण्यासाठी पाचारण झाले. अध्यक्ष हो याला आशा वाटू लागली की नव्या गटाचे नेतृत्व करणारा समाजवादी पंतप्रधान ब्लूम हा इंडोचायनाच्या प्रश्नाची तातडीने उकल केल्याशिवाय राहणार नाही. १२ डिसेंबरला ब्लूम हा पंतप्रधान झाला आणि १५ डिसेंबरला अध्यक्ष हो याने ब्लूम याला पत्र लिहिले. हो याने लिहिले–

> 'झाले गेले विसरून जा. आपण आपापले सैनिक २० नोव्हेंबरला ते ज्या ठिकाणी होते त्या ठिकाणी येतील असे काही करू –'

पण हे पत्र २६ डिसेंबरपर्यंत ब्लूम यांचेपुढे ठेवलेच गेले नाही!

सत्तेवर आल्या आल्या ब्लूम याने मोतेत या आपल्या एका मंत्र्याला वाटाघाटीसाठी इंडोचायनात पाठवण्याचा निर्णय लगेच घेतलेला होता व मोतेत याने पॅरीस सोडलेही होते.

## हैपाँगचा सूड

१५ ते २० डिसेंबरच्या दरम्यान इंडोचायनात अनेक फ्रेंच नागरिकांचे खून पाडण्यात आले. १७ तारखेला हनोई येथे एका दाट कामगारवस्तीच्या विभागात एका फ्रेंच पॅराट्रूपरने कामगारांवर गोळीबार केला. हा कदाचित स्वसंरक्षणार्थ झाला असेल. परंतु

यात दहाहून अधिक व्हिएतनामी कामगार ठार झाले. हनोई येथे व्हिएतनामी सैनिकांनी खंदक खोदायला सुरुवात केली. लष्करी अडथळे उभारले जाऊ लागले.

१८ डिसेंबरला हनोईत हैपाँगला जे घडले ते सर्व पुनः एकदा घडण्याची चिन्हे स्पष्ट दिसू लागली. फ्रेंच सैनिकांनी प्रतिकाराला सुरुवात केली. यावेळी एक गोष्ट स्पष्ट होती की व्हिएतनामी सैनिकांना हैपाँगचा सूड हवा होता. हनोईत फ्रेंचांना धडा शिकवण्याला बहुधा जिॲप याची चिथावणी होती!

हो वाट पाहत होता, पंतप्रधान ब्लूम याचे काही उत्तर देईल. त्याला याची कल्पना नव्हती की, त्याचे पत्र फ्रेंच पंतप्रधानांपर्यंत अद्याप पोचलेलेच नाही. काही तासात हनोई पेटणार, याबद्दल सर्वांची खात्री झाली होती.

जीन सेंटनी याने आपल्या आठवणीत १८ डिसेंबरला रात्री काय घडले ते लिहून ठेवले आहे. तो लिहितो –

> ‘रात्रीचे आठ झाले होते. शहरावर विलक्षण शांतता पसरलेली होती. हॉस्पिटल फ्रेंच कमिशनरच्या कचेरीला लागूनच होते. हॉस्पिटलवरील भव्य घड्याळातून आठाचे टोले पडलेले मी ऐकले. मी बरोबरीच्या मंडळींना म्हटले, “आज रात्री काही गडबड होईलसे मला वाटत नाही. मी जरा घरी जाऊन येतो.” मी लगेच मोटार बोलावली आणि आत चढलो. त्याच क्षणी गर्जना वाटावी असा मोठा आवाज झाला आणि सगळे शहर काळोखात बुडाले. वीजनिर्मितीचे हनोईतील केंद्र उडवण्यात आले होते. यावेळी ठीक पावणेनऊ झालेले होते. चारी दिशांनी बंदुकीच्या फैरीचे पहिलेवहिले आवाज येऊ लागले. या आवाजांनी आमच्या सर्व शांततेच्या आशा रसातळाला गेल्या.”

## सेंटनी रक्तबंबाळ

लगेच सेंटनी आपल्या खासगी मोटारीतून धडपडत बाहेर आला आणि त्याने एका लष्करी गाडीचा आश्रय घेतला. शहरातील फ्रेंच लष्करी ठाण्याकडे जनरल मोलीएर याला गाठण्यासाठी तो लगेच निघाला. लष्करी गाडी ‘पॉल बर्ट’ मार्गापर्यंत सुखरूप आली, परंतु तिथे रस्त्यावर ठेवलेल्या एका बॉम्बने तिचा बळी घेतला. गाडी धडाडून पेटू लागली. अंगात वीस-पंचवीस काचांचे तुकडे व धातूचे तुकडे घुसलेला जीन सेंटनी रक्तबंबाळ स्थितीत त्या पेटत्या गाडीतून बाहेर पडला. फ्रेंच सैनिकांनी त्याला एका रूग्णालयात तातडीने दाखल केला. सेंटनी रूग्णालयात दाखल होऊन ऑपरेशन थिएटरकडे नेईपर्यंत जो काही वेळ गेला तेवढाच. हॉस्पिटलला व्हिएतनामी सैनिकांनी गराडा घातला आणि त्या रूग्णालयाच्या आवारात गोळ्या सुटू लागल्या.

## साहस अंगाशी आले

१८ तारखेची रात्र आणि १९ तारखेचा दिवस हनोईत जिॲपच्या सैनिकांचा जोर होता. शहराचा कब्जा करून त्यांना फ्रेंचांना तिथून हुसकल्याचा काही काही काळ भास झाला खरा. परंतु १९ तारखेला रात्रीपासून फ्रेंच सैनिकांनी शहरात रणगाडे आणून व्हिएतनामी सैनिकांना टिपायला सुरुवात केली. त्या रात्री फ्रेंचांचा जोर वाढत गेला. जिॲपचे साहस त्याच्या अंगाशी आले. हनोईतून फ्रेंच पळाले नाहीत. हो याला घेऊन जिॲपलाच पळून जावे लागले!

२० डिसेंबरला दुपारी अध्यक्ष हो यांच्यासह जिॲप हनोईतून निसटला. हनोईच्या उत्तरेकडील शेतपिकात दोघे अदृश्य झाले! शहर सोडण्यापूर्वी अध्यक्ष हो याने पत्रक काढले –

‘देशबांधवांनो!’

‘शांततेच्या प्रेमाखातर आम्ही खूप नरमाईने वागलो, परंतु आमची नरमाई ही फ्रेंच वसाहतवाद्यांची अधिकाधिक माजोरी ठरत चालली.

‘आता हे बस्स् झाले! पुनश्च गुलामीत पडण्यापेक्षा आपण सर्वस्व पणाला लावून प्रतिकार करू या.

‘ज्याच्याजवळ बंदूक असेल त्याने बंदूक चालवावी. ज्याच्याजवळ तलवार असेल त्याने तलवार चालवावी आणि ज्यांच्याजवळ तलवारही नसेल त्यांनी फावडी-कुदळी, लाठ्या, काठ्याने जे हाती लागेल त्यानिशी प्रतिकारात सामील व्हावे.

‘या झगड्यात अखेर आपलाच विजय होणार आहे याबद्दल सर्वांनी खात्री बाळगावी.’

## हा सौदा परवडणार नाही!

१९४६ साल संपले तेव्हा हो-चि-मिन्ह याच्या शांततापूर्ण स्वातंत्र्य प्रयत्नांचा असा खग्रास झाला. एका अमेरिकन पत्रपंडिताजवळ इंडोचायनात सुरू झालेल्या या युद्धाचे वर्णन करताना हो याने म्हटले की, ‘वाघाची आणि हत्तीची झुंज आहे.’ हे वर्णन अगदी बरोबर होते.

‘व्हिएतनामी वाघ एका जागी स्थिर राहील तर फ्रेंच साम्राज्यशाही त्याला केव्हाच चिरडून टाकील. पण वाघ एका जागी स्थिर राहणारा नसतोच. तो दिवसभर जंगलात दबा धरून राहणार आणि रात्र पडली की हत्तीच्या गंडस्थळाच्या दिशेने झेपावणार. उडी चुकली तर जबड्यात-पंजात हत्तीचे मावेल तेवढे मांस ओरबाडून तो परत जंगलाची वाट धरणार. दुसऱ्या संधीची वाट पाहत दबा धरून बसणार. हळूहळू हत्तीचा अंतकाळ जवळ येत राहील यात शंकाच नाही.’

अध्यक्ष हो याने आपल्या एका फ्रेंच मित्राजवळ – जो पूर्वी एकदा सरकारात मंत्री होता – उद्गार काढले

‘एका फ्रेंच सैनिकांमागे तुम्ही आमची दहा माणसे मारलीत तरी हा सौदा तुम्हाला परवडणारा नाही! अगदी या हिशोबानेही शेवटी आमचाच जय होणार आहे हे विसरू नका...!’

n

# १० : का गुलामांचे तुम्हा सुलतान होणे आवडे?

एका फ्रेंच सैनिकामागे दहा व्हिएतनामी सैनिकांची किंमत देण्यास जरी अध्यक्ष हो हा तयार झालेला असला तरी १९४६ च्या डिसेंबरअखेर सुरू झालेल्या इंडोचायनातील युद्धाचे स्वरूपच असे राहणार होते की मरणाऱ्या सैनिकांचा हिशोब नेमका उलटा राहणार होता. पुढे आठ वर्षे चालू राहिलेल्या या युद्धात अखेर फ्रेंचाचीच जबर हानी होणार होती.

## उदासीन संधीसाधू

या काळात अमेरिका ही या युद्धापासून दूर राहणार होती. आशियातील साम्राज्य सावरण्याच्या फ्रेंचांच्या या आतबट्ट्याच्या उद्योगाचा कडाडून विरोध करणारे अनेक अमेरिकन उदारमतवादी सामान्यजन त्यावेळीही अमेरिकेत होते. परंतु आश्चर्याची गोष्ट म्हणजे वॉशिंग्टनचे राजकारणी मात्र इंडोचायनातील लढाईविषयी संपूर्णपणे उदासीन होते. इंग्लंडमध्ये ॲटलीचे मजूर सरकार हे स्वतः भारतादी देशांना दास्यमुक्त करण्याच्या प्रयत्नात असले तरी फ्रेंचांनी इंडोचायनात सुरू केलेल्या संघर्षाविषयी त्यांनी खेदाचा उद्गारही काढला नाही! उलट फ्रेंचांना ब्रिटिश सरकारने वीस हजार पौंडांची शस्त्रे पुरविली! याचा अन्वय लावला तर एवढेच सांगता येईल की व्हिएतनाम देश जर कम्युनिस्ट राजवटीखाली गेला तर सिंगापूर व मयाला येथील ब्रिटिश वर्चस्व धोक्यात येईल, अशी भीती बहुधा ब्रिटिशांना वाटत असावी आणि म्हणून त्यांनी फ्रेंचांना सर्वतोपरी सहाय्यच केले.

हो-चि-मिन्ह याला रशियाचाही पाठिंबा या काळात नव्हता. मॉस्को नेत्यांची अशी अपेक्षा होती की फ्रेंच कम्युनिस्ट पक्ष हा लवकरच फ्रेंच सत्तेत एक हक्काचा वाटेकरी होईल आणि एकदा हे घडले की व्हिएतनामच्या स्वातंत्र्याचा प्रश्न लगेच धसाला लागून तो सुटेल. रशियाच्या धोरणांविषयी एक व्हिएतनामी नेता म्हणाला, 'रशियन हे रशियापुरते पक्के राष्ट्रवादी आहेत. आम्ही त्यांच्या उपयोगी पडू अशी काही शक्यता असती तरच त्यांनी आम्हाला मदत केली असती. दुर्दैवाने आजच्या घडीला आमचा त्यांना काहीच उपयोग नाही!'

फ्रेंच पंतप्रधान ब्लूम यांनी जनरल लेक्लेर्क आणि आपला एक मंत्री मोतेत यांना युद्धाला तोंड लागताच इंडोचायनात पाठवले. मोतेत हा कंबोडियाची राजधानी नॉमफेन येथे पोचताच त्याने सांगितले, 'जर अजून कुणाला समझोत्याची योजना मांडायची असेल तर आम्ही त्याचा विचार करू.' मोतेत हा नॉमफेन येथेच थांबला व जनरल लेक्लेर्क हा हनोई येथे एकटाच आला. अध्यक्ष हो यांच्यामार्फत रीतसर भेटीची मागणी त्याचेपुढे

आली. परंतु मोतेत याच्या संमतीशिवाय जनरल लेक्लेर्क हा काहीच निर्णय घेऊ शकत नव्हता.

मोतेत हा नॉमफेनहून हनोई येथे न येता प्रथम सायगावला गेला. तेथील फ्रेंच हायकमिशनर जनरल अर्जेनलीय याने मोतेत याला २ जानेवारी ४७ पर्यंत सायगावलाच ठेवून घेतले. मध्यंतरीच्या काळात हनोई शहरात जोरात चकमकी झडू लागल्या होत्या. मोतेत हनोई येथे पोचला तेव्हा तेथील चकमकीची उग्रता पाहून त्याची समझोत्याची इच्छा संपली. अध्यक्ष हो याचेकडून वाटाघाटीसाठी झालेल्या सूचनेवर त्याने विचारही करण्याचे नाकारले. जेमतेम एक दिवस राहून तो पुनः दक्षिणेकडे निघून गेला. सायगावपर्यंतच्या या परतीच्या प्रवासात मोतेत याला ठिकठिकाणच्या फ्रेंच एरिया कमांडरनी सुरू झालेल्या लढाईची एकतर्फी वर्णने ऐकवली! परिणामी सायगाव येथे मोतेत याने आपल्या इंडोचायना भेटीची फलश्रुती सांगितली.

'हो-चि-मिन्ह यांचेबरोबर यापुढे बोलणी करणे फ्रेंच सरकारला शक्य नाही-'

## बनावट सही

मोतेत-लेकलेर्क शिष्टाई अशा तऱ्हेने वांझोटी ठरल्यानंतर पाठोपाठ आणखी एक घटना घडली. ब्लूम मंत्रिमंडळ पॅरीसमध्ये गडगडले! रॅमॅदिअे हे पंतप्रधान झाले. पंतप्रधान रॅमॅदिअे यांनी पत्रकारांना सांगितले की हो याचे जे पत्र भूतपूर्व पंतप्रधान ब्लूम यांना आलेले आहे त्यावर हो याची सही ही, त्यांनी केलेली नसून, दुसऱ्याच कुणीतरी केलेली आहे. त्यामुळे आम्ही त्या पत्राची दखल घेतलेली नाही. १९ डिसेंबरनंतर हो यांनी फ्रेंचांशी कसलाही संपर्क ठेवलेला नाही..'

फ्रेंच पंतप्रधान खोटे बोलत आहेत हे सर्वांना कळावे, म्हणून हो याने २७ मार्च १९४७ रोजी एका पत्रकाराला मुलाखत दिली. या मुलाखतीचा वृत्तांत, पत्रकाराचे नाव अज्ञात ठेवून फ्रेंच वृत्तपत्रांनी प्रसिद्ध केला. या मुलाखतीत हो याने स्पष्टपणे सांगितले.

'१९ डिसेंबरपासून आतापर्यंत मी २१ व २३ डिसेंबर, १, ७ व १० जानेवारी १९४७, १८ फेब्रुवारी आणि ५ मार्च १९४७ या तारखांना एकूण किमान सात वेळा फ्रेंच सरकारला वाटाघाटीसाठी आवाहन केलेले आहे. इतर देशांच्या परराष्ट्र खात्यांमार्फत पाठवलेली माझी पत्रे फ्रेंच पंतप्रधानांपर्यंत पोचलेली असूनही, फ्रेंच पंतप्रधान सांगतात की त्यांना पत्रे पोचलेलीच नाहीत! मोतेत म्हणतात की मी जिवंत आहे की नाही हे देखील कुणी खात्रीशीर सांगू शकत नाही. जर फ्रेंचांना पद्धतशीरपणे माझी शांततेची सर्व खटपट दाबून टाकण्याची इच्छा असेल तर यातून निर्माण होणाऱ्या घटनांची सर्व जबाबदारी फ्रेंचांवर राहील. सुदैवाने मी जिवंत आहे आणि लवकरच त्यांना प्रत्यक्ष भेटण्याची आशाही बाळगून आहे!'

जानेवारी ४७ संपत आला तेव्हाच हो-चि-मिन्ह याच्या लक्षात आले की फ्रेंचांना युद्धच हवे आहे आणि शांततामय वाटाघाटी पुनश्च सुरू करण्याच्या आपल्या सर्व प्रयत्नांना पाने पुसली जात आहेत. परंतु सर्वच फ्रेंच जनता ही आपली शत्रू आहे अशी त्याची भूमिका कधीच नव्हती. व्हिएतनामच्या स्वातंत्र्याचा पाठपुरावा करणारे काही सच्चे फ्रेंच मित्र आहेत, असू शकतात आणि त्यांच्या सदिच्छा या आपल्या लढ्याला आवश्यक आहेत ही त्याची पक्की धारणा होती. जीन सेंटनी हा अशाच अनेकांपैकी हो याच्या फार जवळचा. २४ जानेवारी १९४७ ला हो याने सेंटनीला पत्र लिहिले. पत्रात त्याने लिहिले,

'प्रिय मित्रा –

'मला नुकतेच कळले की, तुम्ही फ्रान्सला परतण्याच्या विचारात आहात. तुम्हाला व मादाम सेंटनी यांना माझ्या शुभेच्छा पाठवीत आहे.

'माझी खात्री आहे की, आपले उभयतांचे शांततेचे प्रयत्न सुरू झालेल्या लढाईमुळे धुळीस मिळाले, याचे माझ्याप्रमाणे तुम्हालाही दुःख झालेले आहे. दडपशाहीच्या आणि चढाईच्या फ्रान्सच्या नव्या धोरणाबद्दल तुमचा मुळीच दोष नाही, याची मला खातरजमा आहे.'

'म्हणूनच मी तुम्हांला हे कळवण्यासाठी उत्सुक होतो, की बरेच विपरीत काही घडले असले तरी तुम्ही आणि मी हे मित्रच आहोत! इतकेच नाही तर मी असेही आश्वासन देतो की तुमची व आमची जनता यांच्यातील स्नेहही अबाधितच राहणार आहे. आतापर्यंत पुरेशी वित्तहानी आणि जीवितहानी झालेलीच आहे! तुम्ही आणि मी यावेळी काय करावे? व्हिएतनामचे स्वातंत्र्य आणि अखंडता एकदा का फ्रान्सने मान्य केली की तत्क्षणी सर्व संघर्ष संपले. शांतता आणि परस्पर विश्वास निर्माण होईल आणि आपल्या दोघांच्या देशाच्या भल्यासाठी आपण परस्पर हिताचा व्यवहार तात्काळ सुरू करू शकू.'

'माझा भाग उचलायला मी तयार आहे. मला आशा आहे की तुमच्या बाजूने तुम्हीदेखील या दिशेने प्रयत्नशील राहाल. आपण आशा करू या की परमेश्वर आपल्याला यश देईल!'

आपला भावपूर्ण

हो-चि-मिन्ह.

## गांधी-माओ यांचा सुवर्णमध्य

हे पत्र आणि त्याची एकूण रचना आपल्याला महात्माजींनी ब्रिटिश व्हॉईसरॉयला पाठवलेल्या अनेक पत्रांची आठवण करून देणारी आहे.

गांधीजींचे राजकारणातील साधुत्व आणि साधुत्वातील राजकारण ही दोन्ही अंगे इथे आढळतात. यात बनियाचा व्यवहार आहे आणि अंतःकरणाची ऊबही आहे. फ्रेंच सरकारची दुष्कृत्ये इथे एका व्यक्तीपासून दूर करण्याची चतुराई आहे. पत्राच्या शेवटी तर मार्क्सवादाचा हा वारकरी चक्क परमेश्वरापायी यशही मागतो आहे.

परंतु हे पत्र म्हणजे पालथ्या घड्यावरची धारच ठरले. मात्र हो याच्या नेतृत्वाची जातकुळी सांगणारे हे पत्र आहे. लाँग-मार्चचे नेतृत्व करणारा माओ-त्से-तुंग आणि चरख्याच्या शस्त्राने वर्षभरात स्वराज्य हिसकवू पाहणारे महात्माजी यांचा जर काही सुवर्णमध्य काढला तर तो हो याच्या नेतृत्वाशी मिळता-जुळता ठरेल. म्हणून हे राजकीयदृष्ट्या अपयशी ठरलेले पत्र मुद्दामच संपूर्ण दिले आहे.

## अपथ्यकारक घटना

फ्रेंच सैन्याने लवकरच हनोईमधून उरलासुरला व्हिएतमिन्ह प्रतिकार संपुष्टात आणला आणि व्हिएतनामचे राष्ट्रीय सरकार पुनश्च वनवासी झाले. ॲडमिरल अरजेनलीय यांचा राजीनामा आता स्वीकारला गेला आणि त्यांचे जागी सायगावचा नवीन हायकमिशनर म्हणून बोलार्त यांची नेमणूक जाहीर केली. फ्रेंचांच्या इंडोचायनाबाबतच्या धोरणाचे वळण बदलून टाकणाऱ्या आणखी दोन घटना पॅरीस येथे पाठोपाठ घडल्या. एक म्हणजे फ्रेंच पंतप्रधान रॅमॅदिए यांचे मंत्रिमंडळातील कम्युनिस्ट मंत्र्यांशी बिनसले आणि पंतप्रधानांनी मंत्रिमंडळातील सर्व कम्युनिस्ट मंत्र्यांची हकालपट्टी केली! आश्चर्य म्हणजे या हकालपट्टीविरुद्ध जनतेत कसलाही क्षोभ वगैरे झाला नाही. हो याची एक पक्की धारणा अशी होती की व्हिएतनामच्या समस्येची किल्ली ही फ्रान्समधील राजकीय परिस्थितीतून जन्माला येईल. तेथील परिस्थितीने जर डावी कलाटणी घेतली तर व्हिएतनामचे स्वातंत्र्य त्वरित दाराशी येईल. यामुळे फ्रेंच मंत्रिमंडळातून कम्युनिस्ट मंत्र्यांची झालेली हकालपट्टी ही व्हिएतनामला मुळीच पथ्यकारक नव्हती.

याचबरोबर दुसरी एक घटना घडली, तीही व्हिएतनामला मुळीच उपकारक नव्हती. सायगावला आलेला एक नवा फ्रेंच कमिशनर बोलार्त व त्याचे सल्लागार हे आधी हो याच्याबरोबर वाटाघाटी करण्यास फारसे उत्सुक नव्हतेच. परंतु सायगावला गेल्या गेल्या फ्रान्सचा अध्यक्ष जनरल द गॉल याने बोलार्त याला स्पष्ट कळवले –

‘जो कोणी फ्रेंचांच्या वसाहती फ्रेंच वर्चस्वाखालून गमावण्याचे पाप करील, त्याला फ्रान्सच्या सर्वश्रेष्ठ न्यायालयापुढे जाब द्यावा लागेल.’

आता बोलार्त आणि द गॉल यांचे संबंध पूर्वीपासूनच चाकर-मालकाचे होते. जर्मनव्याप्त फ्रान्समध्ये बोलार्त हा द गॉलच्या चळवळीचा प्रमुख होता. यामुळे बोलार्त याला द गॉलचा शब्द हा परमेश्वराचाच शब्द वाटत होता.

## भ्याडांना जागा नसावी

तरीसुद्धा बोलार्त याने पॉल-म्यूस याला हो याचा प्रतिनिधी होआंग-मिन्ह-गियाम याची भेट घेण्यास अनुमती दिली. बोलार्त याने सांगितले की हो याने खालील अटी मान्य केल्या तरच लढाई थांबेल –

१) व्हिएतमिन्ह सैन्याने सर्व शस्त्रे फ्रेंचांच्या हवाली करावीत.

२) फ्रेंच सैनिकांना सबंध व्हिएतनामी भूमीवर मुक्तपणे वावरता यावे.

३) जे जे बिगर व्हिएतनामी लोक त्यांच्या ताब्यात आहेत, त्या सर्वांना फ्रेंचांच्या स्वाधीन करण्यात यावे.

या अटी म्हणजे संपूर्ण शरणागतीच्याच अटी होत्या. जणू व्हिएतमिन्ह सैन्याचा फ्रेंचांनी रणांगणावर सपशेल पराभवच केला होता अशा थाटात बोलार्त वागत होता.

हनोईपासून ऐंशी मैलांवरील थाय-नग्यूएन प्रांताच्या एका खेड्यास म्यूस यांच्याशी हो याने बोलणी केली. याच खेड्यात १९४५ साली हो याचा निवास होता. हनोईहून हुसकल्यानंतर हेच खेडे पुनश्च व्हिएतमिन्हची राजधानी झाले होते. म्यूस याने बोलार्त याने घातलेल्या अपमानास्पद अटी जशाच्या तशा हो याला सांगितल्या. या अटी ऐकताच हो याने म्यूस याला जबाब दिला –

‘फ्रेंच युनियनमध्येही भ्याडांना जागा असू नये. जर तुमच्या अटी मी मानल्या तर मी भ्याड ठरणार आहे!’

वाटाघाटी लगेचच संपल्या. बोलण्यासारखा काही धागा म्यूस याच्या हाती नव्हताच. म्यूसला फ्रेंच हद्दीत पोचवण्यासाठी एक कोवळा तरुण व्हिएतमिन्ह लष्करी अधिकारी आला होता. निरोप घेताना त्याने म्यूस याला विचारले – ‘अखेर युद्ध होणारच का?’

म्यूस याने होकारार्थी मान हालवली. तो तरुण पोरगा म्हणाला – ‘म्हणजे अभ्यासक्रम पुरा करण्यासाठी आता मला पॅरीसला जाता येणार नाही!’

म्यूस परतला तो एक खूणगाठ मनाशी बांधून की हो याचा तरुण मनावरील प्रभाव यत्किंचितही कमी झालेला नाही. आतापर्यंत फ्रेंचांशी जुळते घेण्याचा प्रयत्न करणारा हो, ही त्याची धारणे फसल्यामुळे कदाचित अनुयायात अप्रिय झाला असेल अशी सर्वसाधारणपणे फ्रेंच वर्तुळात अपेक्षा होती. म्यूस याला या भेटीत उलट अनुभव आला.

हो हाच अजून सर्वाधिकारी होता. त्याचा शब्द हाच व्हिएतमिन्ह सरकारचा शब्द होता. त्याने युद्धाचा निर्णय घेतलेला होता आणि युद्ध आता अटळपणे सुरूच राहणार होते.

## अमेरिकेची पापणी हलली

याच सुमारास अमेरिकेने इंडोचायनात लक्ष घालण्यास सुरुवात केली होती. अमेरिकेचा फ्रान्समधील वकील विल्यम बुलीट याने फ्रेंचांच्या मागे असा लकडा लावला की हो-चि-मिन्ह याला काटशह देण्याकरता एखाद्या राष्ट्रवादी नेत्याच्या नेतृत्वाखाली, एक राष्ट्रीय सरकार जर हनोईला निर्माण केले तर वनवासी झालेल्या हो याच्या जनता पाठिंब्यात झपाट्याने घट सुरू होईल. हा नेता कोण असावा हे देखील विल्यम बुलीट याने शोधून ठेवले होते. बाओ-दाई! व्हिएतनामचा परागंदा राजा यासाठी राबविता येईल अशी या अमेरिकन वकिलाची पक्की धारणा होती. रॅमॅदिएचे सरकार या प्रयोगाला अनुकूल आहे हे लक्षात येताच विल्यम बुलीट हा १९४७ च्या ऑक्टोबरात इंडोचायनात आला. यावेळी बाओ-दाई हा हाँगकाँगला ऐषारामात आणि ख्यालीखुषालीत दिवस कंठीत होता. हाँगकाँगला जाऊन बुलीट याने बाओ-दाईची गाठ घेतली व हाँगकाँग-सायगाव हे तारायंत्र सुरू करून दिले. पुढील महिन्यात बुलीट हा अमेरिकेत सरकारी कामासाठी आलेला असताना त्याने ‘लाईफ’ या प्रख्यात नियतकालिकात बाओ-दाईचे प्रत्यक्ष नाव न घेताही राष्ट्रीय सरकार बनवण्यासाठी तोच कसा लायक पुरुष आहे याची भलावण करणारा एक विस्तृत लेख लिहिला.

फ्रेंच सरकारची अशी साहजिकच समजूत झाली की विल्यम बुलीट मार्फत अमेरिकन सरकारचे मनच बोलत आहे. यामुळे विल्यम बुलीट मार्फत फ्रेंच सरकारने बाओ-दाईबरोबर १९४७ च्या डिसेंबरात वाटाघाटी सुरू केल्या. यासाठी बाओ-दाई हा हाँगकाँगहून जिनिवा येथे दाखल झाला होता.

## बाओ-दाईचे जमेना

फ्रेंचांना असे आढळून आले की बाओ-दाई जे मागतो आहे त्यात आणि हो याच्या मागणीत तसा काहीच फरक नाही! अमेरिकेला काहीही करून बाओदाईचे सरकार निर्माण होणे हे अगत्याचे वाटत होते. यामुळे बाओ-दाईवर दडपण आणून अमेरिकेने त्याला फ्रेंच युनियन अंतर्गत राष्ट्रीय सरकारचे नेतृत्व स्वीकारण्याचा आग्रह सुरू केला. परंतु बाओ-दाई ऐकेना. त्याला हे स्पष्ट दिसत होते की हो मागतो आहे त्यापेक्षा काहीही कमी पदरात घेऊन आपण सत्ता स्वीकारली, तर ती टिकणार नाही. जनता हो याच्याच मागे जाईल.

अखेर फ्रेंचांनी बाओदाईचा नाद सोडला. १९४८ च्या मे महिन्यात सम्राट बाओ-दाईची स्वारी पुनश्च हाँगकाँग येथे परतली व विलासात रममाण झाली. जनरल झुएन

नावाच्या एका व्हिएतनामी सेनाधिकाऱ्याला प्रमुख करून फ्रेंचांनी जून १९४८ मध्ये राष्ट्रीय सरकारचे एक बाहुले हनोई येथे उभे केले! परंतु या सरकारात काहीच दम नव्हता.

## माओचा दणका

१९४८ साल संपत आले तोपर्यंत सहा महिन्यांत हो-चि-मिन्ह याच्या गनिमी छाप्यांनी फ्रेंच सैन्य पुरेसे त्रस्त झालेले होते. आणि अशा परिस्थितीत चीनमध्ये माओच्या सैन्याच्या विजयी नौबती झडू लागलेल्या त्यांनी ऐकल्या!

१९४८ साल उजाडले तेव्हाच चीनमधील यादवीत पारडे माओकडे झुकलेले होते. ८ नोव्हेंबर १९४८ या दिवशी माओच्या लाल सेनेने मुकडेन जिंकले. माओने जाहीर केले – 'अपेक्षेपेक्षा फारच कमी वेळात आपण युद्ध जिंकणार आहोत. फार तर वर्ष लागेल!' १९४८ अखेर जवळजवळ सर्व मांचुरिया व उत्तर चीन कम्युनिस्टांच्या कब्जात आला. हुओई-होई या ठिकाणी चँग-कै-शैकच्या सैन्याचे पानिपत झाले. ३,२०,००० सैनिक या लढाईत चँगने गमावले. यानंतर कोमिंग्टांग सरकार पुनः कधीच उठून उभे राहू शकले नाही. सर्वत्र पळापळच सुरू झाली. ३ फेब्रुवारी १९४९ ला पेकिंगमध्ये लाल सैन्य घुसले. जर लाल सैन्य याच जोशात दक्षिण चीनवर घसरले, तर काही दिवसांतच चीनमधील लढाई संपणार होती.

याचा अर्थ स्पष्ट होता. व्हिएतमिन्ह सैन्याला उत्तर सरहद्दीला लागून एक जबरदस्त मित्र आता लाभणार होता. वाटेल ते करून हो याला शह देऊ शकेल असा एखादा बाओ-दाईसारखा माणूस हाताशी धरून, व्हिएतनामी राष्ट्रीय सरकार अस्तित्वात आणले नाही तर परिस्थिती बिकट होणार होती. आता फ्रेंचांनीच बाओ-दाई याची आळवणी सुरू केली.

राजकारणाचा त्रिकोण उस्कटला गेला होता. मार्च १९४६ मध्ये पॅरीस-हनोई- चुंकिंग या बिंदूना जोडणारा त्रिकोण फारच निराळ्या जातीचा होता. त्यावेळी चुंकिंगची चँग-कै-शैकची राजवट ही व्हिएतनामच्या स्वातंत्र्याच्या संदर्भात अगदीच नगण्य होती. उलट हनोई मुक्तीचा मार्ग हा पॅरीसच्या राजकारणातूनच जात होता. आता सगळेच चित्र पालटले होते. पेकिंगवर आता माओच्या कम्युनिस्ट सेनेचे वर्चस्व आले होते. १९४६ साली फ्रेंच सरकारात असलेला कम्युनिस्ट मंत्री थोरेज हा आता मंत्रिमंडलाबाहेर फेकला गेलेला होता आणि चँग-कै-शैक परागंदा होण्याच्या मार्गावर होता. व्हिएतनामची मुक्ती ही पॅरीसमार्गे न येता, आता ती पेकिंगमार्गेच लवकरात लवकर घडवली जाईल अशी चिन्हे दिसू लागली होती.

१ ऑक्टोबर १९४९ या दिवशी चिनी प्रजासत्ताकाचा पहिला अध्यक्ष म्हणून पेकिंगला माओने लाल निशाण फडकवले. दोनच आठवड्यांत कँटोन पडले आणि

मार्क्सवाद्यांना चिनी भूमीवर सुईच्या अग्रावर राहील एवढी जमीनही नाकारणारा चीनचा एकेकाळचा पुरुषसिंह चँग-कै-शैक हा निर्वासित होऊन फार्मोसा बेटावर पळून गेला.

## मॉस्कोवर नांगी

माओने मॉस्कोवासी भाईंवर लवकरच मुत्सद्देगिरीची पहिली बाजी मारली. १८ जानेवारी १९५० यादिवशी नवजात चिनी प्रजासत्ताकाने हो-चि-मिन्ह याच्या वनवासी सरकारला, व्हिएतनामचे अधिकृत सरकार म्हणून मान्यता जाहीर केली. हो च्या सरकारपाशी चीनचा वकील दाखल झाला आणि हो-चि-मिन्हचा वकील पेकिंगला रवाना झाला. हो याच्या सरकारला रशियाची मान्यता मिळाली ती यानंतर दोन आठवड्यांनी!

## जगाचे दरवाजे उघडले

याच महिन्यात माओचे सैन्य टोंकीनला येऊन भिडले. आतापर्यंत हो याचा जगाशी संबंध जवळजवळ तुटलेला होता. लाओस अथवा ब्रह्मदेशमार्गे काही पत्रकार, काही हितचिंतक किंवा एखादे मिशन वा डेलीगेशन अधूनमधून हो याच्या भेटीला आले तर येत असे. परंतु लाल चीनची सरहद्द व्हिएतनामला भिडताच पेकिंगमार्गे जगाचे दरवाजे हो याच्या सरकारला खुले झाले.

इंडोचायनाच्या कम्युनिस्ट पार्टीचे १९४९ साली हो याने विसर्जन केले होते. आता पुनश्च काही फेरविचार होणे अपरिहार्य होते. पुनः कम्युनिस्ट पक्षाची निर्मिती करणे यावेळी हो याला अशक्य नव्हते. परंतु या एका कृतीसरशी सर्वच राष्ट्रवादी व्हिएतनामी जनतेचा पाठिंबा कदाचित गळून पडण्याची शक्यता त्याने नजरेआड होऊ दिली नाही. यादृष्टीने फेब्रुवारी १९५० मध्ये दोन महत्त्वाच्या घटना घडल्या, त्याची नोंद केली पाहिजे.

११ फेब्रुवारीला २०० प्रतिनिधींची एक काँग्रेस हो याने भरवली. या काँग्रेसला काहीजण इंडोचायना कम्युनिस्ट पक्षाचीच एक काँग्रेस समजतात, ते फारसे चूक नाही. या काँग्रेसमध्ये ‘व्हिएतनाम-डाँग-लाओ-डांग’ म्हणजे ‘व्हिएतनाम कामगार पक्षा’ची स्थापना झाल्याचे घोषित करण्यात आले. यात कम्युनिस्ट हा शब्द टाळण्यात आला असला, तरी या पक्षाचे लागेबांधे कुणाशी राहतील हे अगदी स्पष्टपणे सूचित करण्यात आलेले होते.

चिनी कम्युनिस्टांचा भक्कम पाठिंबा हाताशी आला असूनही हो याने फ्रेंच कम्युनिस्ट पक्षाशी जमलेले प्रेमाचे संबंध ठोकरले नाहीत. परिषदेला हजर राहण्यासाठी लेओ फिग्युरे या फ्रेंच कम्युनिस्ट पुढाऱ्याला पाचारण करण्यात आले.

फिग्युरे हा मॉस्को-पेकिंगमार्गे या युवक परिषदेला हजर राहण्यासाठी निघाला. इकडे परिषद आटोपली तोपर्यंत हो याचेपर्यंत तो पोचू शकला नाही. परंतु मार्च १९५० मध्ये केव्हातरी तो हो याच्या निवासस्थानी पोचला, तेव्हा त्याचे व्हिएतमिन्ह नेत्यांनी अतिशय

प्रेमाने स्वागत केले. या स्वागताच्या वेळी फिग्युरे याच्या ही गोष्ट लक्षात आली की त्याचे झालेले स्वागत हे एखाद्या स्वतंत्र सरकारच्या स्वागतासारखे इतमामाचे आणि दरबारी पद्धतीचे स्वागत होते. हो हाच खऱ्याखुऱ्या व्हिएतमिन्ह सरकारचा अध्यक्ष होता आणि तो त्याच वजनाने वागतही होता.

'तुयेन-क्वांग'च्या जंगलात वनवासी व्हिएतमिन्ह सरकारने उभी केलेली राज्ययंत्रणा फिग्युरे याने सविस्तर पाहिली. फ्रान्सबरोबर समझोता व्हावा अशी या मंडळींची जरी तीव्र इच्छा असली, तरी अंगावर घेतलेले युद्ध विजयाच्या क्षणापर्यंत झुंजण्याची त्यांची ईर्षादेखील त्यांनी मुळीच लपवलेली नव्हती.

हो याने फिग्युरे याला स्पष्टच सांगितले –

> '१९४६-१९५० हा काळ आमच्या परीक्षेचा काल होता. चीनच्या भूमीवर आता आमचे मित्रराष्ट्र निर्माण झाल्याने, आमच्या वनवासातील अनेक समस्या आता सुटण्याच्या मार्गावर आहेत. तरीही फ्रान्सला वाटाघाटीची संधी देण्याची आमची इच्छा आहे.'

फिग्युरे हा पॅरिसला परतला व हो बरोबर बोलण्याचा वृत्तांत त्याने नेत्यांना व फ्रेंच सरकारला सांगितला. अर्थातच पहिली प्रतिक्रिया हीच झाली की हो हा आता टेकीस आलेला आहे आणि त्याने अखेरपर्यंत लढण्याचे जे अवसान आणले आहे त्यात काही अर्थ नाही.

## थोरेजचे आक्रंदन

फ्रेंच कम्युनिस्ट नेता थोरेज याने मात्र फ्रेंच कम्युनिस्ट पक्षाच्या बाराव्या अधिवेशनात स्पष्टपणे योग्य तो इशारा दिला. हे अधिवेशन पॅरीस येथे एप्रिल १९५० मध्ये भरले. थोरेज याने सांगितले –

> 'आम्हीही देशभक्त आहोत, आंतरराष्ट्रीय बंधुत्वाचा उद्घोष करणारे कामगार आहोत आणि म्हणूनच व्हिएतनाममध्ये चालू असलेल्या अन्याय्य युद्धाचा आम्ही धिक्कार करीत आहोत. तेथील जनतेवर आमचेच फ्रेंच बांधव हे अत्याचार करीत आहेत, हे ऐकताना आमची मान शरमेने खाली जाते. याचे कारणही हेच आहे की आमचे फ्रान्स देशावर प्रेम आहे. जी जमात दुसऱ्याचे स्वातंत्र्य मानीत नाही, त्या जमातीच्या स्वातंत्र्यालाही अर्थ नाही.'

फ्रेंच सरकार सुस्त होते. थोरेजच्या इशाऱ्याकडे लक्ष द्यायला या सरकारला फुरसत नव्हती. मध्यंतरी बाओ-दाईला मथवण्यात फ्रेंच सरकारला यश आलेले होते. ८ मार्च

१९४९ या दिवशी बाओ-दाई याने फ्रेंच सरकारशी तह केला होता. व्हिएतनामच्या जनतेचा प्रतिनिधी म्हणून आणि कम्युनिस्ट विचारसरणीचा हो याचा राष्ट्रवादी प्रतिस्पर्धी या नात्याने सरकार बनवण्यासाठी बाओ-दाई हा दलात येथे दाखल झालेला होता.

## अमेरिकेची दृष्टी पालटली

बाओ-दाई व्हिएतनाममध्ये परतला याची कुणी फारशी दखलही घेतली नाही. कारण याच सुमारास जगाचे सर्व लक्ष चीनमधील माओच्या दैदीप्यमान यशाने खेचून घेतले होते. हो-चि-मिन्ह याच्या सरकारला पेकिंगहून माओने व मॉस्कोहून स्टॅलिनने मान्यता जाहीर करताच, अमेरिकेच्या दृष्टिकोणातून व्हिएतनाममधील सुरू असलेल्या संघर्षाचे चित्र एकदम पालटले. आतापर्यंत व्हिएतनाममध्ये सुरू असलेले युद्ध हे फ्रेंच साम्राज्यवादी आणि व्हिएतनामी स्वातंत्र्यभक्त यांच्यातील संघर्ष म्हणून त्याकडे अमेरिका पाहात होती आणि सुबुद्ध अमेरिकन जनतेची सहानुभूती होती ती व्हिएतनामी जनतेकडेच! परंतु आता त्यांच्या दृष्टीत एकदम फरक पडला.

'आंतरराष्ट्रीय कम्युनिझम' आणि 'मुक्त लोकशाही देश' यांच्या जागतिक टक्करीतील एक महत्त्वाची लढाई म्हणून व्हिएतनाम युद्धाकडे आता अमेरिका पाहू लागली. म्हणूनच लाओस, कांबोडिया व व्हिएतनाम यांना स्वातंत्र्य देणारा कायदा फ्रेंच सरकारने पास करताच, अमेरिकेने ७ फेब्रुवारी १९५० या दिवशी 'बाओ-दाई' याच्या नेतृत्वाखाली फ्रेंचांनी निर्माण केलेल्या व्हिएतनामी सरकारला अधिकृत सरकार म्हणून आपली मान्यता जाहीर केली!

व्हिएतनामच्या युद्धात हो-चि-मिन्ह याला सत्तेपासून दूर ठेवण्यासाठी पदार्पण करण्याच्या दिशेने अमेरिकेचीही वाटचाल आता सुरू होत होती. अमेरिकेच्या तिजोऱ्यातून डॉलररूपाने अगणित पैसा आणि शस्त्रागारातून अमाप शस्त्रास्त्रे, बाओ-दाईच्या रक्षणासाठी व्हिएतनाममध्ये दाखल होण्याची वेळ, आता जवळ येत चालली होती. अमेरिकेचे सेक्रेटरी ऑफ स्टेट डीन ॲचेसन हे लगोलग पॅरीसला दाखल झाले. फ्रेंच सरकारशी त्यांनी वाटाघाटी केल्या. ८ मे १९५० या दिवशी ॲचेसन यांनी पॅरिसमध्ये घोषणा केली –

> 'इंडोचायनात सुरक्षितता आणि खऱ्याखुऱ्या राष्ट्रवादाची वाढ होण्याची नितांत गरज आहे अशी अमेरिकेची खात्री पटली आहे. या दृष्टीने अमेरिका इंडोचायनाला आवश्यक ती सर्व मदत करील. ज्या प्रदेशावर सोव्हिएट साम्राज्यवादाची पकड बसली आहे, त्या ठिकाणी राष्ट्रीय स्वातंत्र्य अथवा लोकशाही उत्क्रांती या दोन्ही गोष्टी अशक्य असतात, अशी आमच्या सरकारची खात्री पटलेली असल्याने आम्ही

इंडोचायना सरकारला (बाओ-दाईला), फ्रान्सला सर्व प्रकारचे आर्थिक व लष्करी सहाय्य देण्याचे ठरवले आहे.'

n

# ११ : फ्रेंच जनरलची लष्करी घोडचूक

डीन अॅचेसन यांनी ८ मे १९५० या दिवशी पॅरीस येथे इंडोचायनामधील फ्रेंचांना व फ्रेंचांनी सायगावला निर्माण केलेल्या बाओदाई सरकारला सर्व प्रकारचे आर्थिक व लष्करी साहाय्य करण्याचे जाहीर अभिवचन देताच, अमेरिकेतून शस्त्रास्त्रांचा व आर्थिक साहाय्याचा ओघ इंडोचायनात सुरू झाला. अमेरिकेने घेतलेला हा निर्लज्ज पवित्रा शहाजोग ठरावा अशी एक घटना महिन्याभरातच अनपेक्षितपणे घडली. ती घटना म्हणजे कोरियात सुरु झालेला संघर्ष होय.

## कोरियात युद्ध भडकले!

२६ जून १९५० यादिवशी कोरियात युद्धाला तोंड लागले. उत्तर कोरियातील कम्युनिस्ट वर्चस्वाच्या राजवटीने दक्षिण कोरियावर अचानक चढाई सुरू केली. २७ जूनला अमेरिकेचे अध्यक्ष ट्रूमन यांनी जाहीर केले –

> ‘कोरियातील संघर्षावरून हे स्पष्ट झाले आहे की कम्युनिझमचा प्रसार यापुढे शस्त्राच्या जोरावर करण्याचा कम्युनिस्टांचा इरादा आहे. यामुळे मी देखील इंडोचायनात फ्रेंचांच्या व राष्ट्रीय सरकारच्या मदतीसाठी अधिक मोठ्या प्रमाणावर लष्करी मदत पाठवण्याचे ठरवले आहे.’

उत्तर कोरियातील कम्युनिस्ट राजवटीने रशियाच्या पूर्वसंमतीनंतरच दक्षिण कोरियाच्या प्रजासत्ताक राजवटीवर प्रहार केला असावा हा समज बहुतांशी खरा होता. या समजातील तथ्य समजण्यासाठी उत्तर कोरियाची पूर्वपीठिका ठाऊक असायला हवी.

१९४५ साली दुसऱ्या महायुद्धातील जपानच्या पराजयानंतर उत्तर कोरिया हा जपानी अंमलाखालून मुक्त झाला. १९४६ ते १९४८ ही तीन वर्षे उत्तर कोरियात रशियन सैन्यच तळ देऊन राहिले. सोविएट सैन्याच्या बळावर किम इलसाँग हा कम्युनिस्ट राज्यशकट हाकीत होता. उत्तर कोरियात जपान्यांनी उभे केलेले पोलाद कारखाने, कोळसा खाणी, पॉवर स्टेशन्स ही सर्व जपान्यांनी देश सोडण्यापूर्वी निकामी करण्याचा प्रयत्न केलेला होता. ही कारखानदारी पुन्हा उभी करण्याकरिता लागणारे तंत्रबळ व आर्थिक बळ उत्तर कोरियाला रशियनांनी पुरवले आणि या बदल्यात उत्तर कोरियातील सर्व सरकारी यंत्रणेवर कोरियन कम्युनिस्टांनी कब्जा केला. उत्तर कोरियाला लागणारी मदत करण्याची ताकद या कालखंडात चिनी कम्युनिस्टांकडे नव्हती. कारण माओ यावेळी यादवी युद्धातच गुंतलेला होता. १९५० सालापर्यंत उत्तर कोरिया हा जवळ जवळ

सोव्हिएट युनियनचाच एक प्रांत असावा इतका तो देश रशियन कम्युनिस्टांच्या आहारी गेलेला होता.

१९५० नंतर मात्र येनान येथे चिनी कम्युनिस्टांनी शिक्षित केलेले कोरियन कम्युनिस्ट तरुण मोठ्या संख्येने उत्तर कोरियात दाखल झाले. जपान्यांविरुद्ध लढण्याकरिता ही तरुण माणसे चीनमध्ये गेली होती. या तरुणांना नुकत्याच माओला मिळालेल्या विजयाची धुंदी आवरता येत नव्हती. उत्तर कोरिया व दक्षिण कोरिया यांच्यात यादवी सुरू केली, तर अंतिम यश आपल्यालाच लाभेल असा या तरुणांचा होरा होता. दक्षिण कोरियात शस्त्राच्या बळावर कम्युनिझम आणण्यासाठी या चिनी कम्युनिस्टप्रणीत तरुणांचे दडपण सुरू झाले. किम इलसाँग हा संपूर्णपणे सोविएट राजवटीशी इमान ठेवणारा असला, तरी या नव्या प्रवाहापासून स्वतःचा बचाव करणे त्याला भाग होते. तेव्हा दक्षिण कोरियावर हल्ला करण्याचा निर्णय काही अंतर्गत दडपणाखाली, तर काही साहसापायी उत्तर कोरियातील रशिया धार्जिण्या कम्युनिस्ट राजवटीने घेतला. हा निर्णय रशियन सरकारच्या पूर्वसंमतीशिवाय घेण्याची ताकद उत्तर कोरियाच्या राजवटीत १९५० साली नव्हती, यात मुळीच शंका नाही.

अर्थातच शस्त्रांस्त्रांच्या जोरावर रशिया हा आता कम्युनिझमचा प्रसार करू इच्छितो आहे व त्याला पायबंद घातला पाहिजे हा अध्यक्ष ट्रूमन यांचा निर्धार, कोरियातील आक्रमण लक्षात घेता सामान्यपणे सर्व जगातील बिगर कम्युनिस्ट राजवटींना अगदी सुयोग्यच वाटला. कोरिया आणि इंडोचायना या दोन ठिकाणी कम्युनिझमचा शस्त्राघाती प्रसार आणि अमेरिकेच्या नेतृत्वाखाली त्याला होणारा प्रतिकार, याची हिंसात्मक प्रात्यक्षिके लगेचच सुरू झाली.

## अमेरिकेचा हस्तक्षेप

उत्तर कोरियाच्या फौजांनी अनपेक्षितपणे दक्षिण कोरियावर चढाई केल्यामुळे दक्षिण कोरियाची पिछेहाट सुरू झाली. अध्यक्ष ट्रूमन हे मिसोरी राज्यातील आपल्या घरी विश्रांती घेत असताना २५ जूनला वॉशिंग्टनहून त्यांना ही बातमी कळविण्यात आली. ट्रूमन न्यूयॉर्कला पोचण्यापूर्वीच सिक्युरिटी कौन्सिलची बैठक भरून १ विरुद्ध ९ मतांनी अमेरिकेचा ठराव मंजूर झाला होता. चढाई थांबवून उत्तर कोरियाने फौजा मागे घ्याव्या अन्यथा संयुक्त राष्ट्रसंघ कारवाई करील असा इशारा या ठरावात होता. राष्ट्रसंघ काय करील याची वाट न पाहता अध्यक्ष ट्रूमन यांनी जनरल मॅकऑर्थर याला दक्षिण कोरियाला हवाई मार्गाने सर्व लष्करी मदत देण्याचा आदेश देऊन, फोर्मोसा सामुद्रधुनीत अमेरिकेचे सातवे आरमार आणण्याची आज्ञा दिली.

रशियन सरकारने व कम्युनिस्ट देशांनी या युद्धाचे खापर दक्षिण कोरियाचे अध्यक्ष सिंगमनऱ्ही यांचेवर फोडले. काही दिवसांपूर्वी अमेरिकेच्या परराष्ट्र खात्यातर्फे डल्लेस यांनी दक्षिण कोरियाला भेट दिली व तेव्हा हे युद्ध सुरू करण्याचे कारस्थान शिजवण्यात आले; असा प्रचार कम्युनिस्टांनी आरंभला. हा सर्व अर्थात प्रचाराचा भाग होता. म्हणूनच संयुक्त राष्ट्रसंघात फारसा काथ्याकूट न होता ताबडतोब दक्षिण कोरियाच्या मदतीला सैन्य पाठविण्याचा ठराव तडकाफडकी मंजूर झाला. हल्ला उत्तर कोरियानेच केलेला होता आणि त्यांच्या फौजांना सुरुवातीला त्याचा चांगला फायदाही मिळाला.

## चिन्यांचे युद्धात पदार्पण

१५ सप्टेंबरला मोठ्या संख्येने अमेरिकन सैन्य 'इनचोन' येथे कोरियात समुद्रमार्गे उतरले. उत्तर कोरियाच्या पराभवाला लगेचच सुरुवात होऊन, कम्युनिस्ट फौजांना ३७ अक्षांश रेषेवर पुनश्च ढकलण्यात संयुक्त राष्ट्रसंघाच्या फौजांना यश लाभले. उत्तर कोरियाच्या कम्युनिस्ट फौजांचा पराभव घडत असताना रशियन सैन्याने काहीही हालचाल केली नाही! हा क्षण साधून चीनचे स्वयंसेवक उत्तर कोरियाच्या मदतीला आले व पुनश्च उत्तर कोरियाचा जोर वाढून कम्युनिस्टांनी ३८ अक्षांश रेषा पुन्हा एकदा ओलांडली.

चिनी लष्कर प्रत्यक्षपणे उत्तर कोरियात येणार नाही; याबाबतीत चौ-एन-लाय यांनी चीनमधील भारताचे वकील श्री. पण्णीकर यांच्यामार्फत दिलेला इशारा हा नुसता वायबार आहे, या समजुतीने संयुक्त राष्ट्रसंघाचा आदेश नसताना अमेरिकन सेनेने ३८ अक्षांश रेषा ओलांडून उत्तर कोरियाच्या भूमीवर पाय टाकला होता. परंतु मॅकऑर्थरचा हा अंदाज चुकला. आता मात्र चिनी स्वयंसेवक फार मोठ्या संख्येने उत्तर कोरियाच्या मदतीला आले आणि राष्ट्रसंघाच्या फौजांना पुन्हा मागे रेटायला त्यांनी सुरुवात केली.

जनरल मॅकऑर्थर याने जाहीरपणे घोषणा केली की,

> '३८ अक्षांशावरच अमेरिकेन फौजांना रोखून धरणे हे चूक आहे. कोरियातील युद्ध हे सर्वंकष युद्ध म्हणूनच खेळावे लागेल. यासाठी उत्तर कोरियावर व चीनवर बाँबफेक करणे आवश्यक आहे. 'लष्करी जया' ला अन्य पर्याय असू शकत नाही!'

अमेरिकन सेनानीच्या या प्रक्षोभक वक्तव्याने अध्यक्ष ट्रूमन यांना त्याच्याविरुद्ध कारवाई करणे भाग पडले. ११ एप्रिल १९५१ ला ट्रूमन यांनी मॅकऑर्थरची हकालपट्टी करून कोरियातील लढाईची सूत्रे जनरल रिजवे यांचेकडे दिली. जनरल रिजवे यांनी कम्युनिस्ट चढाई रोखून धरण्यात यश मिळवले. इतकेच नाही तर दक्षिण कोरिया ३८ अक्षांश रेषेपर्यंत त्यांनी पुनश्च मुक्त करीत आणला. अमेरिकेने प्रथमच नाप्लाम बाँबचा

उपयोग यावेळी केला. उभय पक्षांची आता खात्री पटली की निर्णायक लष्करी जय कुठल्याच पक्षाला शक्य नाही. जून १९५१ मध्ये रशियाचे जॅकोब मलिक यांचेमार्फत शस्त्रसंधीच्या वाटाघाटी सुरू झाल्या आणि दोन वर्षे वाटाघाटीचा घोळ घातल्यानंतर जुलै १९५३ मध्ये अखेर कोरियातील यादवी युद्ध थांबले.

## शस्त्रशक्ती सर्वांना समजते

उत्तर कोरियातील कम्युनिस्ट राजवटीने हे लष्करी साहस सुरू केले होते, परंतु दक्षिण कोरियाच्या मदतीला संयुक्त राष्ट्रसंघ आल्याने हा डाव उत्तर कोरियाच्या अंगाशी आला. अर्थात युद्ध मोठ्या प्रमाणावर झाले नाही याचे कारण अध्यक्ष ट्रूमन यांनी ३८ अक्षांश रेषेपलीकडे अमेरिकन सैन्य न पाठवण्याचा ठाम निर्धार प्रगट केला. या घोषणेचा फायदा घेऊन रशियातर्फे जॅकोब मलिक यांनी कम्युनिस्टांच्या अंगाशी येऊ पाहाणारे हे युद्ध अखेर शस्त्रसंधीच्या वाटाघाटीच्या घोळात गुदमरवून टाकले. ९६,००० उत्तर कोरियन व २१,००० चिनी युद्धकैदी, अमेरिकन लष्कराच्या ताब्यात होते. सुमारे ३०,००० उत्तर कोरियन व १६,००० चिनी कैद्यांनी परत आपापल्या देशात जाण्यास नकार दिल्याने, कम्युनिस्टांची अधिकच नाचक्की अखेर झाली. सर्वच्या सर्व कैदी त्यांची इच्छा विचारात न घेता परत केले पाहिजेत या कम्युनिस्टांच्या हट्टापायी केवळ दोन वर्षे वाटाघाटीचा घोळ पडला होता. अखेर ही मागणी कम्युनिस्टांनी सोडून दिली.

शक्यता अशी आहे की ५ मार्च १९५३ रोजी स्टॅलिन मृत्यू पावल्यानंतर, त्याच्या जागी आलेल्या नव्या राजवटीने हा शहाणपणा पत्करला व उत्तर कोरियावर तसे दडपण आणून अखेर कोरियातील युद्ध समाप्त करणारा शस्त्रसंधी अंमलात आणण्याची वाट मोकळी केली.

२५ जून १९५० ते २७ जुलै १९५३ कोरियन युद्ध चालू होते. जगाचे सारे लक्ष अर्थात याच युद्धाने खेचून घेतले होते. उत्तर कोरियाला रशियाकडून सर्व प्रकारची मदत येत होती. चिनी स्वयंसेवक उत्तर कोरियाकडून प्रत्यक्ष लढत होते आणि तरीही ३८ अक्षांशावर कम्युनिस्टांना लष्करीदृष्ट्या रोखून धरण्यात अमेरिकेला यश आले. दक्षिण कोरियाचा घास घेण्याचा उत्तर कोरियाचा मनसुबा अखेर तहकूब झाला. या सर्व घटनेचा परिणाम व्हिएतनाम युद्धावर झाला. व्हिएतनाम युद्धात अधिक हिरीरीने, अधिक त्वेषाने अमेरिका उतरली आणि जगाच्या इतिहासात सर्वात प्रदीर्घ चाललेले व्हिएतनामी युद्ध दिवसेंदिवस अधिकाधिक रक्तलांछित होत गेले.

## कोरियातील यशाचा मद

वर्षभरापूर्वी फ्रेंचांनी सम्राट बाओदाईला फ्रेंच युनियनांतर्गत स्वातंत्र्य देऊन सरकारप्रमुख करण्याचा इरादा व्यक्त केला, तेव्हा ट्रूमन सरकारने फ्रेंचांना कळवले होते –

'बाओदाई सरकारला जनतेत पाठिंबा नसल्याने हे बाहुले सरकार केवळ फ्रेंचांच्या लष्करी पाठिंब्यावरच तगणार आहे. सबब अमेरिका या तकलादू सरकारला मान्यता देऊ शकत नाही.'

परंतु वर्षभरात आता अमेरिकेचा सगळाच नूर पालटला. दक्षिण आशियावर पसरत चालेल्या विराट कम्युनिस्ट सावलीशी लढण्यासाठी अमेरिकेने ७ फेब्रुवारी १९५० ला बाओदाईचे सरकार अधिकृतरित्या मान्य केले आणि आठवड्याभरात अध्यक्ष ट्रूमन यांनी इंडोचायनात हो-चि-मिन्ह याचा बिमोड करण्यासाठी फ्रेंचांना सर्व प्रकारची लष्करी मदत देण्याच्या आदेशावर स्वाक्षरीदेखील केली!

व्हिएतनाममध्ये आकार घेत असलेल्या शोकांतिकेत यानंतर अमेरिका एक महत्त्वाची भागीदार झाली.

कोरियाच्या युद्धात कम्युनिस्ट चीनने महत्त्वाचा भाग घेतला असला तरी व्हिएतनाममधील युद्ध हे तितकेच महत्त्वाचे आहे हे लक्षात ठेवून रशिया व विशेषतः माओने, हो-चि-मिन्ह यांना लष्करी सहाय्याचा ओघही कोरियन युद्धाची तिन्ही वर्षे अखंड वाहता ठेवला होता.

## चिनी सैनिक आले, सहाय्य आले

दक्षिण १० ऑगस्ट १९५० या दिवशी सुमारे दीड लाख चिनी सैनिक नागरिक वेषात युनान प्रांतातील कुनमिंग या ठिकाणी एकत्रित करण्यात आले. उत्तर व्हिएतनामला लागून असलेल्या लाल चीनच्या प्रदेशातून, हळूहळू हे सर्व सैन्य जनरल जिॲपच्या मदतीसाठी व्हिएतनाममध्ये उतरले. २८ ऑक्टोबरला पाठोपाठ दोन चिनी जहाजे शस्त्रास्त्रे व दारूगोळा भरून हैपाँग बंदरात दाखल झाली. पुढे वर्षभराच्या आत म्हणजे २४ ऑगस्ट १९५१ ला चिनी लष्कराचा चीफ ऑफ स्टाफ जनरल शाओ-के हा कोरियातून 'नान-निंग' या क्वाँगसी प्रांतातील शहरात दाखल झाला व तेथून त्याने व्हिएतमिन्ह सैनिकांना मदतीचा ओघ अखंड राहील व आवश्यक तो लष्करी सल्ला उपलब्ध होईल अशी कायम व्यवस्था निर्माण केली.

लालचीन सर्वतोपरी हो-चि-मिन्ह याच्या मदतीला जातो आहे हे पाहताच सुमारे ४५० लष्करी सल्लागारांचा तांडा मॉस्कोने उत्तर व्हिएतनाममध्ये रवाना केला. हे सल्लागार २१ सप्टेंबर १९५१ च्या सुमारास व्हिएतनाममध्ये दाखल झाले.

## जिॲपचे गनिमी तंत्र

याचा अर्थ असे नव्हे की उत्तर व्हिएतनामचे युद्ध हे केवळ बाहेरून येणाऱ्या मित्रांच्या मदतीवरच खेळले जात होते. सायगावला स्थापन झालेले बाओदाईचे सरकार हे फ्रेंच साम्राज्यवाद्यांच्या हातातील खेळणे आहे, अशा प्रचाराचा धडाका अध्यक्ष हो याने सुरू केल्यामुळे, जवळ जवळ सर्व बिगर कम्युनिस्ट राष्ट्रवादी व्हिएतनामी जनताही आता कम्युनिस्ट नेतृत्वाखाली एकत्र येऊ लागली होती. व्हिएतनामच्या स्वातंत्र्याचा लढा हा अध्यक्ष हो आणि जनरल जिॲप हेच प्रत्यक्ष लढत आहेत याविषयी सर्व जनतेची यामुळे खात्री पटत चालली होती.

ज्या प्रकारचे गनिमी युद्ध जनरल जिॲप खेळत होता त्या युद्धाला नेहमीचा असा चेहरा मोहरा नव्हता. दोन पावले पुढे टाकावी, एक पाऊल मागे घ्यावे, डावीकडे हुलकावणी द्यावी, उजवीकडे सरकल्याचा बहाणा करावा, लष्करी छापे घालावे असे हे जंगली युद्धाचे गनिमी तंत्र जनरल जिॲप याने बसवले होते. केवळ शस्त्रास्त्रांची खणाखणी हे या युद्धाचे गमकच नव्हते. धर्माभिमान, अर्थकारण, राजकारण, मानसशास्त्रीय आघात या सर्वांचा उपयोग करून सबंध व्हिएतनामची संस्कृती फ्रेंचांविरुद्ध उभी करण्यासाठी अध्यक्ष हो याच्या नेतृत्वाखाली एक बिनचेहऱ्याची प्रचंड आघाडी उभी करण्यात व्हिएतनामी देशभक्तांना यश आलेले होते.

सबंध देशभर फ्रेंचांना आता छुपे कम्युनिस्ट दिसू लागले. फितुर फंदांची संख्या दिवसागणिक वाढत चालल्याचा भास त्यांना होऊ लागला. कुठच्या व्हिएतनामी माणसावर विश्वास टाकावा आणि कुणावर टाकू नये याचा अंदाजच त्यांना लागेनासा झाला. कुठल्याही क्षणी आपल्यावर हल्ला होऊ शकेल या भयाने फ्रेंच सैनिक भयग्रस्त होऊन गेले.

१९४५ ते १९४८ या तीन वर्षात जनरल जिॲप याने टोंकीन विभागात रीतसर शिक्षण घेतलेले लाल सैन्यच उभे केले होते. फ्रेंचांना चारी अंगांनी सतावण्यासाठी या सैन्याने कामगिरी बजावण्यास हळूहळू सुरुवात केली. १९५० मध्ये जनरल जिॲप याने 'लोकयुद्ध-लोकसेना' (People's war People's army) हे पुस्तक सैनिकांसाठी लिहिले. १९३८ साली माओने गनिमी युद्धाची तंत्रे विषद करणारे जे पुस्तक लिहिले होते, त्या पुस्तकातील मूलतत्त्वेच या जिॲपच्या पुस्तकात ग्रथित केलेली आहेत. जनरल जिॲप याने व्हिएतनामच्या स्वातंत्र्ययुद्धाच्या तीन अवस्था सांगितलेल्या होत्या –

१) मूक असहकार व विरोध, राजकीय व लष्करी सामर्थ्याची उपासना.

२) प्रत्यक्ष प्रतिकार, फ्रेंच लष्करी तळावर प्रत्यक्ष छापे आणि मोठ्या चढाईची सिद्धता.

३) सर्वंकष चढाई युद्धाची भीषणता इतकी वाढवावी की फ्रेंचांनी तहाची याचना करायलाच हवी.

१९४५ ते १९४८ या काळात व्हिएतनामी युद्धाची पहिली अवस्था यशस्वीरित्या जनरल जिॲप याने संपवली होती. दुसरा कालखंड १९४८ ते १९५१ हा होता. या काळात व्हिएतनामी सैन्याने फ्रेंचावर छापे घालायला सुरुवात केली. टोंकीनच्या दक्षिणेकडे मेकाँग भागात मात्र युद्धाची ही दुसरीच अवस्था १९५४ पर्यंत चालू ठेवण्यात आली.

युद्धाच्या दुसऱ्या अवस्थेत जनरल जिॲपला फ्रेंचांच्या लष्करी हालचाली बिनचूक कळवण्याची कामगिरी चिनी सैनिकांनी यशस्वी केली. क्वांगसी, क्वांगटुंग व युनाम या व्हिएतनामच्या लागून असलेल्या तीन चिनी प्रांतातून नागरी वेषातील चिनी सैनिकी हेर कुठेही घुसू शकत असत. चेहरेपट्टीतील विलक्षण साम्यामुळे व्हिएतनाम, लाओस किंवा कांबोडिया यापैकी कुठल्याही देशाचे नागरिक म्हणून हे हेर वावरू शकत असत. हेरांचे मोठे जाळेच लाल चिनी सैनिकांनी व व्हिएतनामी नागरिकांनी फ्रेंचांभोवती फेकलेले होते.

## ‘होआ-बिन्ह’ फ्रेंचांनी घेतले

फ्रेंचांना अशा युद्धाची सवय नव्हती, तटबंदीसारख्या संरक्षक लष्करी फळ्या उभारण्याच्या तंत्राकडेच त्यांचा भर होता, विशेष कल होता. अपरिचित देश व अपरिचित माणसे यांच्याविरुद्ध लढताना स्वाभाविकपणे अशी मनोवृत्ती निर्माण होणेच शक्य असते. १९५० पर्यंत फ्रेंच जनरल कार्पेतीए याने फ्रेंच सैनिकांच्या वेगवान हालचालीवर मुख्य भर ठेवला होता. १९५० साली त्याची जागा मार्शल जीन-द-लात्र याने घेतली. मार्शल जीन याने अधिक कल्पकता वापरून ‘होआ-बिन्ह’ हे उत्तर-दक्षिण मार्गावरील महत्त्वाचे ठिकाण जिंकून घेतले. यामुळे उत्तर व्हिएतनाममधून दक्षिणेकडे जाणारा मार्ग बंद झाला. इतकेच नव्हे तर होआ-बिन्हवर जनरल जिॲपने केलेले हल्ले त्याने परतवले आणि या लढ्यातून व्हिएतनामी सैनिकांची जबर हानीही झाली.

मार्शल जीन याच्या पिछाडीला दक्षिण व्हिएतनाममध्ये मोठ्या प्रमाणावर घातपाती चळवळ उभी केल्याशिवाय, होआ-बिन्ह सर करता येणार नाही, अशी अखेर जनरल जिॲप याची खात्री पटली.

## लाओसकडे नवी आघाडी

१९५२ अखेर उत्तर व्हिएतनामच्या युद्धात अशी परिस्थिती होती की टोंकीन आखाताचा भाग वगळता, जवळजवळ सर्व उत्तर व्हिएतनाम हा जनरल जिॲपच्या कब्जात गेलेला होता. ‘होआ-बिन्ह’ वर फ्रेंचांनी पक्के वर्चस्व प्रस्थापित केल्याने, दक्षिणेकडे सरकणे जनरल जिॲपला शक्य नव्हते. यामुळे एप्रिल १९५३ मध्ये जिॲपने लाओसमध्ये नवी आघाडी उघडली. जवळ जवळ २०,००० चौ. मैलांचा लाओसचा

प्रदेश त्याने व्यापला आणि १ मे ला जिअॅपचे सैन्य लाओसची राजधानी 'लुआंग-प्रबांग'च्या वेशीपर्यंत येऊन थडकले. परंतु राजधानी व्यापण्याचा खटाटोप न करता, जिअॅपचे सैन्य राजधानीच्या पिछाडीच्या जंगलातून पुनः उत्तरेकडे सरकले. या लष्करी धडकीतून 'पॅथे-लाओ' या नावाने ओळखल्या जाणाऱ्या भूमीगत चळवळीला लाओसमध्ये चांगले बाळसे चढले. लाओस, कंबोडिया आणि दक्षिण व्हिएतनाम यांना फ्रेंचांकडून मिळणाऱ्या संरक्षणाची दुर्दशा सर्वांच्या ध्यानात आणून देण्याचे महत्त्वाचे कार्य या चढाईने केले गेले.

व्हिएतनाममधील युद्ध अशा रीतीने फ्रेंचांच्या गळ्याभोवतीची तात ठरत चालले असताना, अमेरिकेत अध्यक्षीय निवडणुका पार पडल्या. जानेवारी १९५३ मध्ये अध्यक्ष ट्रूमन यांचे जागी आयसेनहॉवर यांची कारकीर्द सुरू झाली. आशियात सर्वत्र कम्युनिस्टांचे उठाव होत असल्याने, धास्तावलेल्या अमेरिकनांना अधिकच भयग्रस्त करण्याकरता सिनेटर मॅकार्थी यांनी प्रचार आरंभला. कम्युनिस्ट शिरकाणाचीच आपण जणू जय्यत तयारी करीत असल्याचा आव त्याने आणलेला होता. जळी-स्थळी-काष्ठी-पाषाणी या सिनेटरला कम्युनिस्ट दिसत होते.

## आयसेनहॉवरची नवी चाल

'कोरियातील शस्त्रसंधी लवकराच लवकर घडवून आणीन' असे आश्वासन अध्यक्ष आयसेनहॉवर यांनी निवडणुकीच्या जाहीरनाम्यात दिलेले होते. त्यानुसार कोरियात कम्युनिस्टांबरोबर यशस्वी वाटाघाटी करायची जबाबदारी एकीकडे पार पार पाडीत असतानाच, आशियात कम्युनिस्टांना पायबंद घालण्यासाठी इंडोचायनाच्या युद्धात अधिक दृढतेने पावले टाकण्याचे धोरणही आयसेनहॉवर बांधीत होते. यामुळे कोरियन युद्धात शस्त्रसंधीवर सह्या होण्यापूर्वीच व्हिएतनाममधील फ्रेंचांचा आक्रोश त्यांच्या कानावर धडकल्यामुळे अमेरिकन बॉंबफेकी विमाने, वाहतुकीची विमाने, टॅंक, मशीनगन्स आणि अमाप दारूगोळा दक्षिण व्हिएतनाममध्ये पाठवायला आयसेनहॉवर यांनी सुरुवातही केली.

अध्यक्ष आयसेनहॉवर यांचे सेक्रेटरी ऑफ स्टेट जॉन फॉस्टर डल्लेस यांनी सत्तेवर येण्यापूर्वीच वर्षभर जाहीरपणे सांगितले होते –

> 'इंडोचायनात यादवी माजलेली आहे. बऱ्यासाठी की वाईटासाठी ते नंतर ठरेल! परंतु अमेरिका या यादवीत खेचली गेलेली आहे. ज्या सरकारला आपली मान्यता आहे त्याच्या बाजूनेच अमेरिका उभी राहील. जर आपण मान्यता दिलेल्या राजवटीचा (म्हणजे बाओ-दाईचा) या युद्धात पराभव झाला, तर आशिया व पॅसिफिकमधील

परिस्थिती अधिकच कठीण होईल. कारण नुकतीच चीनमधून आपल्याला माघार घ्यावी लागलेली आहे. लोकांचा असा समज होईल की अमेरिकेशी मैत्री म्हणजे जीव घेणे लोढणे ठरते.'

आता तर काय डल्लेस साहेब हे सत्ताधारी झालेले होते. व्हिएतनाम युद्धात जणू अमेरिकेचीच अब्रू पणाला लागली आहे, अशा हिरीरीने आता डल्लेस पावले उचलणार आहेत, याबाबतीत कसलीही शंका जाणकारांच्या मनात आता नव्हती. सेक्रेटरी ऑफ स्टेट या नात्याने नभोवाणीवर केलेल्या भाषणात २ फेब्रुवारी १९५३ ला डल्लेस यांनी मनातली मळमळ सांगून टाकली.

'जर इंडोचायना, सयाम, ब्रह्मदेश आणि मलाया या सर्व भागांवर रशियाचे प्रभुत्व निर्माण झाले, तर आशियातील तांदुळाची धनरासच कम्युनिस्टांच्या कब्जात गेल्यासारखे होईल. या अस्त्राच्या जोरावर मग त्यांना जपान आणि भारतात चंचूप्रवेश करणेही शक्य होईल.'

## फ्रान्समध्ये सत्तांतर

भलत्या प्रतिष्ठेपायी व्हिएतनाममधील युद्ध दत्तक घेण्याच्या विचारात अमेरिकेचे राज्यकर्ते असताना, फ्रान्समध्ये उलथापालथ झाली. मे ५३ मध्ये फ्रान्सची आर्थिक परिस्थिती गंभीर होऊन फ्रेंच सरकारला चलनाचे अवमूल्यन करावे लागले आणि या ताणाबरोबर मंत्रिमंडळ गडगडले! जोसेफ लानिएल हा नवा पंतप्रधान झाला आणि बिडॉल्ट हे परराष्ट्रमंत्री झाले. नव्या मंत्रिमंडळाने लाओस, कंबोडिया व व्हिएतनाम यांच्या फ्रान्सबरोबर असलेल्या राजकीय संबंधाबाबत फेरविचार करण्याची तयारी दाखवणारे पत्रक जाहीर केले (जुलै १९५३)

व्हिएतनाममध्ये ज्या प्रकाराने युद्ध चालू होते त्यामुळे फ्रान्समध्ये असंतोष वाढत चाललेला होता. आशियातील कम्युनिस्टांची लाट थोपवण्यात फ्रेंचांना तसा काय रस होता? अमेरिकेला त्यात लक्ष घालणे स्वतःच्या हितासाठी आवश्यक वाटत होते. परंतु कम्युनिस्टांशी लढत होते फ्रेंच सैनिक. मरत होते फ्रेंच सैनिक. विधवा होत होत्या त्या फ्रेंच कन्या. अमेरिकेची ही लढाई फ्रेंचांनी लढावी आणि आयसेनहॉवरने कोरियात मात्र ३८ अक्षांश रेषेपलीकडे कम्युनिस्टांना सुखाने नांदू देणारा शस्त्रसंधी करावा! नवे फ्रेंच पंतप्रधान लानिएल याने फ्रेंच पार्लमेंटपुढे बोलताना १९५३ च्या ऑक्टोबरात या प्रकारच्या विचारांना वाचा फोडली. पंतप्रधान म्हणाले –

'अगदी स्पष्टपणे आणि निर्णायक स्वरूपात मी हे पुनः पुन्हा म्हणतो आहे की इंडोचायनातील पेचप्रसंग लष्करी पद्धतीनेच सोडवण्याची गरज नाही. कोरियात शत्रूने

शरणागती न देता अमेरिका वाटाघाटी करू शकते आणि त्याला फ्रान्सचा पाठिंबा लाभतो, या न्यायाने व्हिएतनाममध्येही अन्य पर्याय शक्य आहे. युद्धासाठी युद्ध फ्रान्सला नको असेल तर अमेरिकेलाही ते चालू ठेवता येणार नाही! म्हणून जर सन्मान्य तडजोड शक्य असेल तर कोरियात अमेरिकेने तयारी दाखवली त्याप्रमाणे फ्रान्सदेखील व्हिएतनाममध्ये सन्मान्य तडजोडीला उत्सुक आहे.'

या घोषणेचा अर्थ अगदी स्पष्ट होता. फ्रेंचांना व्हिएतनाममध्ये अमेरिकेचे तोफगोळे म्हणून स्वतःचा नाश करून घेण्याची इच्छा आता नव्हती. आयसेनहॉवरपुढे हा पेच होता की फ्रेंचांना यापुढे कसे लढत ठेवायचे? अमेरिकेचे सैन्य व्हिएतनाममध्ये उतरल्याखेरीज यापुढे भागण्यासारखे नव्हते. परंतु अमेरिकन सैन्य व्हिएतनाममध्ये पाठवायला नैतिक आधार कुठे होता? फ्रेंच सरकारने तशी विनंती केली तर हे एक शक्य होते किंवा लाओस, कंबोडिया व दक्षिण व्हिएतनाम यांनी संयुक्त राष्ट्रसंघाकडे धाव घेतली तर राष्ट्रसंघाचे सैन्य म्हणून अमेरिका प्रत्यक्ष लढाईत उतरू शकत होती. फ्रेंचांना व बाओदाई सरकारला लष्करी व आर्थिक मदत देऊन व्हिएतनामच्या युद्धात कम्युनिस्टांना पराजित करण्याचे अमेरिकेचे स्वप्न आता पुरते विरलेले होते.

## पत्रकाराचे धाडस

सर्व बाजूंनी व्हिएतनाम प्रश्नांची अशी कोंडी झालेली असतानाच 'एक्सप्रेस' या स्विडिश पत्राचा पॅरीसमधील एक पत्रकार स्वेन लोफग्रेन याला एक कल्पना सुचली. फ्रेंच पंतप्रधान लानिएल याचे पार्लमेंटमधील भाषण ऐकल्यानंतर त्याची खात्री झाली की व्हिएतनाम युद्धात तडजोड होऊ शकेल असा हा क्षण आहे. परंतु हो-चि-मिन्ह याचे यावर काय म्हणणे आहे हे जाणून घेण्याचीच कुणाला गरज वाटत नाही हे कसे? त्याने एक प्रश्नमालिका तयार करून ती पेकिंगमधील स्विडीश वकिलातीमार्फत हो-चि-मिन्ह याला धाडून दिली. व्हिएतनाममध्ये शस्त्रसंधी व राजकीय शांतता प्रस्थापित करण्यासाठी अध्यक्ष हो याच्या अटी काय आहेत, हे मुख्यतः या पत्रकाराने विचारले होते.

२६ नोव्हेंबर १९५३ ला स्वेन लोफग्रेन याला हो याचेकडून उत्तर आले. उत्तर सोपे, साधे व अपेक्षा निर्माण करणारे होते. हो याने कळवले होते –

'गेली सात-आठ वर्षे व्हिएतनामी जनता लढत आहे ती केवळ आपले स्वातंत्र्य व शांततेने जगण्याचा हक्क प्रस्थापित करण्यासाठी. जोपर्यंत फ्रेंच वसाहतवाद्यांना हे आक्रमक युद्ध चालू ठेवण्याची इच्छा आहे, तोपर्यंत व्हिएतनामी जनतेला ते जिंकेपर्यंत लढवलेच पाहिजे. परंतु जर फ्रेंच सरकार सुरू असलेल्या युद्धापासून काही धडा घेऊन, वाटाघाटीच्या मार्गाने युद्धबंदी करू इच्छित असेल व शांततेच्या मार्गाने

व्हिएतनामचा प्रश्न सोडवण्याची त्या सरकारची इच्छा असेल, तर व्हिएतनामची जनता आणि व्हिएतनामचे लोकशाही प्रजासत्ताक सरकार अशा प्रयत्नांना योग्य तो प्रतिसाद नक्की देईल.'

हो याचे हे उत्तर स्विडिश पत्रात प्रसिद्ध करण्यात आले.

## होणारे न टळे

हो याच्या वृत्तपत्रात प्रसिद्ध झालेल्या या उत्तराची प्रत स्वेन लोफग्रेन याने फ्रेंच परराष्ट्र मंत्री बिडॉल्ट याला दाखवली तेव्हा तो कुरबुरला – 'वृत्तपत्रांच्या रकान्यांतून राजकीय वाटाघाटी होत नसतात!' बिडॉल्ट अशा मगुरीने बोलत असला तरी फ्रेंच जनमत हे यानंतर अधिकाधिक युद्धविरोधी बनत चालले होते आणि याची दखल लानिएल सरकारला घेतल्यावाचून गत्यंतर नव्हते. फ्रेंच संरक्षणमंत्री रेने फ्लेबेन हा अस्वस्थ होता. त्याने फ्रेंच पार्लमेंटचा समाजवादी सभासद ॲले सावरी याला व्हिएतनाममध्ये जाऊन हो याची गाठ घेण्यास सांगितले. या शिष्टाईला फ्रेंच पंतप्रधान लानिएल याचा आशीर्वाद होता. परंतु बिडॉल्ट यांनी पुनः कडाडून विरोध केला. त्यांनी उद्दामपणे सांगितले – 'व्हिएतनामचे उसने अवसान आता ओसरण्याच्या मार्गावर आहे. जर यावेळी वाटाघाटीसाठी हात पुढे केला तर त्यांचा गेलेला आत्मविश्वास पुनः प्रस्थापित होईल. अध्यक्ष हो याची यावेळी गाठ घेण्यात काहीच अर्थ नाही.'

पुढे ३-४ महिन्यांनी बिडॉल्ट भानावर आले आणि त्यांनी ॲले सावरी याला व्हिएतनाममध्ये पाठवण्यास संमती दिली. परंतु तेव्हा होणारी दुर्घटना होऊन गेलेली होती!

## जनरल नावरेची लष्करी घोडचूक

व्हिएतनाममध्ये युद्धाचे पारडे फ्रेंचांच्या बाजूला झुकत आहे अशी जी बिडॉल्ट यांची यावेळी समजूत झाली होती, त्याला थोडासा आधार होता. लाओसमध्ये जनरल जिॲप याने काही दिवसांपूर्वी जी लष्करी धडक दिली, त्यामुळे लाओस आघाडीकडील फ्रेंच कमांडर जनरल नावरे याला जिॲपच्या फौजांना लाओसच्या अलीकडेच चाप लावण्याची गरज वाटू लागली. या दृष्टीने दिअेन-बिअेन-फू या गावाचा कब्जा करण्याचे त्याने ठरवले. या गावापासून नजिकचा फ्रेंच लष्करी तळ हा सुमारे १७५ मैलांवर होता. या खेड्याच्या आसपासच्या टापूत व्हिएतनामी सैन्य जवळ जवळ नव्हतेच. परंतु हे खेडे मात्र चारी बाजूंनी टेकड्यांनी वेढलेले होते. सर्व बाजूंनी टेकड्या व मध्येच तळहातासारखे हे खेडे अशी याची मनोहर निसर्गरचना होती. या खेड्याचा कब्जा करण्याची कल्पना जनरल नावरे याला अशाकरता महत्त्वाची वाटली की व्हिएतनामी सैनिकाजवळ

विमानदल नसल्यामुळे या ठिकाणी मोठा फ्रेंच तळ उभारता येईल. चारी अंगाने असलेल्या टेकड्यांवरून लांब पल्ल्याच्या तोफा आणणे व्हिएतनामी सैन्याला शक्य होणार नाही आणि यामुळे निसर्गदत्त अशा सुरक्षित जागी लाओसचा बालेकिल्ला म्हणून हा फ्रेंच तळ उपयोगी पडेल. तेथे मोठे वायुदल ठेवता येईल.

जनरल नावरे याने प्रथम दिअेन-बिअेन-फू येथे छत्रीधारी सैनिक उतरवले. नंतर तिथे विमानाची धावपट्टी तयार करवून विमानाने सैन्य व सामग्री पाठवून सैन्याचा तळ निर्माण केला. विमानदलाचे अधिक्य व वर्चस्व असल्याकारणाने जनरल नावरे याला ही गोष्ट सहज साधता आली. दिअेन-बिअेन-फू येथे नवा अभेद्य लष्करी तळ निर्माण केल्याची बातमी आल्याने, पॅरीस येथे बिडॉल्ट याला क्षणभर लढाईचे पारडे आपल्याकडे झुकल्याचा भास झाला! परंतु एका विलक्षण सापळ्यात फ्रेंच सैनिक स्वतःच्या पायाने चालत गेलेले आहेत याची पॅरिसमध्ये कुणालाच कल्पना नव्हती.

महिनाभरात आसपासच्या टेकड्यांवरून चारी अंगाने व्हिएतनामी सैन्य गोळा होऊ लागले. वीस-पंचवीस हजार फ्रेंच सैनिकांनी व्यापलेला लष्करी तळ तेथील सर्व शस्त्रास्त्रांनिशी हाती पडला तर या पराभवाने फ्रेंच वसाहतवाद्यांचे कंबरडेच मोडेल असा पक्का हिशोब जनरल जिॲप याने केला. पॅरीसमध्ये फ्रेंच सरकार वाटाघाटीसाठी उत्सुक झालेले आहे. मे १९५४ मध्ये जिनिव्हा येथे भरणाऱ्या बड्या राष्ट्रांच्या परराष्ट्र मंत्र्याच्या परिषदेत व्हिएत-मिन्ह युद्धात तडजोड घडवण्याची बोलणी होण्याची शक्यता आहे, या सर्व बातम्या जनरल जिॲपच्या कानावर होत्याच. तेव्हा तत्पूर्वी असा एखादा अभूतपूर्व लष्करी विजय आपण पदरात पाडला तर वाटाघाटींना जाताना ताठ मानेने जाता येईल अशी अध्यक्ष हो व जनरल जिॲप यांची धारणा होती.

महिना दोन महिन्यात दिएन-बिएन-फू चा कब्जा करणे अगत्याचे होते. अवधी थोडा असला तरी जिद्द मोठी होती. फ्रेंचांकडे विमाने होती. व्हिएत-मिन्ह सैनिकांजवळ विमाने तर नव्हतीच परंतु विमानविरोधी तोफाही नव्हत्या. फक्त निसर्ग त्यांच्या बाजूला होता. अवजड दूरगामी तोफा टेकड्यांवर चढवून त्यांची तोंडे दिएन-बिएन-फू कडे वळवण्यासाठी लागणारे चिवट मनुष्यबळ सुदैवाने व्हिएत-मिन्ह सैनिकांपाशी होते. या सर्व हालचाली विमानाचे लक्ष चुकवून करता याव्यात असे दाट जंगल आसपासच्या टेकड्यांवर होते.

दूरगामी तोफा टेकड्यांच्या उतारावर आतल्या अंगाने आणून उभ्या ठाकल्या. त्या तोफा टेकडीच्या सुरक्षित बाजूला न ठेवता दिएन-बिएन-फू वर त्यांची तोंडे जनरल जिॲपने केंद्रीत केली आणि धडाका उडाला.

खोलगट भागात जमा झालेल्या फ्रेंच सैनिकांच्या शौर्याला या लढाईत वावच नव्हता. बाहेरून मदत येण्याची वाट बंद होती. विमानांतून केलेली बॉंबफेक, तोफांचा गडगडाट बंद

पाडण्यात यशस्वी ठरत नव्हती. चारी दिशांनी व्हिएत-मिन्ह सैनिकांपाशी नाहीत या भरवशावर आग ओकू लागल्या. जी दूरगामी अस्त्रे व्हिएत-मिन्ह सैनिकांपाशी नाहीत या भरवंशावर जनरल नावरे याने हा तळ निर्माण केला होता, तो फ्रेंच सेनानी भयचकित झाला. दिएन-बिएन-फू व्यापण्याची त्याची कल्पना ही मोठीच लष्करी घोडचूक ठरली!

वाटेल ती किंमत देऊन दिएन-बिएन-फू जिंकायचेच या ईर्षेने व्हिएत-मिन्ह सैन्य लढत होते. याउलट फ्रेंच सैन्य केलेल्या घोडचुकीने भांबावून गेलेले होते.

फ्रान्सचा चीफ ऑफ स्टाफ जनरल पॉल एली हा घाईघाईने इंडोचायनाला भेट देऊन वॉशिंग्टनला गेला. त्याने अध्यक्ष आयसेनहॉवर व डल्लेस यांना स्पष्ट कल्पना दिली, की जनरल नावरे याने मोठा लष्करी घोटाळा केला असून, दिएन-बिएन-फू येथील लढाई हातातून गेल्यासारखीच आहे. अमेरिकेला जर काही करावयाचे असेल तर अवधी अगदी थोडा आहे.

## चर्चिल साथ देईनात

लगेच डल्लेस यांची धावपळ सुरू झाली. इंग्लंडचे पंतप्रधान चर्चिल यांची गाठ घेण्यासाठी डल्लेससाहेब १२ एप्रिलला लंडनला दाखल झाले. व्हिएतनाममध्ये अमेरिकन सैन्य उतरवण्यासाठी डल्लेस यांना इंग्लंडचा पाठिंबा हवा होता! जिनिव्हा येथील बैठक २७ एप्रिलला सुरू होणार होती. तत्पूर्वीच अमेरिकन सैन्य व्हिएतनाममध्ये उतरवता यावे यासाठी ही धावपळ होती. नऊ तास चर्चिल यांचेबरोबर बोलणी झाली. परंतु जिनिव्हा बैठकीपूर्वी घाईघाईने निर्णय घेण्यास चर्चिल उत्सुक दिसेनात. अमेरिकन सरकार अशा बाबतीत जितका निर्लज्ज व्यवहार करू शकते, तो चर्चिल याच्यासारख्या सनदशीर साम्राज्यवाद्यालाही परवडणारा नव्हता.

डल्लेससाहेब लंडनहून पॅरीसला आले. तेथे फ्रेंच सरकारकडे आलेले दिएन-बिएन-फूच्या लढाईतील दुर्दशेचे ताजे वृत्त त्यांनी ऐकले. फ्रेंच सरकारने डल्लेस यांना स्पष्ट कल्पना दिली की सैन्य पाठवण्याची वेळही निघून गेली आहे. काही करायचे असेल तर ते आता विमान दलानेच करावयाचे आहे.

विमानदल यावेळी एकच काम करू शकत होते. ॲटमबाँबचा पुनः एकदा वापर! डल्लेस प्रत्यही म्हणत आले होते, ‘आम्ही वेळ पडली तर अशी शस्त्रे कम्युनिस्टांविरुद्ध वापरू, की ज्यांचे परिणाम इंडोचायनापुरतेच मर्यादित राहणार नाहीत!’

अध्यक्ष आयसेनहॉवर यांनी पुढे एका दूरचित्रवाणीवरील मुलाखतीत सांगितले, ‘त्यावेळी ॲटमबाँबचा कसा काय वापर केला असता हे मला तरी कळत नाही! दिएन-

बिएन-फू भोवतालची जंगलेदेखील ज्यामुळे उद्ध्वस्त आणि बेचिराख झाली असती, अशा अणुस्फोटातून दिएन-बिएन-फू आणि तेथील फ्रेंच सैनिक कसे काय वाचले असते?'

डल्लेस पॅरीस येथे असतानाच दिएन-बिएन-फू च्या लढाईची अखेर जवळ येत होती. डल्लेस यांनी अध्यक्ष आयसेनहॉवर यांना तार केली –

> 'दिएन-बिएन-फू येथील परिस्थिती दारुण आहे. बी-२९ विमाने धाडायला हवीत किंवा शरणागती तरी पत्करायला हवी आहे. बिडॉल्ट हा अगदीच मोडल्यासारखा झाला आहे. परंतु केवळ दिएन-बिएन-फू ची लढाई हातातून गेली म्हणून इतके हातपाय गाळण्याचे मला कारण दिसत नाही. त्याचे लष्करी महत्त्व उगाचच वाढवण्यात आले आहे.'

जिनिव्हा बैठक होण्यापूर्वी अमेरिकेने व्हिएतनाम युद्धाची व्याप्ती वाढवणारी कोणतीही गोष्ट करू नये असे ठाम मत चर्चिल व परराष्ट्रमंत्री अँथनी ईडन यांनी व्यक्त केल्यामुळे डल्लेस यांचा लगेच काही करण्याचा बेत ढासळला. अध्यक्ष आयसेनहॉवर हा प्रत्यक्ष लढाईचा अनुभव असलेला माणूस अध्यक्ष होता. दिएन-बिएन-फू वाचवणे यावेळी शक्य नव्हते हे त्याला समजत होते आणि एका पराजयाने लढाई संपत नाही असा त्याचा विश्वासही होता. अध्यक्ष आयसेनहॉवर यांनी डल्लेस यांना फक्त जिनिव्हा बैठकीला जाण्यास सांगितले.

## जिनिव्हा येथील कोंडाळे

२७ एप्रिलला जिनिव्हा येथे सुरू झालेल्या बैठकीला लाल चीनचे परराष्ट्र मंत्री चौ-एन्-लाय् यांनी हजर राहाण्यास अमेरिकेने घेतलेली आडकाठी अमेरिकेनेच दूर केली होती. लाल चीनला मान्यता देऊन त्या देशाला राष्ट्रसंघाचा घटक करावा असे ब्रिटिश सरकारचे व रशियाचे मत होतेच. विरोध काय तो अमेरिकेचाच होता. तो या बैठकीपुरता मागे घेण्यात आला होता.

जिनिव्हा बैठकीला येण्यापूर्वी चौ-एन्-लाय् यांनी हो-चि-मिन्ह व पंडीत नेहरू यांचीही भेट घेतलेली होती. पंचशील तत्त्वांचा उद्घोष आशियात झालेला होता. या पार्श्वभूमीवर या बैठकीत चौ-एन्-लाय् यांची उपस्थिती ही महत्त्वाची ठरणार होती आणि तशी ती ठरलीही.

४ मे ला डल्लेससाहेब अमेरिकेच्या प्रतिनिधित्वाची जबाबदारी बेडेल स्मिथ यांच्यावर टाकून जिनिव्हातून निघून गेले. कारण बैठकीचा एकंदर सूर व्हिएतनामच्या युद्धात शस्त्रसंधी घडवून आणावा असाच लागला होता. जर या विरोधी काही करावयाचे झाले, तर आपण या निर्णयाचे वेळी हजरच न राहणे हे डल्लेस यांना सोईस्कर वाटले असावे.

या बैठकीला उत्तर व्हिएतनामचे प्रतिनिधी म्हणून फाम-व्हान-डाँग हे हजर झाले होते.

'D.B.F. Fini'

बैठकीच्या सुरुवातीला कोरियाचा प्रश्न चर्चेला पुढे आला. ७ मे ला सकाळपर्यंत ही चर्चा संपत आली होती. आता लवकरच व्हिएतनामचा प्रश्न चर्चेला पुढे येणार होता. तितक्यात फ्रान्सचे परराष्ट्र मंत्री बिडॉल्ट यांचे हातात त्यांच्या सहकाऱ्याने एक तार आणून दिली. बिडॉल्ट यांनी तार वाचली. त्यांचा चेहरा काळानिळा झाला. त्यांच्या तोंडातून शब्द फुटेना. तारेत शब्द होते –

'D.B.F.Fini'

दिएन-बिएन-फू पडले होते! झालेल्या पराभवाची भीषणता बिडॉल्ट यांच्या चेहऱ्यावर स्पष्टपणे दिसतच होती. हाच चेहरा काही महिन्यांपूर्वी उर्मट आणि उद्दाम होता, यावर त्या क्षणी कुणी विश्वासही ठेवला नसता!

n

# १२ : दिएन-बिएन-फू पडले!

दिएन-बिएन-फू येथे जनरल जिॲप याने फ्रेंचांवर जो लष्करी विजय मिळवला तो व्हिएतनाम युद्धातील एक सर्वात मोठा निर्णायक विजय होता. या लढाईचे भवितव्य काय ठरते यावर जनरल नावरे या फ्रेंच सेनानीचे युद्धातील पुढील सर्व डावपेच अवलंबून होते. ५६ दिवस हा संग्राम चालला. विजयाचे पारडे कधी इकडे तर कधी तिकडे झुकत होते. परंतु विलक्षण सापळ्यात फ्रेंच सैन्य अडकल्यामुळे फ्रेंचांची दुर्दशा अटळ झाली. या युद्धातील अखेरच्या पर्वात म्हणजे १ मे ते ७ मे १९५४ या काळात जिॲपने सुमारे तीन लाख व्हिएत-मिन्ह सैनिक या युद्धात लोटले होते. ४ मे १९५४ या दिवशीच फ्रेंचांनी विजयाची आशा सोडली आणि जिनिव्हा येथे लढाईच्या वार्तेची मार्गप्रतीक्षा करणारा फ्रेंच परराष्ट्र मंत्री बिडॉल्ट याच्या हातात मागील प्रकरणात सांगितल्याप्रमाणे तार पडली. 'दिएन-बिएन-फू ची लढाई फ्रेंचांनी गमावली आहे.'

## पराभवाच्या छायेतील उचापती

दिएन-बिएन-फू वर व्हिएत-मिन्हचे निशाण प्रत्यक्ष रोवायला ७ मे उजाडला. या लढाईत सुमारे १६००० फ्रेंच सैनिक ठार झाले वा पकडले गेले. यात एक जनरल, सोळा कर्नल्स आणि सुमारे १८०० फ्रेंच लष्करी अधिकारी होते. यावरून लष्करी पराभवाच्या गंभीरतेची कल्पना येईल. पराभवापूर्वीची काही हकीगत आता उजेडात आली आहे. नुकत्याच प्रकाशात आलेल्या 'पेंटॅगॉन पेपर्स' या अमेरिकेच्या राजनैतिक कागदपत्रांवरून असे स्पष्ट दिसते, की दिएन-बिएन-फू वाचवण्याकरता व्हिएतनाम युद्धात लष्करी हस्तक्षेप करण्याची कल्पना जनरल रिजवे (कोरियातील अमेरिकेचा लष्करी कमांडर) याच्या विरोधामुळे अमेरिकेच्या राज्यकर्त्यांना सोडून द्यावी लागली. ४ एप्रिल १९५४ या दिवशी अध्यक्ष आयसेनहॉवर यांनी सेक्रेटरी ऑफ स्टेट डल्लेस यांचेशी बोलणी करून अखेर हा निर्णय घेतला.

वरील निर्णयाला चोवीस तास होतात न होतात, तोच अमेरिकेचे फ्रान्समधील वकील डग्लस धिलॉन यांची ५ एप्रिलला डल्लेस यांना तार आली. या तारेत मजकूर होता –

'काल रविवारी रात्री ११ वाजता मला बिडॉल्ट यांनी बोलावणे धाडले. पंतप्रधान लानिएल यांच्या ऑफिसात माझे बिडॉल्ट यांनी स्वागत केले. थोड्याच वेळात पंतप्रधान लानिएल आले. सर्वांनी मला आग्रह केला की काहीही करून अमेरिकेने विमानवाहू बोटी आणून दिएन-बिएन-फू वाचवले पाहिजे.

‘जनरल नावरे यांनी पाठवलेल्या ताज्या अहवालानुसार फ्रेंच छत्रीधारी सैनिक ज्या संख्येने दिएन-बिएन-फू येथे उतरत आहेत, त्याच्या कितीतरी पटीने जनरल जिॲपच्या सैनिकांची संख्या सारखी वाढते आहे. आठवडा अखेर किंवा पंधरा दिवसांत व्हिएत-मिन्ह पुनः निर्णायक चढाईला सुरुवात करतील अशी अपेक्षा आहे. जर आपली मदत आली नाही, तर दिएन-बिएन-फू चे भवितव्य ठरल्यासारखेच आहे. जनरल नावरे यांनी कळवले आहे की, लढाई वाचवणे केवळ अमेरिकेच्या मदतीने शक्य होईल.

‘फ्रेंचांच्या सांगण्याप्रमाणे चिनी कम्युनिस्ट जनरल लि-चेन हा जिॲपबरोबर लढाईत प्रत्यक्ष मार्गदर्शन करतो आहे. दुसरी गोष्ट, सर्व टेलिफोन, तारायंत्रे ही चिनी सैनिक चालवित आहेत. चिन्यांनी कोरियाच्या लढाईतून मोकळ्या झालेल्या चाळीस विमानविरोधी तोफा व रडार यंत्रे दिएन-बिएन-फू येथे हालवली आहेत. सुमारे एक हजार ट्रक भरून शस्त्रास्त्रे, दारूगोळा, बंदुका चिनी सैनिकांनी व्हिएन-मिन्ह सैनिकांना आतापर्यंत पुरवल्या आहेत.

‘बिडॉल्ट याचे म्हणणे आहे की दिएन-बिएन-फू च्या लढाईत चिनी कम्युनिस्टांनी प्रत्यक्ष हस्तक्षेप केलेला असल्याने, अमेरिकेने या युद्धात उतरणे हे नितांत आवश्यक आहे. या लढाईवर दक्षिणपूर्व आशियातील राजकारणाचे भवितव्य अवलंबून असल्याने आम्ही अमेरिकेला मदतीचे आवाहन सतत करीत आहोत.’

अध्यक्ष आयसेनहॉवर यांच्या आदल्या दिवशीच्या निर्णयानुसार, सेक्रेटरी ऑफ स्टेट डल्लेस यांनी धिलॉन यांना तारेने कळवले –

‘काहीही करण्यापूर्वी अमेरिकन काँग्रेसची संमती घ्यावी लागेल. जे काही करावयाचे ते ब्रिटन आदी राष्ट्रांच्या पाठिंब्यानेच करायचे आहे. ब्रिटिशांचे मलाया, ऑस्ट्रेलिया, न्युझीलंड या विभागातील हितसंबंध वाचवण्यासाठी, एकट्या अमेरिकेला काहीही करण्याची इच्छा नाही. ब्रिटिशांनी उच्च स्तरावर याबाबत बोलणे चालू आहे.

## जिनिव्हा येथील धावपळ

सबंध एप्रिल महिना पॅरिस-वॉशिंग्टन-लंडन या त्रिकोणात धावपळ सुरू होती. बोलणी चालू होती. तारांची फेकाफेक केली जात होती. या पार्श्वभूमीवर २६ एप्रिल १९५४ या दिवशी जिनिव्हा येथे अनेक राष्ट्रप्रतिनिधींची परिषद सुरू झाली.

१८ फेब्रुवारी १९५४ ला बर्लिन येथे बड्या चौघांचा जो करार झाला, त्यानुसार ही परिषद भरत होती. बर्लिन येथे ब्रिटन, फ्रान्स, अमेरिका व रशिया यांनी असे ठरवले की कोरियाच्या संघर्षाच्या शांततामय मार्गाने निर्णय लावण्यासाठी ‘जिनिव्हा’ येथे २६ एप्रिलला बड्या चौघांनी पुनः जमावे. परंतु या परिषदेसाठी सर्व संबंधित राष्ट्रांचे प्रतिनिधी

बोलवावेत. याच परिषदेत बड्या चौघांबरोबर, लालचीन आणि इतर संबंधीत राष्ट्रे यांनी इंडोचायनात शांतता स्थापन करण्याच्या दृष्टीने विचार करावा.

बड्या राष्ट्रांनी या निर्णयामुळे अशी अप्रत्यक्ष कबुलीच दिली होती, की यापुढे आशियातील राजकीय प्रश्नाची चर्चा ही कम्युनिस्ट चीनला वगळून करणे वस्तुस्थितीला धरून होणार नाही. आशियाच्या राजकारणात कम्युनिस्ट चीन यापुढे बड्यांच्या मांडीला मांडी लावून बसणार असा याचा अर्थ होता आणि म्हणून जिनिव्हा परिषदेला चौ-एन-लाय हजर झालेले होते.

या परिषदेचे महत्त्व लक्षात घेऊन, व्हिएत-मिन्हचा प्रतिनिधी म्हणून अध्यक्ष हो याने आपला तीस वर्षांचा विश्वासू सहकारी फाम-व्हान-डाँग याला पाठवले होते.

परिषदेसाठी आलेल्या इंग्लंड, अमेरिका व फ्रान्स या राष्ट्रांत, व्हिएतनाम प्रश्नावर सर्व गोंधळ होता! इंग्लंडला व्हिएतनामचा प्रश्न कोरियाच्या प्रश्नाप्रमाणे देशाची फाळणी करून सोडवणे इष्ट वाटत होते. अँथनी ईडन यांचा हाच आग्रह होता. दिएन-बिएन-फू पडण्याची बातमी येईपर्यंत फ्रेंच परराष्ट्रमंत्री बिडॉल्ट आणि डल्लेस यांच्यात मोठ्या प्रमाणावर अमेरिकेने व्हिएतनाम युद्धात हस्तक्षेप करण्यासंबंधी चर्चा चालू होती. अमेरिकेच्या लढाईतील प्रत्यक्ष हस्तक्षेपाला अँथनी ईडन अनुकूल नव्हते. फ्रेंच पंतप्रधान लानिएल याला अमेरिकन सेनेने फ्रेंचांची लढाई लढावी हे पसंत नव्हते. आणि अमेरिकन सेनानींचा तर अशा प्रत्यक्ष हस्तक्षेपाला, वॉशिंग्टनमध्ये विरोधच दिसत होता. परिषदेत या प्रकारच्या फाटाफुटीमुळे काय होणार याचा अंदाज घेवून डल्लेस यांनी ४ मे १९५४ या दिवशीच परिषदेतून पोबारा केला. अमेरिकेच्या प्रतिनिधीत्वाची सूत्रे बेडेल स्मिथ या दुय्यम अधिकाऱ्याकडे देण्यात आली. उद्या परिषदेत उत्तर व्हिएतनामच्या कम्युनिस्ट राजवटीवर शिक्का-मोर्तब करणारा समझोता झालाच तर आपण त्यात सामील नव्हतो असा कांगावा करण्याचा पर्याय राखून ठेवण्यासाठीच डल्लेस या बैठकीतून पळाले होते.

२६ एप्रिल ते ४ मे परिषदेत कोरियाच्या प्रश्नावर निष्फळ काथ्याकूट झाला. ज्या दिवशी व्हिएतनामची चर्चा सुरू झाली, त्याच दिवशी दिएन-बिएन-फू वर व्हिएतमिन्हचे निशाण फडकले. लष्करी विजयाप्रमाणेच हा एक मोठा राजनैतिक विजयही ठरला. फ्रेंच परराष्ट्र मंत्री बिडॉल्ट यांनी या पराभवाने तर हाय खाल्ली होती असे दिसते. कारण ५ किंवा ६ मे लाच त्यांनी व्हिएतनाममध्ये शस्त्रसंधीला फ्रान्स तयार असल्याचे सूतोवाच केले असावे.

'पेंटॅगॉन पेपर्स' मध्ये अध्यक्ष आयसेनहॉवर यांच्या कचेरीत ७ मे ५४ ला जी बैठक झाली त्याचा अहवाल दिलेला आहे. त्यात खालील निर्णयाचा विचार नमूद आहे.

१) बिडॉल्ट यांच्या प्रस्तावाला पाठिंबा देऊ नये.

२) याची कारणे.

अ) जिनिव्हा परिषदेत शस्त्रसंधीचा प्रस्ताव आला तर व्हिएतनाम युद्धात लढण्याची फ्रेंच सैन्याची उरली सुरली ईर्षाच नष्ट होईल.

ब) शस्त्रसंधी कम्युनिस्ट प्रामाणिकपणे पाळणार नाहीत.

क) जर पुढील पाच अटी फ्रेंचांना मान्य असतील तर अमेरिका, व्हिएतनाम युद्धात उतरण्याची परवानगी मागणारा प्रस्ताव अमेरिकन सिनेटपुढे मांडील. या अटी अशा –

अ) युद्धात अमेरिकेला स्वातंत्र्य राहावे.

ब) स्थानिक जनतेला युद्धशिक्षण देण्याची जबाबदारी अमेरिका घेईल.

क) सर्व लष्करी शिक्षणाची जबाबदारी अमेरिकेवर असेल.

ड) या युद्धात फ्रेंच सैनिकही अमेरिकन सेनेबरोबर लढतील.

या बैठकीनंतर डल्लेस यांनी १२ मे १९५४ ला बेडेल स्मिथ यांना जिनिव्हा परिषदेत अमेरिकेने काय भूमिका घ्यावी यासंबंधी गुप्त सूचना धाडल्या. त्यातील महत्त्वाच्या या होत्या.

१) ज्या राष्ट्रांना अमेरिकेची मान्यता नाही अशा कम्युनिस्ट चीन आदी देशांच्या प्रतिनिधींशी आपण कसलीही प्रत्यक्ष बोलणी करू नयेत.

२) इंडोचायनाच्या प्रश्नावर जिनिव्हा परिषदेत अमेरिकेचा प्रतिनिधी हजर आहे, तो केवळ एक हितचिंतक देशाचा प्रतिनिधी म्हणून! या झगड्यात अमेरिका आक्रमक देश नाही किंवा या वाटाघाटीत अमेरिकेला फारसे महत्त्वही नाही.

३) लाओस, कंबोडिया आणि व्हिएतनाम या तिन्ही देशात अस्तित्वात असलेली कायदेशीर सरकारे धोक्यात आणील, असा कोठलाही शस्त्रसंधीचा किंवा अन्य प्रकारच्या समझोत्याचा प्रस्ताव पुढे आला, तर अमेरिकेची त्याला मान्यता असणार नाही. कम्युनिस्ट हुकूमशाहीच्या जोखंडाखाली या प्रदेशातील जनता जाऊ नये.

४) या सूचनांच्या अनुषंगाने आपण फ्रान्सच्या प्रतिनिधींबरोबर सहकार्य करावे.

या सूचना अगदी स्पष्ट होत्या. अमेरिका, अध्यक्ष हो याचे सरकार हे कायदेशीर सरकार मानित नव्हती. यामुळे हो-चि-मिन्ह सरकारला व्हिएतनाम भूमीवर कायदेशीर स्वामित्व देणारी कसलीही योजना जिनिव्हा परिषदेपुढे आली तर अमेरिका ती ठोकरणार होती.

## नव्या फ्रेंच पंतप्रधानांचा धक्का

अँथनी ईडन व रशियाचा परराष्ट्रमंत्री मोलोटॉव्ह यांनी जिनिव्हा परिषदेत आता पुढाकार घेऊन व्हिएतनाममध्ये शस्त्रसंधी घडवून आणण्याच्या योजनेला गती दिली होती. युद्ध थांबवायला फ्रेंच उत्सुक होते आणि चौ-एन-लाय व फाम-व्हान-डाँग हे दोघे रशियाच्या दडपणाखाली शस्त्रसंधी पत्करतील असे वाटत होते. सबंध मे महिना या वाटाघाटीत गेला. जून उजाडला आणि वाटाघाटींना निर्णायक धक्का देणारी घटना फ्रान्समध्ये घडली. १२ जून १९५४ या दिवशी फ्रेंच पंतप्रधान लानिएल यांच्या मंत्रिमंडळाने राम म्हटला! मेंडेस फ्रान्स हा नवा पंतप्रधान सत्तेवर आला. सत्ताग्रहण करतानाच मेंडेस फ्रान्स याने घोषणा केली –

> 'चार आठवड्याच्या आत मी व्हिएतनाम प्रश्नावर सन्माननीय तडजोड घडवून आणीन. जर २० जुलैपर्यंत समझोता झाला नाही तर मी राजीनामा देईन!'

इतक्या नाट्यमय रितीने नव्या फ्रेंच पंतप्रधानांनी समझोत्याची निकड लावताच जिनिव्हा परिषदेचा नूर एकदम पालटला. शस्त्रसंधी करायचाच आहे, युद्ध थांबणारच आहे, तर ते कुठल्या रेषेवर थांबावे? लष्करी देवाण घेवाण काय करायची? या प्रश्नाचा खल फ्रेंच, सायगावचे व्हिएतनामी प्रतिनिधी, हो-चि-मिन्ह चे प्रतिनिधी यांनी न करता त्या त्या शिष्टमंडळातील लष्करी सभासदांनी तो करावा असे ठरवून जिनिव्हा परिषदेतून सर्व परराष्ट्र मंत्र्यांनी एकवीस दिवसांची सुटी घेतली!

चौ-एन-लाय यांच्याशी बोलणी करण्याची सुद्धा अमेरिकेच्या प्रतिनिधीला मनाई असली, तरी शस्त्रसंधी होणार की नाही यासंबंधीची बहुतांशी जबाबदारी ही चौ-एन-लाय यांचेवर टाकण्यात आली होती. अध्यक्ष हो-चि-मिन्ह यांच्याशी प्रत्यक्ष संबंध असलेली फक्त हीच एक व्यक्ती होती आणि अध्यक्ष हो याच्या संमतीशिवाय जिनिव्हामधील निर्णयाला काहीच अर्थ राहाणार नव्हता.

फ्रेंच पंतप्रधान मेंडेस फ्रान्स यांना बर्न येथे २३ जूनला भेटून चौ-एन-लाय तडक अध्यक्ष हो याच्या भेटीसाठी निघाले. वाटेत दिल्ली येथे पंडीत नेहरूंची त्यांनी भेट घेतली व रंगूनला अध्यक्ष नू यांच्याशी बोलणी करून, चौ-एन-लाय पेकिंगला परतले. ३ जुलै ते ५ जुलै चौ-एन-लाय व अध्यक्ष हो यांची चीन-व्हिएतनाम सरहद्दीवर कुठेतरी प्रदीर्घ भेट झाली. दोघांनी शस्त्रसंधीच्या किमान अटी निश्चित केल्या. व्हिएतनामचे विभाजन तूर्त पत्करावे, परंतु सायगाव सरकारच्या ताब्यातील प्रदेशात निवडणुका घेण्याची अट घालावी असे उभयतांनी ठरवले.

शस्त्रसंधीच्या अटी ढोबळमानाने आता सर्वत्र चर्चिल्या जात होत्या. उद्या व्हिएतनाममध्ये शांतता प्रस्थापित झाली, उत्तर व्हिएतनाममध्ये अध्यक्ष हो-चि-मिन्ह याच्या कम्युनिस्ट तोंडवळ्याचा अंमल प्रस्थापित झाला की आज नाही तरी कालांतराने

सबंध व्हिएतनाम कम्युनिस्ट गटात दाखल होईल या भीतीने, अमेरिकेच्या राज्यकर्त्यांना ग्रासलेले होते. हा समझोता होऊ नये, पण झालाच तर त्यातील कराराला कसा हरताळ फासावा, या दृष्टीने अमेरिकेची पावले लगेचच पडू लागलेली स्पष्ट दिसतात.

## अमेरिकेची मळमळ

७ जुलै ५४ ला बेडेल स्मिथ यांना जिनिव्हा येथे धाडलेल्या तारपत्रात डल्लेस यांनी कळवले होते –

'व्हिएतनाममध्ये निवडणुका होणार याचा निःसंदिग्ध अर्थ हाच की कालांतराने व्हिएतनाम अखंड होऊन तो हो-चि-मिन्ह याच्या कब्जात जाणार असे असल्याने शस्त्रसंधीनंतर या निवडणुका जितक्या विलंबाने होतील हे पाहाणे चांगले. म्हणजे लोकशाहीवादी गटाला जयाची काहीतरी आशा राहील. म्हणून निवडणुकीची नक्की तारीख समझोत्यात पक्की करू नये-'

अमेरिकेचे मन जिनिव्हा येथील वाटाघाटीबाबत स्वच्छ नाही, प्रांजळही नाही याचा सुगावा सर्वांनाच लागलेला होता. साहजिकच चौ-एन-लाय यांनी असा आग्रह धरला की, जिनिव्हा परिषदेचा एक हजर असलेला घटक म्हणून अमेरिकेची व्हिएतनाम समझोत्यावर संमतीची सही हवी. फ्रान्स व ब्रिटन यांनी व्हिएतनामची फाळणी करणारा करारनामा हो-चि-मिन्ह यांच्याशी ठरवला व युद्ध बंद होण्याचे ठरले तर अमेरिकेचा त्याला विरोध होणार नाही असे आश्वासन अध्यक्ष आयसेनहॉवर यांनी या दोन्ही राष्ट्रांना दिलेले असल्याने, जरी कदाचित अमेरिकेच्या प्रतिनिधीने करारावर सही नाकारली तरी करार घडवून आणायचाच असे मेंडेस फ्रान्स व ईडन यांनी नक्की ठरवले होते. मेंडेस फ्रान्स हा २० जुलैच्या आत व्हिएतनाममध्ये शस्त्रसंधी करायला वचनबद्ध होता आणि अँथनी ईडन यांना व्हिएतनामच्या युद्धाची व्याप्ती वाढवायची मुळीच इच्छा नव्हती.

१४ जुलैला फ्रेंच पंतप्रधान मेंडेस फ्रान्स व ब्रिटनचे परराष्ट्र मंत्री अँथनी ईडन हे दोघे जिनिव्हाला दाखल झाले. परिषद पुन्हा सुरू झाली. बेडेल स्मिथ यांना परिषदेला हजर राहण्याची परवानगी वॉशिंग्टनहून आल्याने तेही जिनिव्हाला दाखल झाले. व्हिएतनामची फाळणी नक्की झाली होतीच. रेषेची ओढाताण सुरू होती. डाँग याला फाळणी १३ व्या अक्षांश रेषेवर हवी होती. तर फ्रेंचांनी २१ व्या अक्षांश रेषेचा आग्रह धरलेला होता. अखेर तडजोड झाली आणि १७ व्या अक्षांश रेषेवर फाळणी निश्चित करण्यात आली. या अक्षांशावर फाळणी पत्करण्यासाठी मोलोटोव्ह आणि चौ-एन-लाय यांना अध्यक्ष हो याचा प्रतिनिधी फान-व्हान-डाँग याच्यावर प्रेमाचे दडपण आणावे लागले.

## हाच तो जिनिव्हा करार

२१ जुलै १९५४ या दिवशी जिनिव्हा करारावर संबंधित राष्ट्रांच्या प्रतिनिधींच्या सह्या झाल्या. व्हिएतनाम, लाओस आणि कंबोडिया या तिन्ही देशातील युद्ध थांबवण्यासाठी वेगवेगळे करार झाले. व्हिएतनामविषयक कराराच्या अटी अशा होत्या –

(अ) १७ व्या अक्षांशावर व्हिएतनामचे, उत्तर व्हिएतनाम व दक्षिण व्हिएतनाम असे दोन भाग करण्यात यावेत. उत्तर व्हिएतनाम- ज्यात हनोई आणि मुख्यतः लाल नदीचा त्रिभुज प्रदेश येत होता या ठिकाणी हो-चि-मिन्ह यांचे सरकार हे अधिकृत सरकार राहील. दक्षिण व्हिएतनामावर सम्राट बाओदाईचे सायगाव येथील सरकार राज्य करील.

(ब) दोन्ही विभागांत नवे सैन्य कुणीही आणावयाचे नाही किंवा नवे लष्करी तळ उभारावयाचे नाहीत. इतकेच नव्हे तर या दोन विभागांनी कुठल्याही लष्करी गटात सामील व्हायचे नाही.

(क) व्हिएतनामची फाळणी ही तात्पुरती समजली जाईल व सर्व देशभर जुलै १९५६ मध्ये निवडणुका होतील व नंतर अखंड व्हिएतनाम अस्तित्वात यायचा की नाही ते ठरेल.

(ड) शस्त्रसंधीची अंमलबजावणी व निवडणुकीची व्यवस्था करण्यासाठी तीन तटस्थ राष्ट्रांचे एक कमिशन नेमण्यात आले. (भारत, पोलंड व कॅनडा हे या मंडळाचे सभासद झाले.)

२१ जुलै ५४ चा करार जिनिव्हा येथे आकार घेत असताना बेडेल स्मिथ यांचा 'अल्सर' त्यांना फारच त्रास देऊ लागला! ते आजारी पडल्याचे जाहीर झाले!

२१ जुलैला दुपारी जिनिव्हा येथील 'पॅलेस-देस-नेशन्स' या इमारतीच्या उपहारगृहात शँपेनच्या बाटल्या फसफसल्या. परिषदेसाठी जमलेले देशोदेशींचे प्रतिनिधी आनंदात आणि समाधानात पोटपूजेला बसले. कुणाच्या पदरात काय पडले याचा हिशेब प्रत्येकजण करीत होता. परिषदेतून निष्पन्न काय झाले? व्हिएतनाममध्ये तूर्त लढाई थांबली. लाओस आणि कंबोडिया यांच्या स्वातंत्र्याला आंतरराष्ट्रीय परिषदेत बड्या राष्ट्रांचा आशीर्वाद मिळाला आणि व्हिएतनामची फाळणी होऊन दोन राज्ये जन्माला आली. परंतु पुढील अशुभ घटनांची पाल सर्वांच्या मनात चुकचुकत होतीच. जिनिव्हा करारावर अमेरिकेच्या प्रतिनिधींची अथवा बाओ-दाई सरकारच्या प्रतिनिधींची सही नव्हती. दोघांनी निरनिराळ्या कारणासाठी सही नाकारली होती.

## रूसू बाई रूसू!

यापैकी अमेरिकेचा प्रतिनिधी बेडेल स्मिथ याने करारावर सही करण्यास नकार दिला, याचे कारण एकतर अमेरिकेन राज्यकर्त्यांच्या मनात कम्युनिस्टांविषयी अतोनात अविश्वास होता. परंतु महत्त्वाचे कारण अमेरिकेला मनातून हा समझोता व्हायलाच नको होता! ईडन, मोलोटोव्ह, मेंडेस फ्रान्स आणि चौ-एन-लाय यांच्या पुढाकारानेच हा समझोता प्रामुख्याने घडून आला होता आणि यात अमेरिकेने काहीच भाग न घेतल्याने त्यांचा 'पापड' मोडला होता. या कराराने हो-चि-मिन्ह याचे कम्युनिस्ट सरकार आशियात अधिकृत सरकार म्हणून मिरवणार याचा विषाद अमेरिकेला लपवता येत नव्हता. परंतु आंतरराष्ट्रीय समझोता ठोकरण्याचे धैर्यही अध्यक्ष आयसेनहॉवर व डल्लेस यांच्यापाशी नसल्याने या कराराचे तोंडदेखले स्वागत करणारे परंतु हो-चि-मिन्ह सरकारला, '१७ व्या अक्षांश रेषेबाहेर येऊन गडबड कराल तर याद राखा,' असे धमकावणारे एक स्वतंत्र पत्रक अमेरिकेने प्रसिद्ध केले. बाओदाईचे सायगाव येथील सरकार हे अमेरिकेच्या पैशावर व लष्करी साहाय्यावर गुजराण करणारे असल्याने, अमेरिकेने तोंड वाकडे करीत का होईना, व्हिएतनाम समझोत्याला आपला संशयग्रस्त आशीर्वाद जाहीर करताच, सायगाव सरकारच्या विरोधाला काहीच किंमत उरली नाही.

फार आनंद वाटावा असे फाम-व्हान-डॉंग यांच्या दृष्टीने काहीच घडले नव्हते. व्हिएतनामची पुरातन राजधानी हुए ही उत्तर व्हिएतनामच्या अंमलाखाली यावी यासाठी १३व्या अक्षांशावर फाळणी करण्याचा त्याचा आग्रह त्याला सोडून द्यावा लागला होता. सर्व देशात लवकरात लवकर निवडणुका घेण्याची त्याची अटही स्वीकारली गेली नव्हती. दोन वर्षानंतर निवडणुका होणार होत्या. पॅथेलाओ या कम्युनिस्ट संघटनेला उत्तर लाओसमध्ये स्वतंत्र स्वायत्त विभाग वेगळा करून देण्यात येईल अशी त्यांची अपेक्षा होती. परंतु लाओससंबंधीच्या करारात हे देखील मान्य झालेले नव्हते.

## करार आणि हो-चि-मिन्ह

उत्तर व्हिएतनामला बराचसा प्रतिकूल असलेला हा जिनिव्हा करार फाम-व्हान-डॉंग याने केवळ आपल्या एकट्याच्या निर्णयावर पत्करला यावर विश्वास ठेवता येत नाही. या निर्णयाला अध्यक्ष हो याची संमती होती आणि देवाण घेवाणीत देवाण अधिक झाली तरी व्हिएतनाममध्ये युद्धबंदी पत्करावी असा अध्यक्ष हो याचा निर्णय झालेला होता.

करारावर सही होण्यापूर्वी सहा दिवस म्हणजे १५ जुलैला पक्ष मेळाव्यापुढे अध्यक्ष हो याचे भाषण झाले. या भाषणाचा वृत्तांत आता उपलब्ध आहे. या भाषणात हो याने सांगितले होते –

'अखेरपर्यंत लढा' हे आतापर्यंत आपले ब्रीदवाक्य होते. परंतु बदललेल्या परिस्थितीत शांतता, राष्ट्रीय ऐक्य, स्वातंत्र्य आणि लोकशाही हे आपण ध्येय मानले

पाहिजे. जेव्हा माणसे वाटाघाटींना बसतात तेव्हा योग्य ती देवाण-घेवाण करावीच लागते. फ्रेंच आपणहून सोडून जायचे म्हणत आहेत. एकदा फ्रेंच सैन्य निघून गेले की स्वतंत्र सार्वभौम राष्ट्र म्हणून व्हिएतनाम फ्रेंच युनियनमध्ये समान दर्जाने राहण्यासंबंधी विचार करू शकेल.'

## लढा गुंतागुंतीचा असतो

देशाच्या होऊ घातलेल्या फाळणीसंबंधी अध्यक्ष हो यांनी खुलासा केला –

> 'विवक्षित भागात लढणारी दोन सैन्य वेगवेगळी एकत्रित करणे, म्हणजे देशाचे विभाजन नव्हे! व्हिएतनाम अखंड व्हावा म्हणून पत्करलेली ही तात्पुरती योजना आहे. यामुळे आमच्या काही बांधवांना, आम्ही ज्यांना शत्रू मानतो अशांच्या ताब्यातील प्रदेशात काळ काढावा लागणार आहे. ते असमाधानी राहणार आहेत. त्यापैकी काही तर उद्विग्न होणार आहेत. काही काळ आमच्या शत्रूंना त्यांचे शोषण करण्याची संधी लाभणार आहे. परंतु सर्व देशाच्या हिताचा विचार करून काही काळ त्यांनी ही कळ सोसली तर सर्व देश त्यांचा उतराई राहील. शांततेचा लढा हा असा गुंतागुंतीचा आणि कठिणच असतो.'

ज्या माणसांनी दिएन-बिएन-फू येथे फार मोठा लष्करी विजय पदरात पाडला होता, आठ वर्षे ज्यांनी निरंतर लढाईतून निर्माण होणारी दुःखे भोगली होती, ज्यासाठी आतापर्यंत ९ लाख ३८ हजार सैनिक व नागरिकांचा बळी दिला गेला होता, ज्याच्या परिणामी दोन तृतीयांश देशावर त्यांना प्रभुत्व मिळाले होते आणि बाओदाईच्या राज्यात ज्यांच्याविषयी प्रेमाचे आणि आदराचे वातावरण क्षणाक्षणाला शतगुणित होत होते अशा माणसांनी देशाचा सर्वात सुपीक भाग सोडून देऊन मागे हटण्याचे पत्करावे आणि बाओ-दाई सरकारला सावरण्याची उसंत द्यावी हे सर्वच लोकविलक्षण होते.

दक्षिण २१-२२ जुलैच्या रात्री जिनिव्हा येथे शस्त्रसंधी करारावर स्वाक्षऱ्या झाल्याचे वृत्त जेव्हा हनोईला पोहोचले, तेव्हा हो-चि-मिन्ह याच्या मनात काय विचार असतील? मार्च १९४६ प्रमाणेच पुनः एकदा आपण हातीतोंडी आलेले फायदे आपखुशीने नाकारले हे बरोबर की चूक? शांतता महत्त्वाची की सांडलेले रक्त महत्त्वाचे? उद्या दक्षिण व्हिएतनाममध्ये निवडणुका होतील तेव्हा आपल्यालाच जनमताचा प्रचंड कौल लाभेल याची शाश्वती आहे काय? अनेक वर्षांच्या सततच्या लढाईनंतर हो-चि-मिन्ह याला कदाचित असेही वाटले असेल की युद्धात संपूर्ण जय अथवा पराजय कुणाच्याच वाट्याला येत नाही. म्हणूनच दिएन-बिएन-फू पडल्याची बातमी जिॲप याने स्वतः त्याला कळवली तेव्हादेखील तो म्हणाला होता.

'विजय केवढाही मोठा असला तरी ही फक्त सुरुवात आहे...'

कसली सुरुवात? अधिक मोठ्या विजयाची की विजयातून निर्माण होणाऱ्या खंतीची?

१० ऑक्टोबर १९५४ या दिवशी युद्धाची भेरी वाजल्यानंतर आठ वर्षांनी आणि दिएन-बिएन-फू येथील विजय पदरात पडल्यापासून पाच महिन्यांनी हो-चि-मिन्हने पुनश्च हनोईत पाऊल टाकले. नागरिकांच्या स्वागताचा उत्साह जबर होता. परंतु लोकांना उत्सुकता होती ती जनरल जिॲपच्या दर्शनाची. त्याच्या लाल सेनेच्या विजयी संचलनाची.

व्हिएतनाममधून फ्रेंचांचे सैन्य व नागरिक काढून घ्यायचे होते. फ्रेंच व हो-चि-मिन्ह यांच्यात वाटाघाटी होऊन पुढील संबंध ठरायचे होते. फ्रेंचांचा वकील प्रतिनिधी हनोईला यायचा होता. फ्रेंच पंतप्रधान मेंडेस फ्रान्स यांना यावेळी आठवण झाली ती जीन सेंटनी याची. हो-चि-मिन्हशी त्याचे मित्रत्वाचे संबंध होते आणि जीन सेंटनीला हनोईला पाठवता आले तर पुढील संबंध खेळीमेळीच्या वातावरणात आकाराला येतील असा सर्वांनाच विश्वास होता. मेंडेस फ्रान्स आणि इटलीत सुट्टी घालवण्यासाठी गेलेल्या जीन सेंटनीला पॅरीसला बोलावून घेतले व हनोईला जाण्यासाठी त्याचे मन वळवले.

## जीन सेंटनीचे पुनरागमन

७ नोव्हेंबरला फ्रेंचांचा 'डेलिगेट जनरल' म्हणून जीन सेंटनी हनोईला दाखल झाला. त्याला शंका वाटत होती की आता स्वतंत्र देशाचा अध्यक्ष झालेला हो, पूर्वीच्याच मित्रत्वाने वागतो की नाही? परंतु जीन सेंटनीचे पाऊल अध्यक्ष हो याच्या निवासाच्या दरवाजात पडताच हो याने त्याला पूर्वीप्रमाणेच प्रेमभराने मिठी मारली. जीन सेंटनीच फ्रेंचांचा प्रतिनिधी म्हणून आला, याचा आनंद हो याला लपवता येत नव्हता. त्याच्या डोळ्यातून आंनदाश्रू ओघळू लागले. जीन सेंटनी बरोबरच्या फ्रेंच लष्करी जनरलला हो म्हणाला –

'आपण आतापर्यंत एकमेकांशी खूप धक्काबुक्की केली. आता हे सर्व विसरून आपण यापुढे पन्नास टक्के वाटा उचलून पुढची वाटचाल करू या.'

परंतु अशा गोडव्याने मुत्सद्यांना अधिकच गोंधळात पडायला होते. महात्माजींनी लॉर्ड मौंटबॅटनला जिंकले त्या पद्धतीने हो-चि-मिन्ह हा जीन सेंटनीशी वागत होता. जेवणाची निमंत्रणे त्याला वारंवार मिळत आणि हो यांच्या आग्रहानंतर जीन सेंटनी याला 'नाही' म्हणता येत नसे.

जीन सेंटनी हनोईला वकील सदृश प्रतिनिधी म्हणून आला असला, तरी फ्रेंचांचे खरे प्रेम होते ते सायगाव येथील बाओदाई सरकारवर. फ्रेंचांच्या उरावर बसून हनोईचे

सिंहासन निर्माण झाले होते. हा इतिहास इतक्या लवकर विसरणे त्यांना कठीण जात होते. सायगावचे सरकार हेच व्हिएतनामचे अधिकृत सरकार हा तमाशा चालू ठेवण्यासाठी फ्रेंचांचा वकील हा सायगावलाच राहणार होता. हनोईला वकिलातीचा दर्जा देण्यास फ्रेंच उत्सुक नव्हते. हनोईचा वकील पॅरीसला यायला फ्रेंच राज्यकर्त्यांचा विरोधच होता.

यामुळे वरून कितीही अघळपघळ दिसत असला तरी वर्षभरातच पॅरीस-हनोई संबंधात किल्मिषे निर्माण व्हायला सुरुवात झाली. पहिली गोष्ट म्हणजे जुलै १९५६ मध्ये जिनिव्हा करारानुसार, व्हिएतनाममध्ये निवडणुका घेण्याचे काहीच चिन्ह दिसेना! जिनिव्हा करारावर फ्रेंच प्रतिनिधींची सही होती आणि करारानुसार निवडणुकांचा आग्रह धरणे हे पॅरीस सरकारचे काम होते. परंतु फ्रेंच पंतप्रधानावर वॉशिंग्टनचे डोळे सतत वटारलेले होते. सायगाव सरकारला निवडणुकात आपले काय होणार याचे चित्र दिसत असल्याने त्यांना निवडणुका नकोच होत्या. वॉशिंग्टनला बिथरवून शिवाय सायगाव सरकार धोक्यात आणणाऱ्या निवडणुका घेण्याचा आग्रह धरण्याची इच्छा व धमक फ्रेंच पंतप्रधानात नव्हती.

## हंगेरीतील वादळ

याच सुमारास युरोपात एक कम्युनिस्ट सत्ताविरोधी वादळ रोरावू लागले. हंगेरीत गडबड सुरू झाली. इम्रे नागीसाठी विद्यार्थी आणि कामगार यांनी स्टॅलिनवादी राकोसी याच्या सरकारविरुद्ध बंडाचे निशाण उभारले. ऑक्टोबर १९५६ मध्ये प्रत्यक्ष कृतीस सुरुवात झाली. २३ ऑक्टोबर १९५६ या दिवशी बुडापेस्टला हंगेरीतील जनता रस्त्यावर आली. दिवसभर निदर्शने चालू होती. रात्रौ ९-३० वाजता बुडापेस्ट शहरातील मध्यवर्ती चौकात उभारलेला स्टॅलिनचा पुतळा लोकांनी उखडून टाकला. परंतु हा तात्कालिक विजय ठरला! घाबरलेल्या हंगेरियन कम्युनिस्ट सरकारने रशियाकडे मदत मागितली आणि २४ ऑक्टोबरला सकाळी पहिली सोव्हिएट टँकदले बुडापेस्टमध्ये घुसली.

## इम्रे नागीची हत्या

कुश्चेव्ह यांना क्षोभाचा अंदाज येईना. हंगेरीतील कम्युनिस्ट नेतृत्वाचा तोंडवळा बदलून भागेल असे त्यांना प्रथम वाटले होते. राकोसीच्या जागी गेरो हा कम्युनिस्ट सत्तेवर आणण्यात आला. परंतु लोकांना इम्रे नागी हाच नेता हवा होता. जुलै १९५३ ते एप्रिल १९५५ या काळात सत्तेवर असताना इम्रे नागी याने बऱ्याच सुधारणा घडवल्या होत्या. मॉस्कोचे दडपण काही वेळा मानले नव्हते. टिटोवादी म्हणून त्याला बदनाम करून खाली खेचण्यात आलेले होते.

हंगेरीतील उठावाचा अर्थ मॉस्कोच्या दडपणाविरुद्ध उठाव असा दिसू लागताच दुसऱ्या दिवशी मिकोयान व सुस्लॉव्ह ही जोडगोळी मॉस्कोहून बुडापेस्टला धावत आली. इम्रे नागी याला पंतप्रधान करून कादर याला हंगेरीयन कम्युनिस्ट पार्टीचा सचिव करण्यात आले. सोव्हिएत सैन्य काढून घेण्यात आले.

परंतु मॉस्कोशहांना इम्रे नागी सत्तेवर नको होता. त्यांनी लोकक्षोभापुढे तात्पुरती माघार घेतली होती इतकेच. बुडापेस्टमधून रशियन सैन्य मागे गेलेले सर्वांना समजले, परंतु त्याचवेळी नव्या तुकड्या पूर्व हंगेरीतून आत शिरत होत्या. काही दिवसांतच कादर याने इम्रे नागीवर जनताद्रोहाचा आरोप केला व तो पूर्व हंगेरीत रशियन सेनेच्या आश्रयाला पळाला. बुडापेस्टमध्ये कम्युनिस्टांनी दडपलेले राजकीय पक्ष पुनः उजळ माथ्याने डोके वर काढून वावरू लागले.

इम्रे नागी हा कम्युनिस्टविरोधी जनतेला संघटित करण्यात अखेर उणा पडला! नागी याने संयुक्त राष्ट्राकडे मदतीसाठी धाव घेतली. ४ नोव्हेंबरला सोव्हिएट सैन्याने बुडापेस्टवर पुनः नागडा हल्ला चढवला. हंगेरीच्या जनतेने विरोध केला. माणसे टँकखाली चिरडून सोव्हिएट टँकदलांनी बुडापेस्टचे बंड मोडले! इम्रे नागी याने युगोस्लाव्हियाच्या वकिलातीत आश्रय घेतला. परंतु वकिलातीत घुसून रशियनांनी त्याला अटक केली. कादर अधिकारावर आणला गेला आणि जून १९५७ मध्ये इम्रे नागी याला दोषी ठरवून हंगेरीयन सरकारने त्याचा वध केला.

## जीन सेंटनीची माणुसकी

हंगेरीत राकोसी सरकारविरुद्ध बंड होत असताना व्हिएतनाममध्ये आलेल्या ताठ हंगेरियन तज्ज्ञांना आपला आनंद लपवणे अशक्य झाले. त्यांनी तो जाहीरपणे व्यक्त केला. परंतु कुश्चेव्ह यांनी हंगेरीत जी कारवाई घडवली, त्या कारवाईला मार्शल टिटो व माओ यांनी पाठिंबा दिला होता. अर्थात हो याची सहानुभूती इम्रे नागीला नव्हती हे निराळे सांगणे नकोच. हंगेरीत इम्रे नागी अटकेत पडून कादर सरकार अधिकारावर येताच, व्हिएतनाममध्ये आलेल्या आठही हंगेरियन नागरिकांना परत मायदेशी येण्याचा हुकूम सुटला. आपल्या पुढे काय वाढून ठेवलेले आहे याची कल्पना असल्याने, या हंगेरियन तज्ज्ञांनी जीन सेंटनी यांचेकडे राजकीय आश्रय मागितला व हंगेरीला परतण्यास नकार दिला.

या आठ जणांची आश्रयासाठी विनंती आली, तेव्हा जीन सेंटनी पॅरिसला गेलेला होता. तेथून त्याने तारेने आपल्या हनोईतील कचेरीला आश्रय देण्यासंबंधी सूचना दिली.

हो-चि-मिन्ह याला यासंबंधी काहीच कल्पना नसल्याने त्याने या आठ जणांना हनोईतून विमानाने हंगेरीला रवाना करण्याचा हुकूम दिलेला होता. हे हंगेरियन नागरिक

हनोईला विमानतळाकडे जात असताना, साध्या वेषातील फ्रेंच सैनिकांनी (जे निःशस्त्र होते) या सर्वांना पळवले व फ्रेंच वकिलातीच्या कार्यालयात लपवून ठेवले.

जीन सेंटनी तातडीने हनोईला आला व त्याने उत्तर व्हिएत-मिन्ह सरकारला फ्रेंच सरकारने आठही जणांना आश्रय दिल्याचे कळवले. आंतरराष्ट्रीय नियमानुसार वकिलात ही सार्वभौम असते. परंतु हनोईत फ्रेंचांची काही वकिलात नव्हती! तेव्हा याचा फायदा घेऊन हो याचे सरकार या आठ नागरिकांचा जबरदस्तीने कब्जा करू शकते याची जीन सेंटनीला जाणीव होती. जीन सेंटनीने या हंगेरियन नागरिकांना पेट्रोलच्या पिंपात लपवून हनोई शहराबाहेर काढले व लाओसमध्ये जिथे फ्रेंचांचे लष्करी मिशन अजून होते तिथे त्यांना आश्रय दिला.

जीन सेंटनी याने आपल्याला फसवले आहे ही गोष्ट अध्यक्ष हो याला फार लागली. हो-चि-मिन्ह याने सांगितले की 'जीन सेंटनी याने उत्तर व्हिएतनामच्या सार्वभौम हक्काची पायमल्ली केलेली आहे. यामुळे परस्पर संबंधावर आघात झालेला आहे.'

जीन सेंटनी व हो याचेतील संबंध अशा रीतीने १९५६ अखेर पार दुरावले. जीन सेंटनी लवकरच हनोई सोडून पॅरीसला कायमचा परतला. परंतु त्याला साधा निरोप समारंभही हो याने केला नाही.

दहा वर्षांनी सेंटनी परत हनोईला आला तेव्हा हो-चि-मिन्ह याच्या मनात यापूर्वी घडलेल्या कटू घटनांचा कसलाही राग नव्हता! याचे कारण असे तर नसेल की बुडापेस्टला स्टॅलिनचा पुतळा उखडला म्हणून इम्रे नागीला देहांतशासनाचा धनी करणाऱ्या कुश्चेव्हलाच, स्टॅलिनचे शव थडग्यातून उखडण्याची कालांतराने गरज भासली आणि हो-चि-मिन्ह याला जीन सेंटनीने जे दहा वर्षांपूर्वी केले त्यात फारसे आक्षेपार्ह काही नव्हते असे म्हणायची पाळी आली? कुणास ठाऊक असेही असेल!

n

# १३ : हनोई सरकार हेच राष्ट्रीय सरकार

जिनिव्हा येथे व्हिएतनामची उत्तर व्हिएतनाम व दक्षिण व्हिएतनाम अशी जी फाळणी करण्यात आली ती नेमक्या सतराव्या अक्षांश रेषेवरच का करण्यात आली? याची अनेक ऐतिहासिक कारणे होती.

## इथे हिंदूराज्य होते

कितीतरी शतके दक्षिण व्हिएतनाम असा देशच नव्हता. व्हिएतनामच्या दक्षिणेला साधारणपणे सतराव्या अक्षांश रेषेखाली खंपा देश होता.

खंपा हे हिंदू राज्य होते. हिंदूंच्या साम्राज्यविस्ताराचे खंपा राज्य हे दक्षिणपूर्व आशियातील शेवटचे टोक. याउलट ‘नाम’ म्हणजे ‘जमीन’ आणि ‘व्हिएत’ म्हणजे ‘दक्षिण’ या अर्थाने ही दक्षिणेकडची समजली जाणारी भूमी चीनच्या सरहद्दीला लागून असल्याने आज ज्याला उत्तर व्हिएतनाम म्हणतात तो सर्व प्रदेश चिनी साम्राज्याचेच अंगण होते. ख्रिस्त शतकापूर्वी सुमारे दोनशे वर्षे, चिनी लष्करी धटिंगण युनान, क्वांगसी, क्वांगटुंग प्रांतातून ‘व्हिएतनाम’ नामक भूमीवर आक्रमक म्हणून आले आणि या प्रदेशात राहणाऱ्या आदिवासी जमातीवर त्यांनी राजकीय वर्चस्व स्थापले.

जवळ जवळ दहा शतके चिन्यांशी संबंध आल्याने या भागातील वांशिक व सांस्कृतिक बदल हे चिन्यांशी मिळते जुळते झाले. व्हिएतनामचा इतिहास लिहिण्याचा श्रीगणेशा झाला तो चिनी लिपीत. चिनी लष्करी प्रशासक हे युनानी, चिनी व व्हिएतनामी नागरिक यांच्यात फरक मानीतच नसत. ही सर्वच जनता त्यांच्या दृष्टीने दाक्षिणात्य होती. व्हिएतनाममधील स्थानिक जनतेने साहजिकच शतकानुशतके त्यांच्यावर राज्य करणाऱ्या माणसांचा धर्म पत्करला, चालीरीती आत्मसात केल्या. त्यांच्या संस्कृतीची सर्व बाह्य लक्षणे स्वीकारली. एवढे होऊनही व्हिएतनाम हा प्रदेश चिनी साम्राज्याचाच एक कायम भाग आहे अशी भावना मात्र स्थानिक लोकांत रूजू शकत नव्हती. याचे बलवत्तर कारण म्हणजे व्हिएतनाम प्रदेश हा भौगोलिक दृष्ट्या चिनी सरहद्दीला लागून असला तरी वेगळा भूभाग होता. डोंगरदऱ्या ओलांडून चिनी लष्कराच्या झुंडी आल्या खऱ्या परंतु या लष्करी धटिंगणांनी ओलांडली ती ‘सरहद्द’ आहे ही भावना काही व्हिएतनामी जनतेतून कधीही नष्ट झाली नाही.

अखेर दहाव्या शतकात चिनी लष्कराला सरहद्दीपलिकडे पिटाळून लावण्यात ली नावाच्या घराण्यातील पुरुषांना यश आले. ली घराण्यातील हे स्वातंत्र्यभक्तही चिनी सरदारांप्रमाणे लष्करप्रमुखच होते. त्यांनी चिन्यांना हुसकले. परंतु धर्माने बौद्ध असलेल्या

या राज्यकर्त्यांनी सत्ता प्रस्थापित केली किंवा चालू ठेवली ती चिनी पद्धतीचीच. शिक्षणाच्या क्षेत्रात त्यांनी कन्फ्युशिअस पत्करला आणि मँडारीन मार्फत राज्य करण्याची पद्धतीच कायम केली.

पुढची पाच शतके नवजात व्हिएतनाम राष्ट्र, उत्तरेकडे चिनी लष्कराकडून अधूनमधून होणारा उपद्रव सहन करीत त्याचा मुकाबला करीत होते तर दक्षिणेकडे (म्हणजे आज मध्य व्हिएतनाम म्हणता येईल) खंपा राजे अधूनमधून या देशावरच दक्षिणेकडून आक्रमणे करीत होते.

## मंगोली गेले, मांचू आले

पंधराव्या शतकात अखेर ली-लोई या व्हिएतनामी सरदाराने स्वतःला व्हिएतनामचा राजा म्हणून राज्याभिषेक करवून घेतला. कारण चिन्यांना उत्तरेकडे कायमचे सरहद्दीबाहेर हाकलून देण्यात तो यशस्वी झाला होता. चौदाव्या शतकात (१३६८) मंगोली सत्ता उलथून, पेकिंग येथे मांचुरियातील टोळीवाल्यांचे मांचू घराणे गादीवर आले आणि या मांचू राजांजवळ पार दक्षिणेकडे चीनची नैसर्गिक सरहद्द ओलांडून आक्रमणे करण्याची जिद्द आणि ताकद नव्हती.

ली-लोई याचे लक्ष आता दक्षिणेकडे वळले. मध्य व्हिएतनाम (अन्नाम) व दक्षिण व्हिएतनाममध्ये खंपा राजाचे राज्य समाप्त करण्यासाठी आता व्हिएतनामी राजांच्या लढाया सुरू झाल्या. ज्या दिवशी ली-लोई राजाने अन्नामच्या प्रवेशद्वारावर धडका देण्यास सुरुवात केली, त्या दिवसापासून इतिहासाने वेगळे असे स्पष्ट वळण घेतले. जो चिमुकला देश आतापर्यंत आपलो तोंड फक्त चिनी आक्रमकाकडे वळवून कसाबसा जगत होता, त्याने चिन्यांना हाकलून मोहरा फिरवताच दक्षिणपूर्व आशियात एक नवे महत्त्वाचे राष्ट्र उदयाला येऊ लागले.

खंपा पराभूत झाले. सतराव्या शतकात व्हिएतनामी राजे अन्नाममधून अधिक दक्षिणेकडे सरकले. यानंतर दक्षिण व्हिएतनाम, लाओस व कंबोडिया या सर्व प्रदेशात ज्या असंख्य लढाया निरनिराळ्या राजे लोकात झाल्या, त्याचा आ आणि अंत नेमका सांगणे कठीण आहे. दहाबारा राज्ये उदयाला आली, लयाला गेली. कंबोडियात एका बाजूने सयामी राजे घुसू पाहात होते, तर दुसऱ्या बाजूने व्हिएतनामी राजे! अखेर कंबोडियाच्या राजाने दोघांचे मांडलिकत्व मान्य केले! दोघांना आपल्या प्रदेशात विशेषाधिकार दिले. लाओसच्या राजाने म्हणजे सरदाराने व्हिएतनामच्या राजाचे मांडलिकत्व पत्करले. युरोपमधील बेल्जियम व पोलंड या देशांसारखी लाओस-कंबोडिया या देशांची स्थिती आहे. दोन शतूंच्या टकरीत या देशांचे नेहमी मरण ओढवतेच.

## राज्याचे वाटप झाले

ली राजांच्या वतीने युद्ध खेळणारी 'त्रिन्ह' व 'नग्यूएन' ही दोन सरदार घराणी हळूहळू फारच मातब्बर व मस्तवाल झाली. मात्र दोघांनी समजुतीने राज्याचे वाटप केले. सतराव्या शतकाच्या अखेरीस ली घराण्याचे राजे हे नामधारी शाहू राजे होऊन, राजप्रासादातच जन्माला येऊन तेथे मरू लागले... आणि त्रिन्ह व नग्यूएन या सरदारांनी व्हिएतनामची राजकीय फाळणीच केली. १८ व्या अक्षांशावर त्यांनी एक प्रत्यक्ष दगडविटांची भिंतच बांधून टाकली. म्हणजे हे प्रॉपर्टीचे, जमीनजुमल्याचे यादवी युद्ध वाटण्या होऊन संपले. त्रिन्ह घराणे हे उत्तरेकडे स्थिरावले आणि नग्युएन घराण्याने अन्नाम म्हणजे मध्य व्हिएतनामचा कब्जा केला.

अन्नाम प्रदेशाचा किनाऱ्यालगतचा प्रदेश हाच काय तो राज्यकारभाराचा प्रमुख भूभाग आहे. एका बाजूने टेकड्या व एका बाजूने समुद्र अशा नैसर्गिक सरहद्दीत पसरलेला हा चिंचोळा प्रदेश जास्तीतजास्त तीनशे मैल लांब तर कमीतकमी पंचेचाळीस मैल रूंदीचा आहे.

## कन्फ्युशिअसची समाज-रचना

सर्वसाधारणपणे कन्फ्युशिअसच्या समाजरचनेत दोन प्रमुख गट असत. सुशिक्षित, संख्येने कमी असलेल्या प्रतिष्ठित नगरजनांचा एक प्रबळ वर्ग आणि इतरेजनात प्रामुख्याने शेतकरीवर्ग. या दोघांना जोडणारा दुवा म्हणजे खेडेगावचे पाटील! या पाटलांनाच मँडारीन म्हणत असत. हे मँडारीन आपली मुले कन्फ्युशिअसच्या शिक्षणपद्धतीने शिकायला धाडीत व राज्यकारभारातील अधिकाऱ्याच्या नेमणुकीसाठी ज्या परीक्षा होत, त्याला ही मँडारीनवर्गाची मुले प्रमुखतः बसत असत. हे मँडारीन खेडेगावचे स्वयंभू राजेच असत व गावकरी शेतकऱ्यांना ते कन्फ्युशिअसची तत्त्वे पाळायचा उपदेश करीत असत.

प्रत्येक खेडे हे बरेचसे स्वयंपूर्ण असे चारी अंगाने बांबूच्या बेटाचे कुंपण असलेल्या व्हिएतनामी खेड्यात देवाचार आणि कुळाचार यांना आजही विलक्षण महत्त्व असते. ग्रामदेवता, खेड्यात वावरणारे मृतात्मे यांचाही बडेजाव आढळून येतो. प्रत्येक खेड्याच्या ग्रामदेवतेला किंवा ग्रामदेवाला 'दिन्ह' म्हणतात. 'दिन्ह' या शब्दाचा ग्रामदेवतेचे मंदिर असाही अर्थ घेतला जातो. पूर्वापार समज असा की प्रत्येक खेड्याच्या भूमीत वास करणाऱ्या देवतांचे अधिकार हे व्हिएतनामच्या राजाला प्राप्त होत असत. खेड्यातून होणाऱ्या शेतीवर अर्थात त्याचाच हक्क पोचत असे. ली राजांनी ही कन्फ्युशियन संस्कृती आपल्याबरोबर दक्षिणेकडे नेली. परंतु जसजसे ते दक्षिणेकडे सरकू लागले तसतशी कन्फ्युशिअस संस्कृतीची छाप विरळ विरळ होत गेली असे आढळते. मध्य व्हिएतनामच्या आणखी दक्षिणेकडील प्रदेशाला ज्याला मेकाँगचे भूशीर म्हणतात, या प्रदेशात तर

कन्फ्युशिअसच्या शिकवणुकीची उदार व उदात्त तत्त्वे अगदीच परिणामशून्य झालेली आढळतात.

## जसा देश तशी माणसे

मेकाँग भूशीराचा प्रदेश हा बराचसा सपाट प्रदेश आहे. व्हिएतनामी या भागात प्रथम आले तेव्हा इथे फारशी वस्ती नव्हतीच. प्रदेश मुबलक. यामुळे व्हिएतनामी या भूशीरातील नद्यांच्या काठाकाठाने वस्ती करीत गेले. उत्तरेकडे आढळणाऱ्या खेड्यांच्या बंदिस्त रचनेला इथे मूळ धरणे कठीण होते. कारण त्याची आवश्यकता नव्हती आणि याचा एक परिणाम असा झाला की या भागात खेडे हा राज्यकारभाराचा मुलभूत घटक हे स्थान खेड्यांना उरले नाही. विशेषतः सायगावच्या अवतीभोवती ही परिस्थिती निर्माण झाली.

उत्तरेकडूनच आलेल्या व्हिएतनामी माणसाचा स्वभाव मेकाँग भूशीरात आल्यानंतर बदलू लागला. माणसे ऐषारामी, उधळी, मतलबी आणि स्वयंकेंद्रित होऊ लागली. उत्तर व्हिएतनामी हे स्वभावतःच काटकसरी, मानी आणि कीर्तीचे उपासक राहिले. दक्षिण व्हिएतनामी त्या लोकांना 'कंजूष' म्हणतात. आयुष्यात गेला दिवस आपला म्हणावा आणि चैन करावी हे त्यांना कळत नाही अशी त्यांची चेष्टाही करतात. याउलट उत्तर व्हिएतनामी हे दक्षिण व्हिएतनामी लोकांना खुशालचेंडू समजतात आणि क्रांतीदर्शी तत्त्वांचा त्यांना स्पर्शही नाही याबद्दल त्यांना दूषणे देतात.

व्हिएतनाम जनतेनेच आपल्या देशातील दोन भागातील बांधवांचे केलेले हे परस्पर वर्णन पुरेसे बोलके आहे. उत्तरेकडे आढळणारी शिस्त, खेड्यातील बंदिस्त रचना, राजकीय महत्त्वाकांक्षा, स्वातंत्र्योपासना आणि कीर्तिरूपे जगण्याचा आणि उरण्याचा अट्टाहास याचा दक्षिण व्हिएतनाममध्ये मागमूस नाही. अशा या दक्षिण व्हिएतनामी जनतेच्या वतीने अमेरिकेसारखी बलाढ्य शक्ती जरी लढू लागली तरी अंतिम जय हा उत्तर व्हिएतनामचा होणार, ही साधी गोष्ट अमेरिकेने कधी ध्यानात घेतली नाही.

## दक्षिण व्हिएतनामचा जन्म

एकोणिसाव्या शतकाच्या सुरुवातीला म्हणजे १८०२ मध्ये दक्षिणेवर राज्य करणारा नग्युएन लष्करी सरदार, गिया-लाँग याने ली राज्याला पदच्युत करून पुन्हा एकदा सर्व व्हिएतनाम स्वतःच्या छत्राखाली आणला. गिया लाँगला हा लष्करी विजय मिळू शकला, कारण तोपर्यंत आशियात ठिकठिकाणी व्यापारासाठी सोकावलेल्या पाश्चात्यांकडून अद्यावत शस्त्रास्त्रे खरेदी करून त्या शस्त्राचा वापर त्याने केला. परंतु राज्यकारभार करणे गियालाँग याला जमले नाही. हुए ही नवी राजधानी त्याने निर्माण केली ती १७ व्या अक्षांश रेषेखाली. मध्य व्हिएतनाममध्ये ली राजाची राज्यव्यवस्था जी काही होती ती रद्द

करून गियालाँग याने चिनी सम्राटाच्या धर्तीवर राज्यकारभार सुरू केला. मँडारीन हे ठिकठिकाणी लष्करी धटिंगण झाले. ठराविक कर हुए दरबारात दिला की शेतकऱ्यांना पिळण्यास ते मोकळे राहू लागले. जेमतेम चाळीस वर्षे गियालाँगची सत्ता टिकली. १८४२ मध्ये एक फ्रेंच नाविक काफिला सायगाव बंदरात उतरला, आणि त्याने पाहता पाहता सायगाव आणि भोवतालचा बराचसा प्रदेश गियालाँग याच्या राज्यातून ओरबाडून वेगळा केला!

फ्रेंचांनी सायगाव कब्जात घेतले ते त्यांना व्हिएतनाम जिंकण्यात स्वारस्य होते म्हणून नव्हे! तसे पाहिले तर सतराव्या शतकातच फ्रेंच व्यापारी व मिशनरी दक्षिण व्हिएतनाममध्ये आलेले होते. व्हिएतनाममध्ये त्यावेळी व्यापाराला फारसा वाव नव्हता म्हणून व्यापारी निराश झाले. परंतु कॅथॉलीक फ्रेंच मिशनऱ्यांना व्हिएतनामची भूमी ही धर्मप्रचाराला अतिशय सुपीक वाटली. त्यांनी जिद्दीने सेवाधर्माच्या आणि शिक्षणाच्या मार्गाने धर्मप्रचाराचे कार्य चालू केले. दक्षिण व्हिएतनाममध्ये फार मोठे कॅथॉलिक मिशन, फ्रेंच लष्कराने सायगाव जिंकण्यापूर्वीच तेथे उभे झालेले होते!

परंतु फ्रेंच सैन्य आले ते मिशनऱ्यांना दिलासा देण्यासाठी नाही. याकाळी चीनमध्ये इंग्लिश, स्पॅनिश, पोर्तुगीज यांच्याबरोबरच्या व्यापारी स्पर्धेतून फ्रेंचांचा साम्राज्यवाद जन्म पावत होता. फ्रेंचांची अशी कल्पना होती की दक्षिण व्हिएतनाममार्गे नौकानयनाला योग्य नद्या सापडल्या तर चीनबरोबर व्यापाराचे एक दार उघडता येईल. परंतु काही वर्षांच्या अनुभवानंतर, संशोधनानंतर त्यांना कळून चुकले की मेकाँग भागातील नद्या नौकानयनाला योग्य नाहीत. यासाठी उत्तर व्हिएतनामच्या उत्तर टोकावर झडप घातली पाहिजे.

## फ्रेंच साम्राज्याची निर्मिती

१८७३ मध्ये फ्रान्सीन गार्नियर या धाडसी फ्रेंच नाविक अधिकाऱ्याने किनाऱ्या किनाऱ्याने गोळीबार करीत अखेर हनोईवर तोफा डागल्या. लाल नदी ही नौकानयनाला योग्य असून तेथून चीनशी व्यापार करता येईल हा शोध त्यानेच लावला.

पॅरिसला आता व्हिएतनाममध्ये रस निर्माण झाला. फ्रेंच मिशनऱ्यांनी तोपर्यंत आपण चालवलेल्या दैवी कार्यात स्थानिक लष्करी सरदार कसा व्यत्यय निर्माण करतात याची रसभरीत वर्णने पॅरिसला धाडलेली होतीच. हा प्रदेश इतका मागासलेला आहे की या प्रदेशातील जनतेला सुबुद्ध करण्यासाठी, शहाणे करण्यासाठी फ्रेंच राजकीय सत्ता व फ्रेंच मिशनरी या दोघांनी तेथे कार्य केले पाहिजे असा फ्रेंच राजसत्तेला मिशनऱ्यांनी आग्रह सुरू केला. याचा परिणाम म्हणून १८८३ नंतर फ्रेंचांनी व्हिएतनाम जिंकायलाच सुरुवात केली.

मेकाँग भूशिरातून फ्रेंच सैन्य वर उत्तरेकडे सरकू लागले आणि त्याला साथ देण्यासाठी 'उत्तर व्हिएतनाममध्ये' फ्रेंच मिशनऱ्यांनी बंड सुरू केले! गियालाँगचा वंशज हुऐ येथे गादीवर होता. त्याचे नाव तू-डक. हा राजा लगेचच शरण आला. त्याने मेकाँग भूशिरावर फ्रेंचांची अधिसत्ता मान्य केली. या भागाला फ्रेंचांनी नवे नाव दिले कोचीन-चायना!

वीस वर्षे कोचीन-चायना ही फ्रेंचांची वसाहत म्हणून नांदू लागली. तू-डक मरण पावताच फ्रेंचांनी पुनः उचल केली. त्यांनी हुऐ येथे डाँग-यान्ह नावाचा आपला एक हस्तक गादीवर बसवला (१८८४) म्हणजे १८५९ मध्ये फ्रेंचांनी कोचीन-चायना (मेकाँग डेल्टा) घशात घातला. १८८२ मध्ये त्यांनी गार्नियर मार्फत टोंकीनचा भाग कब्जात आणला आणि १८८४ मध्ये त्यांनी हुऐ येथील राजाला आपल्या हातातले बाहुले करून अन्नाम विभागही आपल्या छत्राखाली आणला! लाओस आणि कंबोडिया यांनी लढाई न करताच फ्रेंचांचे मांडलिकत्व पत्करले. ही दोन्ही राज्ये फ्रेंचांची मांडलिक राज्ये झाली. म्हणजे एकोणीसावे शतक संपत आले, तेव्हा व्हिएतनाम असा काही देश वा राष्ट्र उरले नव्हते. या सर्व प्रदेशाला फ्रेंच म्हणू लागले, 'फ्रेंच इंडोचायना.' या इंडोचायनात लाओस, कंबोडिया या राष्ट्रांबरोबरच टोंकीन भागाकडील व्हिएतनाम, अन्नाम व कोचीन-चायना असे मूळच्या व्हिएतनामचे तीन तुकडे समाविष्ट होते.

## पारतंत्र्य कुणाला बोचते?

ज्याच्या रक्तातून व घामातून व्हिएतनाम हे राष्ट्र पुन्हा उभे राहू शकेल अशी इंडोचायनातील राष्ट्रीय जमात कोणती, याची बाह्य जगाला काहीच कल्पना नव्हती! फक्त फ्रेंच मिशनऱ्यांना ही जात इंडोचायनात वेगळी अशी ओळखता येत होती. ही जात होती उत्तर हनोई परिसरातील मिशनऱ्यांना न बधलेली आणि फ्रेंचांचा द्वेष करणारी उत्तर व्हिएतनामी जमात.

फ्रेंचांनी सर्व व्हिएतनाम जिंकून त्यांचा समावेश 'इंडोचायना' नावाच्या सैलसर राजकीय बांधणीच्या दावणीत केल्यानंतर, फ्रेंच या देशाकडे एक वसाहत म्हणूनच पाहू लागले. या भूमीतून सर्व कच्चा माल फ्रान्समध्ये नेऊन फ्रेंच कारखानदारीची भरभराट करावी व पुन्हा फ्रेंच कारखान्यातून निर्माण झालेला माल व्हिएतनामी जनतेलाच भरपूर फायदा घेऊन विकावा असे हे 'शोषणचक्र' सुरू झाले. परंतु यासाठी व्हिएतनामी सर्व अर्थरचना ही फ्रेंच अर्थकारणाचे ओझ्याचे गाढव ठरावे, असे बदल करणे फ्रेंचांना भाग पडले. व्हिएतनाममधून मुख्यतः कोळसा, जस्त व कथिल हे धातू खनिजसंपत्ती म्हणून फ्रेंचांना मिळू शकणार होते. यासाठी ठिकठिकाणी खाणी उघडण्यात आल्या. हा माल शहरापर्यंत नेण्याच्या दृष्टीने वाहतुकीसाठी रस्ते, कालवे, रेल्वे आणि व्यापारी शहरे

हळूहळू बांधावी लागली. या सर्व भांडवली खर्चाची तरतूद करण्यासाठी साहजिकच व्हिएतनामी जनतेवर कराचे ओझे वाढवायला फ्रेंचांनी सुरुवात केली.

## गरिबीतून दारिद्र्याकडे

आतापर्यंत शेतकरी सरकारी कर धान्यरूपात राजाला देत होता. परंतु आता कर पैशात द्यावा लागू लागला. करांचे इस्टेटीशी, जमीन-जुमल्याशी असलेले नाते संपुष्टात येऊन, वस्तूंच्या व्यापारावर हा कर लादण्यात आला. मिठाचा व्यापार, अल्कोहोलचा व्यापार व अफूचा व्यापार फ्रेंच सरकारने संपूर्णपणे आपल्या ताब्यात घेतला. कुठल्याही व्यापाराचे सरकारीकरण झाले की जे होते ते झाले! या सर्व वस्तूंच्या किंमती सहा-सात पटीने लगेच वाढल्या. लोकांनी आतबट्ट्याचा व्यवहार म्हणून शेतीतून लक्ष काढून घेतले व ते सरकारी नोकऱ्यांच्या आणि फ्रेंच भांडवलदारांच्या मागे धावू लागले. फ्रेंच भांडवलदारांना कमीत कमी रोजंदारीत भरपूर मनुष्यबळ यामुळे आयतेच कब्जात आले. देश अधिकाधिक गरीब होत चालला. गरिबीचे रूपांतर दैन्यात आणि दारिद्र्यात होत चालले.

दक्षिण व्हिएतनाममध्ये अन्नामच्या नामधारी राजामार्फत फ्रेंच कारभार चालत असला तरी उत्तर व्हिएतनाममध्ये पूर्वीच्याच पद्धतीने म्हणजे मँडारीनेट पद्धतीने सरकारी काम चाले. मँडारीन हे फ्रेंच सरकार व जनता यामधील दुवा होते. मात्र त्याला आता लोकांचा दुवा लाभत नव्हता की सरकार त्याची फार कदर करीत नव्हते. लेखणीच्या एका फटकाऱ्यासरशी फ्रेंचांनी खेड्यांचे अधिकार निकालात काढले. पूर्वी ग्रामपंचायत गावातील प्रत्येकाच्या इस्टेटीचे हिशोब करून कराचे प्रमाण सर्वानुमते ठरवीत असे. आता गावपाटलांना गावातील लोकांविषयी कसलीही जबाबदारी वाटेनाशी झाली. फ्रेंच सरकारी अधिकाऱ्यांना खुश ठेवावे व लाचलुचपत, लांड्यालबाड्या करून गरीब शेतकऱ्यांच्या जमिनी लुबाडाव्या, हा प्रकार अनेक ठिकाणी दिसून येऊ लागला. जी माणसे खेड्यात राहात होती त्यांनाच या बदलाचे चटके बसत होते. जे शहरांकडे निघून गेले, चाकरमाने झाले, त्यांना शहरातून बोकाळलेल्या लाचलुचपतीने घेरले.

## राज्यकारभाराची तीन तोंडे

फोडा आणि झोडा याच सनातन न्यायाने फ्रेंच साम्राज्यवाद्यांनी व्हिएतनाममध्ये राज्य सुरू केले. त्यांच्या सत्ता वापराच्या एकाच देशात तीन तऱ्हा होत्या. ‘कोचीन चायना’ या वसाहतीवर- ज्याची राजधानी सायगाव होती- फ्रेंच पार्लमेंट थेट राज्य करीत असे. उत्तर व्हिएतनाममध्ये मँडारीनेट पद्धतीने राज्यकारभार चाले. तर हुए येथे राहून स्वतःला राजा म्हणविणारा अन्नामचा राजा, मध्य व्हिएतनाममध्ये फ्रेंचांच्या हिताचा राज्यकारभार करी.

परिणाम असा झाला की, कोचीन चायना म्हणजे मेकाँग प्रदेशातच फ्रेंचांनी काय ते आमुलाग्र बदल केले. रबर आणि ऊस ही नवी पिके या प्रदेशातच फ्रेंचांनी सुरू केली. रबराचे मळे आणि ऊसाचे बागाईतदार यांचा एक नवा भांडवलदारवर्ग तिथे निर्माण झाला. चोलोन बंदरातून हा नवा माल निर्यात होत असे. या चोलोनशेजारी फ्रेंचांनी एक नवे व्यापारी शहर वसविले, तेच आजचे सायगाव. सायगावला पूर्वेकडचे 'पॅरिस' म्हणतात. यावरून त्या शहरातील फ्रेंच कर्तृत्वाचा सर्वांगीण प्रत्यय येईल. मध्य व्हिएतनाम किंवा उत्तर व्हिएतनामपेक्षा सायगाव परिसरात व्हिएतनामी जीवनाचा तोंडावळा शतपटीने बदलून गेला. आधीच येते कन्फ्युशिअसच्या शिकवणुकीची विरळ छाप आणि त्यात नव्या राज्यकर्त्यांनी आणलेला भपका आणि श्रीमंती! राज्यकर्त्यांचा धर्म पत्करला तर भरभराट होते याचा सुगावा लागताच, शिकलेसवरलेले श्रीमंत वर्गातले दक्षिण व्हिएतनामी भराभर कॅथॉलिक होऊ लागले. ते बाटलेले व्हिएतनामी तर वेषाने, संस्कृतीने आणि मनाने स्वतःला फ्रेंच नागरिकच मानू लागले. व्हिएतनामी भूमीशी असलेले त्यांचे इमान आणि प्रेम पैशाच्या प्रेमाने गिळंकृत केले. अर्थात हा सर्व परिणाम एकाएकी झाला नाही. पिढ्यान् पिढ्या हे बदल होत गेले.

## जे पॅरिसला ते सायगावला

१९२० ते १९३० या काळात सायगाव शहरात सोशॅलिस्ट, ट्रॉस्टकाईटस् कम्युनिस्ट म्हणविणाऱ्या राजकीय संघटना अस्तित्वात आल्या. राजकारणातील नवे प्रवाह हे पॅरिसमार्गे येत राहिले. हुए किंवा हनोई ही आपलीच शहरे आहेत याचा देखील दक्षिण व्हिएतनाम्यांना विसर पडत चालला. या सर्व राजकीय गटांना देशाचा उद्धार अभिप्रेत होता, तो फ्रेंच सुधारणांच्या मार्गाने. आपण फ्रेंचांसारखे आधुनिक व नव्या राजकीय तत्त्वज्ञानाचे उपासक झालो की देशाला स्वातंत्र्य मिळणार, देश मोठा होणार अशी यांची गणिते होती. अर्थात प्रत्यक्ष कामापेक्षा मचमच आणि चर्चा फार! पक्ष उभा होऊन वर्ष उलटायच्या आत मतभेदाने फाटाफूट आणि वेगवेगळ्या चुली. या सर्व मंडळींना खेळवणे फ्रेंच सरकारला सोपे जात असे.

दक्षिण व्हिएतनाममधील सायगावसारख्या शहरातील शिक्षित आणि तरुण मंडळी, नव्या नव्या क्रांतिकारी राजकीय पक्षाच्या नावाने मळवट भरून, स्वतःभोवतीच घुमत असताना लहान लहान गावातून आणि खेड्यांतून जो छोट्या छोट्या व्यापाऱ्यांचा सुखवस्तू वर्ग होता तो काय करीत असावा? अगदी तेच करीत होता की साधारणपणे राजकारण हे त्याज्य मानून सुखवस्तू लोक करतात ते! मठ आणि महंत, बुवा आणि बाबा यांच्या शोधात ही मंडळी मशगूल होती.

## मठ महंताची चलती

लोक देवधर्माला विसरले म्हणून अवनती झाली, तेव्हा प्रथम लोकांची अध्यात्मिक उंची वाढवायला हवी! या कल्पनेने एक नवा पंथ १९२५ च्या सुमारास कोचीन-चायनामध्ये उदयाला आला. या पंथाचे नाव 'काओ-दाई'. काओदाई याचा अर्थ सृष्टीतला सर्वश्रेष्ठ देव! या देवाने पूर्वी भूतलावर दोन वेळा कृपादृष्टी करून अवतार जन्माला घातले. परंतु याचा उपयोग झाला नाही. पहिल्या वेळी ख्रिस्त आणि मोझेस आले. दुसऱ्या वेळी बुद्ध आणि लाओत्सु आले आणि आता तिसरी जोडी येणार असून, निरनिराळ्या लोकांच्या अंगात हे अवतार संचार करून आपल्या आगमनाची पूर्वसूचना देऊ लागले आहेत अशी या पंथाची धारणा होती. हा पंथ सर्व धर्मांचे कडबोळे असल्याने यांच्या मठातून 'जोन ऑफ आर्क' आणि 'व्हिक्टर ह्युगो' यांचीही तैलचित्रे असत.

कॅथॉलिक चर्चच्या धर्तीवर हा पंथ वाढू लागला. प्रार्थना मंदिरे, मठाच्या मालकीच्या जमिनी, मठांच्या शाळा, शिक्षणसंस्था, सामाजिक सेवासंस्था असा या काओदाई पंथाचा पसारा वाढू लागला. या सर्वांसाठी लागणारा पैसा छोटे छोटे व्यापारी आणि सरकारी नोकर भरपूर देत असत. १९२६ अखेरच कोचीन चायनात या पंथाचे सुमारे वीस हजार भक्त होते.

## बड्या बाबाचे बंड

काओदाई पंथाची भरभराट झाल्यानंतर या मठाप्रमाणे आणखी एक पंथ उदयाला आला. या पंथाचे नाव 'होआ-हाओ'. या पंथाचा गुरु फू-सो हा कंबोडियाच्या व कोचीन चायनाच्या सरहद्दीवरील एका खोऱ्यातून पुढे सरसावला. ज्या पद्धतीने बुवाबाजी पसरते त्याप्रमाणे 'होआ हाओ' हा पंथ पसरू लागला. १९३९ पर्यंत फू-सो याने काही भक्तगण जमवले असले तरी त्याचा बोलबाला फारसा नव्हता. १९३९ साली फू-सो याने मरण पंथाला लागलेला आणि डॉक्टरांनी आशा सोडलेला एक रोगी मंत्रसामर्थ्याने खडखडीत बरा केल्याचे वृत्त पसरले. 'होआ-हाओ' हे फू-सो ज्या खेड्यात राहात असे त्या खेड्याचे नाव! ते आता अनेकांच्या तोंडी येऊ लागले. फू-सो च्या दर्शनाला बायबापडे मोठ्या संख्येने धावू लागले.

फू-सो याचा पंथ हा आधुनिकतेची छटा दिलेला बुद्धधर्मच आहे. फू सो याने आपली शिकवण सांगणारी जी पुस्तके लिहिली आणि भक्तांना वाटली, त्यात आत्मसुधारणेचे मार्ग, अज्ञान अहंकाराचा नाश यावर प्रमुख भर आढळतो. या पंथाचे मुख्य लक्षण म्हणजे तो 'काओदाई' प्रमाण सबगोलांकार व फ्रेंचांच्या वाटेस न जाणारा पंथ राहिला नाही. फू-सो हा फ्रेंचांना शिव्या देई; त्यांच्यावर टीका करी.

१९४० साली फ्रेंचांनी फू-सो याला पकडले व वेडा ठरवून वेड्यांच्या इस्पितळात टाकले! फू-सो हा मानसिक रूग्ण ठरवल्याने त्याला वैद्यकीय उपचार करण्यासाठी

व्हिएतनामी डॉक्टर येत. चमत्कार असा झाला की फू-सो याने डॉक्टरांवर उपचार केले!! डॉक्टरमंडळीच फू-सो यांची भक्त झाली. त्याला गुरु मानू लागली! आपले काहीतरी चुकले, उगाच जनतेत क्षोभ नको म्हणून फ्रेंचांनी फू-सो याला सोडून दिले. आता तो चांगलाच मोठा मातब्बर बुवा झाला. त्याला झालेल्या तुरूंगवासाचा परिणाम असा झाला की त्याने आता फ्रेंचांशी उघडपणे शतुत्व पत्करून जपानी आक्रमकांशी संधान बांधले.

फू-सो हा त्रासदायक ठरू लागला म्हणून त्याला पकडण्याच्या विचारात फ्रेंच सरकार असतानाच, जपान्यांनी व्हिएतनाममध्ये शिरकाव केला. फू-सो भूमिगत झाला. त्याने आपल्या अनुयायांचे लहानसे सैन्य तयार केले आणि जपानी सैन्य फू-सो ला शस्त्रास्त्रे पुरवू लागले.

होआ-हाओ पंथाचे अनुयायी फ्रेंचांविरुद्ध लढू लागल्यामुळे, जपानी आक्रमणाचा फायदा घेऊन उत्तर व्हिएतनाममध्ये हो-चि-मिन्ह याच्या प्रेरणेने जो राष्ट्रीय उठाव झालेला होता, त्या लढ्याला 'होआ-हाओ' पंथियांचे प्रयत्न सहाय्यभूत ठरू लागले. परंतु काहीतरी कुरबुर होऊन होआ हाओ पंथियांनी एका व्हिएत-मिन्ह लष्करी ठाण्यावरच हल्ला चढवला. दुसरे महायुद्ध संपता संपता व्हिएत-मिन्ह व 'होआ-हाओ' यांच्यात चांगलेच वैमनस्य माजले. कारण आता सत्ता व्हिएत-मिन्हच्या हाती जाऊ लागली होती आणि 'होआ-हाओ' पंथाचे वाजवीपेक्षा अधिक लाड करणे स्वतंत्र हनोई सरकारला परवडणारे नव्हते. १९४७ साली व्हिएत-मिन्ह लष्कराने फू-सो याला पकडून त्याला देहांतशासन दिले!

'काओ-दाई' अथवा 'होआ-हाओ' या पंथियांना फ्रेंचांशी स्वातंत्र्यासाठी लष्करी संघर्ष करण्याची मुळी आवश्यकताच वाटली नव्हती. त्यांच्या भाकड समजुतीनुसार परमेश्वराची इच्छा होताच फ्रेंच व्हिएतनाममधून निघून जाणारच होते. आणि मग व्हिएतनामी जनता, 'काओ-दाई' अथवा 'होआ-हाओ' पंथाचा स्वीकार करून सुखाने नांदणार होती. त्यांना आपला मुख्य शतू वाटे तो म्हणजे व्हिएतनाममधील कॅथॉलीक पाद्री धर्मगुरू! या लांडग्यापासून कोचीन-चायना भागातील व्हिएतनामची कोकरे वाचवणे हे या पंथांना आपले प्रथम कर्तव्य वाटत असे. परंतु कॅथॉलिक चर्चलाही ही मंडळी मोठ्या प्राणपणाने विरोध करायला तयार होती अशातलाही भाग नाही. कारण 'आले देवाजीच्या मना तर पाद्र्यांचे चालेना' अशी स्थिती नक्की येणार असा या गुरुपंथीयांचा गाढा विश्वास होता.

## नगेआन : क्रांतिकारकांची भूमी

मध्य व्हिएतनाममध्ये (अन्नाम) पुरेसा शेतीचा उद्योग नव्हता किंवा कसले औद्योगिकरणही शक्य नव्हते. हुए येथील राजवाड्यात बसून अन्नामचा राजा फ्रेंचांचा मांडलिक म्हणून गादीवर बसलेला असे व तो कारभारात फारसे लक्षही घालीत नसे.

फ्रेंचांच्या वर्चस्वाविरुद्ध बंडखोर निर्माण करणारे दोनच प्रांत या अन्नाम भागात होते. ते प्रांत म्हणजे 'नगेआन' आणि 'हा-तिन्ह'. एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस या प्रांतातून काही क्रांतिकारक स्वातंत्र्यप्रयत्नात चीन अथवा जपानची मदत मागण्यासाठी परागंदा झाले, ते स्वप्नभंग अवस्थेत तिकडेच कुजत राहिले. हो-चि-मिन्ह याचा जन्म 'नगे आन' प्रांतातलाच. तिथेच त्याचे वडील मँडारीन होते. हो-चि-मिन्ह आणि तत्पूर्वी काही क्रांतिकारकांची जन्मभूमी असलेला अन्नाम भाग हा अन्यथा स्वातंत्र्य प्रयत्नांशी फारसा कधी निगडीत झाला नाही. हे सर्व सतीचे वाण पत्करले होते ते उत्तर व्हिएतनामने.

उत्तर व्हिएतनाममध्ये लागवडीला न आणली गेलेली अशी कुंवार शेतजमीन फ्रेंचांना फारशी आढळलीच नाही. यामुळे टोंकीन भागात त्यांचे राज्य येताच त्यांनी खेड्यातील शेतकऱ्यांच्या जमिनी घेऊन त्यावरच उद्योगधंदे उभारले. फ्रेंच सत्तेच्या आगमनाने कोचीन-चायना विभागात निदान काही प्रमाणात स्थानिक लोकांनाही सुबत्त सदृश दशा प्राप्त करता आली. उत्तर व्हिएतनाममध्ये असे काहीच घडले नाही. तिथे मुख्यतः खनिजसंपत्ती होती आणि या सर्व खाणी फ्रेंचांच्या मालकीच्या होत्या. कापड गिरण्या, सिमेंट या कारखानदारीतही सर्व फायदा फ्रेंच कारखानदारांच्याच घशात जात होता. खाण कामगार आणि गिरणी कामगार आदी मजुरांना क्षुद्र वेतनावर राबवावे व सर्व निर्माण झालेली संपत्ती फ्रान्समध्ये पळवावी असे हे शोषणचक्र उत्तर व्हिएतनाममध्ये ६०-७० वर्षे फिरत राहिले. कारखान्यांतून आणि गिरण्यातून काम करणाऱ्याला पुरेसे वेतन नसल्यामुळे या माणसांनी खेड्यातील आपली शेती ही जिवंत ठेवली. कुटुंबातील अन्य माणसे शेतीकडे लक्ष देत राहिली परंतु या भागात फ्रेंचांनी शिक्षणाचा जो प्रसार केला त्याचा फायदा नव्या व्हिएतनामी पिढ्यांना होत राहिला. 'स्वातंत्र्य-समता-बंधुता' या तत्त्वत्रयीचा जन्म फ्रेंच राज्यक्रांतीत झालेला असल्याने, फ्रेंचांच्या इतिहासांतून या सर्व तत्त्वांशी नवीन पिढीची ओळख होत गेली. फ्रेंच लोक हे व्यवहारातही या सर्व तत्त्वांना हरताळ फासणारे वर्तन प्रतिदिनी कसे करत असतात याचीही शेकडो उदाहरणे त्यांच्या नजरेस पडत होती. यामुळे या भागातील देशप्रेमी तरुण हे अस्वस्थ होत होत क्रांतिसन्मुख होत गेले. जनरल जिॲप हा अशाच तरुणांपैकी या भागातून हो-चि-मिन्ह याला लाभलेला महत्त्वाचा सहकारी. दुसऱ्या महायुद्धातील घालमेलीचा फायदा उठवून उत्तर व्हिएतनाममध्ये हो-चि-मिन्ह यांच्या नेतृत्वाखाली कम्युनिस्ट तत्त्वज्ञानाने भारलेली व्हिएत-मिन्ह चळवळ कशी उभी झाली आणि १९५४ पर्यंत राजकारणाने कसकशी वळणे घेतली याचे वर्णन यापूर्वीच्या निवेदनात आलेलेच आहे.

## हनोई सरकार हेच राष्ट्रीय सरकार

१९५४ मध्ये 'दिएन-बिएन-फू' येथे लष्करी जय प्राप्त केल्यानंतर फ्रेंचांना हे मान्यच करावे लागणार होते की हो-चि-मिन्ह याने निर्माण केलेले व्हिएतनामचे राज्य हे देशवासीयांचे स्वतंत्र राष्ट्र होते! भूमी, सैन्य आणि वैशिष्ट्यपूर्ण संस्कृती या राष्ट्राला आवश्यक असणाऱ्या तिन्ही गोष्टी हनोईतील व्हिएत-मिन्ह सरकारपाशी आता होत्या. उत्तर व्हिएतनामी जनतेची खेडोपाडी संघटना करून, लष्करी पथके उभारून हो-चि-मिन्ह व जिऑप या दोघांनी हे नवे राष्ट्र निर्मिलेले होते. त्याचा पाया मजबूत होता. त्याची मुळे राष्ट्रीय जनतेच्या जीवनात खोलवर पसरलेली होती.

जिनिव्हा वाटाघाटीला फ्रेंच आले तेव्हा त्यांच्या हातातले हुकमी पान एकच होते. त्यांचा प्रश्न होता की व्हिएत-मिन्ह सरकारच्या ताब्यात प्रत्यक्ष भूमी अशी कितीशी आहे? व्हिएत-मिन्हनी शहरांचा नाद कधी धरला नसल्याने कोठल्याही शहरावर त्यांचे निशाण फडफडत नव्हते. फक्त १३व्या अक्षांश रेषेपर्यंत आणि काही प्रमाणात त्या खालीसुद्धा बहुसंख्य खेडी ही व्हिएतनामीचे बालेकिल्ले झालेली होती. व्हिएतनाम हा फ्रेंच युनियनचा भाग ठेवण्याची कल्पना फ्रेंचांनी १९५३-५४ मध्येच सोडून दिली. या संघर्षातून आपले सैनिक सहीसलामतपणे व्हिएतनामबाहेर कसे पडतील याचीच फक्त फ्रेंचांना काय ती चिंता होती. फ्रेंच कसलीही वाटाघाटी न करता लढाईतून अंग काढून निघून जाते, अथवा दक्षिण व्हिएतनाम वाचवण्यासाठी कसबसे लढत राहते, तरी सर्वच्या सर्व अखंड व्हिएतनाम हो-चि-मिन्ह याच्या कब्जाखाली आणायला जिऑपच्या सैन्याला फार काळ लागला नसता. परंतु सोव्हिएट युनियन, चीन, इंग्लंड, अमेरिका या सर्वांच्या आग्रहाला-दडपणाला बळी पडून उत्तर व्हिएतनाम सरकारने जिनिव्हा येथे वाटाघाटींना मान्यता दिली, आणि तत्क्षणी व्हिएतनाममधील प्रश्नाचे स्वरूप साम्राज्यवादी फ्रेंच व व्हिएतनामी जनता यांच्यातील लढा असे न राहता, व्हिएतनाममधील संघर्ष हा शीतयुद्ध चालवण्याच्या बड्या राष्ट्रांच्या हितसंबंधात अडकलेला वादग्रस्त प्रश्न झाला!

अखंड व्हिएतनाम हा आता केवळ काही काळाचा प्रश्न आहे. दोन वर्षांनी निवडणुका होऊन जनतेचा कौल निश्चित आपल्याच बाजूस लागणार असल्याची खात्री असताना युद्ध कशाला? अशा नाना विलोभनीय कारणांनी हो-चि-मिन्ह याने जिनिव्हा येथे शस्त्रसंधी पत्करला होता.

जिनिव्हा येथे झालेल्या शस्त्रसंधी करार अथवा त्यानंतर दोन दिवसांनी प्रसिद्ध झालेला परिषदेचा जाहीरनामा (Final declaration of the conference) या दोन्ही कररमदारांत व्हिएतनामच्या भूमीवर हनोई येथील सरकार वगळता अन्य दुसरे सार्वभौम सरकार आहे असा उल्लेख आढळत नाही. सर्व देशात दोन वर्षांनी निवडणुका घेण्याची जबाबदारी फ्रेंचांची होती. परंतु परिषदेनंतर निघालेल्या अखेरच्या जाहीरनाम्यावर तर

जमलेल्या राष्ट्रांपैकी कुणीच सह्या केल्या नाहीत! कारण अमेरिकेने जाहीरनाम्यावर स्वाक्षरी केल्याखेरीज इतरांची सह्या करण्याची इच्छा नव्हती आणि अमेरिकेने सही करण्याचे नाकारले!

## सेटोचा अमेरिकन सोटा!

माओचा चीनमधील विजय आणि पाठोपाठ व्हिएतनाम भूमीवर उत्तर व्हिएतनाममध्ये सत्तेवर आलेली हो-चि-मिन्ह याची कम्युनिस्टप्रेमी राजवट, या घटनांमुळे अमेरिकेच्या पॅसिफिकमधील हितसंबंधाला धोका निर्माण झाल्याची वॉशिंग्टन राज्यकर्त्यांची खात्री झालेली होती. अमेरिकेचे हितसंबंध म्हणजे नेमके काय याचा उलगडा कुणीच कधी केलेला नाही! कम्युनिस्ट विरोधासाठी, त्याच्या प्रसाराला पायबंद घालण्यासाठी पूर्व आशियात अमेरिकेने ताबडतोब हालचालही सुरू केली.

जिनिव्हा शस्त्रसंधीनंतर दोन महिन्यात मनिला येथे 'साऊथ-ईस्ट एशिया-ट्रीटी-ऑरगनायझेशन' म्हणजे 'सेटो' (S.E.A.T.O.) ही संघटना अमेरिकेच्या पुढाकाराने जन्माला घालण्यात डल्लेस यांना यश आले. या संघटनेचे आशियातील किती देश सभासद झाले? फक्त तीन- फिलीपाइन्स, थायलंड आणि पाकिस्तान. ब्रह्मदेश, भारत आणि इंडोनेशिया यांनी या संघटनेला बांधून घेण्यात उत्सुकता दाखवलीच नाही. या सेटो संघटनेत सामील झालेल्या राष्ट्रांनी ठरवले काय तर, जर सेटो करारात सामील झालेल्या कोणा राष्ट्रावर बाहेरून आक्रमण झाले, तर इतर सर्वांनी त्या पीडित राष्ट्राला मदत करावी. या कराराला जे परिशिष्ट होते त्यात 'कंबोडिया', 'लाओस' आणि व्हिएतनाममधील 'मुक्त प्रदेश' असे तीन आणखी देश या कराराच्या कक्षेत असल्याचे नमूद करण्यात आले.

## अमेरिकेचे कारस्थान

म्हणजे या करारातील अमेरिकेन विंचवाचे विष या परिशिष्टाच्या शेपटात होते! व्हिएतनाममधील मुक्त प्रदेश म्हणजे कोणता देश? तर उत्तर व्हिएतनामच्या कक्षेबाहेर फाळणी करून वेगळा केलेला दक्षिण व्हिएतनाम! या प्रदेशावर आक्रमण कोण करणार होते? तर अर्थातच हो-चि-मिन्हचे सरकार! व्हिएतनाममध्ये निवडणुका घेतल्या तर सर्व देश हो-चि-मिन्ह याच्या कब्जाखाली जाणार होता. यामुळे निवडणुका घ्यायच्या नाहीत आणि जर यामुळे व्हिएत-मिन्ह फौजा शस्त्रसंधी मोडून दक्षिण व्हिएतनाममध्ये आल्या तर ते आक्रमण ठरवून सेटा करारानुसार, दक्षिण व्हिएतनाममध्ये घुसून अमेरिकेला त्याचा प्रतिकार करता यावा म्हणून ही तरतूद होती.

दक्षिण व्हिएतनामचे सरकार म्हणजे कोण तर बाओदाईच सरकार. १ जानेवारी १९५० रोजी बाओदाईला चीनमधून पाचारण करून फ्रेंचांनी 'व्हिएतनामचे सरकार'

म्हणून त्याच्या नेतृत्वाखाली सायगावला एक नामधारी राष्ट्रीय सरकार स्थापन केल्याचे पूर्वी सांगितलेच आहे. सायगाव शहराच्या आसपासच्या भागावरच काय तो या सरकारचा परिणामकारक अंमल चाले. सुमारे तीन लाख दक्षिण व्हिएतनामी पगारी सैन्य ही या राज्याची लष्करी ताकद होती. बाओदाई हा स्वतः सायगावला न राहता 'दलात' येथेच राहात असे आणि अधिकारांचे वाटप करण्याचे काम फक्त करीत असे.

## गुंडांचे मोहोळ

फ्रेंचांचे हे तोंडदेखले दान बाओदाईला महागात पडणार ही गोष्ट सूर्यप्रकाशाइतकी स्पष्ट होती. व्हिएत-मिन्ह नेते हे आपले राज्य सुस्थित व प्रगतीशील राहील याची प्रथमपासूनच काळजी घेत होते. याउलट दक्षिण व्हिएतनाममध्ये कालचा गोंधळ आज बरा म्हणावा, अशी बिकट परिस्थिती झालेली होती.

दक्षिण व्हिएतनाममध्येच 'काओदाई' आणि 'होआहाओ' या सर्व भानगडी होत्या. या पंथाचे अनेक उपपंथ आता झाले होते. कारण या मठाचे आद्य अधिपती आता हयात नव्हते. या सर्व पंथांच्या म्होरक्याजवळ आता लहान लहान सैन्येदेखील होती. सायगाव बंदरापाशी दादागिरी करून चिनी व परदेशी व्यापारी वर्गाकडून, कराच्या रूपाने खंडणी वसूल करणारा बेव्हिएन नावाचा चाचेगिरी करणारा व्हिएतनामी गुंड बराच बलिष्ठ झाला होता. या माणसाला बाओदाईने जवळ केले. म्हणजे अनेक प्रकारच्या शस्त्रधारी गुंडाच्या टोळ्याच दक्षिण व्हिएतनाममध्ये आता धक्काबुक्की करीत जगत होत्या.

या सर्व शस्त्रधारी टोळ्यांच्या म्होरक्याबरोबरच कॅथॉलिक, बौद्ध, खमेर आणि खंपा अशी नाना जातीजमातींची परस्परांना छेद देण्याची वृत्ती तेथे बळावत होती.

बाओ-दाई सरकारच्या सायगावमधून वाहणाऱ्या व्यापाराच्या सर्व नाड्या अजून फ्रेंच भांडवलदारांच्याच हातात होत्या. हे भांडवलदार, दक्षिण व्हिएतनामी मळेवाले आणि बागाईतदार आणि सायगावमधून व्यापार करणारे चिनी व्यापारी यांचेच उखळ पांढरे होत होते. पोलिस खात्यात गुंडांचा वरचष्मा होता. अशा या राज्याचा प्रमुख म्हणून बाओ-दाईला नेमून फ्रेंचांनी त्याच्या गळ्यात एक लोढणेच अडकवले होते.

पण बाओ-दाई चतुर ठरला! भयावह वातावरणात जिवावर कधी बेतेल याचा नेम नाही, अशा परिस्थितीत फ्रेंचांनी हातात कोंबलेले दक्षिण व्हिएतनाम सरकारचे नेतृत्व दुसऱ्या कुणाच्या तरी गळ्यात बांधण्याच्या उद्देशाने बाओदाई १९५४ च्या जानेवारीत फ्रान्सला गेला. आपल्या कोसळत्या राज्याला त्याला एक पंतप्रधान हवा होता.

एकीकडे जिनिव्हा परिषद सुरू झाली होती आणि फ्रेंच परराष्ट्र मंत्री बिडॉल्ट यांच्या सल्ल्याने एखादा हुशार पुरुष दक्षिण व्हिएतनाम सरकारचा पंतप्रधान म्हणून नेमून,

बाओदाई स्वतःकडे राज्याचे फक्त अध्यक्षपद ठेवण्यालाच उत्सुक होता. आतापर्यंत पंतप्रधानकी बाओदाईचा एक पुतण्या सांभाळत होता. परंतु खायला कहार आणि राज्याला भार असा हा डबडा माणूस होता. आज ना उद्या दक्षिण व्हिएतनाममध्ये ज्याच्यावर विसंबता येईल, असा एक माणूस अमेरिकेने हेरलेला होता. धर्माने कॅथॉलिक असलेल्या या माणसाने अमेरिकेतले राजकारणी धुरंधर आपल्या सत्ताझेपेसाठी वापरले की अमेरिकेन राजकारण्यांनी या माणसाला वापरला हा प्रश्न गूढ आहे. परंतु बाओदाईला स्वतःला डोईजड होईल या भीतीने नको असलेला एक पंतप्रधान बिडॉल्ट मार्फत अमेरिकेनेच दक्षिण व्हिएतनामवर अखेर लादला, या आरोपात बरेच तथ्य आहे. शस्त्रसंधी करारावर जिनिव्हा येथे सह्या होण्यापूर्वीच महिनाभर या माणसाने अध्यक्ष बाओदाईचा पंतप्रधान म्हणून सायगावला जून १९५४ मध्ये सत्ता हाती घेतली! अमेरिकेचे पुढचे अध्यक्ष लिंडन जॉन्सन यांनी 'आशियातला विन्स्टन चर्चिल' म्हणून ज्याची कालांतराने भलावण केली तोच हा माणूस. या माणसाचे नाव होते –

नगोदिन्ह-दिएम!

n

# १४ : हा कोण संप्रती नवा पुरुषावतार?

दक्षिण व्हिएतनाम राज्याच्या पंतप्रधानकीच्या वस्त्रांची झूल अंगावर चढवून हो-चि-मिन्ह याच्या हनोई सरकारला आव्हान देऊ पाहाणारा हा नगो-दिन्ह-दिएम कोण? कुठला?

## पुरुषस्य भाग्यम्

याच्या पूर्वचरित्राविषयी अनेक सुरस आणि चमत्कारिक कथा सांगितल्या जातात. परंतु त्यात निश्चितपणे ज्ञात असलेले चरित्र, त्याच्या वयाच्या अठ्ठावीस वर्षांपासूनचे आहे. अभ्यासात हुशार म्हणून चमकलेला हा कॅथॉलिक तरुण, वयाच्या २८ व्या वर्षीच दक्षिण व्हिएतनामवर फ्रेंचांचा आश्रित म्हणून राज्य करणाऱ्या हुए दरबारात एक अधिकारी होता. दोन वर्षात तो राज्याचा गृहमंत्री झाला. परंतु राज्यकारभारात स्वतंत्र प्रज्ञेने रस घेऊ पाहणाऱ्या या माणसांशी फ्रेंचांचे लगेचच बिनसले. तितक्यात महायुद्ध सुरू झाल्याने फ्रेंचांनी त्यांना विरोधी वाटलेल्या या माणसाला सत्तेवरून दूर करण्यास अन्नामच्या राजाला भाग पाडले. युद्धाची चार वर्षे हा काय करीत होता हे कळत नाही.

पुढे पराभव समोर दिसू लागताच, जपानी सैन्य व्हिएतनाम सोडता सोडता फ्रेंचांच्या साम्राज्याला सुरूंग पेरू लागले. दिएम याला जपान्यांनी दक्षिण व्हिएतनाममध्ये स्वतंत्र सरकार स्थापण्यासाठी पाचारण केले. परंतु जपानी निघून जाणार आहेत हे ठाऊक असल्याने दिएम याने जपान्यांना साथ देण्यास नकार दिला.

दिएम हा फ्रेंचविरोधी आहे, जपान्यांना वश झालेला नाही, तरुण आहे, चळवळ्या आहे या सर्व गोष्टी ध्यानात घेऊन हो-चि-मिन्ह याने त्या काळात दिएम याला व्हिएत-मिन्ह चळवळीत खेचण्याचा दोन वेळा प्रयत्न केला. हो-चि-मिन्ह याला त्याच्या राजकारणी ज्ञानाविषयी प्रेम नव्हते अथवा व्हिएत-मिन्ह चळवळ तो नेटाने पुढे नेईल अशातलाही भाग नव्हता. दिएम हो-चि-मिन्ह याला हवा होता याला कारण त्याची जात व धर्म. दिएम कॅथॉलिक ख्रिश्चन. जर हा व्हिएत-मिन्ह चळवळीत आला, तर कॅथॉलिकांना आपल्या चळवळीविषयी दुस्वास वाटणार नाही, या हिशोबाने हो-चि-मिन्ह याने त्याला गळ सोडलेला होता. याचा परिणाम असा झाला की त्याने कट्टर व्हिएत-मिन्ह विरोधकाचीच भूमिका घेतली! कॅथॉलिक ख्रिश्चन आणि कम्युनिस्ट यांचे हाडवैर प्रसिद्ध आहे. अत्यंत नास्तिक आणि पराकोटीचे धार्मिक यांचे जमावे कसे? यामुळे दिएम हा कॅथॉलिकांना आपला रक्षणकर्ता भासला आणि व्हिएत-मिन्ह ला तो आपल्या मार्गातील काटा दिसू लागला.

व्हिएत-मिन्ह चळवळ्यांशी फितुरी करणाऱ्या दिएमला व्हिएत-मिन्ह सैनिकी संघटनेने देहांत शासन फर्माविले. आज ना उद्या व्हिएत-मिन्ह आपल्याला ठार मारणार हे निश्चित कळल्याने आणि फ्रेंचांनी त्याला संरक्षणाची हमी देण्यास असमर्थ असल्याचे कळवल्याने दिएम याने १९५० मध्ये देश सोडला. निरनिराळ्या आशियाई व युरोपियन देशात प्रवास करीत दिएम १९५२ च्या सुरुवातीला अमेरिकेला पोचला.

## अमेरिकेत वास्तव्य

अमेरिकेत पोचताच कॅथॉलिक नेता म्हणून त्याने अमेरिकेच्या कॅथॉलिक धर्मपंथीयांच्या आश्रमात (मॉनेस्टरीत) आसरा घेतला. आशियातील राजकीय घटनांचा अभ्यासक हा त्याने आपला व्यवसाय ठरवला. साहजिकच या निमित्ताने निरनिराळ्या सभा, परिषदांतून त्याला भाषणासाठी, चर्चेसाठी निमंत्रणे मिळू लागली. लेकवुड, न्यू जर्सी आणि ओसिनिंग या तीन ठिकाणच्या कॅथॉलिक आश्रमांतून त्याचे वास्तव्य असे. अधूनमधून तो न्यूयॉर्कला येऊन राहात असे व काही लेखन वगैरे करी. कुणावरही छाप पडावी असे त्याचे व्यक्तिमत्त्व प्रसन्न व गुलजार होते. यामुळे आशियाच्या राजकारणाचा अभ्यास करणाऱ्या अमेरिकेन प्राध्यापक मंडळींनी त्याला फारच महत्त्व देण्यास सुरुवात केली. श्रीमंत अमेरिकन कॅथॉलिक भांडवलदार आणि सबंध कॅथॉलिक मिशन हे तर त्याचे मोठे पाठीराखेच झाले.

वर्षभरात, दिएमचे नाव वॉशिंग्टनच्या वर्तुळात, सिनेटर मंडळीत, न्यायाधीश लोकात, देशोदेशींच्या परराष्ट्र वकिलात पसरले. सिनेटर आणि सरकारी अधिकारी यांच्या गाठीभेटी त्याला सहजासहजी मिळू लागल्या.

दिएम याने अमेरिकेत शिक्षणासाठी आलेल्या व्हिएतनामी कॅथॉलीक विद्यार्थ्यांची संमेलने भरवणे अथवा व्हिएतनामच्या प्रश्नावर विद्वानांची मते गोळा करणे असे पूरक उद्योग सुरू केले.

अमेरिकेतील धूर्तांशी बरीच संधाने बांधल्यानंतर मे १९५३ मध्ये दिएम युरोपला आला व बेल्जियममध्ये ख्रिश्चन मॉनेस्टरीत राहू लागला. येथून त्याने फ्रान्समधील व्हिएतनामी कॅथॉलिक तरुणांशी संबंध प्रस्थापित केले. अमेरिकेतील कार्याचे वलय मागे असल्यामुळे त्याच्या नेतृत्वाला फ्रान्समधील व्हिएतनामी कॅथॉलिक विद्यार्थ्यांचा पाठिंबा लगेच मिळू लागला.

## धूर्त पॅरीसला आला

दिएन-बिएन-फू भोवती यावेळी व्हिएत-मिन्ह सैन्याने फास आवळायला सुरुवात केली होती. बाओदाई पॅरीसला येताच दिएम हा देखील पॅरीसला आला. पॅरीसमधील

अमेरिकेचा वकील धिलॉन याने बाओ-दाईला असे सुचवले की जर त्याने दिएम याला पंतप्रधान करण्याचे ठरविले, तर त्याला अमेरिकन सरकारचा पाठिंबा हजार हिश्यांनी मिळेल.

६ जून १९५४ ला म्हणजे फ्रेंच पंतप्रधान लानिएलचे सरकार कोसळण्यापूर्वी दोन आठवडे फ्रेंच परराष्ट्रमंत्री बिडॉल्ट याने एकंदर रागरंग पाहून बाओदाईला दिएम यालाच पंतप्रधान करण्याची विनंती केली. कारण फ्रेंच सैन्य पराभव समोर दिसू लागल्याने आता व्हिएतनाममधून बाहेर पडणार होते. अमेरिकेला जो माणूस पंतप्रधान म्हणून हवा आहे त्यालाच पंतप्रधान केले तर अमेरिका दक्षिण व्हिएतनाम सरकारला सर्वतोपरी साहाय्य करील हे स्पष्ट दिसत होते. जिनिव्हा करारानंतर दक्षिण व्हिएतनाममध्ये काय होईल याचा अंदाज बाओदाईला नव्हता. तेव्हा राज्याची जबाबदारी लवकरात लवकर कुणाच्यातरी गळ्यात बांधण्याची त्याला घाई होती. तेवढ्यात डल्लेससाहेब पॅरीसला आले. बाओदाईने त्यांची भेट घेऊन सांगितले –

‘फाळणी झालेल्या व्हिएतनाममध्ये मी परत जाणार नाही. जर व्हिएतनाम पुन्हा अखंड करण्याचा प्रयत्न दिएम करणार असेल तर मी त्याला पंतप्रधान करतो!’

## पंतप्रधानकीचे दान

डल्लेस यांना तेच हवे होते. बाओदाई सायगावला हवा होता कशाला? तिथे दिएमच्या हातात संपूर्ण सत्ता असणेच अमेरिकेला अगत्याचे वाटत होते. बाओदाई असे समजत होता की पंतप्रधानकी दिएमला दिली तरी लष्करी प्रमुख जनरल हिन्ह हा आपला माणूस आहे. पॅरीसला राहून आपण दिएमला बरोबर जरबेत ठेवू. अशा रीतीने सिद्ध साधकांच्या वाटाघाटीतून दक्षिण व्हिएतनामचे पंतप्रधानपद १९५४ च्या जून महिन्यता दिएम याच्याकडे चालत आले.

दिएम याने या नव्या कामगिरीची किंमत म्हणून, बाओदाई यांचेकडून सर्वाधिकार मागितले. दक्षिण व्हिएतनाममध्ये राज्यापुरत्या निवडणुका घेऊन असेंब्ली निर्माण करण्याचा अधिकारही बाओदाईकडून त्याने घेतला. याच्या बदल्यात दक्षिण व्हिएतनामी जनतेला बाओदाई हवा आहे तोपर्यंत त्याच्याशी एकनिष्ठ राहण्याचे अभिवचन दिएम याने बाओदाईला दिले.

२५ जून १९५४ ला दिएम सायगावला आला, तेव्हा अनंत प्रश्न आ वासून उभे होते. या प्रश्नातून अमेरिकेला सोईचा असा मार्ग काढण्यासाठी अमेरिकेच्या गुप्तहेर खात्यातर्फे कर्नल एडवर्ड लान्सडेल या लष्करी अधिकाऱ्याला सायगावला पाठवण्यात आले होते. दिएम येण्यापूर्वीच लान्सडेल तिथे पोचलेला होता.

## कॅथॉलिकांचे राजकारण

लवकरच जिनिव्हा युद्धबंदी करारावर सह्या झाल्या. या करारातील एक कलम असे होते की करारापासून ३०० दिवस, ज्या व्हिएतनामी नागरिकांना ज्या भागात जावयाचे असेल त्या भागात त्यांना विना अटकाव जाता यावे. या सवलतीला दुतर्फा दात होते, आणि या करवतीचा हो-चि-मिन्ह याने बरोबर फायदा उठवला. सुमारे नव्वद हजार व्हिएत-मिन्ह सैनिक १७ व्या अक्षांश रेषेखाली उतरून फ्रेंचांशी लढा देत होते. यातली बरीचशी संख्या शस्त्रसंधी करारानुसार जिॲप याने उत्तर व्हिएतनाम हद्दीत मागे खेचली. परंतु अद्यावत लष्करी शिक्षण लाभलेले आणि कडवे कम्युनिस्ट असे निवडक व्हिएत-मिन्ह सैन्य हे शस्त्रे दडवून नागरिक वेषात दक्षिण व्हिएतनाममध्येच मागे रेंगाळत राहिले. व्यवस्थित सूचना देऊन त्यांना मागे ठेवण्यात आले होते. सुमारे दीड लाख दक्षिण व्हिएतनामी नागरिक हे हो-चि-मिन्ह राजवटीला पत्करून उत्तरेकडे निघाले होते. त्याचप्रमाणे कम्युनिस्ट राजवटीच्या एकरंगी आणि शिस्तप्रिय कडव्या राजवटीला कंटाळलेले हजारो उत्तर व्हिएतनामी नागरिक हे सायगावकडे निघाले होते. निर्वासितांचे हे उत्तर दक्षिण आणि दक्षिण उत्तर दिशांनी निघालेले लोंढे अवाढव्य होते. यात कम्युनिस्ट कोण, बिगर कम्युनिस्ट कोण हे ठरवणे तर केवळ अशक्यच होते.

ज्या प्रमाणात दक्षिणेकडून लोक उत्तरेकडे गेले त्याच्याशी उत्तरेकडून दक्षिणेकडे येणाऱ्या लोंढ्यांचे प्रमाण व्यस्त होते. ८ ते ९ लाख म्हणजे चार-पाच पटीने अधिक स्त्री-पुरुष कम्युनिझमच्या भयाने दक्षिण व्हिएतनामच्या राज्यात आले! परंतु यात एक गोष्ट महत्त्वाची होती की या मंडळीत कॅथॉलिक ख्रिश्चनांचे प्रमाण जवळ जवळ ८५ टक्के होते. उत्तर व्हिएतनामच्या लोकसंख्येत ७ टक्के कॅथॉलिक होते, त्यातले बहुतेक तेथून दक्षिणेत पळून आले.

कॅथॉलिक ख्रिश्चनांनी इतक्या मोठ्या प्रमाणावर उत्तर व्हिएतनाम सोडायला, कॅथॉलिक चर्चचा प्रचार कारणीभूत होता. कम्युनिस्ट राजवटीत धर्मस्वातंत्र्य धोक्यात येईल असा जालीम प्रचार जिनिव्हा समझोता पार पडताच, कॅथॉलिक पाद्र्यांनी व्हिएतनामभर सुरू केला. दिएम हा स्वतः १९५४ मध्ये हनोई येथे गेला व त्याने उत्तर व्हिएतनाममधील कॅथॉलिकांनी दक्षिणेत यावे असा उपदेश केला. 'ख्रिस्त दक्षिणेकडे गेला', 'कुमारी माता मेरी उत्तर सोडून गेली' अशा घोषणा पाद्री देत होते. या सर्व प्रचारात धर्माभिमानाबरोबरच राजकारण होते. जिनिव्हा करारापूर्वी उत्तर व्हिएतनामची लोकसंख्या ही दक्षिण व्हिएतनामपेक्षा जास्त होती. उत्तर व्हिएतनामची लोकसंख्या एक कोटी पन्नास लाख असावी. याउलट दक्षिण व्हिएतनामची लोकसंख्या एक कोटी चाळीस लाख असावी. जर जिनिव्हा करारानुसार व्हिएतनाममध्ये दोन वर्षांनी निवडणुका झाल्याच, तर

आहे या परिस्थितीत जनतेचा कौल उत्तर व्हिएतनामच्या बाजूने पडणार ही गोष्ट स्पष्ट होती. कारण दक्षिण व्हिएतनामची जनता मोठ्या संख्येने हो-चि-मिन्ह यांची चाहती होती. तेव्हा कॅथॉलिकांना असे साहजिकच वाटले की जर मोठ्या संख्येने आपण दक्षिणेत जाऊ तर दोन वर्षांनी होणाऱ्या निवडणुकीत हो-चि-मिन्हला नक्कीच शह लागेल.

हो-चि-मिन्ह याला निवडणुक हवी होती. त्यात आपण विजय मिळवू अशी त्याला खात्री वाटत होती. परंतु या एकाच पर्यायावर सर्व भिस्त टाकण्याइतका तो दुधखुळा नव्हता. त्याने दक्षिण व्हिएतनाममधील आपल्या अनुयायांना दक्षिण व्हिएतनाममध्येच ठामपणे राहण्याच्या सूचना पाठवल्या आणि तेथली व्हिएत-मिन्ह चळवळ इशाऱ्यासरशी पुनः सुरू करता यावी म्हणून मोठ्या प्रमाणात व्हिएत-मिन्ह सैनिकही त्याने दक्षिणेतच ठेवले. त्यांची शस्त्रे लपविलेली होती व ते नागरी वेषात वावरत होते एवढाच काय तो फरक. निवडणुकीचा डाव, अमेरिका व दिएम सरकार बहुतेक उधळून लावील अशी भीती हो-चि-मिन्ह याला वाटत होती आणि तीच शेवटी खरी ठरलीही!

## हीथ रस घेईनात

'अमेरिकन इंटरनॅशनल रेस्क्यू कमिटी' (I.R.C.) या नावाची एक आंतरराष्ट्रीय क्षेत्रात काम करणारी संस्था दुसऱ्या महायुद्धाच्या काळात जन्माला आली होती. नाझी जर्मनीतून हाकललेले निर्वासित जे बुद्धिवादी ज्यू त्यांचे पुनर्वसन ही संस्था करीत असे. महायुद्धानंतर सोव्हिएट रशियाशी अमेरिकेचे थंडे युद्ध सुरू झाले. ही संस्था यानंतर सोव्हिएट रशियातून हाकललेल्या लेखक, शास्त्रज्ञ आदी लोकांच्या पुनर्वसनाचे काम करू लागली. भारतात फाळणीनंतर निर्वासितांचे लोंढे निर्माण झाले, कोरियात युद्धाच्या वेळी निर्माण झाले. परंतु या संस्थेचा लोंढ्याने येणाऱ्या निर्वासितांशी संबंध नव्हता म्हणा, किंवा हे कार्य आपल्या आवाक्यातले नाही याची त्यांना कल्पना होती म्हणून म्हणा, या संस्थेने यावेळी काहीही केले नाही! परंतु व्हिएतनाममध्ये आता जी निर्वासितांची पळापळ मोठ्या प्रमाणावर होऊ लागली, तेव्हा या संस्थेला एकदम जाग आली! याचे सकृद्दर्शनी दिसणारे असे कारण असे की, कॅथॉलिक धर्मीय हे दक्षिणेत येत होते आणि कॅथॉलिक मिशनने या संस्थेने हे पुनर्वसनाचे कार्य करायला प्रोत्साहन दिले. अमेरिकेत कॅथॉलिक धर्मियांची लॉबी केवढी परिणामकारक आहे, याचे हे एक उदाहरण म्हणता येईल. या संस्थेचा अमेरिकेन अध्यक्ष लिओ चेर्ने हा लगेच सायगावला आला व दक्षिण व्हिएतनाममधील अमेरिकेचे वकील डोनाल्ट हीथ, याचेशी त्याने बोलणी केली. हीथ यांनी चेर्ने यांना सांगितले की ही सर्व जबाबदारी फ्रेंचांची आहे. तुम्ही कशाला या भानगडीत पडता? आम्ही सरकारी पातळीवर काही तुम्हाला मदत करणार नाही. चेर्ने याने मग पंतप्रधान दिएमचीच गाठ घेतली.

दिएम याने चेर्ने यांच्या प्रयत्नाचे एकदम स्वागत केले. अमेरिकेत आपल्याविषयी चांगले मत पसरायला ही चांगली संधी आहे, हे दिएमच्या लक्षात आले. फ्रेंचांना दिएम मनातून नको होता – केवळ अमेरिकेच्या आग्रहाखातर हा प्रयोग त्यांनी पत्करला होता. यामुळे फ्रेंचांवर मात करायला चेर्ने दिएमच्या उपयोगी पडणार होता.

चेर्ने याने अमेरिकेतील आपल्या संस्थेच्या पदाधिकाऱ्यांना तार दिली 'कम्युनिस्ट दक्षिण व्हिएतनाममधून निघून गेलेच नाहीत. सायगावच्या दक्षिणेला अजून त्यांचे लहान लहान अड्डे आहेत. कम्युनिस्टांपासून दक्षिण व्हिएतनाम वाचवायचा तर दिएम याला आपण मदत केली पाहिजे. दिएम याचे शत्रूदेखील सांगतात की दिएम हा शुद्ध सार्वजनिक चारित्र्याचा आहे.'

दिएम हा खरोखर कसा आहे हे चेर्ने याला एकाच भेटीत कसे काय कळले कुणास ठाऊक! चेर्ने हा सप्टेंबर १९५४ मध्ये वॉशिंग्टनला आला. त्याच्या संस्थेने दक्षिण व्हिएतनाममधील निर्वासितांच्या पुनर्वसनाचे कार्य अंगिकारले आणि या कामासाठी संस्थेने बटिंनगेर या अनुभवी अमेरिकन माणसाला दक्षिण व्हिएतनाममध्ये धाडले. कामाची थोडीफार सुरुवात करून बटिंनगेर हा देखील वॉशिंग्टनला परतला. बटिंनगेर याने आल्या आल्या वृत्तपत्रात एक लेख लिहिला आणि प्रथमच दक्षिण व्हिएतनाममध्ये तेथील अमेरिकेचा वकील हा नीट काम करीत नसल्याचा पुकारा केला. त्याने लिहिले –

'दिएम हा नालायक ठरावा अशीच फ्रेंचांची इच्छा आहे. दिएम हा आग्रही आहे म्हणून त्याला फ्रेंच दुराग्रही म्हणतात! दिएम हा प्रामाणिक म्हणून त्याला फ्रेंच राजकारणात अननुभवी ठरवतात, आणि फ्रेंचांचा सल्ला धुडकावणारा तो पहिलाच व्हिएतनामी पंतप्रधान असल्याने फ्रेंच, दिएम हा समजुतीने न घेणारा असल्याचा प्रचार करतात. तेथील स्थानिक जनतेच्या आकांक्षांविषयी प्रेम असलेला वकील अमेरिकेने तेथे धाडला पाहिजे.'

दिएमच्या राज्यात अजून फ्रेंचांना महत्त्वाचे स्थान का होते? तर फ्रेंच सैन्य अजून व्हिएतनाम सोडून गेलेले नव्हते. आणि अंतर्गत व्यवहार वगळता परराष्ट्र संबंधावर फ्रेंचांचाच अंमल होता. चेर्ने आणि बटिंनगेर या जोडीने दिएमविषयी अनुकूल प्रचार आणि डोनाल्ट हीथ या अमेरिकेच्या वकिलाविषयी जोरदार अपप्रचार सुरू केला. कार्डिनल स्पेलमन हा कॅथॉलिकांचा मोठा गुरु, सिनेटरपैकी मॅनस्फील्ड व जॉन एफ. केनेडी हे कॅथॉलिक सिनेटर त्यांना साथ देऊ लागले. 'अमेरिकन फ्रेंडस् ऑफ व्हिएतनाम' ही संस्था जन्माला आली. पुढची सात वर्षे या संस्थेने सायगाव सरकारला पैशाची व इतर मार्गाने भरपूर मदत केली. सिनेटर मॅनस्फील्ड हा देखील दक्षिण व्हिएतनामचा दौरा करून आला व त्याने वृत्तपत्रातून दिएमच्या अडचणीचे व या बाबतीत अमेरिकेच्या जबाबदारीचे रोचक वर्णन सुरू केले.

## ते प्रसिद्ध पत्र

अध्यक्ष आयसेनहॉवर यांचेपर्यंत हे सर्व प्रकारच हळूहळू पोचले. २३ डिसेंबर १९५४ रोजी अध्यक्ष आयसेनहॉवर यांनी पंतप्रधान दिएम याला जे पत्र लिहिले ते पत्र महत्त्वाचे आहे, कारण पुढचे सर्व अध्यक्ष, केनेडी, जॉन्सन, निक्सन हे या पत्राचा आधार घेऊन आपल्या व्हिएतनाममधील राजकीय हालचालीचे समर्थन करीत गेलेले आढळतात. या पत्रात अध्यक्ष आयसेनहॉवर यांनी लिहिले होते –

> ‘आपल्या सरकारला कसकशी मदत करता येईल याचा विचार व्हाईट हाऊस करीत आहे. ही मदत परिणामकारक ठरून आपले सरकार स्थिर कसे होईल व लोकांना दिलासा कसा मिळेल या दृष्टीने विचार चालू आहे. अमेरिकन वकिलाला तुमच्याबरोबर सतत विचारविनिमय करण्याच्या सूचना पाठविल्या आहेत. मदत फ्रेंचांच्या मार्फत न येता, आता थेट तुमच्याकडेच येत जाणार आहे. परंतु या मदतीचा योग्य विनियोग करून राज्यकारभाराची पातळी सतत उंच ठेवण्याचे आश्वासन तुम्ही दिले पाहिजे.’

या पत्रात दिएमकडून जे आश्वासन मागण्यात आले, ती अमेरिकेच्या मदतीची किंमत होती. दिएमचे सरकार हे उत्तम सरकार ठरले, तर आशियातील कम्युनिस्टांच्या प्रसाराला मोठा पायबंद बसेल असा हा हिशोब होता. याचा अर्थ या मदतीला मागे धागा होता आणि या धाग्याचे एक टोक वॉशिंग्टनच्या राज्यकर्त्यांच्या हातात ठेवलेले होते. दान कुणीच फुकट देत नसतो. दिएम याने दान पत्करले. दातृत्वाचा गौरव केला. परंतु त्याची किंमत मोजण्याचे कधी फारसे मनावर घेतले नाही!

दिएम हा आता आपली सत्ता निरंकुश करण्याच्या मागे लागला. अध्यक्ष बाओ-दाई फ्रान्समध्येच कायमचा राहात असला तरी व्हिएतनामी लष्कर प्रमुख जनरल हिन्ह हा त्याचा माणूस होता आणि त्याला उडवायचे दिएम याने ठरवले. त्याला अधिकारावरून दूर करण्यासाठी त्याने अध्यक्ष बाओ-दाई याची परवानगी मागितली. बाओ-दाई हा फ्रेंच सरकारचा बाहुला होता. फ्रेंचांना जनरल हिन्ह हाच लष्कर प्रमुख हवा होता. बाओ-दाई परवानगी पाठवीना तेव्हा बाओ-दाईला धाब्यावर बसवून दिएम याने जनरल हिन्ह याला अधिकारावरून दूर केले! (सप्टेंबर १९५४)

संतापलेल्या जनरल हिन्ह याने खूप त्रागा केला. तो म्हणाला – ‘मी नुसता फोन उचलण्याचा अवकाश आहे की व्हिएतनामी लष्कर दिएमला नाहीसा करील. परंतु दिएम गेला तर अमेरिकन मदत बंद होईल आणि त्याची तर आज देशाला फार गरज आहे.’

जनरल हिन्ह याला हाकलण्याच्या निर्णयाला अध्यक्ष बाओदाईची संमती दोन महिन्यांनी आली. दिएमचा एक काटा असा लगेच निघाला.

## हीथला लाथ

तीन नोव्हेंबरला व्हाईट हाऊसमधून महत्त्वाची हालचाल झाली. दक्षिण व्हिएतनाममधील अमेरिकेचा वकील हीथ हा वॉशिंग्टनची धोरणे नीट पुढे ढकलीत नाही या प्रचाराला यश येऊन, हीथ याला परत बोलावण्यात आले. त्याचे जागी जनरल कॉलीन्स या लष्करी अधिकाऱ्याची अमेरिकेचा वकील म्हणून सायगावला नियुक्ती झाली. या नव्या वकिलाकडे मुख्य कामगिरी ही होती की फ्रेंच कमिशनर जनरल पॉल एली यांचेशी संपर्क ठेवून, प्राप्त परिस्थितीत अमेरिकन सरकारने दिएम याला देऊ केलेल्या मदतीचा त्याचे सरकार कसा विनियोग करते यावर लक्ष ठेवणे.

जनरल कॉलिन्स सायगावला आला, तेव्हा दिएम याने जनरल हिन्ह याला दूर केलेला असला तरी त्याच्या खऱ्या अडचणींनाही सुरुवात झालेली होती. ‘काओ दाई’ व ‘होआ-हाओ’ या धर्मवेड्या संघटनांची उभी झालेली सैन्ये इतके दिवस फ्रेंच पोशीत होते. दक्षिण व्हिएतनाममधील काही छोटे छोटे प्रदेशच यामुळे या लोकांच्या कब्जात गेलेले होते. या पंथाचे चालू गुरु हे आता लष्करी झुंड बनून आपल्या अधिकारात जनतेकडून खंडणी रूपाने पैसा गोळा करीत असत. फ्रेंचांनी १ जानेवारी १९५५ पासून या धर्मवेड्या संघटनांच्या म्होरक्यांना, त्यांच्या सैन्याच्या वाटपासाठी पैसा देणे बंद केले! या दोन्ही संघटना आता बिथरल्या. परंतु या संघटनांना दुखवणे तूर्त दिएम याला परवडणारे नव्हते. त्यांनी बंड केले तर त्याला कॅथॉलिकविरोधी बंडाचे स्वरूप आले असते. तेव्हा दिएमने डाव टाकला. त्याने त्या संघटनांच्या गुंडांना मुळी मंत्रीच करून टाकले! ‘काओ-दाई’ व ‘होआ-हाओ’ या संघटनांचे प्रतिनिधी मंत्रिमंडळात आले.

## मवाल्याला जरब बसवली

माथेफिरू धर्मवेड्यांच्या मठाधिपतींना सत्तेत वाटा मिळाल्याचे पाहाताच, सायगाव बंदरात चाचेगिरी करून आणि मवाल्यांचे, वेश्यांचे अड्डे ताब्यात ठेवून मातलेल्या ज्या गुंडाचे वर्णन पूर्वी आलेले आहे, तो दादा बे-व्हिन यालाही दमात घेण्याचा विचार दिएम याला प्रशस्त वाटू लागला. हा माणूस तर फारच माजला होता. कारण दशलक्ष डॉलरची लाच खाऊन बाओदाईने या माणसाला सायगाव म्युनिसिपालिटीचे पोलीसदलच विकले होते! बाओ-दाईला फ्रान्समध्ये उधळण्यासाठी पैसा हवा होता. या गुंडाने तो त्याला दिला आणि बदल्यात बाओदाईचे खासगी सैन्यच त्याने आयते विकत घेतले. आतापर्यंत सायगाव व चोलोन बंदरातून जुगार, वेश्यांचे अड्डे आणि अफूचा काळा बाजार यातून

निर्माण होणारा पैसा बाओदाईला पोचत होता. सगळा पोचत नव्हता. पोलीस व म्युनिसिपालिटीचे रक्षक भरपूर खाऊन, तरी जो अमाप उरत असे तेवढा पोचत होता.

बे-व्हिन हा अतिशय मस्तवाल माणूस होता. आपल्याशी दिएम जमवून घेईल अशी त्याची अपेक्षा होती. फ्रेंचांना व अमेरिकनांनाही, त्याच्याशी दिएम याने जमवून घ्यावे असाच सल्ला होता. परंतु लष्करप्रमुख जनरल हिन्ह याला दूर केल्यापासून दिएम याला व्हिएतनामी लष्कराची हुकूमत मिळाली होती. बे-व्हिन हा अतिशय बदनाम माणूस होता, तेव्हा त्याला धडा शिकवण्याचे दिएम याने ठरवले.

सायगाव शहरात व बंदरभागात हाणामाऱ्यांना सुरुवात झाली. खून पडू लागले. गोळीबार सुरू झाला. 'न्यूयॉर्क टाईम्स' ने १८ एप्रिलच्या अंकात इशारा दिला –

'गोंधळापासून आणि कम्युनिझमपासून दक्षिण व्हिएतनामला वाचवणे दुरापास्त आहे. सुरू झालेली यादवी देश अधिक छिन्नविछिन्न होणार याची लक्षणे आहेत. नगो-दिन्ह-दिएम हा नालायक, गैरव्यवस्था उत्पन्न करणारा आणि लोकांच्या मनातून उतरलेला असा आता झालेला आहे.'

बे-व्हिएनबरोबर हिंसक झगड्यात बहुधा दिएमचा खातमा होणार, या कल्पनेने 'काओ-दाई' व 'होआ-हाओ' या पंथाचे जे मंत्री दिएमच्या सरकारात आलेले होते, त्यांनी दिएम हा दडपशाही करतो या कारणास्तव राजीनामे दिले. आगीत तेल पडले. दिएमचा परराष्ट्रमंत्री आणि अनेक वर्षांचा स्नेही त्रान-हो हा देखील राजीनामा देऊन बाजूला झाला.

अमेरिकेचा वकील जनरल कॉलिन्स २० एप्रिलला धावत वॉशिंग्टनला गेला. जनरल कॉलिन्स याने स्टेट डिपार्टमेंटला बरोबर सल्ला दिला. जोपर्यंत नवा नेता या सगळ्यातून निर्माण होत नाही तोपर्यंत आपण दिएमला पाठिंबा द्यायला हवा असे मत त्याने दिले.

६ मे १९५५ ला अमेरिकन सरकारने घोषणा केली –

> 'स्वतंत्र व परिणामकारक राष्ट्रीय कार्याविषयी अमेरिकेला सहानुभूती असल्याने, नगो-दिन्ह-दिएम याच्या अधिकृत सरकारला आमचा पाठिंबा राहील.'

एप्रिल अनपेक्षित अवस्थेत संपला. परंतु मे च्या पहिल्या आठवड्यात यादवीचे पारडे संपूर्णपणे दिएमकडे झुकले. बे-व्हिएनचे बंड दक्षिण व्हिएतनामच्या सैनिकांनी पार मोडून काढले. तोपर्यंत 'काओ-दाई' व 'होआ-हाओ' या पंथीयांनी गडबड सुरू केली होती, त्यांचाही दक्षिण व्हिएतनामी सैन्याने समाचार घ्यायला सुरुवात केली. परंतु बे-व्हिएनची दुर्दशा पाहताच ही मठवाली मंडळी शांत झाली!

दिएम याला या सर्व संकटात साथ दिली ती त्याच्या भावाने, नगो-दिन्ह-न्हू याने. दिएम याने जो 'क्रांतिकारी पक्ष' सुरू केला होता, त्याचा न्हू नेता समजला जात असे.

## दिएम-सर्वसत्ताधीश झाला

१९५५ साल संपले, तेव्हा दिएम हा दक्षिण व्हिएतनाम राज्याचा एकमेव सत्ताधीश ठरला होता. दक्षिण व्हिएतनामी सैन्याला पूर्वी बाओदाई पगार देत असे, आता पगार दिएम देत होता आणि त्यांचे इमान त्याने विकत घेतलेले होते. शिवाय अध्यक्ष बाओदाई फ्रान्समध्ये मजा मारीत होता, तर दिएम सायगावला प्रत्यक्ष राज्य चालवीत होता. यामुळे बाओ-दाईची दक्षिण व्हिएतनाममध्ये आता किंमत शून्य झाली होती.

देशात अमेरिका ‘देता किती घेशील दो कराने’ अशी अवाढव्य आर्थिक आणि लष्करी मदत आता ओतू लागली. जिनिव्हा कराराची अंमलबजावणी करण्याकरता नेमलेल्या आंतरराष्ट्रीय महामंडळाचे सभासद, दक्षिण व्हिएतनाममध्ये आले तर त्याला दिएम अडवीत नव्हता, परंतु त्यांचे स्वागतही करीत नव्हता. जिनिव्हा कराराच्या जाहीरनाम्यानुसार निवडणुका घ्यायला दक्षिण व्हिएतनाम बांधलेला नाही, कारण त्यावर आमची सही नाही असे आता तो जाहीरपणे म्हणू लागला.

एखाद्या चिनी मॅडारीनच्या झोकात दिएम आता वावरू लागला. सत्ता आणि पैसा याची धुंदी तो, त्याचा भाऊ न्हू आणि भावजय मादाम न्हू यांच्या डोळ्यांवर हळूहळू चढू लागली. जनमताची कदर त्याला वाटेनाशी झाली. यातच आपले मरण आहे हे त्याने ओळखले नाही. त्याला हे माहीत नव्हते की, पतनापूर्वी माणूस गर्विष्ठपणे जगण्यात धन्यता मानीत राहतो!

n

# १५ : दक्षिण व्हिएतनाममधील अनागोंदी

दक्षिण व्हिएतनामचे बिगर कम्युनिस्ट दुबळे राज्य जर स्थिर करायचे, तर त्या देशाला बळकट राष्ट्रीय सैन्याची आवश्यकता आहे असा वॉशिंग्टन राज्यकर्त्यांचा ठाम सिद्धांत होता. उत्तर व्हिएतनामी सैन्य हे याउलट शिस्तीचे आणि लढायांचा सतत अनुभव लाभलेले असे सैन्य आता झालेले होते. फ्रेंचांवर मिळविलेल्या लष्करी विजयामुळे त्यांची मने आणि मनगटे प्रस्फुरीत अवस्था अनुभवीत होती. अशा स्थितीत तर दक्षिण व्हिएतनामचे राष्ट्रीय सैन्य जितक्या लवकर तयार होईल तेवढे अमेरिकेला हवे होते. पंतप्रधान दिएम याला तर अशा सैन्याची नितांत गरज वाटत होती.

## कॉलिन्सची कामगिरी

जनरल कॉलिन्स हा अमेरिकेचा नवा वकील नोव्हेंबर १९५४ मध्ये सायगावला आल्यापासून याच प्रयत्नांच्या मागे होता. पंतप्रधान दिएम याने अमेरिकेचे याबाबतचे साहाय्य गृहित धरण्यासारखी परिस्थिती आहे हे ओळखून, दक्षिण व्हिएतनाममधील फ्रेंच सैन्याला ‘चलेजाव’ म्हणायला सुरुवातच केली. वस्तुतः सर्व व्हिएतनामभर निवडणुका होऊन सर्व देशाचे एक सरकार निर्माण झाल्यानंतर अठरा महिन्यांनी फ्रेंच सैन्य काढून घ्यायचा वायदा, फ्रेंचांनी शस्त्रसंधी करारानुसार दिलेला होता. परंतु पंतप्रधान दिएम याने जाहीरपणे वक्तव्ये सुरू केली की फ्रेंच सैन्य दक्षिण व्हिएतनाममधून काढून घेतल्याखेरीज राष्ट्रीय भावना रूजणार नाही. एकीकडे जनरल कॉलिन्सपाशी दिएम राष्ट्रीय सैन्यासंबंधी सहकार्य मिळवण्याच्या वाटाघाटी करीतच होता.

जनरल कॉलिन्स याने तर नोव्हेंबर १९५४ मध्ये आल्या आल्या मुलाखतीत म्हटले होते – ‘कोरिया, ग्रीस आणि तुर्कस्थानात येथे ज्या खास अमेरिकन पद्धतीने आम्ही तेथील लष्करे शिकवून तयार केली, तशाच पद्धतीने दक्षिण व्हिएतनामी राष्ट्रीय सैन्य उभे करण्याची अमेरिकेची योजना आहे. अर्थात हे लष्करी शिक्षण फ्रेंच कमिशनर जनरल पॉल एली याच्या देखरेखीखालीच देण्यात येईल.’

वस्तुतः जनरल कॉलिन्स हा अमेरिकेचा अंतस्थ हेतूचा फारच आधी गौप्यस्फोट करीत होता. फ्रेंच सैन्य अजून दक्षिण व्हिएतनाममध्येच होते. ते काढून घेण्यासंबंधीच्या वाटाघाटी पुढे सहा-सात महिन्यांनी सुरू झाल्या. मात्र जनरल कॉलिन्स हा इतक्या उघडपणे आपला हेतू आधीच सांगत सुटला, याचे कारण पंतप्रधान दिएम आणि जनरल कॉलिन्स यांचे आता पक्के मेतकूट झाले होते; आणि दक्षिण व्हिएतनाममधून फ्रेंच सैन्य आधी बाहेर काढले म्हणजे अमेरिकेची वाट मोकळी होईल असे दोघांनी ठरवलेले असावे.

एप्रिल १९५५ मध्ये जनरल कॉलिन्स जेव्हा वॉशिंग्टनला गेला तेव्हा अध्यक्ष आयसेनहॉवर यांच्याशी त्याने चर्चा केल्यानंतरच ६ मे १९५५ ला अमेरिकेच्या सरकारने नगो-दिन्ह दिएम यालाच आपला पाठिंबा असल्याचे निःसंदिग्ध शब्दांत जाहीर केले होते.

यावेळी डल्लेस हे पॅरीस येथे 'नाटो' संघटनेच्या बैठकीकरता आलेले होते. त्यांनी फ्रेंच सरकारला उपदेश केला – 'लवकरात लवकर तुम्ही फ्रेंच सैन्य व्हिएतनाममधून काढून घ्या. दक्षिण व्हिएतनामी लष्कराला प्रशिक्षित करण्याची जबाबदारी आम्ही घेतो. व्हिएतनामच्या बाबतीत फ्रेंचांचे हात ऐतिहासिकदृष्ट्या बरबटलेले आहेत, याउलट अमेरिकेचे हेतू अत्यंत शुद्ध आहेत! आम्ही देखील कम्युनिस्टविरोधी सरकार सायगाव येथे मजबूत करण्याला बांधलेले आहोतच.' डल्लेस यांच्या वक्तव्याने फ्रेंच सरकार रागावले. फ्रेंचांनी डल्लेस यांना म्हटले –

'तुम्ही जर दिएम सरकारला लष्करी मदत करू लागला तर जिनिव्हा शस्त्रसंधीच धोक्यात येईल! त्यावर तुमची सही नाही. तेव्हा दक्षिण व्हिएतनाममध्ये तुम्ही कशाला आला असा प्रश्न येईल. कम्युनिस्ट जगात याचे विपरीत पडसाद उमटतील.'

फ्रेंच पंतप्रधानांनी चर्चिलनंतर इंग्लंडचे पंतप्रधान झालेले हॅरॉल्ड मॅकमिलन यांना पॅरिसला बोलावले. मॅकमिलन यांनीही डल्लेस यांना सांगून पाहिले की अमेरिका दक्षिण व्हिएतनाममध्ये स्वतःला गुंतवू पाहील, तर जिनिव्हा शस्त्रसंधी धोक्यात येईल! परंतु डल्लेस ऐकेनात.

इकडे ही चर्चा चालू असताना फ्रान्समध्ये कायम तळ ठोकून दक्षिण व्हिएतनामचे अध्यक्षपद सांभाळणारा सम्राट बाओदाई याने धांदल सुरू केली. आज ना उद्या दिएमला हाकलून स्थिर झालेल्या दक्षिण व्हिएतनाम सरकारचे नेतृत्व पुन्हा आपल्याकडे घ्यायला बाओदाई उत्सुक होता. जनरल हिन्ह याला दिएमने सत्तेवरून हाकलल्यापासून दिएमशी त्याचे बिनसले होते. ६ मे ला वॉशिंग्टनहून दिएम यालाच अमेरिकेचा पाठिंबा असल्याची घोषणा झाल्यापासून तर बाओदाई वेडापिसाच झाला होता. त्या घोषणेत बाओदाईचा नुसता उल्लेख देखील नव्हता. काय हा अध्यक्षांचा अपमान! बाओदाईने डल्लेस यांची भेट मागितली आणि डल्लेस यांनी थंडपणे त्याला भेटण्यासही नकार दिला. आधीच फ्रेंच सरकार आणि इंग्लंडचे पंतप्रधान मॅकमिलन यांची समजूत घालताना डल्लेस वैतागले होते आणि त्यात ही नवी पीडा कशाला असे त्यांना वाटले.

## फ्रेंच गेले – अमेरिकन आले

शेवटी फ्रेंच सैन्य काढून घ्यायचे की नाही एवढाच काय तो वादाचा मुद्दा आहे, असे गृहीत धरून १० मे १९५५ ला वॉशिंग्टन येथून अमेरिकेच्या अध्यक्षभवनातून पत्रक प्रसिद्ध झाले –

‘व्हिएतनाम सरकारच्या विनंतीनुसार व फ्रेंच सरकारच्या संमतीने व्हिएतनामी राष्ट्रीय लष्कराचे शिक्षण करण्याची जबाबदारी अमेरिकेने पत्करली आहे.’

एखाद्या गृहस्थाच्या घरात शिरून एखादा माणूस तुमच्या मुलांना मी शिकवतो म्हणू लागला तर तो गृहस्थ कशाला नको म्हणेल, अशा काहीतरी हिशोबाने अमेरिकेने फ्रेंचांची संमती मुळी गृहीतच धरली होती!

डल्लेस वॉशिंग्टन परतले आणि अमेरिकेच्या दूरचित्रवाणीवर डल्लेस आयसेनहॉवर सुखसंवादाचा एक कार्यक्रम अमेरिकन नागरिकांसाठी आयोजित करण्यात आला. या बातचितीमध्ये डल्लेस अध्यक्षांना म्हणाले –

> ‘मी पॅरीसला एक मुद्दा आग्रहाने मांडला तो असा की व्हिएतनाम हा आता एक स्वतंत्र देश आहे – निदान दक्षिणेचा अर्धा भाग आणि तिथे असलेले सरकार हे काही बाहुले सरकार नाही की जे आम्ही म्हणू त्याला मान तुकवील. त्या सरकारला जनमताचा आधार आहे. दिएमचे सरकार आता बाओदाईकडून किंवा वॉशिंग्टनहून येणाऱ्या आज्ञा पाळायला मुळीच बांधलेले नाही.’

दिएम याला बाओदाईला दूर करण्यासाठी डल्लेस यांनी दिलेली ही चिथावणीच होती. डल्लेस यांनी बाओदाईला भेट नाकारली होती आणि आता तर अमेरिकेच्या अध्यक्षांच्या समोर बसून डल्लेस सांगत होता ही बाओदाईची पीडा हवी कशाला?

फ्रेंच सरकारला पण शहाणपण सुचले. बाओ-दाईमार्फत सायगाववर काहीही हुकुमत ठेवणे अशक्य आहे हे फ्रेंच सरकारने ओळखले. तिथे सैन्य तरी कशाला पोसायचे? फ्रेंच सरकारने १२ मे १९५५ ला जाहीर केले –

‘दक्षिण व्हिएतनाममधून आम्ही फ्रेंच सैन्य लगेच काढून घेत आहोत.’

लगेच म्हणजे इतके लगेच की सायगावहून पहिल्या फ्रेंच तुकड्यांनी २० मे १९५५ ला बोटीत पाऊलदेखील ठेवले! अर्थात सर्व सैन्य काढून घ्यायला वर्ष लागणार होते.

राजकारणात एक नियम असा असतो की, एखाद्या माणसाकरवी एखादे सुष्टदुष्ट काम करवून घेतले की त्याची बदली करायची! म्हणजे नवा आलेला माणूस त्यातले सोयीस्कर धागे तेवढे पकडू शकतो. जनरल कॉलिन्स याने आपले काम चोख पार पाडले होते. लगेच जनरल कॉलिन्सच्या बदलीचा हुकूम वॉशिंग्टनहून आला! त्याच्या जागी दक्षिण व्हिएतनाममधील अमेरिकेचा वकील म्हणून फ्रेडरीक रेनहार्ड हे गृहस्थ आले. जनरल कॉलिन्स याला निरोपाची मेजवानी सायगाव येथे झाली. दिएम अर्थात हजर होता. अशा प्रसंगी देशाच्या सर्वात मोठ्या स्थानावर असलेल्या व्यक्तीच्या नावे मौखिक चित्राहुती

घालण्याची आंग्ल पद्धत आहे. त्याला 'टोस्ट' म्हणतात. जनरल कॉलिन्स याने टोस्ट सुचवला तो दिएमच्या नावे!

अध्यक्ष बाओ-दाई सरकारी समारंभातूनही आता नामशेष झाला.

## बाओ-दाईला ग्रहण

दिएमने आता अध्यक्ष बाओदाईच्या खुर्चीलाच सरळ हात घालण्याचे ठरवले. प्रथम त्याने बाओदाईचे पाच हजार शाहीखासगी सैन्य दक्षिण व्हिएतनामी राष्ट्रीय सैन्यात विलीन करून टाकले. सम्राट बाओदाईच्या जमिनी खूप होत्या. त्या सर्व सरकारी करून, त्यावर त्याने उत्तर व्हिएतनाममधून आलेल्या प्राय: कॅथॉलिक बंधूंचे पुनर्वसन सुरू केले! बाओदाई हा मूळचा अन्नामचा राजा. त्याची राजधानी हुए. तेथे एक मृतावस्थेत गेलेले 'रॉयल कौन्सिल' होते. या कौन्सिलच्या सभासदांना वश करून दिएम याने ठराव करून घेतला – 'दिएम यानेच देशाचे अध्यक्षपद भूषवावे.'

इतके पचल्यावर दिएम याने घोषणा केली – '२३ ऑक्टोबर १९५५ रोजी देशात सार्वमत घेऊन हे ठरविण्यात येईल की जनतेला देशाचा प्रमुख म्हणून दिएम हवा आहे की बाओदाई?'

एवीतेवी निवडणूक होणारच आहे तेव्हा याचवेळी जिनिव्हा करारानुसार होणारी निवडणूकही का घेत नाही? असा प्रश्न पत्रकारांनी दिएमला विचारताच दिएमन सांगितले –

'कसला जिनिव्हा करार? आम्ही त्यावर सही थोडीच केली आहे? आम्ही त्या कराराला मुळीच बांधलेलो नाही. निवडणुका घेण्याचा प्रश्नच येत नाही!'

१६ जुलै १९५५ ला अशा रीतीने दक्षिण व्हिएतनामला जिनिव्हा समझोत्याचे जाहीर श्राद्ध उरकण्याचा धीर दिएम याला झाला, याचे कारण अमेरिकेची त्याला यासाठी फूस होती. सेक्रेटरी डल्लेस यांनी दोन आठवड्यांपूर्वी म्हणजे २७ जूनला नेमके याच अर्थाचे वक्तव्य केले होते.

डल्लेस यांचे सहाय्यक चिटणीस रॉबर्टसन यांनी दोन महिन्यांनी दिएम याच्या निर्णयावर शिक्कामोर्तब केले. त्याने सांगितले ---

'उत्तर व्हिएतनाममधून दक्षिणेस आलेले लाखो निर्वासित आणि दक्षिण व्हिएतनामी जनता या सर्वांना अखंड व्हिएतनामचा ध्यास आहे. परंतु ही सर्व लक्षावधी जनता कम्युनिझमला कट्टर विरोध करणारी आहे. यामुळे कम्युनिस्ट राजवटीखालील अखंडता त्यांना कधीही मान्य होणार नाही. जुलै १९५६ मध्ये जिनिव्हा समझोत्यानुसार निवडणुका मग घ्यायच्या कशाला?'

'न्यूयॉर्क टाईम्सने' लिहिले –

> 'दक्षिण व्हिएतनामी जनतेचा निवडणुकांबाबतचा निरूत्साह समजू शकतो. जर मते केवळ संख्येने मोजायची म्हटली तर दक्षिण व्हिएतनाम या निवडणुकीत देश म्हणून नाहीसा होईल आणि जिनिव्हा समझोत्याचा व्यावहारिक अर्थ हा होईल की, एक कोटी जनतेला कम्युनिस्ट राजवटीचे दास्य पत्करण्यास भाग पाडले गेले.'

## निवडणुकीचा तमाशा

ऑक्टोबर उजाडला. दिएमच्या देशात सार्वमताची धमाल सुरू झाली. दिएमचा धाकटा भाऊ न्हू, थोरला भाऊ आर्चबिशप थुक, भावजय मादाम न्हू ही सर्व मंडळी कामाला लागली. दिएमच्या राज्यातील हे पहिलेच लोकशाही लोकनाट्य! जनतेत उत्साह होताच, परंतु निवडणूक अधिकारी आणि मतगणक यांच्यात जरा जादा होता! सार्वमताचा निकाल लागला. ९९ टक्के जनतेने दिएम पत्करला. बाओदाईला 'चलेजाव' सांगितले! सायगाव शहरात तर जेवढे नोंदवलेले एकूण मतदार होते, त्यापेक्षा दिएमला मते कितीतरी अधिक पडली!! हा सर्व दिएम कुटुंबाचा एक 'अच्छा खासा तमाशा' होता आणि तो झकास पार पडला.

दिएमच्या प्रेमातली माणसेही हा लोकशाही तमाशा पाहून हवालदिल झाली. जोसेफ बटिंगर (हा अमेरिकन सायगावला भेट देऊन गेला होता.) याने लिहिले –

> 'ही एकतर्फी निवडणुक आणि त्यात उपयोगात आणलेल्या क्लृप्त्या भयावह आहेत. स्वतंत्र व्हिएतनाममधील लोकशाही कुठल्या मार्गाने जाणार याचे जर ही निवडणुक निदर्शक असेल तर दिएम आणि त्याच्या कुटुंबियांचे भवितव्य मला कठीण दिसते!'

अमेरिकन सरकारने मात्र अधिकृतरित्या दक्षिण व्हिएतनाममधील या अभूतपूर्व लोकशाही प्रयोगाची खूपच वाहवा केली. आनंद व्यक्त केला. दिएमची पाठ थोपटली.

१९५५ साल संपले तेव्हा दिएम याने डोळ्यांपुढे ठेवलेली बरीच उद्दिष्टे पुरी केलेली होती. धर्मवेड्या पंथांची मोडतोड झाली होती. फ्रेंच सैन्य देश सोडून चालले होते. बाओदाई नामशेष झाला होता. आता ज्यासाठी आपण हे सर्व केले असे दिएम सांगत असे, तेवढी गोष्ट करायची शिल्लक होती आणि ती म्हणजे लोकप्रिय बलशाही अशा कम्युनिस्टविरोधी दक्षिण व्हिएतनाम देशाची निर्मिती! १९५५ साली हे त्याला जमले नाही, ५६ साली जमले नाही, पुढे कधीच जमले नाही!

१९५६ च्या मे महिन्यात त्यावेळी सिनेटर असलेले जॉन एफ. केनेडी यांनी लिहिले –

> 'दक्षिण व्हिएतनामसंबंधी अमेरिकेच्या वृत्तपत्रांतून आता पहिल्या पानांवर काहीच बातम्या दिसत नाहीत. याचे कारण अध्यक्ष दिएम (आ आता बाओदाईच्या जागी

अध्यक्ष झाला होता.) याने राजकीय व आर्थिक क्षेत्रात असलेली बजबजपुरी नाहीशी करण्यात मिळवलेले यश होय. तिथे कम्युनिस्ट चढाईचा धोका नाहीसा करण्यासाठी माझ्या मते आपली काँग्रेस आणि सरकार दक्षिण व्हिएतनामला आता मोठ्या प्रमाणावर मदत करील असे दिसते.'

## ग्रॅहम ग्रीनची भेट

अमेरिकेच्या सरकारला, सिनेटरांना, वृत्तपत्रकारांना दक्षिण व्हिएतनाम हा दिवसेंदिवस सुदृढ होत चालल्याचा भास होत असताना, ग्रॅहम ग्रीनसारखे ललित लेखक दक्षिण व्हिएतनामला भेट दिल्यानंतर सांगत होते –

'दक्षिण व्हिएतनामचे काही खरे नाही! उत्तर व्हिएतनामच्या एकतंत्री कारभाराला उत्तर देऊ शकेल असा जनतेला पुरेसे स्वातंत्र्य असलेला कारभार येथे नाहीच. इथेही एक नालायक हुकूमशहा आहे, वृत्तपत्रांची गळचेपी आहे, कडक नियंत्रणे आहेत, आणि सरकार विरोधकांना इथे हद्दपारी आहे.'

लेखकाचा आवाज नेहमीच क्षीण असतो. यामुळे इकडे राजकारण्यांनी लक्ष दिले नाही. अध्यक्ष दिएम याच्या अमेरिका भेटीचे नगारे इतके जोरात वाजू लागले की वस्तुस्थिती काय आहे हे पाहायची कुणाला इच्छा होईना. मे १९५७ मध्ये दिएम अमेरिका भेटीला आला. त्याची ही भेट म्हणजे विजयी दौरा असे त्याचे सर्वत्र वर्णन झाले. कारण त्याने अमेरिकेच्या काँग्रेसपुढे केलेल्या भाषणानंतर टाळ्यांच्या फैरीवर फैरी झडल्या. यशानंतर चढणारी खोटी नम्रता, अमेरिकेच्या मदतीचा पुनः पुनः कृतज्ञतापूर्वक निर्देश आणि कम्युनिस्टांना पायबंद घालण्याची आवेशपूर्ण भाषणे याच्या बळावर दिएम याने अमेरिकेन जनतेवर छाप पाडली. वृत्तपत्रांनी त्याची मोठमोठी छायाचित्रे छापली. मोठमोठ्या मुलाखती प्रसिद्ध केल्या. 'न्यूयॉर्क टाईम्स'ने मथळा दिला – 'दिएम हा आशियाचा रक्षणकर्ता! कणखर नेतृत्वाचा आदर्श!!'

अमेरिकेच्या आर्थिक मदतीचे स्वरूप हे आपल्याकडील 'पी.एल.४८०' या योजनेपेक्षाही अधिक उघडे नागडे होते. अमेरिकेच्या अन्नधान्याचे पैसे भारताने रुपयांत द्यावे व तो खजिना अमेरिकेने भारतात खर्च करावा अशी आपल्याकडील मूळ योजना होती. परंतु अखेर हे पैसे इतके जमले की ते अमेरिकेने भारतात खर्च केले तर समांतर अर्थव्यवस्था उभी राहील अशी परिस्थिती येताच अमेरिकन सरकारने हे पैसे भारत सरकारला दान देऊन टाकले! परंतु मुळात हे कर्ज म्हणूनच भारताने मदत घेतली होती. दक्षिण व्हिएतनामबाबत अमेरिकेची मदत हे मुळी कर्जच नव्हते! व्हिएतनामी व्यापाऱ्यांनी खते, पोलाद, मशिनरी, मोटारी, सिमेंट इत्यादी गोष्टी खुशाल अमेरिकेतून मागवाव्या व

याचे पैसे व्हिएतनामी चलनात ('पिअॅस्टर्स'मध्ये) दक्षिण व्हिएतनामच्या तिजोरीत भरावे आणि दक्षिण व्हिएतनाम सरकारने हा बहुतेक पैसा सैन्यावर खर्च करावा अशी ही योजना होती. या पैशातून जे लष्करी साहित्य दिएम खरेदी करीत असे ते साहित्य मात्र अमेरिका दक्षिण व्हिएतनामला विकीत आहे असे अमेरिका जगाला सांगू शकत असे! म्हणजे अन्नधान्य व आवश्यक वस्तूंची मदत अशा करता की दक्षिण व्हिएतनामचे लष्कर मजबूत व्हावे!

## अमेरिकन सहाय्याचा खेळखंडोबा

५० ते ६० या दशकांत अमेरिकेकडून ज्या मागासलेल्या देशांनी आर्थिक वा लष्करी साहाय्य घेतले, त्या त्या देशांनी त्याचा चांगला विनियोग केलेला दिसत नाही. ही गोष्ट आधी कळावी असा पूर्वानुभव अमेरिकेला नव्हता. मार्शल योजनेखाली पश्चिम युरोपातील देशांना अमेरिकेने साहाय्य केले अथवा जपान देशाची युद्धोत्तर रचना करण्यासाठी अमाप मदत दिली तेथे सर्वत्र अमेरिकेला अपेक्षित ती उद्दिष्टे त्या त्या देशांनी पुरी केल्याचे दिसते. या देशातून राज्यकारभाराला आवश्यक असणारे ज्ञान व चतुराई देशाचे पुढारी म्हणणाऱ्यांच्यापाशी भरपूर होती. तिथले उद्योगपती हे अद्यावत विज्ञानाने परिपुष्ट होते. अर्थशास्त्रज्ञ, इंजिनिअर्स, तंत्रज्ञ हे सर्व कुशल होते आणि त्यांच्याशी अमेरिकन राज्यकर्त्यांना उत्तम संवाद साधता आला. अमेरिकेच्या मदतीला अर्थात काही धागे होते आणि त्याची दुसरी टोके अमेरिकेच्या परराष्ट्रीय राजकारणात गुंतलेली होती हे जरी मान्य केले, तरी या देशातून कम्युनिझमचे आकर्षण आत्यंतिक गरिबीच्या अभावाने जवळ जवळ नव्हते. यामुळे अमेरिकेला दिलेल्या मदतीने निर्माण होणारे ओशाळेपणे राबवून, या देशांना काही चपराक देण्याची वेळच आली नाही. या देशांनी आपला आर्थिक विकास साधून अमेरिकेला धन्यवाद दिले.

दक्षिण व्हिएतनामच्या बाबतीत अमेरिकेच्या मदतीचा खेळखंडोबा लगेचच सुरू झाला. पहिली गोष्ट सत्ता हाती येईपर्यंत दिएम हा निष्कलंक असला तरी सत्तेवर आल्यानंतर तो झपाट्याने बदलत गेला. दिएमचा धाकटा भाऊ न्हू याने दिएमला पटवून दिले की अमेरिकेच्या पैशातला काही पैसा हा दिएमला पाठिंबा देणाऱ्या पक्षांवर खर्च करण्यास वा वापरण्यास मुळीच चूक नाही! दिएमचा थोरला भाऊ आर्चबिशप थुक याने दिएमला उपदेश केला की 'तुला संपूर्ण पाठिंबा आहे तो कॅथॉलिक धर्मियांचा. मग या धर्माच्या प्रसारासाठी, कॅथॉलिक मिशनसाठी, धर्मगुरूंसाठी, चर्चेससाठी पैसा खर्च केला तर त्यात बिघडले काय?'

दिएमच्या राजवटीला गैरव्यवहारांची आणि पैसा हडप करण्याची कीड लागली ती सुरुवातीपासूनच. या किडीने शासन संपूर्ण पोखरीपर्यंत याचा अंदाज बाहेरच्या जनतेला

आला नाही एवढेच काय ते.

## शस्त्रे बाहेर पडली

जुलै १९५६ मध्ये जिनिव्हा समझोत्यानुसार देशभर होणाऱ्या निवडणुकांना दिएम सरकार व त्याच्या पाठीशी उभी असलेली अमेरिकेची भांडवलशाही यांनी हरताळ फासल्यानंतर हो-चि-मिन्ह याने स्वस्थ बसावे अशी कुणाचीच अपेक्षा नव्हती. जर निवडणुका झाल्या असत्या तर लोकशाही मार्गाने संपूर्ण व्हिएतनामभर लाल राजवट आणणारा हो-चि-मिन्ह हा पहिला नेता ठरला असता! परंतु हे यश वा पायंडा पडू देण्यास दिएम याने नकार दिला.

हो-चि-मिन्ह पुढे आता दोन पर्याय होते. एक जिनिव्हा समझोता ठोकरून दक्षिण व्हिएतनामवर पुनश्च लष्करी चढाई अथवा दक्षिण व्हिएतनामचे शासन कब्जात घेऊ शकेल अशा विरोधी चळवळीची दक्षिण व्हिएतनाममध्ये उभारणी. युद्धाचा पर्याय हो-चि-मिन्ह याने पत्करला नाही याला अनेक उघड कारणे दिसतात. पहिली गोष्ट फ्रेंच सैन्य, दक्षिण व्हिएतनाम सोडून निघून गेल्याने आता हे युद्ध फ्रेंचांविरुद्ध होणार नव्हते तर ते स्वकीयांविरुद्ध होणार होते. दुसरी गोष्ट 'मॅनिला करारानुसार' हे युद्ध दक्षिण व्हिएतनामवरील आक्रमण ठरवून अमेरिका आदी बडी राष्ट्रे दक्षिण व्हिएतनामच्या वतीने सरळ युद्धात उतरली असती आणि मग कदाचित उत्तर व्हिएतनामचेच स्वातंत्र्य धोक्यात आले असते. महत्त्वाचे तिसरे कारण असे की कदाचित उत्तर व्हिएतनामच्या लष्करातील कुशल सैनिकांच्या काही तुकड्या या दक्षिण व्हिएतनाममध्येच शस्त्रे म्यान करून पूर्वीच भूमिगत झालेल्या होत्या. दिएम सरकारमधील गैरव्यवहार आणि लाचलुचपत याची झळ दक्षिण व्हिएतनाममधील स्थानिक जनतेला आता भेडसावू लागली असल्याने स्थानिक जनतेत असंतोषाचे बीज पेरणे, त्यांना शासनावर प्रहार करण्यास उद्युक्त करणे हे दिवसेंदिवस अधिकाधिक शक्य होत चालले होते. तेव्हा सायगाव सरकारला लष्करी धक्का देण्यापेक्षा त्याला जनतेतील असंतोष भडकवून आतून धक्के मारणे हे अधिक शहाणपणाचे, चतुराईचे व धोरणीपणाचे ठरणार होते.

## हो-चि-मिन्ह याने हा दुसरा पर्याय पत्करला!

दक्षिण व्हिएतनाममध्ये असलेल्या उत्तर व्हिएतनामी सैनिकांनी आपली शस्त्रे कालांतराने बाहेर काढली. शासन बदनाम करण्याचा सर्वात यशस्वी मार्ग म्हणजे कायदा आणि सुव्यवस्था यांना सुरूंग लावणे. खेड्यापाड्यांतून जमीनदारांवर लाचलुचपत करणाऱ्या सरकारी अधिकाऱ्यांवर आता घेराव आणि क्वचित प्रसंगी हल्ले सुरू झाले.

दिएमला आता काहीतरी करणे भाग पडले... आणि या क्रांतिकारक चळवळ्यांचा बंदोबस्त करण्यासाठी दिएम याने जे जे केले त्यात तो एका पाठोपाठ एक घोडचुका करीत सुटला.

दिएम याने निवडणुका घेऊन सायगावला एक असेंब्ली निर्माण केली असली तरी या निवडणुका म्हणजे सार्वमताप्रमाणे एक मोठे नाटक झाले.

दिएम हा जाहीरपणे लोकशाहीचे कितीही गोडवे गात सुटला तरी त्याचे अंतर्यामी असे मत होते की, 'व्हिएतनामी जनता ही अशा पद्धतीच्या राजकीय व्यवस्थेला अजून लायक नाही! आणि एका व्यक्तीला कठोरपणे राज्य करणे भाग आहे, निदान जोपर्यंत देशाच्या स्वातंत्र्याला धोका आहे तोपर्यंत.'

मे १९५९ मध्ये अमेरिकेच्या गुप्तहेर खात्याच्या एका अहवालातीलच हे वाक्य असल्याने त्याच्या खरेखोटेपणाविषयी शंका असण्याचे कारण नाही. भ्रष्ट लोकशाहीतील सत्तेवरील माणसे विरोध वाढू लागला की नेहमी हेच म्हणत असतात, की देशाच्या स्वातंत्र्याला धोका आहे! विरोधकांच्या मागे काही देशबाह्य शक्ती आहेत!!

## विनाशापूर्वी

दिएमची पुढची विपरीत बुद्धी वर्णन करण्यापूर्वी दिएम याने देशासाठी चांगल्या बुद्धीने प्रथम काय काम केले ते सांगितले पाहिजे.

शेतीप्रधान देशात जमिनीविषयक कायद्याची काटेकोर अंमलबजावणी आणि शेतीचे देशहितकारक असे अर्थशास्त्र यावर देशाची भरभराट अवलंबून असते. फ्रेंच वर्चस्वाखाली व्हिएतनाम असताना लागवडीच्या एकंदर जमिनीचा निम्मा भाग हा तीन टक्के लोकांच्या हातात होता. हे बडे जमीनदार, सावकार, फ्रेंच राज्यकर्त्यांना विरोध करीत नसत व फ्रेंच राज्यकर्ते त्यांच्या वाटेला जात नसत. ८० टक्के शेतकरी हा व्यवहारात भूमिहीन मजूर होता. जे पिकवले जात होते त्यावर त्याची सत्ता नसे.

फ्रेंचांविरुद्ध व्हिएत-मिन्हने 'दिएन-बिएन-फू' पूर्वी दिलेल्या गनिमी लढाया या सर्व भातशेतांतून झाल्या. शेतकऱ्यांची गुरेढोरे यात नष्ट झाली. पाटबंधारे कामातून गेले. शेतकऱ्यांची तरुण मुले व्हिएत-मिन्हमध्ये सामील झाली किंवा फ्रेंच सैन्यात शिरून विरुद्ध बाजूने लढू लागली. काहीजण शहरात पळाले. बेकार मवाली झाले. यामुळे शेते ही भाकडभूमी होऊन म्हाताऱ्याकोताऱ्यांची केवळ दफनभूमी झाली!

दिएम सरकारला शेतीविषयक सुधारणा करणे आवश्यक होते. यासाठी अमेरिकेतून वुल्फ नावाचा शेतीतज्ज्ञ सायगावला आला. दिएम याने अध्यक्ष या नात्याने १९५६ च्या डिसेंबरात वटहुकूम काढून जमीन सुधारणा जाहीर केल्या. यात खालील मुख्य कलमे होती –

(अ) ज्यांच्याजवळ २४५ एकरांहून अधिक जमीन असेल, त्याने ती भूदानासाठी सरकारला दिली पाहिजे.

(ब) सरकारला दिलेल्या जमिनीबद्दल सरकार मोबदला देईल तो पैशांत व बारा वर्षांच्या बाँडमध्ये मिळेल. हा मोबदला म्हणजे जमिनीच्या किंमतीच्या १० टक्के भाग असेल.

(क) जमिनीचा कर हा मुख्य पिकाच्या किंमतीच्या २५ टक्के असेल.

या सुधारणांचा अंमल सुरू होताच दिएम सरकार अडचणीत येऊ लागले. दक्षिण व्हिएतनाममध्ये भूमिहीन शेतकऱ्यांची संख्या यावेळी सहा लाख होती. १३ अक्षांश ते १७ अक्षांश या पट्ट्यातील शेतकऱ्यांनी, (तो भाग जिनिव्हा करार होण्यापूर्वी व्हिएत-मिन्ह अंमलाखाली असताना) जमीनदारांना यापूर्वी सारा म्हणून एक छदामही दिलेला नव्हता. कम्युनिस्टप्रधान राजवटीत ते सर्व त्या जमिनीचे सात आठ वर्षे मालकच होते. परंतु दिएमचा अंमल त्या भागावर येताच जमीनदारांनी कोर्टकचेऱ्यांमार्फत कागदपत्रांवरून त्या जमिनीवरील आपला हक्क कागदोपत्री सिद्ध केला होता. या नव्या वटहुकूमानुसार कसणाऱ्या शेतकऱ्यांना आता जमीनदारांना २५% उत्पन्न सारा म्हणून देणे भाग होते. या सर्व शेतकऱ्यांचा या नव्या कायद्याला जोरदार विरोध सुरू झाला. इथे एक लक्षात ठेवले पाहिजे की हे सर्व शेतकरी काही कम्युनिस्ट नव्हते. परंतु कसेल त्याची जमीन या तत्त्वानुसार ते लहान लहान जमिनीचे मालक झालेले असताना, दिएम याने त्यांना पुनश्च कुळे ठरवून जमीनदारांना सारा देण्यास भाग पाडल्याने मोठाच असंतोष निर्माण झाला.

या असंतोषाला एकत्र करून खतपाणी घालण्याचे राजकीय कार्य त्या भागात मोठ्या प्रमाणावर भूमिगत झालेल्या व्हिएत-मिन्ह कार्यकर्त्यांनी सुरू केले. असंतोष धुमसू लागला, धगधगू लागला. अशा वेळी उपयोगी म्हणून दिएम याने एक लोकशाही हत्यार परजून ठेवलेलेच होते.

११ जानेवारी १९५६ रोजी जमीनकायद्याचा वटहुकूम काढण्यापूर्वीच एक अध्यक्षीय वटहुकूम काढून देशाच्या संरक्षणाला बाधक असतील अशा व्यक्तींना पकडून त्यांना यातना छावण्यांतून धाडण्याचा अधिकार त्याने स्वतःकडे घेतलेला होता. दिएमच्या पोलिसांनी शेतकऱ्यांमध्ये संघटना बांधणाऱ्या चळवळ्या व्हिएत-मिन्ह व शेतकऱ्यांच्या पुढाऱ्यांना टिपायला सुरुवात केली. दडपशाहीचा वरवंटा फिरू लागताच चळवळ-दडपशाही-गोळीबार-चळवळ-दडपशाही हे चक्र अव्याहत फिरू लागले.

पुढल्या वर्ष दीड वर्षात सुमारे ४०,००० संशयित व्हिएत-मिन्ह आणि इतर चळवळ्यांना दिएमने यातना छावण्यांतून बंदिस्त केले.

जिनिव्हा शस्त्रसंधीत एक अट ही होती, की फाळणी होण्यापूर्वी उभय प्रदेशातील व्यक्तींनी काहीही चळवळ केलेली असो त्यांच्यावर सूड उगवला जाऊ नये. दिएम याने

आता त्याच लोकांवर दात धरला, की जे हो-चि-मिन्ह यांचे अनुयायी नव्हते. परंतु काही वर्षे धनी होते आणि दिएमने त्यांच्या जमिनी पुनः सावकारांकडे दिल्याने संतप्त झाले होते.

## राष्ट्रवादी आणि कम्युनिस्ट

हा असंतोष हनोई येथून हो-चि-मिन्ह याने निर्माण केला, ही अमेरिकेच्या प्रचारकी लेखकांनी निर्माण केलेली अफवाच आहे. या असंतोषाला संघटित करून दिएम सरकारविरुद्ध जनक्रांतीची मजबूत फळी उभारण्याचे काम हे प्रथम दिएमच्या दडपशाहीला कंटाळलेल्या दक्षिण व्हिएतनामी राष्ट्रवाद्यांनीच केले. यातले काही तर फाळणीपूर्वी व्हिएत-मिन्ह सैनिकांशीच लढलेले होते. परंतु दिएम सरकारच्या अन्यायाविरुद्ध त्यांनी जी आघाडी पुढे निर्माण केली त्याचा कब्जा कालांतराने कम्युनिस्टांकडे आला कारण या आघाडीला ताजेतवाने तरुण नेतृत्व दिले ते भूमिगत झालेल्या हो-चि-मिन्ह याच्या सैनिकांनीच. परंतु शेतकऱ्यांच्या चळवळीला प्रथम राजकीय नेतृत्व दिले ते ‘दाई-व्हिएत’ व ‘नॅशनल सॅलव्हेशन मूव्हमेंट’ या राजकीय पक्षांनी. हे पक्ष जसे दिएम विरोधी होते तसेच ते कम्युनिस्टविरोधी होते. या पक्षांचे कार्यकर्ते दिएमच्या दडपशाहीचक्राला तोंड देण्यासाठी जेव्हा भूमिगत झाले तेव्हा त्यांना मदत केली ती मात्र आतापर्यंत शस्त्रे म्यान करून बसलेल्या परंतु प्रत्यक्ष लढ्यात न उतरलेल्या व्हिएत-मिन्ह सैनिकांनी. साहजिकच या सर्वांनाच कम्युनिस्ट म्हणून ठोकणे सोपे जाणार होते. दिएमच्या सरकारनेच या भूमिगत चळवळ्यांना ‘व्हिएतकाँग’ म्हणायला सुरुवात केली. ‘काँग म्हणजे कम्युनिस्ट!’ याच व्हिएतकाँगनी लढ्याचा आदेश मिळताच, चळवळीत दाखल झालेल्या व्हिएत-मिन्ह सैनिकांच्यासह ‘नॅशनल लिबरेशन फ्रंट’ (NLF) ‘राष्ट्रीय मुक्ती आघाडी’ पुढे १९६० मध्ये निर्माण केली.

या असंतोषाने लवकरच हिंसक वळण घेतले. दिएमच्या पोलिसांनी चालवलेल्या धरपकडीची आणि छळाची ती अटळ प्रतिक्रिया होती. दिएम सरकारचे पोलिस अधिकारी आणि त्यांना सहाय्य करतात असा संशय असलेले दारू दुकानदार, अमेरिकन व्यापारी यांचेवर मग बॉंब फेकले जाऊ लागले. १९५८ साली ‘व्हिएतकाँग’ चळवळ्यांचे ‘रेडिओ स्टेशन’ सुरू झाले!

एवढे सर्व होईपर्यंत हनोई रेडिओ या चळवळीचे समर्थन करीत नव्हता. दिएम सरकार लवकरच निवडणुकांचा विचार करील अशी आशा व्यक्त करीत होता. अर्थात कदाचित हा हनोई सरकारचा बाह्य मुखवटाही असू शकेल.

## चिन्यांवर प्रहार

अध्यक्ष दिएम याने आणखी एक घोडचूक करून ठेवलेली होती. २२ ऑगस्ट १९५६ ला त्याने एक वटहुकूम काढून जाहीर केले होते – 'व्हिएतनाममध्ये जन्म झालेले चिनी मातापित्यांचे वंशज हे व्हिएतनामचे नागरिक समजले जातील. चिनी शाळा, सामाजिक संघटना, हॉस्पिटले ही सर्व सरकारात रजिस्टर केली पाहिजेत. जे चिनी दक्षिण व्हिएतनामी नागरिकत्व पत्करणार नाहीत, त्यांना देशात व्यवसाय करता येणार नाही. एका वर्षात हे सर्व अंमलात आले पाहिजे.'

हा वटहुकूम वरवर पाहता कुणालाच तापदायक वाटण्याचे कारण नव्हते. परंतु सायगाव-चोलो बंदराच्या आसपास सुमारे सहा लाख चिनी होते. इतक्या संख्येने एकत्र असल्याने त्याचे लहानसे 'पाकिस्तान' तयार झालेले होते. यातील बहुतेक श्रीमंत व्यापारी असल्याने त्यांची शाळा, हॉस्पिटले स्वतंत्र उभी राहून स्वतंत्र चालत असत. या सर्वांचे आता राष्ट्रीयीकरण करावे अशी राष्ट्रीय दक्षिण व्हिएतनामी जनतेची रास्त मागणी होती. परंतु एकाएकी वटहुकूम निघाल्याने चिनी व्यापाऱ्यांनी देश सोडून जायला सुरुवात केली. यातून दोन गोष्टी झाल्या.

पहिली गोष्ट दक्षिण व्हिएतनाम हा चीनविरोधी आहे असा प्रचार हनोई व पेकिंग येथून सुरू झाला. दुसरी गोष्ट चिनी मागे ठेवून गेलेल्या उद्योगधंद्याच्या नाड्या दिएम राजवटीत गबर झालेल्या कॅथॉलिक पंथीय ख्रिश्चनांच्या हातात जाऊ लागल्या आणि या सर्व प्रकरणाला बौद्ध विरूद्ध ख्रिस्ती असा रंग चढत गेला.

दिएमच्या राजवटीचे या काळातले नेमके चित्र 'इकॉनॉमिक्स' पत्राने दिले होते –

> 'दिएमने देश संघटित तर केला नाहीच, उलट त्याने दक्षिणेत दुफळी माजवली आहे. कम्युनिस्ट हे त्याचे शत्रू असताना फक्त त्यांना ठेचण्याऐवजी त्याने सरसकट सर्व विरोधकांना कम्युनिस्ट ठरवून त्यांचा काटा काढायला सुरुवात केली आहे. यामुळे लोकशाही राजवटीचा जो प्रमुख आधार- जबाबदार विरोधी पक्ष – तोच त्याने उखडून टाकला आहे. हे सर्व दिएम करतो आहे याचे कारण पॅसिफिक मार्गाने देशात येणारी डॉलर संपत्ती! अन्यथा ही राजवट एव्हाना मोडून पडली असती. दिएमच्या समर्थकांची संख्या दक्षिण व्हिएतनामपेक्षा अमेरिकेत अधिक आहे.'

दिएमचे समर्थक अमेरिकेत अधिक होते हे स्वाभाविक होते. याचे रहस्य अमेरिकेच्या व्यापाऱ्यांच्या आणि भांडवलदारांच्या दक्षिण व्हिएतनाममध्ये त्यांनी निर्माण केलेल्या आर्थिक व्यापात होते. ट्रॅम, रेल्वे असे काही वाहतुकीला आवश्यक उद्योग वगळता फ्रेंचांनी निर्माण केलेले सर्व उद्योगधंदे हे उत्तर व्हिएतनाममध्ये होते. फ्रेंच निघून गेले तेव्हा दक्षिणेत प्रामुख्याने काही असेल तर तांदळाच्या गिरण्या, लाकूड कापण्याचे कारखाने आणि दारू गाळण्याचा प्रमुख धंदा. संबंध दक्षिण व्हिएतनाममध्ये फक्त एकच कोळशाची

खाण होती. १९५७ साली दिएम याने पहिली पंचवार्षिक योजना मांडली. योजनेचा खर्च अवाढव्य होता आणि त्यातला निम्मा अधिक अमेरिका मदत म्हणून देणार होती. काही मदत फ्रेंचांकडून आणि काही जपानकडून मिळणार होती. यामुळे योजनेचे नाना क्षेत्रातील अमेरिकन सल्लागार सायगावला आपापल्या कचेऱ्या थाटून बसलेले होते. प्रत्येक अमेरिकन सल्लागाराची एक व्हिएतनामी प्रतिमा होती. म्हणजे एका दक्षिण व्हिएतनामी अधिकाऱ्याला हा तज्ज्ञ चिकटवलेला असे. लोकांना असे भासे की राज्य अमेरिका व दिएमचे अधिकारी हे भागीदारीत चालवीत आहेत.

देशात उद्योगधंदे निर्माण व्हावेत यासाठी परकीय भांडवलदारांना मुक्तद्वार ठेवले होते. फक्त कम्युनिस्ट गटातील राष्ट्रांना याचा फायदा घेऊ दिला जात नसे. या भांडवलदारांना जमीन फुकट मिळे. पहिली पाच वर्षे त्यांच्यावर कर नसत, याचा परिणाम म्हणून फ्रेंचांनी सिमेंटचे कारखाने उभे केले. कापडाच्या गिरण्या, कापसाच्या गिरण्या आणि प्लॅस्टिकचा उद्योग तैवानहून आलेल्या चिन्यांनी सुरू केला. साखर कारखाने, दुधाच्या भुकटीचे कारखाने, मच्छीमार व्यवसाय, खताचे कारखाने असे अनेकविध उद्योगधंदे अमेरिकेच्या भांडवलदारांनी उभे केले. कोळशाच्या नव्या खाणी सुरू करून, कोळशापासून वीज तयार करण्यास अमेरिकन भांडवलच मदतीला आले. यापैकी कुठल्याही व्यवसायाचे किमान पुढील बारा वर्षे राष्ट्रीयीकरण करणार नाही असे स्पष्ट अभिवचन दिएम याने दिले होते.

असे सर्व असूनही १९५९ पर्यंत अमेरिकेच्या भांडवलदारांपेक्षा फ्रेंचांचे भांडवल वीसपटीने अधिक होते. मात्र अमेरिकेतला भांडवली पैसा पुढील काही वर्षात मोठ्या प्रमाणावर दक्षिण व्हिएतनाममध्ये येण्याचे आराखडे अमेरिकेत तयार होत होते. या काळात अमेरिकेची मदत होत होती ती मुख्यतः लष्करी क्षेत्रात. अनेक अमेरिकन लष्करी अधिकारी, दक्षिण व्हिएतनामी सैन्याचे शिक्षण करण्यासाठी दक्षिण व्हिएतनाममध्ये आलेले होते. लष्कर आणि सरकारी यंत्रणेत घुसलेले अमेरिकेचे सल्लागार या दोहोंच्या बळावर दक्षिण व्हिएतनाम हे अमेरिकेच्या सरकारला आणि जनतेला आपलेच एक जादा संस्थान वाटत होते.

## सल्ला नको – पैसा द्या!

अमेरिकेचा दिएमच्या मागे एकच लकडा होता की त्याने जमीनविषयक सुधारणा राबवून दक्षिण व्हिएतनाम हा देश एक लोकशाही ताकदवान देश म्हणून लवकर उभा करावा. दिएमची ती कुवत नव्हती. आयत्या पैशाने माणसाचे कर्तृत्व गंजत जाते. तसे दिएम आणि त्याच्याभोवती जमलेल्या मंडळीचे झाले. अमेरिकेतील वृत्तपत्रे अधूनमधून तक्रार करीत – 'दिवसेंदिवस दिएम हा अमेरिकेकडून अधिकाधिक पैसा उकळतो आहे आणि अमेरिकेचा उपदेश मात्र कमी कमी पत्करतो आहे.'

फेब्रुवारी १९५७ मध्ये अमेरिकेच्या गुप्तहेर खात्याने अशाच स्वरूपाचा अहवाल सरकारला दिला.

> 'दिएमचे सरकार हे खऱ्या लोकशाहीपासून फार दूर आहे. नॅशनल असेंब्लीचे अधिकार फारच मर्यादित केलेले आहेत. न्यायखाते हे सरकारच्या दडपणाखाली निवाडे करते. दिएमचे अधिकारी हे दिएमचे खासगी खुशमस्करे वाटावे असे वागतात. या सरकारला कसलाही विरोध सहन होत नाही. सत्ता फक्त दिएम हा एकटा वापरतो आणि त्याच्या अवतीभोवती असणाऱ्यांना त्याचा थोडाफार उपभोग घेता येतो.'

## कॅथॉलिक आणि खुषमस्करे

दिएमशी व्यक्तिगत स्नेह व इमान हाच एक गुण आता राज्यकारभारात श्रेष्ठ ठरला नसता तरच नवल. कॅथॉलिक वर्ग हा शिक्षित वर्ग होता. दिएम त्याचाच धर्मबंधू आणि कॅथॉलिक धर्मियांचे हित विशषष करून पाहणारा असल्याने याच वर्गावर त्याचा विशेष विश्वास होता. अर्थात सैन्यातील व राज्यकारभारातील महत्त्वाच्या बहुतांशी जागा या दिएम याने कॅथॉलिकांना दिल्या. यातले बहुतेक ख्रिश्चनधर्मीय हे उत्तरेकडून निर्वासित म्हणून १९५४ नंतर दक्षिणेत आले असल्याने दक्षिण व्हिएतनामच्या चालीरीती स्थानिक भावभावनांशी त्यांचा मुळीच परिचय नव्हता. यामुळे जे कम्युनिस्ट नव्हते परंतु बुद्ध धर्माभिमानी बहुसंख्य नागरिक होते, ते सर्व दिएम विरोधी होऊ लागले. आपल्या कॅथॉलिक धर्मप्रेमाचे जाहीर प्रदर्शन करू नये हे तारतम्यही दिएम पाळत नसे. सरकारी दौऱ्यावर दिएम खेड्यापाड्यात गेला की त्याच्या आसपास नेहमी कॅथॉलिक पाद्री असत. यामुळे सायगावचे सरकार हे अल्पसंख्य कॅथॉलिकांचेच माजोरी सरकार आहे असे त्याचे चित्र सामान्यपणे सर्वत्र उमटत गेले.

दिएमचे कॅथॉलिक धर्मप्रेम हा अमेरिकेतील कॅथॉलिकांना आणखी एक कौतुकाचा विषय होता. दिएमचा धाकटा भाऊ न्हू हा त्याचा प्रमुख सल्लागार होता. मंत्रिमंडळात त्याला दिएम याने स्थान दिलेले नसले, तरी अमेरिकेच्या गुप्तहेर संघटनेने दिएमच्या हितासाठी दक्षिण व्हिएतनाममध्ये जे जाळे पसरायला सुरुवात केली, त्याल न्हू याचा आशीर्वाद होता. न्हू कट्टर कम्युनिस्ट द्वेष्टा कॅथॉलिक असल्याने, अमेरिकेच्या गुप्तहेर खात्याने त्याचा भरपूर उपयोग करून घेतला.

दक्षिण व्हिएतनामभर पसरत चाललेल्या असंतोषातून जेव्हा हळूहळू बाँबस्फोट होऊ लागले, तेव्हा दिएम हा न्हू यांचेवर जास्तीजास्ती विसंबत जात चालला. दिएमने कुठे जावे, कुठे जाऊ नये, काय बोलावे, काय बोलू नये हे सर्व न्हूच्या तंत्राने ठरू लागले. आपला जीव धोक्यात आहे ही जाणीव दिएम याला होऊ लागताच, त्याने स्वतःला

निकटच्या कोंडाळ्यात बंदिस्त करून घेतले. हे कोंडाळे दिएमला फक्त त्याच गोष्टी सांगे की ज्या त्याला ऐकाव्याशा वाटत. दिएमला तुझे सिंहासन हादरू लागले आहे, वेळीच सावध झाला नाहीस तर तुझे खून पडेल हे सांगण्याचे धैर्य वा इच्छा खुषमस्कऱ्यांत कुणालाच नव्हती.

## एन्.एल्.एफ्.चा जन्म

दिएमची भ्रष्ट आणि भोंगळ राजवट हादरू लागलेली पाहताच दिएम विरोधी सर्व गटांनी एकत्र येऊन 'नॅशनल लिबरेशन फ्रंट' ही गुप्त संघटना मार्च १९६० मध्ये स्थापन केली. या संघटनेने प्रसिद्ध केलेल्या जाहीरनाम्यात दिएम सरकारच्या राजीनाम्याची मागणी लगेचच करण्यात आली.

या सर्व कालखंडात हो-चि-मिन्ह याचे हनोई सरकार आपले राज्य बळकट करीत, प्रतिष्ठा संपादित चालले होते. पंतप्रधान फाम-व्हान-डाँग हा दिल्लीला येऊन त्याने पंडित नेहरूंची भेट घेतली. जिनिव्हा करारानुसार सायगाव सरकार व फ्रेंचांनी निवडणुका घ्याव्या असा जाहीर आग्रह पंडित नेहरूंनी धरला. परंतु तिकडे कुणी लक्ष दिले नाही. रशियाचे बुल्गानिन आणि कुश्चेव्ह यांना हो-चि-मिन्ह पेक्षा नासरचे सुवेझमधील हक्क अधिक महत्त्वाचे वाटत असल्याने ते तिकडे गुंतले होते. १९५८ च्या फेब्रुवारीत उत्तर व्हिएतनाम प्रजासत्ताकाचा अध्यक्ष या नात्याने हो-चि-मिन्ह याने दिल्लीला भेट दिली. १९५९ साली हो-चि-मिन्ह याने पेकिंगला भेट दिली. दोन्ही ठिकाणी हो-चि-मिन्ह याने आपला दृष्टिकोण मांडला. परंतु अमेरिका ही दिएममागे सर्व सामर्थ्यानिशी उभी असल्याने हो याच्या पदरात फारसे यश आले नाही.

परिणाम असा झाला की १४ मे १९५९ ला जेव्हा 'लाओ-डाँग'ची म्हणजे व्हिएत-मिन्ह पक्षातील महत्त्वाचा घटक, ज्याला 'कामगारांचा पक्ष' किंवा 'व्हिएतनाम कम्युनिस्ट पक्ष' म्हणत असत, त्या पक्षाच्या कार्यकारिणीची सभा भरली, तेव्हा कार्यकारिणीने दक्षिण व्हिएतनाममध्ये सुरू झालेल्या मुक्ती आंदोलनाला पाठिंबा जाहीर केला.

सप्टेंबर १९६० मध्ये व्हिएत-मिन्ह पक्षाचा सेक्रेटरी म्हणून 'ले-दुआँ' याची नेमणूक करण्यास हो याने पाठिंबा दिला. १९५६ मध्ये पक्षाच्या तेव्हाचा सेक्रेटरी ट्रूआँग चिन्ह याच्या धोरणानुसार कार्यान्वित केलेल्या जमीन विषयक कायद्यांना जेव्हा लोकांचा विरोध सुरू झाला, तेव्हा ही जबाबदारी चिन्ह याला बाजूला करून हो याने स्वतःकडे घेतली होती. प्रत्यक्षात हे काम ले-दुआँ करत असे. ले-दुआँ हा दक्षिण व्हिएतनाममध्ये सुरू झालेल्या क्रांतीप्रयत्नांना, उत्तर व्हिएतनाममध्ये सक्रिय पाठिंबा द्यावा अशा मताचा होता. त्याच्या मताचा पक्षात जोर होऊन, सप्टेंबर १९६० मध्ये दक्षिण व्हिएतनाममध्ये दिएम

सरकारविरुद्ध सुरू झालेल्या बंडाचा, स्वातंत्र्ययुद्ध व व्हिएतनामच्या अखंडत्वासाठी लढा असा स्पष्ट गौरव करण्यात आला.

दिएम सरकारचे पाठीराखे, अमेरिकेचे सरकार आणि सैन्य आणि दक्षिण व्हिएतनाममधील जनक्रांतीचे पाठीराखे हनोई सरकार यांच्यातील सशस्त्र संघर्षाला लवकरच तोंड लागणार असा याचा अर्थ होता.

परंतु यापूर्वी अमेरिकेत अध्यक्षीय निवडणूक होणार होती. या वेळी अध्यक्षपदासाठी एक धडाडीचा तरुण कॅथॉलिक सिनेटर उभा होता –

जॉन एफ. केनेडी!

n

# १६ : गॅलब्रेथ अहवाल

अमेरिकेचे नवे अध्यक्ष म्हणून केनेडी निवडून आले. २१ जानेवारी १९६१ ला त्यांनी व्हाईट हाऊसमध्ये अध्यक्ष म्हणून पाऊल ठेवले. व्हिएतनामला प्रत्यक्ष भेट देऊन तेथील परिस्थिती एकदातरी पाहून आलेला हा पहिलाच अध्यक्ष होता. तरी या भेटीला १० वर्षे उलटून गेली होती. १९५१ मध्ये केनेडी व्हिएतनामला भेट देऊन आल्यापासून खूपच घडामोडी घडून गेल्या होत्या.

## सिनेटर केनेडी ते अध्यक्ष केनेडी

अध्यक्ष आयसेनहॉवर यांच्या कारकीर्दीच्या अखेरच्या वर्षात तर व्हिएतनामचा प्रश्न अध्यक्षांच्या टेबलावरून घरंगळला होता. हंगेरीतला कम्युनिस्ट विरोधी उठाव, सुवेझ कालव्याबाबत उठलेले वादळ, सोव्हिएत रशियाने पाडलेले गॅरी पॉवर्स याचे यू-२ विमान, अवकाशात सोडला गेलेला पहिला स्फुटनिक या सर्व गदारोळात दक्षिण व्हिएतनाम आणि लाओस या ठिकाणची सरकारे पडण्याच्या अवस्थेत आली तरी त्याकडे आयसेनहॉवर यांनी पुरेसे लक्ष दिलेले नव्हते.

आशियात कम्युनिझमच्या प्रसाराला पायबंद घालण्यासाठी अमेरिकेने पावले टाकली पाहिजेत, या आयसेनहॉवर यांच्या धोरणाला केनेडी यांचा मुलतः मुळीच विरोध नव्हता. परंतु १९५४ साली दिएन-बिएन-फू च्या लढाईत अमेरिकेने प्रत्यक्ष भाग घ्यावा असा विचार जेव्हा प्रसृत झाला, त्यावेळी सिनेटर असलेल्या केनेडीनी काँग्रेसपुढे बोलताना बजावले होते –

> ‘व्हिएतनाममधील शत्रू हा एकाचवेळी सर्वत्र असतो आणि शोधू जाता एका ठिकाणीही सापडत नाही. अमेरिकेने कितीही लष्करी मदत केली तरी या शत्रूवर मात करणे शक्य नाही. या शत्रूला गुप्त पाठिंबा भरपूर आहे.’

दोन वर्षांपूर्वी हे विचार मांडणाऱ्या सिनेटर केनेडी यांच्या विचारसरणीत नंतर थोडा बदल झाला. १९५६ च्या जूनमध्ये ‘अमेरिकन फ्रेंडस् ऑफ व्हिएतनाम’ (व्हिएतनाम मित्रमंडळ) या संस्थेच्या सभासदांपुढे बोलताना सिनेटर केनेडी म्हणाले होते –

> ‘दक्षिणपूर्व आशियातील स्वतंत्र जगाची व्हिएतनाम ही कोनशिला आहे. त्या कमानीचा तो केंद्र आधार आहे. ब्रह्मदेश, थायलंड, भारत, जपान, फिलिपाइन्स, लाओस आणि कंबोडिया या सर्वांचे संरक्षण, व्हिएतनामभर कम्युनिझमची लाट पसरली तर धोक्यात येणार आहे.’

एखाद्या धोरणाला पाठिंबा देणे वा जयजयकार करणे आणि त्या धोरणाची प्रत्यक्ष अंमलबजावणी करण्याची जबाबदारी पत्करणे या गोष्टीत महद्‌अंतर असते. यामुळे अध्यक्षपदाची धुरा खांद्यावर घेतल्यानंतर, त्यांनी जेव्हा दक्षिणपूर्व आशियाकडे निरखून पाहिले, तेव्हा त्यांच्या ध्यानी आले की दक्षिणपूर्व आशियाच्या प्रवेशद्वाराची ही कमान गंजून गेलेली आहे आणि ती दुरूस्त करण्याचे अवघड काम नशिबाने आपल्यावरच ढकलले गेले आहे. यावेळचे व्हिएतनाममधील अमेरिकेचे वकील एलब्रिग दुब्रो याने अहवाल पाठवला होता की पंतप्रधान दिएम हा आता इतका चढेल आहे की तो उपकारकर्त्या अमेरिकनांनाच सतत दोष देत असतो!

'पेंटॅगॉन' या वॉशिंग्टनमधील सर्वोच्च लष्करी मंत्रणेमार्फत ब्रिगेडियर लान्सडेल यांना आयसेनहॉवरच्या कारकीर्दीतच व्हिएतनामला पाठवण्यात आले होते. जानेवारी १९६१ मध्येच सर्व पाहणी करून हा ब्रिगेडियर वॉशिंग्टनला परतला. त्याचा जाडजूड अहवाल अध्यक्षांच्या टेबलावर येऊन पडलेला होता. पेंटॅगॉनकडून आलेल्या अहवालात म्हटलेले होते –

'दिएमने केलेल्या जमिनीविषयक सुधारणांनी काही केले असेल तर एवढेच की ज्या जमिनी 'व्हिएत-मिन्ह' क्रांतिकारकांनी शेतकऱ्यांना वाटल्या होत्या, त्या दिएमने काढून घेऊन पुनश्च सावकारांच्या ताब्यात दिल्या! खेड्यातील ग्रामपंचायतीतून कम्युनिस्ट निवडून येऊ लागताच, दिएम याने या पंचायतीच रद्द करून त्या ठिकाणी स्वतः नेमलेल्या आपल्या कॅथॉलिक हस्तकांच्या ताब्यात सर्व अधिकार दिले. आज जवळजवळ लाख नागरिक त्याने तुरूंगात डांबलेले आहेत. यामुळे दिएम राजवटीला आता बुद्धिवाद्यांचाही पाठिंबा राहिलेला नसून, त्याचे पोलीस खेड्यापाड्यांतून जे अन्याय आणि अत्याचार करीत आहेत, त्याचा संताप सर्वत्र गोळा होतो आहे. एका वाक्यात सांगायचे तर दिएम सरकार आणि जनता यांच्यात कसलाही दुवा राहिलेला नाही.

'उत्तर व्हिएतनामच्या पॉलिटब्यूरोने (कम्युनिस्ट पक्षाची कार्यकारिणी) मे १९५९ मध्ये स्पष्ट आदेश दिलेला आहे, की आता राजकीय चळवळीचा काळ संपलेला असून सशस्त्र लढा पुढे ढकलण्याचा क्षण आलेला आहे. उत्तर व्हिएतनाममधील कम्युनिस्ट पक्षाच्या या नव्या धोरणाचा सूत्रचालक, पक्षाचा नवा चिटणीस ले-दुआँ हा दक्षिण व्हिएतनाममध्ये आलेला आहे अशी खात्रीलायक बातमी आहे. उत्तर व्हिएतनामी सैनिक रोज वाढत्या संख्येने दक्षिण व्हिएतनाममध्ये घुसत आहेत. हे सर्व सैनिक गनिमी तंत्रात निष्णात असून, १९५९ सालच्या पहिल्या चार महिन्यातच ११९ खून पाडण्यात आलेले आहेत. ८ जुलै १९५९ ला बिन्ह-होआ या लष्करी

तळावर गनिमी तरुणांनी केलेल्या हल्ल्यात, या संघर्षातील पहिले दोन अमेरिकन सैनिक बळी पडले आहेत. २६ सप्टेंबर १९५९ ला तर खुद्द सायगावलाच दक्षिण व्हिएतनामच्या लष्करी बराकींवर हल्ला करून, या गनिमी व्हिएत-मिन्ह व व्हिएतकाँग तरुणांनी १२ सैनिक ठार करून शस्त्रास्त्रे पळवली.'

या अहवालाच्या शेवटी उत्तर व्हिएतनामचा पंतप्रधान फाम-व्हान-डाँग याने १३ सप्टेंबर १९५९ ला फ्रेंच प्रतिनिधी जॉर्जस पिकॉय याला जे सांगितले त्याचा उल्लेख आहे. फाम-व्हान-डाँग याने सांगितले – 'तुम्ही एक लक्षात ठेवा की आज ना उद्या आम्ही सायगावमध्ये येणार आहोत! नक्की येणार आहोत!!' नोव्हेंबर १९५९ मध्ये व्हिएतनाममधील त्रिराष्ट्रीय कमिशनच्या कॅनेडियन प्रतिनिधींशी बोलतानाही फाम-व्हान-डाँग याने बजावले, 'अमेरिकनांना आम्ही समुद्रात ढकलल्याशिवाय राहाणार नाही...!'

'दक्षिण व्हिएतनाममध्ये स्थापन झालेल्या राष्ट्रीय मुक्ती आघाडी (N.L.F.) या पक्षाची रीतसर स्थापना २० डिसेंबर १९६० रोजी झाली असून त्याची सभासद संख्या आता तीन लाखाच्या घरात गेली आहे-' असेही या पेंटॅगॉनने अहवालात अखेर नमूद केलेले होते.

## अघोषित युद्धाच्या दिशेने

या सर्वांवर पेंटॅगॉनने सुचवलेला लष्करी उपायही केनेडींच्या सहीची वाट पाहात होता. पेंटॅगॉनने सुचवले होते की दक्षिण व्हिएतनाममधील सशस्त्र बंडाळीचा उपाय म्हणजे 'Counter Insuregency Plan.' (उत्तर व्हिएतनामी भूमिगत सैनिक आणि व्हिएतकाँगी यांच्याच मार्गाने त्यांच्याशी लढण्याची योजना) यासाठी काय करायचे? तर पंतप्रधान दिएम याला दक्षण व्हिएतनामी सैनिकांची संख्या १,७०,००० करण्यासाठी सर्व प्रकारचा दारूगोळा आणि दाणा-वैरण अमेरिकेने पुरवायची. याशिवाय गनिमी प्रकाराने लढू शकतील असे ३२,००० नागरिक रक्षक (Civil Guards) अमेरिकेने तयार करायचे आणि हळूहळू ही संख्या ७०,००० पर्यंत वाढवायची. अमेरिकेने मागील अनुभवावरून शहाणे होऊन ते फुकटा फुकटी करू नये. दिएम याने या सर्व खटाटोपाबद्दल पुढील गोष्टी केल्या पाहिजेत.

१) सायगाव सरकारमध्ये बिगर कम्युनिस्ट अशा विरोधी पक्षांच्या प्रतिनिधींना स्थान दिले पाहिजे.

२) ज्या अधिकाऱ्यांविरुद्ध लाचलुचपतीचे व भ्रष्टाचाराचे आरोप आहेत, अशा सर्वांची चौकशी करण्याची संधी दक्षिण व्हिएतनामच्या नॅशनल असेंब्लीला दिली पाहिजे.

३) या सर्वांबरोबर जनतेशी संपर्क साधणाऱ्या जनहिताच्या योजना, दिएम सरकारने कार्यवाहीत आणाव्या.

केनेडीसाहेबांनी हे सर्व वाचले, तेव्हा प्रथम त्यांनी कपाळालाच हात लावला असला पाहिजे. दिएम सरकारचे व राज्यकारभाराचे जे वर्णन या अहवालाच्या पूर्व भागात केलेले होते, ते वाचून पेंटॅगॉनने सुचवलेल्या सुधारणा हे सरकार करू शकेल यावर आंधळ्याने देखील विश्वास ठेवला नसता.

परंतु नव्या अध्यक्षाने करावे काय? स्वतःचे निष्कर्ष काढून त्यानुसार वागायला वेळ तर हवा! मग मधल्या वेळात काय करायचे? राजकीय लष्करी सल्लागार जे सांगतात त्याला 'मम' म्हणायचे व आपला स्वतंत्र शोध जारी ठेवायचा हाच काय तो पर्याय नव्या तरुण अध्यक्षापुढे होता.

## असमाधानी निर्णय

केनेडींनी 'पेंटॅगॉन'ने सुचवलेल्या नागरी संरक्षक 'सिव्हिल गार्डस्' तयार करण्याच्या योजनेला आणि दिएम सरकारला तीन अटींवर सर्व मदत देण्याच्या हुकुमावर सह्या केल्या. म्हणजे सहा-सात वर्षांपूर्वी ज्या शत्रूवर लष्करी उपायांनी मात करणे अमेरिकेला कालत्रयी शक्य नाही असे हे केनेडी म्हणत होते, त्यांनीच अध्यक्ष केनेडी म्हणून नेमके तेच उपाय अधिक जालीम केले की ज्या उपायांनी यशाची सुतराम शक्यता नव्हती. या उपायांबरोबर समाधानासाठी काही अटी होत्या. परंतु दिएम अधिकारावरून दूर झाल्याखेरीज त्यातली एकही पुरी होणार नव्हती! यामुळे झाले काय की अटी घातल्याचे मानसिक समाधान फक्त अमेरिकेला मिळाले आणि कुठलीही अट पुरी न करता सर्व मदत लाटण्याची संधी दिएम याला मिळाली!

केनेडी यांचे व्हिएतनामबाबत काय करावे यासंबंधी स्वतंत्रपणे मत बनवण्याचे प्रयत्न मात्र लगेच सुरू झाले. मे १९६१ मध्ये उपाध्यक्ष जॉन्सन यांचेसमवेत आपली बहीण जीन व तिचा नवरा स्टीफन स्मिथ यांना देऊन, केनेडी यांनी या सर्वांना दक्षिण व्हिएतनामच्या दौऱ्यावर पाठवले. उपाध्यक्ष जॉन्सन हे दिएमशी सायगावच्या सचिवालयात जेव्हा बातचीत करीत, तेव्हा ते परखडपणे चार शब्द त्याला ऐकवीत होते. परंतु जाहीर समारंभातून दिएम त्यांची पंचाईत करी, जॉन्सन यांना समारंभप्रसंगी दिएम हजर असताना त्याची स्तुतीच करावी लागे! आणि आपण आपल्या खऱ्या मताशी करीत असलेली प्रतारणा अशा प्रसंगी बोचत असल्याने त्याची प्रतिक्रिया अशी होई की जॉन्सन दिएमची फाजील स्तुती करून जात. अशाच एका समारंभात जॉन्सन म्हणाले –

'दिएम हे आजचे विन्स्टन चर्चिल आहेत!'

दिएमपाशी काही असेल तर याचवेळी फक्त चर्चिलसदृश्य शरीर होते, कपडे होते! परंतु व्यवहारज्ञान आणि देशप्रेम याबाबतीत चर्चिल यांच्या नखाचीही सर नव्हती. या अशा वक्तव्याचा विपरीत परिणाम दक्षिण व्हिएतनामी जनतेवर झाला. त्यातले जे तद्दन मूर्ख अथवा लाळघोटे होते त्यांना दिएम हा खरोखरच चर्चिल वाटू लागला. आणि जे शहाणे होते त्यांनी संशय व्यक्त केला की अमेरिकेचा उपाध्यक्ष या नालायक माणसाची ज्या अर्थी एवढी स्तुती करतो, त्या अर्थी अमेरिकेचा यात काही तरी स्वार्थ असला पाहिजे, नक्की डाव असला पाहिजे! म्हणजे सर्व बाजूंनी अमेरिकेचीच नाचक्की होण्याची पूर्वतयारीच जॉन्सन साहेबांनी सुरू केली म्हणा ना!

उपाध्यक्ष परत आले आणि त्यांनी केनेडी यांच्या कानात सत्य सांगितले – 'दिएमच्या ठिकाणी काही गुण आहेत परंतु आता जनतेशी त्याचा संबंध उरलेला नाही. त्याच्या भोवती जमलेली माणसे ही त्याच्यापेक्षा अनाकर्षक आहेत. आपल्या मदतीची किंमत, आपल्याला चांगल्या राज्यकारभाराच्या रूपाने कशी हवी आहे, यासंबंधी त्याला परखडपणे चार शब्द सांगण्याची वेळ आलेली आहे!'

जॉन्सन व्हिएतनाममधून परत येऊन केनेडी यांचेशी कानगोष्ट करीपर्यंत, परिस्थिती अधिक खालावलेली होती. दक्षिण व्हिएतनामी सैन्य १७ व्या अक्षांश रेषेवरच गलथान पहारा देत होते. ते लढतही नव्हते आणि घुसखोर व्हिएत-मिन्ह सैनिकांनाही रोखू शकत नव्हते. सर्व फळीला हेरांनी प्रचंड भगदाडे पाडली होती, आणि उत्तर व्हिएतनाममधून कम्युनिस्ट चळवळे आणि व्हिएत-मिन्ह सैनिक दक्षिणेत सारखे येत होते. त्यांची संख्या आता १२ ते १५ हजार झालेली होती आणि दक्षिण व्हिएतनाममध्ये ठिकठिकाणी गावेच्या गावे कम्युनिस्टांच्या कब्जात गेल्यासारखी झाल्याने, जवळ जवळ ६०% दक्षिण व्हिएतनामवर उत्तर व्हिएतनामने कब्जा केल्यासारखीच परिस्थिती निर्माण झाली होती!

या पार्श्वभूमीवर 'धरले तर चावते आणि सोडले तर पळते' अशा कात्रीत सापडलेल्या अध्यक्ष केनेडी यांची मनःस्थिती करुणाजनक व दोलायमान झालेली होती. सगळी कानगोष्ट झाल्यावर अर्थात उपाध्यक्ष जॉन्सन यांनी अखेर हेच सांगितले –

'तथापि आहे या स्थितीत दिएम सरकारला मदत करीत राहणे एवढेच आपल्या हाती आहे!'

जॉन्सन स्तुतीने धीर चेपलेल्या दिएमने वॉशिंग्टनला तेवढ्यात पत्र पाठवले –

'१७,००० दक्षिण व्हिएतनामी सैन्य उभारावयाचे आहे. मदत पाठवा-' केनेडी यांनी २,००,००० सैनिकांची मदत मान्य करून टाकली. पेंटॅगॉनने सुचविलेल्या १,७०,००० पेक्षा हा आकडा ३०,००० नी अधिकच होता!

## लाओसमधील राजकारण

यावेळेस अध्यक्ष केनेडी यांना व्हिएतनामच्या प्रश्नांकडे पुरेसे लक्ष न देता येण्याचे आणखी एक कारण होते. अध्यक्ष आयसेनहॉवर यांनी अध्यक्षीय सूत्रे केनेडी यांच्या हाती देताना परिस्थितीचा जो ऊहापोह त्यांचेशी केला त्यात महत्त्व दिले ते 'लाओस' मध्ये घडत असलेल्या घटनांना. आयसेनहॉवर यांनी सांगितले –

> 'लाओसमध्ये भूमिगत कम्युनिस्ट चळवळ्यांचा (पॅथे-लाओ)' जोर वाढलेला आहे. लाओस हा प्रदेशच दक्षिण पूर्व आशियाचा बालेकिल्ला म्हणायला हवा. ब्रिटन आणि फ्रान्स यांनी मागल्या वेळेप्रमाणेच या भागात 'सीटो' संघटनेने हस्तक्षेप करायला विरोध कळवला आहे! ब्रिटन आणि फ्रान्स बरोबर येत नसतील तर त्यांच्याशिवाय अमेरिकेने तेथे हस्तक्षेप करणे भाग आहे. लाओस सरकारात जर कम्युनिस्ट घुसले तर सगळाच अनर्थ होईल.'

लाओसची सरहद्द एका अंगाने संपूर्णपणे उत्तर व्हिएतनाम, दक्षिण व्हिएतनाम व कंबोडिया या तिघांना भिडलेली. तेव्हा तेथील सरकारात जर पॅथेलाओ या कम्युनिस्ट संघटनेला शिरकाव मिळाला, तर दक्षिण व्हिएतनाममध्ये लढणाऱ्या सशस्त्र चळवळ्यांना लष्करी मदतीचा वाहता ओघ सुरू होईल अशी भौगोलिक स्थिती होती. तेव्हा दक्षिण व्हिएतनामचे युद्ध हे लाओसमध्येही लढवायला हवे हा विचार लष्करीदृष्ट्या चूक नव्हता. परंतु लाओसमध्ये तोपर्यंत खूपच गोंधळ झालेला होता.

जिनिव्हा समझोता १९५४ साली झाला, तेव्हा लाओसमधील फोंगस-ली आणि सॅमनेव या दोन प्रांतांवर पॅथेलाओचा संपूर्ण कब्जा झालेला होता. या प्रांताचे स्वतंत्र राज्य होईल व लाओसचेही कम्युनिस्ट व बिगर कम्युनिस्ट असे दोन भाग होतील अशी अपेक्षा होती. परंतु पॅथेलाओला एखादा दिएम लाभलेला नसल्याने, लाओस वाटाघाटीत लाओसची फाळणी झाली नाही. १९५८ साली लाओसमध्ये निवडणुका होऊन प्रिन्स सुवाना फूमा याचे सरकार अधिकारावर आले. हे सरकार सर्वस्वी उजव्या गटाचे होते. परंतु या सरकारने प्रगतीपर धोरणे अंमलात आणली तर त्याला पाठिंबा देण्याचे आश्वासन पॅथे-लाओ पक्षाने दिले होते.

प्रिन्स सुवाना-फूमा यांच्या भांडवलधार्जिण्या सरकारला कम्युनिस्ट पॅथेलाओशी बोलणी करणेही शक्य झाले, कारण पॅथेलाओचा नेता प्रिन्स सुफानो व्हाँग व प्रिन्स सुवाना फूमा यांचा बाप एकच होता. फक्त मातोश्री एकच नव्हत्या! पॅथेलाओ संघटनेने उघडपणे काम करावे यासाठी लाओ राष्ट्रीय आघाडी हा पक्ष पॅथेलाओंनी स्थापन केला. पॅथेलाओपासून प्रिन्स सुवाना फूमाचे सरकार वाचवण्यासाठी उजव्या पक्षांनी पण एक

अर्धलष्करी संघटना उभारायला सुरुवात केली. हे लोक अधूनमधून प्रिन्स सुवाना फूमा हा कम्युनिस्टाच्या आहारी गेल्याचा आरडा-ओरडा करीत. सुवाना फूमा या लोकांना खूष करण्यासाठी थोडा उजवीकडे वळला रे वळला की पॅथेलाओ ओरडू लागे, 'करार मोडून पंतप्रधान भांडवलशाहीला शरण जात आहेत.'

प्रिन्स सुवाना फूमाचे सरकार उजवीकडे झुकायचे नाही, डावीकडेही पाहायचे नाही या ओढाताणीत निष्क्रीय अवस्थेत कसेबसे लोंबकळत जगत होते. याचा फायदा पॅथेलाओ यांनी उठवला. पॅथेलाओ सैनिकांचाच राष्ट्रीय सैन्यात दाखल करून घेऊन त्यांच्यावर वचक ठेवावा अशी कल्पना प्रिन्स सुवाना फूमाने मांडताच लाओसच्या सरकारी सैन्याने विरोध सुरू केला.

प्रिन्स सुवाना फूमाचे सरकार गडबडले आणि देशात बंडाळीच सुरू झाली. कोण कम्युनिस्ट, कोण बिगर कम्युनिस्ट, कोण फक्त तटस्थ राष्ट्रवादी हे बाहेरच्यांना कळेनासेच झाले. ९ ऑगस्ट ६० रोजी कॅप्टन कॉंग-ली नावाच्या पथक प्रमुखाने राजधानी 'व्हिएनशियान'चा कब्जा केला. कम्युनिस्ट अथवा बिगर कम्युनिस्ट असला कसलाही छाप नसलेल्या परंतु सत्तेवर पुनः येण्यासाठी आसुसलेल्या प्रिन्स सुवाना फूमाने कॉंग-ली याला पाठिंबा जाहीर केला. पॅथेलाओ सैनिकांनीही कॉंग-ली याला पाठिंबा जाहीर करताच कॉंग-ली च्या उठावाचा रंग लाल असल्याचे सर्वांच्या लक्षात आले.

लाओसच्या सरकारी सेनेतील एक जनरल फॉमी नोसावत याने घाईघाईने 'सावनखेत' या ठिकाणी सरकारी सैन्य एकत्र करून कॉंग-ली विरुद्ध मोहीम सुरू केली. चीन, सोव्हिएट रशिया, उत्तर व्हिएतनामचे सरकार ही सर्व कॉंग-ली सरकारला अनुकूल वक्तव्ये करू लागली. परंतु प्रत्यक्ष लढाईत अखेर कम्युनिस्टविरोधी सरकारी सैन्याचा जोर झाला व डिसेंबर १९६० मध्ये जनरल फॉमी नोसावन याने व्हिएनशियान राजधानी जिंकून कॉंग-ली याला लाओसबाहेर पिटाळले!

## केनेडींचा धडाका

म्हणजे जानेवारी १९६१ मध्ये केनेडी अध्यक्ष झाले तेव्हा व्हिएनशियानवर जनरल नोसावनचा कब्जा होऊन पॅथेलाओ पुनश्च सत्तेच्या रिंगणाबाहेर फेकली गेली होती. आहे या स्थितीत लाओसमधील यादवी थांबून तिथे स्थिर सरकार यावे यासाठी केनेडीनी प्रयत्न सुरू केले. केनेडी यांनी सोव्हिएट रशियाला विनंती केली की लाओसचा प्रश्न तडजोडीने सोडवण्यासाठी सहकार्य द्या. नुसती विनंती करून केनेडी थांबले नाहीत तर पत्रकारांना मुलाखत देताना त्यांनी घोषणा केली – 'लाओसमध्ये बाहेरून येणाऱ्या मदतीच्या जोरावर पॅथेलाओनी सुरू केलेले शस्त्राघात लगेच थांबले नाहीत तर अमेरिका तिथे हस्तक्षेप करील.'

अमेरिकेच्या दक्षिणपूर्व आशियातील आरमाराने (७ वे आरमार) लगेच हालचाल सुरूही केली आणि अमेरिकेची हेलिकॉप्टर विमाने थायलंडमध्ये उतरू लागली.

केनेडी यांचा धडाका पाहताच लाओसच्या प्रश्नावर आंतरराष्ट्रीय परिषद घेण्यास सोव्हिएट रशियाने १ एप्रिल १९६१ ला संमती जाहीर केली. लाओसमध्ये दुसरी शस्त्रसंधी होऊन, जिनिव्हा येथे लाओसच्या प्रश्नांवर चर्चा करण्यासाठी परिषद सुरू झाल्यानंतरच केनेडी यांना व्हिएतनाम प्रश्नाकडे काळजीपूर्वक ध्यान देण्यास फुरसत झाली.

सायगावचा अमेरिकेचा वकील दीब्रो याचे व दिएमचे ठीक नव्हते. याला मुख्य कारण अमेरिकन वकील हा दिएमशी मिजाशीने वागे. केनेडी यांनी त्याचे जागी नवा वकील नेमला – फ्रेडरिक नोल्टींग. दिएम व न्हू हे दोघे या नेमणुकीने खूष झाले. कारण नोल्टींग हा या दोघांचा पूर्वीपासून स्नेहसंबंधातला होता. याच मे ६१ मध्ये उपाध्यक्ष जॉन्सन यांना केनेडींनी सायगावला धाडले होते.

परंतु उपाध्यक्ष जॉन्सन यांनी आणलेली माहिती ही निर्णय घेण्यास पुरेशी नाही हे ध्यानात येताच, अध्यक्ष केनेडी यांनी आपला लष्करी सल्लागार जनरल मॅक्सवेल टेलर याला सायगावला रवाना केले. जनरल टेलर यांनी आयसेनहॉवरचा चीफ-ऑफ-स्टॉफ म्हणून काही काळ काम केल्यानंतर, व्हिएतनामविषयक प्रश्नावर मतभेद झाल्याने राजीनामा दिला होता. मतभेदाचे कारण हे होते की गनिमी शत्रूशी लढण्याच्या ज्या पद्धती आहेत त्याला विघातक असे लष्करी निर्णय आयसेनहॉवरकडून घेतले जात आहेत असा जनरल टेलर यांचा आरोप होता.

## जनरल टेलर यांचा अहवाल

जनरल टेलर केनेडींच्या आदेशानुसार सायगावला निघाले तेव्हा त्यांच्याबरोबर पेंटॅगॉन संघटनेचे वॉरट रोस्टोव्ह आणि जनरल लान्सडेल हे दोघे होते. ही सर्व मंडळी १८ ऑक्टोबर १९६१ ला सायगावला पोचली. ही मंडळी पोचली त्याच्या आदल्याच दिवशी सायगाव परिसराला वादळाचा व पुराचा तडाखा बसून अनेक लोक बेघर झालेले होते. यामुळे १८ ऑक्टोबर याच दिवशी दिएम याने देशात आणीबाणी जाहीर केली. जनरल टेलर यांना दिएम सरकारने दक्षिण व्हिएतनाममध्ये घुसलेल्या व्हिएतकाँगींची संख्या २०,००० वर गेल्याचे सांगितले. जनरल टेलर हे पुनः पुनः इन्कार करीत असूनही, सायगावभर अशी वदंता लवकरच पसरली की लवकर अमेरिकेन सैन्य दक्षिण व्हिएतनाममध्ये लढण्यासाठी येणार आहे.

जनरल टेलर ३ नोव्हेंबरला वॉशिंग्टनला परतले व त्यांनी केनेडी यांना अहवाल दिला –

‘घातपात आणि गनिमी युद्धाने दक्षिणपूर्व आशियाच्या प्रदेशाचा कब्जा करण्यासाठी, व्हिएतनाममध्ये कम्युनिस्टांनी सुरू केलेला लढा, यशस्वी होण्याच्या मार्गावर आहे. व्हिएतकाँग सैनिकांनी सर्व दक्षिण व्हिएतनामभर धुमाकूळ घातलेला आहे. अमेरिकेच्या मदतीचा उपयोग होईल की नाही अथवा दिएम सरकार या झगड्यात टिकेल की नाही याबद्दल सर्वत्र संशय निर्माण झालेला आहे.’

यावर जनरल टेलर यांनी गंभीर उपाय सुचवला तो असा –

‘आतापर्यंत सरकारी व्यवस्थापनात वा लष्करी हालचालीत अमेरिकेच्या तज्ज्ञांनी आणि लष्करी अधिकाऱ्यांनी केवळ सल्लागाराची भूमिका पत्करली आहे. ती आता सोडून दिली पाहिजे. आता ही सल्लागाराची व बघ्याची भूमिका सोडून अमेरिकन तज्ज्ञ आणि लष्करी अधिकाऱ्यांनी व्यवस्थापनात व लष्करी हालचालीत सक्रीय भाग घेतला पाहिजे. अर्थात हा भाग किती असावा हे दिएम यांच्या सल्ल्याने ठरवून घ्यावे लागेल. दक्षिण व्हिएतनामी सैन्याचे खचणारे धैर्य सावरण्यासाठी अमेरिकेला तातडीने काहीतरी करणे भाग आहे.’

जनरल टेलर यांनी आपल्या अहवालात अखेर जो सल्ला दिला, त्याला कालांतराने विशेष महत्त्व प्राप्त झाले. या अहवालाच्या शेवटी जनरल टेलर यांनी लिहिले होते –

‘मी व माझ्या सहकाऱ्यांचे असे निर्णायक मत आहे की कुश्चेव्ह यांना अभिप्रेत असलेल्या स्वातंत्र्य लढ्याचा कसा मुकाबला करायचा हे अमेरिकेने एकदा ठरवण्याची वेळ आता आलेली आहे! ही स्वातंत्र्ययुद्धे म्हणजे दुसरे तिसरे काही नसून त्या गनिमी लढाया आहेत. कम्युनिस्टांनी हाती धरलेले हे एक नवे व भयाकारी शस्त्र आहे. सांकेतिक प्रतिकाराची तंत्रे इथे उपयोगी पडणार नाहीत. अमेरिकेने निर्णय काय घ्यावा हे सांगणे या अहवालाच्या कक्षेबाहेर असले तरी मला हे स्पष्ट दिसते आहे की दक्षिणपूर्व आशियाच्या संबंधात आपण आपला निर्धार प्रगट केला पाहिजे अशी वेळ आलेली आहे. या गनिमी युद्धाचे उगमस्थान उत्तर व्हिएतनाममध्ये आहे आणि त्या मुळावर आता आम्ही घाव घातला पाहिजे. या युद्धात हनोई सरकार पडलेले असल्याने त्याची किंमत त्या सरकारला आपण द्यायला लावली पाहिजे.’

जनरल टेलर याचा दक्षिण व्हिएतनामच्या युद्धात अमेरिकन सेनेने प्रत्यक्ष भाग घ्यावा हा सल्ला अथवा उत्तर व्हिएतनामवर बाँबहल्ले करा असा दुरान्वयाने सुचवलेला उपाय यापैकी काहीच अध्यक्ष केनेडी यांनी मानले नाही. फक्त अधिक मोठ्या प्रमाणावर लष्करी साहित्य व अधिक लष्करी सल्लागार दक्षिण व्हिएतनामला पाठविण्यास अध्यक्ष केनेडी यांनी संमती दिली.

## गॅलब्रेथ : 'अपयशाशी आपले लग्न लागले आहे.'

अमेरिकेचे भारतातील वकील जॉन गॅलब्रेथ हे यावेळी वॉशिंग्टनहून नवी दिल्ली येथे निघालेले होते. केनेडी यांनी गॅलब्रेथ यांना सायगावला थांबून अहवाल पाठविण्यास सांगितले. गॅलब्रेथ हे स्पष्टवक्ते व सडेतोड बोलणारे गृहस्थ होते. त्यांनी सायगावहून अध्यक्ष केनेडींना लिहिले –

> 'इथली खरी राजकीय वस्तुस्थिती म्हणजे दिएम याला व्हिएतमाँगपासून देश वाचविण्याच्या चिंतेपेक्षा, देशातच क्रांती होऊन आपण त्यात खलास होऊ ही चिंताच अधिक असल्यामुळे, देशात निर्माण झालेली अचेतन अवस्था होय. प्रांताचे गव्हर्नर्स हेच तिथले लष्करी प्रमुख. त्यांच्या ठिकाणी निर्माण झालेली नालायकी, विश्वासार्ह हेरखात्याचा अभाव, केंद्रीत केलेले सैनिकी अधिकार या सर्वांमुळे आपणच उखडले जाऊ ही भीती दिएमच्या मनात निर्माण झालेली आहे याबद्दल मला मुळीच शंका नाही. आपले दुर्दैव असे आहे की आपण जी क्रांती घडवायला जातो ती नेहमी आपल्याच अंगाशी येते. अमेरिकेचे या ठिकाणी अपयशाशीच लग्न लागलेले आहे आणि आता ही गाठ अखेरपर्यंत सुटण्यासारखी नाही-'

केनेडी यांना लिहिलेल्या खासगी पत्रात गॅलब्रेथ यांनी कळवले होते –

> 'खुर्चीवरील आपले आयुष्य लांबवीत बसण्याचा नाद हा सर्वत्रच आढळतो. आपले स्टेट डिपार्टमेंटही याला अपवाद नाही हे तिथल्या माणसांची छायाचित्रे पाहून सहज लक्षात येईल! दिएमला सत्तेवरून हाकलल्याशिवाय तो जाणार नाही. त्याच जागी एखाद दुसरा कोणी आला तरी चालेल. मात्र या दिशेने अमेरिकेने काही प्रयत्न करता कामा नयेत.'

१९६२ साल उजाडले ते केनेडी यांना फारसे उत्साहवर्धक भासत नव्हतेच. दिएम राजवट कानपिचक्या देऊन सुधारण्याचा खेळ अमेरिकेच्या अंगावर शेकू लागल्याचे दृश्य आता दिसू लागले. दिएमचा भाऊ न्हू व त्याची बायको मादाम न्हू हे दोघे अमेरिका आता दक्षिण व्हिएतनामच्या अंतर्गत बाबतीत हस्तक्षेप करू लागल्याची ओरड करू लागले! लाओस येथे पॅथेलाओशी सहकार्य करून सरकार स्थापन करावे या उद्दिष्टाने जिनिव्हा येथे ज्या वाटाघाटी चालू होत्या, त्याचा आधार घेऊन लाओसमध्ये तथाकथित राष्ट्रवाद्यांना अमेरिकेने दगा दिला आणि आता दक्षिण व्हिएतनामबाबत तसेच घडेल असा ओरडा या न्हू दंपतीने सुरु केला.

नव्या वर्षाच्या भाषणात अध्यक्ष केनेडी यांनी दिलासा दिला –

'लाओसमध्ये समाधानकारक सोडवणूक झाली तर ती व्हिएतनाममध्ये शांती स्थापन करण्यास उपयोगी पडेल. दक्षिण व्हिएतनाममध्ये शत्रू आपली हिंसाशक्ती वाढवीत आहे. दक्षिण व्हिएतनाम सरकारने अशी सुधारणेची पावले उचलली आहेत की ज्या योगे सरकारला व्यापक प्रमाणावर जनाधार लाभू शकेल. तेथे आज योजनाबद्ध आक्रमणाने जो रक्तपात घडतो आहे, ते कुठल्याही अर्थाने स्वातंत्र्ययुद्ध नाही – व्हिएतनाम हा मुक्त प्रदेशच आहे. तेथे चालू आहे तो जनतेला गुलामीत ढकलण्याचा प्रयत्न आणि त्याचा प्रतिकार केला जाईल.'

## मॅकव्हीचा जन्म

अमेरिकेच्या या आश्वासनाचा दर्शनी भाग म्हणून सायगावला फेब्रुवारी १९६२ मध्ये 'दि युनायटेड स्टेट्स मिलीटरी असिस्टंट्स कमांड, व्हिएतनाम' (MACV) 'मॅकव्ही' ही नवी संघटना स्थापन करण्यात आली. मॅकव्ही संघटनेचा पसारा इतका मोठा मांडला गेला की सुमारे ४००० अमेरिकन सैनिक व्हिएतनाममध्ये यासाठी आणण्यात आले. व्हिएतनाममध्ये मोठ्या संख्येने अमेरिकन फौज यायला झालेली ही सुरुवात होती. एकीकडे मात्र केनेडी म्हणत होते –

'अमेरिकन सैन्य आत येताच बँड वाजेल, दुतर्फा जमलेले साधे नागरिक टाळ्या वाजवतील आणि चार दिवसात सगळे विसरून जाईल. मग आम्हाला सांगितले जाईल – आणखी फौज पाठवा! दारू पिण्यासारखी ही गोष्ट आहे. दारू घेतली की प्रथम चढते, मग परिणाम ओसरू लागतो म्हणून मग आणखी घ्यावी लागते.'

मॅकव्ही संघटनेचा गाजावाजा सुरू झाला, विरोध सुरू झाला तो अमेरिकेतच! विचारवंत अमेरिकनांना हे स्पष्ट दिसू लागले की 'मद्यपान' खरोखर तर सुरूच झाले आहे. 'अघोषित युद्धा'त अमेरिका गुरफटत चालली आहे. अमेरिकेने दक्षिण व्हिएतनाममध्ये पाठविलेली लष्करी तज्ज्ञ आणि सैन्य हे फक्त युद्धाचे व्यवस्थापन करण्यास मदत करीत आहेत की प्रत्यक्ष लढत आहे, या प्रश्नावर अमेरिकेतील वृत्तपत्रे आणि वॉशिंग्टन सरकार यांच्यात रणधुमाळी सुरू झाली. वृत्तपत्रे छापू लागली – 'सरकार खोटे बोलते-'

रॉबर्ट केनेडी हा अध्यक्षाचा धाकटा भाऊ दक्षिण व्हिएतनामच्या दौऱ्यावर गेला. पत्रकारांनी विचारले –

'अमेरिकन जनतेला इथे काय चालले आहे याची कल्पना आहे का? इथे अमेरिकन पोरे मरत आहेत.'

प्रश्नातली खोच लक्षात न घेता रॉबर्ट केनेडी म्हणाले –

'मला वाटतं, अमेरिकेच्या लोकांना सर्व कल्पना आहे आणि त्यांचा या लढ्याला पाठिंबा आहे.'

संरक्षणमंत्री मॅकनामारा यांनी सांगितले –

'व्हिएतनाममध्ये अमेरिकन सैनिकांची संख्या बरीच आहे ही गोष्ट खरी आहे. परंतु सैनिक लढत नाहीत. जोपर्यंत त्यांच्यावर गोळी झाडली जात नाही तोपर्यंत त्यांनी हात उचलू नये अशा सूचना दिलेल्या आहेत.'

या सर्व वक्तव्यांचा अर्थ स्पष्ट होता. मात्र अध्यक्ष केनेडी यांनी पत्रकारांना सांगितले –

'जर अमेरिकन सेनेने व्हिएतनाममध्ये लढावे असे ठरले तर मी अमेरिकन काँग्रेसचा कौल मागेन.'

## संरक्षित वसाहतींचा फजितवाडा

व्हिएत-मिन्ह गनिमी सैन्याचा जोर दिवसेंदिवस वाढत होता. खेड्यापाड्यांत जीवन असुरक्षित झाले होते. खेड्यातील सरकारधार्जिण्या व्यक्ती आणि सावकार यांचे सतत खून पडू लागले. सामान्यजनांची राज्यकारभाराबाबत किमान एक अपेक्षा असते की सरकारने ज्या बहुसंख्य नागरिकांना शांततेने व सुरक्षितपणे जगावेसे वाटते त्यांना पुरेसे संरक्षण दिले पाहिजे. दक्षिण व्हिएतनाम सरकार ही किमान अपेक्षा आता पुरी करू शकत नव्हते, आणि ज्यांचे खून पडत होते ते बहुसंख्य हे पैशाच्या गैरव्यवहारात हात बरबटलेले सरकारी अधिकारी व व्यापारी असले तरी 'ओल्याबरोबर काही सुके' ही जळत होतेच.

यावर उपाय म्हणून ब्रिटिश-अमेरिकन सल्लागार आणि पंतप्रधान दिएम याच्या सुपीक डोक्यातून एक नवे पिल्लू बाहेर आले. मलाया आणि फिलिपाईन्समध्ये अमेरिकनांनी आणि ब्रिटिशांनी हा प्रयोग पूर्वी केलेला होता व तो यशस्वी ठरला असा अमेरिकनांचा दावा होता. हा प्रयोग होता स्ट्रॅटेजिक हॅमलेट्स म्हणजे 'मोक्याच्या जागी सुरक्षित गावे' निर्माण करण्याचा! दूर दूर पसरलेली, लहान लहान म्हणून रक्षणाच्या दृष्टीने धोक्याची खेडी एकत्र करून त्यांचे एकच गाव तयार करायचे व या गावाला भरपूर संरक्षण द्यायचे. हे नवे गाव निर्माण करताना लष्करीदृष्ट्या सर्व विचार करायचा. १९६३ अखेर दक्षिण व्हिएतनामभर अशी ११८६४ खेडूत गावे निर्माण करण्याची योजना कागदावर आखण्यात आली... आणि अध्यक्ष केनेडी यांचा आशीर्वाद लाभताच झपाट्याने ही योजना अंमलात आणायला सुरुवात झाली.

ही आदर्श संरक्षित गावाची योजना दिएमचा भाऊ न्हू याच्या व्यक्तिगत नियंत्रणाखाली सुरू झाली. महिन्याला अशी ६०० गावे तयार करायची आणि प्रत्येक गावात सुमारे ३०० कुटुंबांची सोय करायची असा धडाकेबंद कार्यक्रम आखण्यात आला. या नव्या

वसाहतींना अमेरिकेचे भरपूर द्रव्यबळ असल्याने राहणीमानात खूपच सुधारणा या गावांतून दिसू लागली. चांगले रस्ते, वाहती गटारे, सांडपाण्याची स्वच्छ योजना, नेटकी घरे, वैद्यकीय उपचाराची सोय असे सर्व या गावातून आढळू लागले. गावकऱ्यात तात्पुरता का होईना एकोपा निर्माण झाला आणि व्हिएतकाँग दहशतवाद्यांना आता एकएकट्या खेड्यावर हल्ला करण्याच्या तंत्रात बदल करावा लागला. या आदर्श गावातून रेडिओ-ट्रान्समीटर्स बसवले गेल्याने, हल्ला झालाच तर दुसरीकडून लष्करी मदत ताबडतोब येऊ लागली. १ ऑक्टोबर १९६३ पर्यंत डोंगरात राहणाऱ्या जमातींपैकी २१७००० लोक अशा २१० संरक्षित वसाहतीतून बसवले गेले.

एखाद्या गावात खूप पैसा ओतला आणि तो फुकट मिळालेला असला तर वरील सर्व गोष्टी सहजी निर्माण होतात. परंतु बागेत घाम गाळून निर्माण केलेली फुले आणि दिवाणखान्यातील आयती बाजारी पुष्परचना याच्यातील फरक हा अखेर महत्त्वाचा असतो! मलायामध्ये ही संरक्षित गावाची योजना फलद्रुप झाली, कारण तिथे मलायी लोकांना चिन्यांपासून संरक्षण द्यायचा प्रश्न होता. चिन्यांमध्ये मलायीचे नातेवाईक नव्हते, अथवा चिन्यांविषयी मलायीना प्रेमही नव्हते. इथे परिस्थिती उलटी होती. बिगर कम्युनिस्ट व्हिएतनामी लोकांना 'व्हिएत-मिन्ह' पासून संरक्षण देण्याचा प्रश्न होता!

शेतकरी हा आपल्या शेतावर राहू इच्छितो. तिथे त्याची जमीन असते, गुरंढोरं असतात. ते त्याचे प्रेमाचे ठिकाण असते. काही संकट येऊन तो तात्पुरता गाव सोडून गेला तरी त्याचा ओढा आपल्या गावाकडे आणि शेताकडेच राहातो. या सुरक्षित वसाहतीत शेतकऱ्यांना सरकारने घरे दिली पण जमिनी कशा देणार? ऐतखाऊ जीवन या शेतकऱ्यांनी पत्करावे अशी दिएम सरकारची अपेक्षा होती की काय?

संरक्षित गावाच्या योजनेचा बोजवारा लगेच सुरू झाला. गावकऱ्यांची अशा काही व्हिएतनामी लोकांशी रक्ताची नाती होती की ज्यांचा ओढा हो-चि-मिन्हकडे होता! आणि त्यांना अशा गावात संबंध प्रस्थापित करणे मुळीच अवघड ठरले नाही. जमिनीबाबत निर्माण होणाऱ्या अडचणींचा विचारच योजकांनी केलेला नव्हता. अमेरिकन पैसा आणि साहित्य विपुल प्रमाणात हातात येत असल्याने, आपल्या योजनेचे नेमके काय होते आहे हे मागे वळून पाहावे, काही आत्मपरीक्षण करावे असा विचारही न्यू-दिएम दुकलीने केला नाही. उलट जास्तीत जास्त अमेरिकेचा पैसा कसा ओढता येईल या प्रयत्नात या योजनेची गती अवाच्या सवा वाढविण्यात आली.

याचा परिणाम व्हायचा तोच झाला. नंतर अमेरिकेनेच केलेल्या पाहणीनुसार यापैकी १० ते १५ टक्के वसाहतीनाच काय ते सुरक्षित म्हणता आले असते! या योजनेमुळे सायगाव सरकारला १९६३ सालात थोडाफार लष्करी फायदा झाला हे मान्य केले, तरी

राजकीयदृष्ट्या ही योजना अपयशी ठरली. कॅथॉलिक मंडळीचे हात वरपर्यंत पोचू शकत असल्याने हा वर्ग वगळता, वसाहती म्हणजे इतरांना 'यातना शिबिरे' ठरू लागली. अधिकारी येऊन वसाहतीतील लोकांना वसाहतीभोवती तारांची कुंपणे घालणे, पहारा देणे अशा बैठ्या कामाला सक्तीने जोडू लागले. रात्र पडली की पहारेकरी उगाचच अपरात्री चौफेर हवेत गोळीबार करून व्हिएतकाँगींना दहशत बसावी म्हणून प्रयत्न करीत. तर दिवसा हे अधिकारी गावकऱ्यांवर नाना प्रकारचे जुलुम करीत. हे दिवसरात्र मेंढराचे आणि काळजीचे जगणे वसाहतीतून सक्तीने वा खुशीने दाखल झालेल्या शेतकऱ्यांना नकोसे झाले.

## प्राणभये लपो जाता

अमेरिकेच्या आर्थिक व लष्करी साहाय्यावरच दिएम सरकार उभे आहे हे चित्र १९६२ सालात इतके ठसठशीत झाले की दिएम आणि त्याचे सगेसोयरे यांनाच आता चटके बसू लागले. अधिकारी वर्ग दिएम, न्हू, मादाम-न्हू या मंडळींनाही गुंडाळून ठेवून परस्पर व्यवहार करू लागले. दिएमला आता आपल्या मंत्र्याचा आणि सेनाधिकाऱ्यांचाच विश्वास वाटेना. आज एका सेनाधिकाऱ्याला जवळ कर. उद्या त्याच्या विरोधकाला चिथाव या पद्धतीनेच आतापर्यंत दिवस निभले होते. पूर्वीचा बे-व्हिएन हा मवाली बरा म्हणावा असा आता न्हू वागू लागला. लाचलुचपत, मवाल्यांचे अड्डे, जुगार या सर्व मार्गांनी दिएम व न्हू यांनी पैसा जमा करायला सुरुवात केली होती आणि दोघे काय करीत असत याचा परस्परांना पत्ता लागू देत नसत. यामुळे दिएमचा भाऊ न्हू याने आज एखाद्याला दूर केला तर उद्या दिएम त्याला जवळ करी. मादाम न्हू तर सत्तेमुळे बहकल्यासारखीच झाली होती. कॅथॉलिकांचे राज्य वाटावे म्हणून या बाईने दिएमला एक Public Morality Act 'जननीतिचा कायदा' करायला भाग पाडले. या कायद्यानुसार सार्वजनिक ठिकाणी स्त्री-पुरुषांनी नाचणे, घटस्फोट घेणे यावर बंदी घालण्यात आली. विवाहाला शासनाची पूर्व परवानगी आणि मर्तिकाच्या मिरवणुकींनाही शासनाची पूर्व परवानगी या कायद्याने जारी केली!

पोलिस अधिकारी, सेनानी आणि कॅथॉलिक धर्मगुरु वगळता, दिएम आता कुणाला भेटणे मुष्कील झाले होते. प्रत्येक वर्षी आपल्या सत्ताग्रहणाचा दिवस लष्करी संचलनाने साजरा करण्याची प्रथा त्याने पाडली होती. १९६२ च्या या समारंभात या संचलनाच्या वेळी रस्त्याच्या दोन्ही अंगांना बाबूंची कुंपणे उभारून दुतर्फा खडा पहारा ठेवण्यात आलेला होता. दिएम कुणाला भेटत नसे खरा, परंतु कुणी पत्रकार आले, परदेशी पाहुणा आला की दिएम न थांबता सहा-सात तास बडबड-बडबड करीत सुटे. लोकांपासून दूर गेलेला हा राष्ट्रप्रमुख आता फक्त आधारासाठी हातातील लष्करी सत्तेवर अवलंबून होता.

दिएमचे अखेरचे दिवस फार वाईट होते. तो असा प्राणभयाने एकांतप्रिय झाल्याने त्याचा भाऊ न्हू हाच शेवटी शेवटी कर्तुम् अकर्तुम् शक्ती झाला. दिएम हा मवाळ वृत्तीचा तर न्हू हा उद्धट, बेशिस्तीचा आणि क्रूर होता. अमेरिकेच्या हेर खात्याचा उपयोग तो स्वतःचे शत्रू टिपण्यासाठी करीत असे. न्हू याने मादाम न्हू हिच्या बापाला दक्षिण व्हिएतनामचा अमेरिकेतील वकील म्हणून मुद्दामच देशाबाहेर काढला होता. कारण या म्हाताऱ्याला आपल्या जावयाचे क्रौर्य व मुलीचा बेबंदपणा मुळीच पसंत नव्हता. न्हूबरोबर तर त्याचे वैरच झालेले होते. दिएम हा प्राणभयाने लपो जाता, त्याचे राज्य बुडणार हे नक्की झाले.

## वार्ताहर बदमाश ठरले

अमेरिकेतील वृत्तपत्रांचे व्हिएतनाममधील बातमीदार बाहेर ज्या बातम्या धाडीत, त्यावरून दक्षिण व्हिएतनाममध्ये पाठवले गेलेले हजारो अमेरिकन सैनिक आता प्रत्यक्ष लढाईत भाग घेऊ लागले होते व अनेकजण प्राणास मुकत होते ही गोष्ट जाहीर होत होती. मादाम न्हू हिचा यामुळे पत्रकारांवर रोष झाला. सप्टेंबर १९६२ मध्ये सायगाव येथील 'न्यूजवीक' पत्राच्या बातमीदाराला मादाम न्हू हिने देशाबाहेर हाकलला. तिने जाहीर आरोप केला –

'हे अमेरिकेचे वार्ताहर कम्युनिस्टांपेक्षा बदमाश आहेत-'

मादाम न्हू हिचा संताप समजण्यासारखा होता. पत्रकारांनी आणि ग्रॅहॅम ग्रीनसारख्या लेखकांनी वर्षभरातच एक सत्य अध्यक्ष केनेडी आणि सामान्य जनतेपुढे स्पष्टपणे मांडले होते आणि ते एकच होते –

'सायगावला राज्य करणारी दिएम, न्हू आणि मादाम न्हू ही सर्व माणसेच बदमाश आणि नालायक आहेत!'

n

# १७ : बौद्धांचा उठाव : संन्याशांची आत्मदहने

केनेडी यांच्या अध्यक्षपदाची दोन वर्षे आता पुरी झाली होती. या दोन वर्षात या अध्यक्षांनी जे निर्णय घेतले त्याचा परिणाम म्हणून अमेरिका दक्षिण व्हिएतनामच्या गलथान राज्यकारभाराच्या चिखलात आता गळ्यापर्यंत बुडून गेलेली होती. दक्षिण व्हिएतनाममध्ये अमेरिकेने हस्तक्षेप केला तो एका उद्दीष्टासाठी –

दक्षिण व्हिएतनाम हा उत्तर व्हिएतनामी कम्युनिस्ट राजवटीच्या ताब्यात जाऊ द्यायचा नाही. यासाठी १७ व्या अक्षांशावर झालेली फाळणी आहे तशीच कायम ठेवायची.

## नालायक राजवटीचा आधार

या उद्दिष्टाच्या पूर्ततेसाठी दक्षिण व्हिएतनाम सरकारला आवश्यक ती आर्थिक व लष्करी मदत द्यायची हे ओघानेच आले होते. परंतु दोन वर्षांनंतर आता दृश्य काय दिसत होते? जिनिव्हा करारानुसार दक्षिण व्हिएतनाममधील लष्करी सल्लागार म्हणून असलेल्या अमेरिकनांची संख्या ६८५ माणसांहून अधिक असू नये, (करार झाला तेव्हा एवढे अमेरिकन अंदाजे तिथे असावेत.) असे बंधन असताना, हे अभिवचन धाब्यावर बसवून केनेडी यांनी 'मॅकव्ही' ही प्रचंड लष्करी संघटना सायगाव येथे उभी करण्यास संमती दिली. या संघटनेअंतर्गत १६ ते १७ हजार अमेरिकन सैनिक दक्षिण व्हिएतनाममध्ये दोन वर्षांत त्यांनी पाठवले. अमेरिकेचे सल्लागार केवळ दक्षिण व्हिएतनामी सैन्याला लष्करी शिक्षण देण्यासाठी आलेले असताना, दक्षिण व्हिएतनामी सैन्याच्या मदतीने अमेरिकन सैनिकांनी उत्तर व्हिएतनामवर छुपे हल्ले चढवावे, तिथे शक्य असल्यास घातपात करावा, दक्षिण व्हिएतनामसाठी हेरगिरी करावी या अर्थाच्या गुप्त आदेशावरही अध्यक्ष केनेडी यांनी स्वाक्षरी केलेली होती. ११ मे १९६१ च्या या गुप्त अध्यक्षीय आदेशात स्पष्ट म्हटले होते –

'Our special forces may form network of resistance, coverbases and teams of sabotage and light-harassment.'

('आपल्या खास सैन्य तुकड्यांनी, प्रतिकाराचे जाळे तयार करावे, घातपात करणाऱ्या टोळ्या व त्यांचे अड्डे यांना संरक्षण द्यावे व हलकीफुलकी त्रासदायक कृत्ये करावी.')

या सर्व सनदशीर आणि बेसनदशीर खटाटोपानंतरही दिएमचे सरकार, उत्तर व्हिएतनामच्या आर्थिक व राजकीय आव्हानाला प्रत्युत्तर देऊ शकेल असे बलवान सरकार वा स्वच्छ कारभार दक्षिणेत निर्माण करू शकले नव्हते. बुडत्याने वाचवणाऱ्याच्या गळ्यात मिठी मारावी आणि प्रसंगी लाथा झाडाव्या असा प्रकार झाला होता. दिएम, न्हू

आणि मादाम न्हू या कंपूने आपला धर्मबंधू जो कॅथॉलिक समाज, त्याच्या पाठिंब्यावर बहुसंख्य बौद्धधर्मीयांवर एक लाचखाऊ नालायक राजवट लादलेली होती. दक्षिण व्हिएतनामचा ६०% दक्षिण भूभाग दिएम विरोधी 'नॅशनल लिबरेशन फ्रंट' व व्हिएत-मिन्ह सैनिक यांच्या वर्चस्वाखाली गेल्यासारखाच झाला होता.

व्हिएत-मिन्ह गनिमांचा लष्करी जोर दिवसेंदिवस वाढू लागल्याने अमेरिकेचे लष्करी दल वाढत्या संख्येने या संघर्षात लोटल्याखेरीज अध्यक्ष केनेडी यांना पर्याय उरला नव्हता. केनेडींची पावले त्याच दिशेने पडत चालली होती आणि प्रत्येक नव्या पावलागणिक अध्यक्ष केनेडी अमेरिकेला व्हिएतनामच्या यादवीत गुरफटवीत चालले होते.

## दिएम सलू लागला!

साम-दामाने दिएम याला शुद्धीवर आणण्याचे अमेरिकन शासनाचे प्रयत्न व्यर्थ ठरले होते. दक्षिण व्हिएतनाम हा प्रदेश कम्युनिस्ट वर्चस्वापासून वाचवण्याचे उद्दिष्ट लांबच राहून उलट दक्षिण व्हिएतनाम, दिएम आणि त्याच्या धूर्त पाताळयंत्री सग्यासोयऱ्यांपासून कसा वाचवावा हाच मुख्य विचार १९६२ अखेर वॉशिंग्टनला सुरू झाला. काहीतरी घडावे आणि दक्षिण व्हिएतनामी जनतेनेच दिएम राजवटीचा उबग येऊन त्याला दूर केला असे घडावे, अशी इच्छा अमेरिकेच्या अध्यक्षांच्या आणि त्यांच्या सल्लागारांच्या मनात बळावू लागली होती. पण हे सर्व जमावे कसे? या विवंचनेत अमेरिका असतानाच दिएम आणि मादाम न्हू या दुकलीने आपल्या त्वरित अधःपतनाचा खड्डा कसा खणला तो पहा.

## बौद्धांचा उठाव

दिएम कुटुंबाचा विनाश व्हिएतकाँगने केला नाही. हे काम केले मूठभर बौद्ध भिक्षूंनी! त्याचे असे झाले –

दिएम याने असा एक वटहुकूम जारी केलेला होता की कुणाही व्यक्तीने सार्वजनिक ठिकाणी आपला धार्मिक ध्वज, हा राष्ट्रीय निशाणापेक्षा जास्त उंचावर फडकवता कामा नये. एप्रिल १९६३ मध्ये दिएमचा थोरला भाऊ आर्चबिशप थुक हा हुए येथे आला असताना कॅथॉलिकांचा धर्मध्वज राष्ट्रीय निशाणाहून उंच ठिकाणी फडफडताना सर्वांनी पाहिलेला होता. महिनाभराने म्हणजे ८ मे १९६३ ला भगवान बुद्धाची २५०७ वी जयंती येत होती. तत्पूर्वी चार दिवस हुए शहरामधील बौद्धांनी प्रांताच्या गव्हर्नरसाहेबांना अशी विनंती केली की सार्वजनिक ठिकाणी धार्मिक ध्वजाच्या प्रदर्शनावर असलेली सरकारी बंधने शिथिल करावी; जशी आर्च बिशप आला असताना ख्रिस्ती धार्मिक विधीच्या वेळी पूर्वी केली होती.

गव्हर्नरने बौद्धांचा अर्ज ठेवून घेतला. या अर्जात सरकारने धार्मिक बाबतीत भेदभाव करू नये असे स्पष्ट बजावलेले होते. या रास्त मागणीच्या आग्रहासाठी बौद्धांनी मोठ्या संख्येने गव्हर्नर निवास, कॅथॉलिकांचे चर्च आणि आर्चबिशपचा निवास या सर्व ठिकाणी निदर्शने केली.

हुए शहरातील आकाशवाणी केंद्रावरही बौद्धांनी मोर्चा नेला. निदर्शकांनी मागणी केली की बुद्ध जयंतीनिमित्त आकाशवाणी केंद्राने बौद्ध भिक्षूंच्या धार्मिक प्रवचनांचे खास कार्यक्रम आयोजित करावेत.

गव्हर्नरने काहीही केले नाही. त्याने फक्त हुएमधील लष्कराला सरकारी आकाशवाणी केंद्राचे रक्षण करण्यास पाचारण करून ठेवले. ८ मे उजाडला. प्रचंड संख्येने बौद्ध समाज रेडिओ स्टेशनवर जमा झाला. जमाव संतप्त होता. तिथे बायोनेट घेऊन लष्कर खडे असलेले पाहून जमावाची चीड अनावर झाली. जमाव रेडिओ केंद्रात घुसू लागला. काही माथेफिरूंनी दगड-विटा आणि सोड्याच्या बाटल्या सैनिकांवर भिरकावल्या. हा लष्कराने नंतर केलेला दावा कदाचित अंशतः खरा असेलही. परंतु संतापलेल्या जमावावर बेछूट गोळीबार करणे म्हणजे राज्य करणे नव्हे!

लष्कराने या निःशस्त्र बौद्धजनांवर गोळीबार केला आणि लष्करी गाड्या अंगावर घातल्या. नऊ माणसे जागीच ठार झाली. चौदा घायाळ झाली.

या गोळीबारात जे मरण पावले त्यांच्या शवयात्रा प्रचंड निघाल्या. दिएम सरकार हे बौद्ध धर्मांच्या विरोधी आहे, बौद्धांना देशातून हाकलण्याचा या कॅथॉलिक धटिंगणांचा विचार आहे असा प्रचार शहराच्या कानाकोपऱ्यापर्यंत दुमदुमू लागला. बौद्धांच्या उठावाने पुढे जे उग्र रूप धारण केले त्याचा उलगडा केवळ तात्कालिक कारणाची क्षुल्लकता पाहून होणार नाही. 'फॉरेन अफेअर्स' या अमेरिकन पत्रात जॉर्ज कार्व्हर यांनी लिहिले –

'१९६३ च्या वसंत ऋतूत हे जे काही प्रसंग घडले ते एकाएकी घडले नाहीत. गेली काही वर्षे लहानसहान प्रसंग, घटना आणि सरकारची धोरणे, यातली काही हेतूपूर्ण तर काही अपघाती, या सर्वांमधून असा एक धार्मिक विरोध तयार होत होता की ज्यावर बिगर कॅथॉलिक दिएम विरोधकांनी आपले लक्ष केंद्रित केले होते.'

## चळवळ पसरू लागली

बौद्ध समाजाने यावेळी नेट धरला. गोळीबारात मरण पावलेल्यांच्या नातेवाईकांना नुकसान भरपाई मिळावी अशी मागणी त्यांनी केली. दिएम याने या साध्या मागणीला नकार दिला. मग मात्र ही चळवळ झपाट्याने पसरू लागली.

व्हिएतनामच्या बौद्ध संघटनेने दिएमच्या बौद्धविरोधी राजकारणाचा बौद्धमंदिरातून निषेध करण्याचा आदेश देताच चळवळ खेडोपाडी पसरू लागली. हुए ते सायगाव सर्वत्र सरकारविरोधी निदर्शने बौद्धभिक्षूंनी आयोजित केली.

दिएम याला जाग आली. अध्यक्ष दिएम हा कॅथॉलिक असला तरी उपाध्यक्ष थो हा बौद्ध होता. थो याला मध्यस्थी करण्यास दिएम याने सांगितले. न्हू याचा अर्थात या वाटाघाटींना विरोध होता. परंतु दिएम याला शांतता हवी होती.

१५ जून ते १८ जून सायगावला अध्यक्षीय प्रासादात सरकारच्यावतीने उपाध्यक्ष थो व बौद्धांचे पुढारी यांच्यात बोलणी सुरू झाली. धार्मिक ध्वजाबाबतचा वटहुकूम दुरूस्त करण्याची व ८ मे ला गोळीबारात मेलेल्यांच्या नातेवाईकांना नुकसान भरपाई देण्याची मागणी अशा दोन मागण्या थो याने मान्य केल्या. बौद्ध पुढाऱ्यांनी आग्रह धरला –

'हुए येथे गोळीबार करण्यात आपली चूक झाली असा पश्चात्ताप सरकारने व्यक्त करावा व त्या दिवशीच्या घटनांची जबाबदारी पत्करावी.'

अध्यक्ष थो म्हणाला –

'त्या दिवशी कुणाचे काय चुकले हे ठरवायला सरकारने कमिशन नेमलेलेच आहे.'

बौद्ध नेत्यांनी हा कमिशनचा वायदा ठोकरला. त्यांना माफी हवी होती आणि ती चौकशीचा फार्स न करता – ताबडतोब! उपाध्यक्ष थो याने या गोष्टीस नकार देताच बौद्ध नेते उठून गेले.

इथं कुणाला असे वाटले की बौद्ध नेत्यांनी फार ताणले! परंतु ८ मे ला जमावात घुसून हुए प्रांताचा जो कॅथॉलिक गव्हर्नर, त्याच्या हस्तकांनी दोन प्लॅस्टिक बाँब फोडले व हे बाँब बौद्ध समाजापैकी जे व्हिएतकाँगी विचाराचे होते त्यांनी फोडल्याचा खोटा आरोप केलेला होता. कमिशनच्या चौकशीत मुख्य चौकशीचा फार्स होता तो बाँबस्फोट बौद्धधर्मीय काँगीनी केले हे सिद्ध करण्याचा. असा सर्व खोटारडेपणा कालांतराने शहाजोग होतो. यासाठी बौद्ध नेत्यांनी ताबडतोब क्षमायाचनेचा आग्रह धरला होता. तो रास्त होता.

सरकार ऐकेना तेव्हा काही बौद्ध भिक्षूंनी हुए व सायगाव शहरात उपोषण सुरू केले. एकाएकी काषायवस्त्रधारी बौद्ध संन्यासी हे दिएम विरोधी संघर्षाचे प्रमुख नेते झाले. बौद्ध धर्माचा त्यांच्याच देशात अवमान करणारी राजवट आता ठेवायची नाही अशा निर्धाराने हे तरुण सुशिक्षित असे कठोर व्रतपालक, आता उठाव करू लागले. सामान्य जनतेत या संन्यासी वर्गाविषयी पराकाष्ठेचा आदर होता. त्यामुळे या चळवळीला हळूहळू रौद्र रूप येऊ लागले. खेड्यापाड्यातून कॅथॉलिक मिशनऱ्यांनी आणि धर्मगुरुंनी १९५४ पासून गरीब जनतेला खूप त्रास दिलेला होता. मोक्याच्या ठिकाणी असलेले कॅथॉलिक अधिकारी आणि कॅथॉलिक धार्जिणी राजवट यामुळे या छळाला मर्यादा नसत. आता या

सर्वांतून जो भस्मासूर उभा झाला, त्याचे दायित्व दिएम सरकारचेच होते. जे पूर्वी कधी बौद्ध प्रार्थनामंदिरात जात नसत असे सामान्य लोक देखील आता हिरीरीने आपली धर्मभावना प्रार्थना मंदिरात मोठ्या संख्येने जमून व्यक्त करू लागले.

## बौद्ध-ख्रिस्ती सनातन झगडा

बौद्धांनी दिएम राजवटीविरुद्ध हे जे निःशस्त्र प्रतिकाराचे शस्त्र उपसले त्याची पाळेमुळे व्हिएतनाम देशाच्या इतिहासात खोलवर गेलेली आढळतात. हुए-सायगाव परिसरात बौद्धधर्म भारतातून आला तो इसवी सनाच्या दुसऱ्या शतकात. हा जो बौद्ध धर्म इथे आला तो महायान बौद्धधर्म. हीनयान बौद्धधर्मात फक्त व्यक्तींच्या मोक्षाचा विचार असतो व हीनयांनी हा जास्त आत्मरती असतो. परंतु महायान बौद्धधर्मात निर्वाणाच्या पायऱ्यांवरून जाताना स्वतःप्रमाणे समाजबंधूंना या दिशेने नेण्यासाठी करायचे सामाजिक कर्तव्य देखील अंतर्भूत असते. व्हिएतनाममधील विविध राजांनी सुरुवातीच्या काळात या धर्माला देशाचाच एक धर्म म्हणून मान्यता दिली.

परंतु अकराव्या शतकात चिनी झोटिंगांच्या स्वाऱ्या होताच, कन्फ्युशिअस धर्माने बौद्धधर्मावर प्रहार सुरू केले. अर्थात हे प्रहार वैचारिकच होते असे नाही. राजधर्म म्हणून कन्फ्युशिअसच्या शिकवणुकीचा जोर असला की बौद्ध मागे सरत. परंतु राजवाड्यात क्रांती झाली की पुन्हा बौद्धांचे विहार दिमाखाने पुढे सरसावत. फ्रेंचांविरुद्ध 'होआ-हाओ' या माथेफिरू धर्मविस्तारांचे जे बंड पूर्वी वर्णन केले त्याला बौद्धांचाच सक्रिय पाठिंबा होता. याचे मुख्य कारण बौद्धधर्म व फ्रेंचांनी आधार दिलेला कॅथॉलिक धर्मपंथ, यांच्यात सुरुवातीपासूनच वितुष्ट आलेले होते. फ्रेंच राजवटीच्या काळात बौद्धधर्माने कन्फ्युशिअस धर्ममताशी जमवून घेतले. कन्फ्युशिअस धर्मांशी जमविणे सहज शक्य होते. कारण कन्फ्युशिअसची शिकवण ही प्रामुख्याने समाजव्यवस्थेची आदर्श कल्पना होती! द्वेषावर आधारलेला तो धर्म नव्हता अथवा इतर धर्मांचे वैरही त्या धर्माला अभिप्रेत नव्हते. बौद्धधर्म हा सर्व सामाजिक, राजकीय व्यवस्थेपलीकडील व्यवस्थेचा म्हणजे निर्वाणाचा विचार करणारा धर्म असल्याने, बौद्ध भिक्षू कन्फ्युशिअसच्या शिकवणुकीकडे इहवादी शिकवण म्हणून काहीशा उपेक्षेनेच पाहत आले होते. शिवाय बुद्धाच्या शिकवणुकीनुसार सर्व माणसे ही परस्परांचे बंधू असल्याने, ही माणुसकीची शिकवण वंश व संस्कृती यांना ओलांडणारी शिकवण होती. इहवादी प्रश्न हे बौद्धांच्या चिंतनाचा क्वचितच विषय असत. आपल्याकडील भागवत धर्माच्या अलीकडील वारकऱ्यांसारखे, राजकारणापासून हे बौद्ध भिक्षू आणि त्यांचे विहार दूर असले तरी संकटकाळात आपलीच शिकवण सर्वांना तारणार आहे, असा एक सुप्त आत्मविश्वास या अनासक्त व्रतधारी संन्याशांपाशी सतत असे.

## भर रस्त्यातील आत्मदहन

या विश्वासाला दिएमच्या भ्रष्ट आणि जात्याभिमानी राजवटीने आव्हान दिल्याने हा भडका उडाला होता.

उपोषणासारखे आत्मक्लेशाचे मार्ग दिएम राजवटीवर परिणाम करू शकणार नाहीत हे लक्षात येताच बौद्ध संन्याशांनी एक अघोरी मार्ग पत्करण्याचे ठरविले. हा मार्ग आत्मदहनाचा होता! या दिव्याला सामोरे जाण्याचा मान थिक-क्वाँग-डक नावाच्या वृद्ध बौद्ध भिक्षूला लाभला.

सायगाव शहराच्या मध्यवर्ती चौकात जून १९६३ मध्ये एके दिवशी हे आत्मदहन पार पाडण्यात आले! या कार्यक्रमाची जाहिरात करण्यात आल्याने बौद्ध स्त्री-पुरुषांचा मोठा जमाव चौकात जमा झाला होता. या चौकासमोरच अमेरिकेची वकिलात होती. चौकातील रहदारी काही काळ थांबली. थिक-क्वाँग-डक याला घेऊन बौद्ध भिक्षू मोटारीने आले. थिक-क्वाँग-डक हा रस्त्याच्या मध्यभागी पद्मासन घालून बसला. त्याच्याबरोबर आलेल्या सहकाऱ्यांनी गॅसोलीनचे दोन डबे त्याच्या अंगावर ओतले. त्याची भगवी वस्त्रे गॅसोलीनने चिंब झाली. त्याचा चेहरा शांत होता. मृत्यूचे भय त्याच्या चेहऱ्यावर नव्हतेच. मुठीत धरलेल्या आगपेटीची काडी त्याने ओढली आणि स्वतःचे शरीर पेटवून दिले!

चारी अंगाने ज्वाला कि-क्वाँग-डक याच्या शरीराला बिलगू लागताच जवळच मांडलेल्या मायक्रोफोनमधून व्हिएतनामी व इंग्रजी भाषेत आळीपाळीने ‘डक चिरायू होतो! हुतात्मा डकचे आत्मदहन आम्ही फुकट जाऊ देणार नाही!!’ अशा घोषणा इतर बौद्ध भिक्षू देऊ लागले. व्हिएतनामी पोलिसांनी हस्तक्षेप करण्याचा प्रयत्न केला तो जमावाने विफल केला. हा प्रकार पाहण्यासाठी अमेरिकन वार्ताहर, छायाचित्रकार जमलेले होते. डकचा जळून कोळपलेला मृतदेह अखेर पद्मासन स्थितीतच ज्वाळात कोसळला. जमलेल्यांपैकी कुणीतरी पुढे होऊन त्याच्या काळजाचा एक लहानसा तुकडा एका बाटलीत काढून घेतला. अमेरिकेत आणि इतर देशात टेलीव्हिजनवर डकच्या काळजाचे दर्शन नंतर सर्वांना घडविण्यात आले!

थिक-क्वाँग-डक याचे आत्मदहन हे वैतागाचे निदर्शक नव्हते तर दिएम सरकारवर चढलेली सत्तेची धुंदी आणि सामान्य जनतेचे या शासनाविषयीचे वास्तव मत याच्यातील प्रचंड दरीचे हे दर्शन होते. बुद्धाचे पद्मासन घालून डक हा जेव्हा आत्मदहनाला बसला, तेव्हा त्याने व्हिएतनामी व अमेरिकेच्या जनतेला याची आठवण करून दिली, की राजकीय पद्धती आणि सांस्कृतिक संबंध यांच्याही अतीत असणारी माणुसकीची जबाबदारी, आणि त्यानुषंगाने येणारी नैतिक बंधने ही सर्वांच्या हितासाठी पाळायची असतात. ८ मे ला निःशस्त्र बौद्धांवर गोळ्या झाडून दिएम सरकारने ही नैतिक जबाबदारी पायदळी तुडविली होती.

डक याचे आत्मदहन हे तरुण रक्ताला केलेले आवाहन होते. हुए आणि सायगाव येथील विद्यार्थ्यांनी प्रचंड संख्येने निदर्शने केली. काही कॅथॉलिक विद्यार्थी हे जाहीररित्या बौद्ध झाले.

बौद्धांनी निर्माण केलेला असंतोष आणि सुरू केलेला प्रतिकार फार काळ अहिंसक राहू शकणार नव्हताच. डकच्या पाठोपाठ ८-९ जाहीर आत्मदहने झाली आणि यासाठी जमलेल्या संतप्त जमावावर पोलिस व लष्कर हल्ले करू लागताच, जमावानेही प्रतिकार सुरू केला. या चळवळीचा फायदा व्हिएत-मिन्ह भूमिगत सैनिक अथवा व्हिएटकाँगी यांनी उठवला नसता तरच नवल.

## हा तर तमाशा आहे!

बौद्धांच्या संतापात भर टाकणारे एक घाणेरडे वक्तव्य मादाम न्हू हिने केले. आत्मदहनाच्या प्रकाराला उद्देशून तिने म्हटले –

'भाजलेले मांस विकण्याचा हा तमाशा आहे!'

आपण बहुसंख्य असून आपल्याला दुय्यम दर्जाचे नागरिक म्हणून दिएम सरकार वागवते, हा बौद्धांचा समज मादाम न्हू हिच्या या सहानुभूतीशून्य वक्तव्याने अधिकच दृढ झाला.

जूनच्या मध्यापर्यंत हुए आणि सायगाव शहरात संघर्षाने उग्र स्वरूप धारण केले. याचे पडसाद सर्व व्हिएतनामभर उमटू लागले. सरकारी सैन्यतुकड्या सरहद्दीवर लष्करी हालचाली करण्याचे सोडून, या चळवळ्यांविरुद्धच शक्ती खर्च करू लागल्या. रस्तोरस्तीची निदर्शने बंद पाडणे, सरकारी इमारतींचे संरक्षण करणे, बौद्ध प्रार्थनामंदिरे आणि विहारांच्या झडत्या घेणे यासाठी बहुतांशी सैन्य वापरण्यात येऊ लागले.

दक्षिण व्हिएतनाममध्ये सुरू झालेल्या या यादवीमुळे अध्यक्ष केनेडी हैराण झाले. त्यांनी हा सर्व प्रकार दुर्दैवी असल्याचे सांगून हताशपणे उद्गार काढले – 'या सगळ्यांचे पर्यवसान होणार आहे तरी काय?'

अध्यक्ष केनेडींच्या या प्रश्नाला दक्षिण व्हिएतनाममधील अमेरिकेचे वकील नोल्टींग यांच्याजवळ काहीच उत्तर नव्हते. नोल्टींग यांच्या सांगण्याप्रमाणे दिएमच्या हातात आता फारसे काही राहिलेले नव्हते. त्याचा भाऊ न्हू आणि भावजय मादाम न्हू या दोघांनी दिएमला भरीस घालून बौद्धांची चळवळ लष्करी सामर्थ्याने चिरडून टाकण्याची तयारी सुरू केली होती. मोठ्या प्रमाणावर संशयितांची धरपकड सुरू झाली होती. रात्री अपरात्री बौद्धांच्या प्रार्थनामंदिरांवर सैनिक छापे घालीत होते. या सर्वांचा विपरीत परिणाम अमेरिकन जनमानसावर पडत होता. नोल्टींग हा दिएमबाबत निर्णायक हालचाल करू

शकत नव्हता अथवा अमेरिकेने करावी असे सुचवीतही नसल्याने अध्यक्ष केनेडी यांनी त्याला परत बोलविण्याचे ठरविले. त्याचे जागी दक्षिण व्हिएतनाममध्ये अमेरिकेचा वकील म्हणून एक पाताळयंत्री परंतु करारी मुत्सद्दी पाठविला गेला. या माणसाचे नाव हेन्री कॅबट लॉज.

## कॅबट लॉज आले

हेन्री कॅबट लॉज याचे फ्रेंच भाषेवर उत्तम प्रभुत्व होते. तो अमेरिकेतील रिपब्लिकन पक्षाचा अभिमानी होता आणि मुख्य म्हणजे त्याचा एक चुलता हा बौद्ध झालेला असल्याने बौद्धांच्या प्रश्नांची त्याला काही तोंड ओळखही होती.

नोल्टींग हा अमेरिकेला येण्यापूर्वी रजेवर गेला असतानाच हा बदल नक्की झाला होता. नोल्टींगच्या नजीकचा दुय्यम परराष्ट्रमंत्री विल्यम ट्रुहार्ट याने १२ जूनला दिएम याची भेट घेऊन देशातील बौद्धांचे समाधान करील अशा तऱ्हेने प्रश्न न सोडविल्यास त्याला अमेरिका यापुढे मदत करू शकणार नाही असा स्पष्ट इशारा दिला. व्हिएतनाममध्ये बौद्धांची चळवळ उग्र होत चाललेली पाहताच रजा रद्द करून नोल्टींग जुलै ६३ मध्ये वॉशिंग्टनला आला. नोल्टींग याने अध्यक्ष केनेडी यांना सल्ला दिला –

‘दिएमला सत्ताभ्रष्ट करण्याची घाई अमेरिकेने करू नये. दिएम गेला तर देशात धार्मिक यादवी माजेल. सत्ता लष्करी अधिकाऱ्यांच्या हातात जाईल आणि त्यानंतर जो सुंदोपसुंदी निर्माण होईल, त्याला अंत राहणार नाही. मी पुनः एकदा दिएमला समजवण्याचा प्रयत्न करतो –’

नोल्टींग याने वर्तवलेले दिएम गेला तर काय होईल हे भाकीत पुढे १०० टक्के खरे ठरले असले तरी दिएमला अधिक समजवण्यात अर्थ नव्हता. म्हणून अध्यक्ष केनेडी यांनी लॉज यांच्या नेमणुकीची तारीख फक्त महिनाभर पुढे ढकलली. ऑगस्टअखेर लॉज याने कामाची सूत्रे हाती घ्यावी असा निर्णय होऊन नोल्टींग सायगावला परतला.

१४ ऑगस्टला नोल्टींग याने दिएमची भेट घेतली. नोल्टींग याच्या दडपणाला यश आल्यासारखे वाटले. दिएम याने अभिवचन दिले की ‘समजुतीने सर्व गोष्टी घेण्याचेच माझे धोरण असते. बौद्धांच्या प्रश्नाकडेही मी याच भावनेने पाहतो आहे. लॉज याच्या नेमणुकीने आम्हाला आनंदच झाला आहे.’

१५ ऑगस्टच्या वृत्तपत्रातून हे अभिवचन प्रसिद्ध झाले. लॉज याच्या नेमणुकीमुळे दिएम व न्हू ही दुक्कल नाराज झाल्याच्या वावड्या उठल्या होत्या. त्याला उद्देशून हा खुलासा दिएमने केलेला होता. अर्थात हा खोटा होता. हे अभिवचनही झूट होते हे पुढील वर्तनावरून दिसून आलेच.

## प्रार्थना मंदिरातील रक्तपात

फक्त सहा दिवस मध्ये गेले. २१ ऑगस्टला पहाटे देशातील यच्चयावत् बौद्ध प्रार्थना मंदिरांवर पांढरी शिरस्त्राणे चढवलेल्या दक्षिण व्हिएतनामी विशेष सेनेने (Special Force) झडप घातली. जवळजवळ १४०० बौद्ध संन्याशांची धरपकड करण्यात येऊन अनेकांना ठार करण्यात आले, तर इतरांना मारझोड करण्यात आली. सायगावमध्ये दिएमच्या अध्यक्षीय प्रासादापासून केवळ शंभर फुटांवर असलेल्या 'झा-लोइ' या प्रमुख बौद्ध प्रार्थनामंदिरांवर सैनिकांनी छापा घालून जवळ जवळ ३० बौद्ध संन्याशांना गोळ्या घालून ठार केले आणि बाकीच्यांना पकडून नेले.

त्या अत्याचारामागे न्हू याचा हात होता. त्याने २२ ऑगस्टला सकाळपासून अमेरिकन वकिलातीचा फोन तोडून टाकला. न्हू याने असे भासवायला सुरुवात केली की सायगावचा गव्हर्नर जनरल दिन्ह याच्या सैनिकांनीच हे सर्व अत्याचार केले. वस्तुस्थिती तशी नव्हती! सेनेने हे अत्याचार केले ही गोष्ट खरी परंतु हे सैन्य म्हणजे न्हू याने आपल्या हाताखाली कम्युनिस्टांविरुद्ध गुप्त कारवायांसाठी घेतलेली खास पथके होती! हुकूम न्हू याने दिला होता. सेनाधिकाऱ्यांचा या भेकड हालचालींशी काही संबंध नव्हता.

२२ ऑगस्टलाच सकाळी म्हणजे ठरलेल्या दिवसाआधीच चार दिवस अमेरिकेचा नवा वकील कॅबट लॉज सायगावला पोचला. न्हू याने लॉज पोचण्यापूर्वीच आपले कृष्णकृत्य लपवण्यासाठी एक चतुर डाव टाकला. २२ ऑगस्टच्या मध्यरात्रीपासून दिएमच्या सहीने सर्व देशभर लष्करी कायदा जारी केल्याची घोषणा त्याने करून टाकली. यातला हेतू स्पष्ट होता. म्हणजे अत्याचार झाले ते सेनेनेच केले असा लोकांचा वहीम कायम व्हावा यासाठी सर्व देशच त्याने लष्करी अधिकाऱ्यांच्या ताब्यात देऊन टाकला.

अमेरिकन वकिलातीला २१ ऑगस्टचे छापे अथवा २२ तारखेपासून जारी होणारा लष्करी कायदा याची काहीच पूर्वसूचना नव्हती. यामुळे अमेरिकेच्या वकिलातीला सर्वात जास्त धक्का बसला. पूर्वसूचना नव्हती इतकेच नाही तर फोन कापून टाकण्यात येऊन अमेरिकेच्या प्रतिनिधीला अंधारात ठेवून न्हू याने कारस्थान उरकल्याने कॅबट लॉज स्तिमित होता.

या घोर अपमानाची प्रतिक्रिया लगेचच लॉज याने सुरू केली.

जी सैन्यपथके भूमिगत कम्युनिस्ट सैनिकांशी लढण्यासाठी अमेरिकेने खास हेरगिरीचे शिक्षण देऊन गेली काही वर्षे तयार केली होती आणि अमेरिकेच्या गुप्तहेर खात्याचा सायगावमधील प्रमुख रिचर्डसन याने न्हू याचेवर विश्वास ठेवून ज्या पथकांचे नेतृत्व त्याच्याकडेच दिले होते, त्या पथकाचा भयानक उपयोग न्हू याने आपल्या देशबांधवांवर केलेला होता. या पथकातील सैनिकांनी छत्रीधारी सैनिकांचे पोषाख अंगावर चढवून असा

आभास निर्माण केला, की दक्षिण व्हिएतनामचे सेनाधिकारी हे अत्याचार घडवीत आहेत. यामुळे प्रथम वॉशिंग्टनला ज्या तारा गेल्या, त्यात या अत्याचारांचे खापर दक्षिण व्हिएतनामी सेनेवरच फोडलेले होते. होनोलुलू येथे पूर्वरजेवर असलेल्या लॉज याला तार देण्यात आली की त्याने टाकोटाक सायगावला जावे – आणि म्हणून तो २२ ऑगस्टलाच सायगावला पोचला होता.

लॉज हा स्वतःच सायगावला आल्यामुळे नेमकी परिस्थिती काय आहे याचा उलगडा व्हायला लगेचच सुरुवात झाली. अमेरिकेचे गुप्त हस्तक सेनाधिकाऱ्यांना भेटले. दक्षिण व्हिएतनामचा चीफ ऑफ स्टाफ, मेजर जनरल डॉन याने खुलासा केला –

> 'व्हॉईस ऑफ अमेरिका झाल्या प्रकाराचा दोष आम्हाला देते आहे ते चूक आहे. आम्हाला मदत करण्याच्या दृष्टीने अमेरिकेने हा प्रचार थांबवावा. दक्षिण व्हिएतनामच्या अंतर्गत व्यवहारात अमेरिका यापुढे काय भूमिका घेणार आहे ते स्पष्ट झाल्याखेरीज आम्हाला पुढचे पाऊल उचलता येणार नाही!'

जनरल किम याने अधिक स्पष्ट सांगितले –

> 'न्हू हा काय करू शकतो हे या प्रकारावरून लक्षात येईल. न्हू आणि मादाम न्हू यांना दूर करण्याबाबत अमेरिकेचा पाठिंबा मिळाला तर सैन्यात एकोपा होऊन दोघांनाही दूर करता येईल.'

दिएमचा संरक्षणमंत्री थुआँ याने अमेरिकेच्या वकिलातीला कळवले – 'न्हू याने जे केले त्याला पाठिंबा देण्याची चूक अमेरिकेने करू नये.'

दिएम, न्हू, मादाम न्हू ही त्रयी एका बाजूला आणि सेनाधिकारी दुसऱ्या बाजूला अशी जबरदस्त फूट पडत चालल्याची ही सर्व वक्तव्ये पूर्वचिन्हे होती.

## कट शिजू लागला

सायगावमध्ये पाऊल ठेवल्यापासून ४८ तास संपण्याच्या आत लॉज यांनी वॉशिंग्टनच्या स्टेट डिपार्टमेंटला गुप्त सूचना पाठविली –

> 'इथे सतत बदल होणार आहेत अशी दाट वदंता आहे. परंतु सायगाव स्थित लष्करी जनरल हे अजून नगो बंधूंनाच अनुकूल आहेत. आताच आपण काही करणे म्हणजे अंधारात उडी मारण्यासारखे होईल.'

२४ ऑगस्ट ६३. शनिवार होता. न कर्त्याचा वार. परंतु व्हिएतनामबाबत महत्त्वाचा निर्णय वॉशिंग्टनने याच दिवशी केला. जे काही केले गेले त्याबद्दल पुढे वादंग माजले.

अध्यक्ष केनेडींना दोष दिला गेला. स्टेट डिपार्टमेंटमध्ये कार्यकारी चिटणीस जॉर्ज बॉल यांच्या सहीने अमेरिकेचे वकील कॅबट लॉज यांना पुढील गुप्त संदेश धाडला गेला –

'या परिस्थितीत न्हू याचे हाती सर्व सत्ता राहील अशी परिस्थिती अमेरिका सहन करू शकणार नाही. दिएमला, न्हू याला आणि त्याच्या हस्तकांना दूर करण्याची संधी देऊन पाहा; जर दिएम हा अडाणीपणाने आपलाच हट्ट धरू पाहील तर दिएम हाच जाग्यावर राहू शकणार नाही, या शक्यतेला आपल्याला सामोरे गेले पाहिजे. न्हू याने आपले आसन स्थिर करण्यापूर्वीच आपण पावले उचलावयाची आहेत. तेव्हा जनरल हार्किन्स (मॅकव्ही संघटनेचा प्रमुख) यांच्याशी विचारविनिमय करून आणि सर्व संभाव्य आक्षेपांचा विचार करून तुम्हाला पुढील निर्देशानुसार पावले टाकण्याची परवानगी आहे –

अ) दक्षिण व्हिएतनाम सरकारला हे स्पष्ट करा की बौद्धांच्यावर मार्शल लॉ च्या आड दडून न्हू व त्याच्या साथीदारांनी जो हल्ला केला तो आम्हाला मंजूर नाही.

ब) नाट्यपूर्णरितीने जे काही घडले त्याचे परिमार्जन झाले पाहिजे. मार्शल लॉ रद्द करावा. पकडलेल्या बौद्ध संन्याशांची त्वरित मुक्तता करावी.

'एकीकडे हे करीत असतानाच मोक्याच्या अधिकारावरील लष्करी अधिकाऱ्यांना आपण याची कल्पना द्यावी की वरील अटी पुऱ्या झाल्याशिवाय दक्षिण व्हिएतनाम सरकारला आर्थिक वा लष्करी मदत यापुढे अमेरिकेला करता येणार नाही. काही पावले उचलणे भाग आहे, आणि पहिले पाऊल म्हणजे न्हू याला दूर करणे. दिएम याला ही संधी देण्याची आमची इच्छा आहे परंतु तो ताठ राहील तर त्यातून निर्माण होणारा पर्याय म्हणजे यापुढे दिएमला आमचा पाठिंबा राहणार नाही. तुम्ही योग्य त्या लष्करी अधिकाऱ्यांना असे आश्वासन देऊ शकता की जर शासन कोलमडले तर मधल्या अस्थिर काळात आम्ही लष्करी पुढाऱ्यांना सरळ पाठिंबा देऊ.

'दिएमच्या जागी कुणाकडे नेतृत्व देता येईल असा योग्य माणसाचा विचारही करायला हरकत नाही. वॉशिंग्टनहून बारीक सारीक सूचना तुम्हाला वरचेवर देणे मुष्कील आहे. परंतु तुम्ही खात्री बाळगावी की कळवल्या सूत्रांनुसार तुम्ही जे काही कराल त्या यच्चयावत गोष्टींना इथून पाठिंबा असेल. या संदेशातील मजकूर गुप्त राखावा हे निराळे सांगायला नकोच.'

दिएमला सत्तेवरून हुसकवण्यासाठी कट रचण्यापासून तो कट कार्यवाहीत आणीपर्यंत, अमेरिकन वकील जे जे करील त्याला आगाऊच पाठिंबा देणारे हे स्टेट डिपार्टमेंटचे पत्र 'पेंटॅगॉन पेपर्स' या खळबळजनक कागदपत्रात आता उपलब्ध आहे. या पत्राचा मजकूर तयार करण्यात त्यावेळचे स्टेट डिपार्टमेंटचे सहाय्यक चिटणीस ॲव्हरेल हॅरीमन यांचाही हात होता. गमतीची गोष्ट अशी की या दिवशी म्हणजे हा संदेश धाडला

त्यादिवशी २४ ऑगस्ट १९६३ ला अध्यक्ष केनेडी हे साप्ताहिक विश्रांतीसाठी हायनीस्पोर्ट येथे गेलेले होते. सेक्रेटरी ऑफ स्टेट डीन रस्क हे न्यूयॉर्कला होते आणि संरक्षणमंत्री मॅकनामारा वॉशिंग्टनबाहेर रजेवर गेलेले होते. यातील मजकुरासंबंधी पेंटॅगॉनचे एक अधिकारी जनरल मॅकस्वेल टेलर यांच्याच मनात काय ती पाल चुकचुकली. परंतु या संदेशाच्या प्रती अध्यक्ष केनेडी व डीन रस्क यांना गेलेल्या पाहून ते देखील स्वस्थ बसले.

सायगावला २५ ऑगस्टला म्हणजे रविवारी दुपारी हा गुप्त संदेश कॅबट लॉज यांना मिळाला. त्यांनी लगेच ‘मॅकव्ही’ प्रमुख जनरल हार्किन्स व गुप्त हेरखात्याचे प्रमुख रिचर्डसन यांना वकिलातीत बोलावून घेतले.

दिएम याला सत्तेवरून दूर करण्याचा कट शिजायला सुरुवात झाली होती!

n

# १८ : दिएम व न्हू यांची हत्या!

अध्यक्ष दिएम व न्हू यांना सत्तेवरून उडवण्याचा कटाचा जो विचार अमेरिकेच्या सायगाव येथील वकिलातीत २४ ऑगस्ट १९६३ या दिवशी सायंकाळी सुरू झाला, त्यातले मुख्य सूत्र हे होते की कटात अमेरिकेचा हात कुठेही दिसता कामा नये, ओळखू येता कामा नये. इतकेच नव्हे तर अमेरिकेच्याच प्रेरणेने हे कारस्थान झाले असा संशय देखील पसरता कामा नये.

अर्थात एक गोष्ट निश्चित झाली की अमेरिकेचा वकील कॅबट लॉज अथवा सायगाव स्थित 'मॅकव्ही' या अमेरिकेच्या लष्करी संघटनेचा प्रमुख जनरल हार्किन्स अथवा गुप्त माहिती खात्याचा प्रमुख रिचर्डसन यापैकी कोणीही दक्षिण व्हिएतनामी सेनाधिकाऱ्यांशी, प्रत्यक्ष बोलणार नाही. मग बोलणी करायची कुणी? एक नाव सर्वांच्या डोळ्यासमोर आले, ते म्हणजे कर्नल लुसे कॉनेईन यांचे. अमेरिकेची C.I.A. गुप्तहेर संघटना ज्यातून निर्माण झाली त्याची आद्य संस्था 'स्ट्रॅटिजिक सर्व्हिसेस्' ही दुसऱ्या महायुद्धकाळात काम करीत असे. त्या संघटनेच्या कामासाठी १९४४ साली हा कर्नल कॉनेईन पॅराशूटचे व्हिएतनाममध्ये उतरला. जपान्यांशी लढणाऱ्या दक्षिण व्हिएतनामी सैनिकांशी त्याचे स्नेहसंबंध होते आणि आता वीस वर्षानंतर त्यातले काही लष्करात सर्व अधिकाराच्या जागा भूषवीत होते. तेव्हा कर्नल कॉनेईन हा या अधिकाऱ्यांचा मित्र म्हणून त्यांच्याशी संपर्कात असलेला होता. त्याचे नाव पुढे येईल किंवा संशय येईल अशी शक्यता नव्हती.

दक्षिण व्हिएतनामी सेनेचा जो कट दिएमविरुद्ध उभा राहिला, त्याचा एक प्रमुख सूत्रधार दक्षिण व्हिएतनामी जनरल डॉन याचा कर्नल कॉनेईन हा जिगरी दोस्त होता. सेनाधिकाऱ्यांची दिएम व न्हू विरुद्धची पहिली तीव्र प्रतिक्रिया अमेरिकेच्या वकिलातीपर्यंत पोचली ती कर्नल कॉनेईन मार्फतच. तेव्हा २४ तारखेच्या वकिलातीत बैठकीत जे महत्त्वाचे निर्णय घेण्यात आले ते कॉनेईन यानेच दक्षिण व्हिएतनामी सेनानींच्या कानावर आवश्यक ते सर्व घालावे असे कॅबट लॉज यांनी ठरवले.

कर्नल कॉनेईन याने कटवाल्या दक्षिण व्हिएतनामी सेनानींना २६ ऑगस्टला कळवले – 'सत्ता हिसकण्याची प्रत्यक्ष कृती घडेल तेव्हा आम्हाला मदत करता येईलच असे नाही. यश येवो अथवा अपयश येवो, ही सर्व कृती व्हिएतनामी लष्करी अधिकाऱ्यांचीच राहील. आमची इच्छा मात्र अशी आहे की रक्तपात कमीत कमी व्हावा....'

तिकडे वॉशिंग्टनला २५ ऑगस्ट व २६ ऑगस्टला अध्यक्ष केनेडी यांनी दोन बैठका घेतल्या. या बैठकींना संरक्षण सचिव मॅकनामारा सहाय्यक सचिव हिल्शमन व मॅककोन

आणि पेंटॅगॉनचे वतीने जनरल टेलर हजर होते. सायगावचे पूर्वीचे वकील नोल्टींग यांनाही बोलावलेले होते. हे सर्वचजण सायगावला, लॉज जे करू पाहत होते त्याबद्दल साशंक होते, विरोधी होते.

भूतपूर्व वकील नोल्टींग याने सांगितले.

'अध्यक्ष दिएम याला न्हू पासून वेगळा करणे शक्य नाही. दुसरी गोष्ट सेनाधिकाऱ्यांनाही देशाचे नेतृत्व करणे जमणार नाही!'

इतर सर्वांनी तर लॉज याच्या दक्षिण व्हिएतनामच्या सेनाधिकाऱ्यांना हाताशी धरून, दिएम, न्हू यांना दूर करण्याच्या कटाच्या यशाबद्दल जबर संशय व्यक्त केला. अमेरिकेचा अध्यक्ष हा कर्तुमकर्तुम अधिकारी असला तरी तो प्रायशः सल्लागारांच्या सल्ल्यानुसार निर्णय करतो अशी रीत आहे. सर्व प्रमुख सल्लागार हे संशय व्यक्त करीत राहिल्याने अध्यक्ष केनेडी पेचात आले. पुनः सायगावला गुप्त संदेश गेला की 'कटाचा अधिक तपशील कळवा!'

इकडे सायगावला अमेरिकेच्या वकिलातीत खात्रीलायक माहिती आणली, की कट पुढे गेलेला असून कटाचा प्रमुख सूत्रधार हा अध्यक्ष दिएम याचा लष्करी सल्लागार लेफ्टनंट जनरल मिन्ह हा स्वतःच आहे! आणि त्याला दक्षिण व्हिएतनामी सेनेत खूपच लोकप्रियता आहे. या कटात मेजर जनरल कान्ह हा सायगावच्या उत्तरेकडे असलेल्या सेनादलाचा प्रमुख, त्याचप्रमाणे कर्नल थिऊ हा त्याच सेनादलाचा अधिकारी हे सामील झालेले आहेत. कॅबट लॉज यांना कट यशस्वी होणार याची मनस्वी खात्री वाटू लागली.

सी. आय. ए. प्रमुख रिचर्डसन याने देखील लॉज यांच्याच मताला पुष्टी देणारा गुप्त संदेश पाठवला. कारण कर्नल कॉनेईनमार्फतच सर्व तपशील वकिलातीकडे गेला होता. मग पुनश्च थोडा घोटाळा केला तो मॅकव्ही – प्रमुख जनरल हार्किन्स याने. त्याने गोलमाल पाठिंबा अध्यक्ष केनेडींकडे व्यक्त केला. तो असा –

> 'अमेरिकेने कटवाल्यांना पाठिंबा देण्यात त्यांचा काहीच फायदा नाही. अर्थात अमेरिकेने शब्द दिल्याखेरीज कटवाले काही करतीलसे वाटत नाही. मात्र कॅबट लॉज यांना पूर्वसूचनांनुसार काहीही करायला माझा विरोध राहणार नाही.'

## कटवाल्यांना संशय आला

वॉशिंग्टनला स्टेट डिपार्टमेंटमध्ये आता रण माजले! अध्यक्ष मात्र कॅबट लॉजच्या कर्तबगारीवरच जास्त विश्वास टाकून होते. सायगावला दक्षिण व्हिएतनामी सेनाधिकारी आता अस्वस्थ होत चालले. आतापर्यंत दिएमशी एकनिष्ठ राहा म्हणून आग्रह करणारे अमेरिकन, कटाच्या कारस्थानात शेवटच्या क्षणाला दगा तर देणार नाहीत असा संशय

त्यांना येऊ लागला. तेव्हा दिएमपासून अमेरिका दूर झाल्याचा पुरावा हवा! तो मिळाल्यानंतर पुढे पाहू असे त्यांनी ठरवले व या दृष्टीने कटाचा प्रमुख सूत्रधार जनरल मिन्ह याने स्वतःच २९ ऑगस्टला कर्नल कॉनेईनला प्रश्न केले –

'तुम्ही आपला दगा देणार नाही याचा पुरावा काय?'

कर्नल कॉनेईनला काही सांगता येईना. तेव्हा जनरल मिन्ह याने सुचवले,

'दिएमला तुम्ही जी आर्थिक मदत देता आणि ज्याच्या जोरावर त्याने 'स्पेशल फोर्स' म्हणून स्वतंत्र सेनापथके सांभाळली आहेत, (ज्या पथकांनी अत्याचार केले) तो सर्व पैसा अमेरिकेने ताबडतोब बंद करावा.'

कर्नल कॉनेईनने सांगितले की, 'आर्थिक मदत बंद करण्यासंबंधी कॅबट लॉजमार्फत प्रयत्न करू. परंतु त्याला थोडा वेळ लागेल. असे असले तरी तुमच्या कटाची रचना आणि योजना यात सहकार्य देण्याच्या सूचना जर आम्ही मिळवल्या तरी तुमचा संशयनिरस व्हायला हवा.'

'सी. आय. ए. ला कॅबट लॉज यांनी कटाच्या सिद्धतेत तांत्रिक मदत करायला परवानगी दिली. कॅबट लॉज यांनी लगेच केनेडी यांना गुप्त तार दिली –

'आपण आता जो मार्ग पत्करला आहे त्यापासून परावृत्त होणे शक्य नाही. हा मार्ग आहे दिएम याच्या पदच्युतीचा. आता अमेरिकेला मागे हटता येणार नाही इतके आम्ही पुढे गेलो आहोत.'

याक्षणी म्हणजे २८-२९ ऑगस्टच्या सुमारास जनरल हार्किन्स याने मात्र संदेश दिला –

'पुनः एकदा दिएम याला संधी देऊन पाहू, सांगून समजावून पाहू असे माझे मत आहे.'

वॉशिंग्टनला दोन तट पडले. केनेडी वगळता जवळजवळ सर्व प्रमुख सल्लागार हेका धरून बसले की जनरल हार्किन्स याच्या संमतीखेरीज कॅबट लॉज यांनी काहीही करता कामा नये. शेवटी केनेडी यांनी कॅबट लॉज यांना कळवले –

'जर कट यशस्वी होण्याची शक्यता असेल तर आमचा त्याला पाठिंबा राहील. फक्त यात अमेरिकन सैनिकांनी प्रत्यक्ष भाग घेऊ नये. हार्किन्स यांनी कटवाल्यांना हे कळवावे.'

याच संदेशात कॅबट लॉज यांनी आणखी अधिकार दिले गेले ते असे –

'दिएम याची आर्थिक मदत बंद करण्याचा निर्णय आवश्यक वाटेल त्याक्षणी कॅबट लॉज यांनीच घ्यावा.'

## मुहूर्त पुढे गेला

इतके सगळे होते न होते तोच कटवाल्यांनी हातपाय गाळले! जनरल हार्किन्स यांनी कटवाल्या सेनानींशी बोलणे केल्यानंतर बातमी आणली की जनरल मिन्ह याने प्रत्यक्ष कृतीचा विचार तूर्त पुढे ढकलला आहे.

'३१ ऑगस्टला कॅबट लॉज यांनी अध्यक्ष केनेडी यांना कळवले की तूर्त तरी कटाचे ऑफस झाले आहे.'

ऑगस्ट ६३ अखेर अध्यक्ष केनेडी यांना कुणी विचारले असते की, सायगावची परिस्थिती कशी काय आहे? तर त्यांनी म्हटले असते – तिथे काय चालू आहे हे या क्षणाला मलादेखील ठाऊक नाही! म्हणूनच २ सप्टेंबर १९६३ ला टी.व्ही.वर बोलताना केनेडी एवढेच म्हणाले –

'बौद्धांवर सायगाव सरकारने चालवलेली दडपशाही आम्हाला मंजूर नाही. दक्षिण व्हिएतनाम सरकारने लोकांचा हरवलेला विश्वास परत मिळवला पाहिजे. नाहीतर तेथील युद्ध जिंकताच येणार नाही. दक्षिण व्हिएतनाम सरकारची धोरणे आणि संबंधित व्यक्ती यांच्यात बदल करण्याखेरीज यश शक्य नाही!'

'संबंधित व्यक्ती' म्हणजे नेमके कोण? कुणाची हकालपट्टी अध्यक्ष केनेडी यांना अंतिम यशासाठी हवी होती? याचा स्पष्ट निर्देश अध्यक्षांनी टाळला.

## सचिवालयातले सांगकामे

केनेडी यांच्या सचिवालयाने दोन अधिकारी तिथली बातमी आणण्यासाठी ताबडतोब सायगावला पाठवले. दोघे चार दिवसात परत आले व त्यांनी आपापले स्वतंत्र अहवाल अध्यक्षांकडे दिले. अध्यक्ष केनेडी यांनी कपाळाला हात लावला! अहवाल इतके परस्परविरोधी होते की अध्यक्षांनी दोघांना बोलावून विचारले.

'आपण दोघे एकाच देशाला गेला होता ना? अहवालावरून तसे दिसत नाही!'

अध्यक्ष केनेडी यांनी २३ सप्टेंबरला आदेश दिला की संरक्षण सेक्रेटरी मॅकनामारा व जनरल टेलर या दोघांनी सायगावला जाऊन अहवाल आणावा. २९ सप्टेंबरला मॅकनामारा यांनी दिएम यांची भेट घेतली. परंतु या भेटीत त्याने न्हू याला अधिकारावरून दूर करावे यासंबंधी म्हणे आग्रहच धरला नाही! का? बहुधा कॅबट लॉज यांचेशी त्याची असलेली स्पर्धा यामागे असेल.

मॅकनामारा-टेलर ही जोडगोळी परत आली. त्यांच्या अहवालात दक्षिण व्हिएतनाममधील युद्ध प्रयत्नात दिएम, न्हू यांचेमुळे खीळ पडण्याचा तर उल्लेख नव्हताच, उलट शेवटी म्हटले होते –

'दोन वर्षांनी म्हणजे १९६५ अखेर दक्षिण व्हिएतनाममधील अमेरिकेचे लष्करी उद्दिष्ट पूर्ण झालेले असेल. १९६३ अखेर सुमारे १००० अमेरिकन सैनिकांना परत बोलवायला हरकत नाही.'

अमेरिकन वृत्तपत्रांनी या अहवालाला जोरदार प्रसिद्धी दिली. 'न्यूयॉर्क टाइम्स' ने ३ ऑक्टोबरच्या अंकात मोठा मथळा दिला –

'१९६५ अखेर व्हिएतनाम लढाईत यश मिळणार!'

## केनेडीनी अट पुरी केली

याच अहवालात दक्षिण व्हिएतनामची राजकीय परिस्थिती असमाधानाकरक असल्याचे जे म्हटले होते, त्याकडे कुणी फारसे लक्ष दिले नाही. तिथे परिस्थिती स्फोटक आहे असे स्पष्टपणे मॅकनामारा-टेलर यांनीही म्हटले होते. या सर्व कालखंडात केनेडी यांचा कॅबट लॉज यांच्यावर अढळ विश्वास राहिला हे आश्चर्य म्हटले पाहिजे. कारण दिएमवर आर्थिक दबाव आणावा ही जी कटवाल्यांची अपेक्षा व्यक्त केली होती, ती त्यांनी याच महिन्यात पुरी केली.

१४ सप्टेंबरलाच केनेडी यांनी कॅबट-लॉज यांना कळवले –

'दक्षिण व्हिएतनाममधील व्यापारी वर्गाला १८.५ मिलियन डॉलर इतक्या किंमतीच्या वस्तूंची आयात करण्याची जी नवी सवलत द्यायची आहे, ती मी रोखून धरली आहे.'

न्हू याला यावेळी आपल्याविरुद्ध वॉशिंग्टनला काहीतरी शिजत असल्याची चाहूल लागलेली असावी. कारण त्याने मादाम न्हू हिला अमेरिकेच्या सदिच्छा दौऱ्यावर रवाना केले ते याच सुमारास. मादाम न्हू ही मूळची बौद्धधर्मीय. न्हू याचेशी लग्न करताना ती कॅथॉलिक झाली. १९५६ साली ती दक्षिण व्हिएतनामच्या विधी मंडळात निवडून आली. तिला फ्रेंच व इंग्लिश या भाषा उत्तम अवगत होत्या. दिएम हा अविवाहित राहिल्याने राष्ट्राच्या अध्यक्षाच्या बायकोचा सर्व दिमाख या त्याच्या वहिनीच्या वाट्याला आला. तिने एक महिला सभा स्थापन केली होती व स्त्रियांच्या चळवळी ती करत असे. बाई एकंदरीत चलाख होती. मादाम न्हू चा चेहरामोहरा गोंडस. यामुळे अमेरिकेत पोचताच छायाचित्रकारांनी तिला वृत्तपत्रातून झळाळी चढवली. राजकीय सभा, महिला क्लब, टेलिव्हिजन या सर्व माध्यमातून मादाम न्हू हिचा परिचय अमेरिकेच्या जनतेला घडू लागला. बाई हुषार असली तरी आढ्यतेखोर व स्वतःचे स्थान ओळखून न वागणारी अशी अननुभवी ठरली. सदिच्छा निर्माण होण्याचा प्रसंगच आला नाही! या दौऱ्यावर असल्याने तिला मिळाला तो फायदा म्हणजे अध्यक्ष दिएम व तिचा नवरा न्हू, यांचे जेव्हा सायगावला खून पडले तेव्हा ही बया वाचली.

ऑक्टोबर महिना उजाडला आणि ८ ऑक्टोबरला सायगावच्या मार्केटमध्ये आणखी एका बौद्ध संन्याशाने आत्मदहन करून घेतले. त्याच दिवशी अध्यक्ष केनेडी यांनी दिएम सरकारला देण्यात येणाऱ्या सर्व आर्थिक सवलती गोठवण्याचा निर्णय घेतला. त्यांनी उचललेल्या या निर्णायक पावलानुसार सायगावला पाणीपुरवठा योजना व पॉवर हाऊससाठी देऊ केलेली प्रचंड रक्कम मागे घेण्यात आली. न्हू याच्या व्यक्तिगत सेवेसाठी राबणाऱ्या 'स्पेशल फोर्स' या पथकातील सैनिकांचा पगार यापुढे अमेरिका देणार नाही' असे दिएमला कळवण्यात येणार होते. जर ही सर्व पथके दक्षिण व्हिएतनामी सेनाधिकाऱ्यांच्या हाताखाली दिली तरच त्याच्यावरील खर्च अमेरिका करील अशी पुष्टी अर्थात या हालचालीला जोडलेली होती.

## कटात अमेरिका होती की नव्हती?

ज्या सेनाधिकाऱ्यांनी कटाला अमेरिकन दगा देणार नाही म्हणून दिएमची आर्थिक मदत अमेरिकेने बंद करावी असे कर्नल कॉनेईन याच्यामार्फत सुचवले होते, 'त्यांना हिरवा कंदील' दाखवण्यासाठीच केनेडी यांनी आर्थिक कपात मान्य केली असे काहीजण म्हणतात आणि त्यात तथ्य दिसते. कारण ही कपात करण्याचा निर्णय सायगावच्या अमेरिकन वकिलातीत कळून की तास उलटण्याच्या आतच कर्नल कॉनेईन हा जनरल मिन्ह याच्या भेटीला त्याच्या कचेरीत गेला. दोघे ७० मिनिटे खलबते करीत होते. दोघे फ्रेंचमधून बोलत होते.

जनरल मिन्ह याने सांगितले, 'मला व्यक्तिशः राजकीय महत्त्वाकांक्षा नाही. परंतु सर्व सेनाधिकाऱ्यांचे म्हणणे आहे की सरकार बदलण्याखेरीज युद्धप्रयत्न सफल होणार नाहीत. आम्हाला अमेरिकेची प्रत्यक्ष कटाच्या कार्यवाहीत मदत नकोच आहे. दोन पर्याय आमचेसमोर आहेत. एक म्हणजे दिएम यालाच अध्यक्ष ठेवायचा, परंतु त्याचे दोन बंधू न्हू व नगो दिन्ह कॅन हा आज व्हिएतनाममध्ये हुए येथे फार माजला आहे. या दोघांना यमसदनाला धाडायचे किंवा सरळ सायगावचाच कब्जा करायचा. तिथे दिएमशी इमान असलेलं ४-५ हजारच सैन्य आहे.'

कर्नल कॉनेईन-लॉज बोलणे झाल्यानंतर कॉनेईन याने कटवाल्यांना १० ऑक्टोबरला कळवले की 'कटाशी अमेरिकेचा संबंध नव्हता असे वेळ पडल्यास जाहीर करण्यास प्रत्यवाय राहू नये, अशा पद्धतीनेच या कटाला अमेरिकेचा पाठिंबा राहील.'

१८ ऑक्टोबरला जनरल हार्किन्स याने दिएम याला कळवले की यापुढे 'स्पेशल फोर्स'चा पगार अमेरिका देणार नाही. ही पथके बहुतांशी दिएम व न्हू यांच्या निवासाच्या रक्षणासाठीच असल्याने मोठीच गडबड झाली. कटवाल्यांना हा निर्णायक पुरावा मिळाला की अमेरिकाही आपल्या कटात असल्यासारखीच वागू लागली आहे!

मोठ्या उत्साहाने जनरल डॉन हा कटाचा एक प्रमुख सूत्रधार जनरल हार्किन्स याला कचेरीच भेटायला गेला. तो जेव्हा 'कट २६ तारखेला उरकण्याचे ठरले आहे' वगैरे सांगू लागला, तेव्हा जनरल हार्किन्स याने त्याला याबद्दल न बोलण्यास सांगितले. डॉन याला संशय आला की बहुधा जनरल हार्किन्स हा कटाला विरुद्ध आहे व तो कटाची हकीगत दिएमच्या कानावर घालणारच! घोटाळा झाला. बिथरलेला जनरल डॉन हा कर्नल कॉनेईनला भेटला व घडलेला प्रकार त्याने कॉनेइनमार्फत कॅबट लॉज यांना कळवला. कॅबट लॉज यांनी जनरल हार्किन्स यांना सूचना दिली की त्यांनी जनरल डॉन याचा गैरसमज दूर करावा. याप्रमाणे जनरल हार्किन्स यांनी डॉन याला कळवले की 'माझ्या म्हणण्याचा अर्थ इतकाच होता की कटात आम्हाला उद्या कुणी गोवेल असा पुरावा उपलब्ध करू नका!'

वॉशिंग्टनच्या पाताळयंत्री राज्यकर्त्यांची अशी इच्छा होती की कटाचे सूत्रचालन कॅबट लॉज यांनी एकट्यानेच काय ते करावे, जनरल हार्किन्स यांना त्यात गुंतवू नये व या धोरणानुसार जनरल हार्किन्स यांनी डॉन याला धुडकावले होते. परंतु यामुळे कॅबट लॉज व हार्किन्स यांच्यात उगाचच गैरसमज पसरले. कटवाल्यांनी यानंतर हार्किन्स याचेशी कसलाही संबंध न ठेवण्याचे ठरवले.

## सावध झालेला अखेर चुकला

कटवाले समजत होते तेवढा मात्र न्हू हा गाफील नव्हता! सेनाधिकाऱ्यात चलबिचल सुरू झाली आहे हे त्याने हेरले व दिएमचा लष्करी सल्लागार जनरल दिन्ह (जो स्वतः कटात सामील होता) याला बोलावून न्हू याने सांगितले –

'काही कट रचला जातो आहे. यात जे सामील आहेत त्यांना पकडण्यासाठी एक खोटाच बनाव घडवा. कट कारवाई सुरू झाली असे भासवा म्हणजे कटवाले भराभर बाहेर येतील. सर्वांना अटक करून फासावर लटकवू.'

जनरल दिन्ह मनात हसला. त्याने 'होय' म्हटले व न्हू याच्या निवासाबाहेर येताच कटवाल्यांना निरोप दिला. 'न्हू हा सावध झाला आहे. काम लवकर उरका!'

न्हू याने दिएमलाही सावध केले. या कटवाल्यांना कॅबट लॉज सामील आहे किंवा काय याचा अंदाज घेण्यासाठी अध्यक्ष दिएम याने २७ ऑक्टोबरला रविवारी कॅबट लॉज यांना आपल्या दलात येथील डोंगरावरील थंड निवासात भोजनाला निमंत्रण दिले. कॅबट लॉज तसे माणसे खेळवलेले तयार गडी होते. त्यांनी भोजनाचे निमंत्रण मोठ्या आनंदाने स्वीकारले. दिएम अधिकारावरून उडवला जाण्यापूर्वी चार दिवसच अमेरिकेचा वकील त्याचेबरोबर जेवायला होता, ही घटना अमेरिकेचा कटाशी काडीचा संबंध नव्हता हे सांगायला केवढा तरी आधार होणार होती!

## अखेरचे भोजन

दिक्षिण २७ ऑक्टोबरला हेन्री कॅबट लॉज हे दिएमबरोबर भोजनासाठी बसले. हस्तांदोलन होऊन स्वागत केल्यापासूनच बोलणी सुरू झाली. दिएम याने विचारले –

‘आमची आर्थिक मदत अमेरिकन सरकारने का बंद केली?’

लॉज याने प्रतिप्रश्न केला – ‘पकडलेल्या बौद्धांची सुटका आपण अजून का केली नाही? विद्यार्थी रोज निदर्शने करीत आहेत, शाळा बंद पडल्या आहेत. हे सर्व कधी बदलणार?’

दिएम याने सटरफटर कारणे पुढे केली, तेव्हा लॉज यांनी अखेर दिएम याला म्हटले –

‘मिस्टर प्रेसिडेंट, मी केलेली प्रत्येक सूचना आपण धुडकावली आहे. अशी एकही गोष्ट आपल्या अधिकारात नाही का की जी करून आपण अमेरिकेतील लोकमतावर अनुकूल परिणाम घडवू शकाल?’

दिएम काही बोलला नाही. शून्यपणे अमेरिकन वकीलाकडे पाहत राहिला. दुसऱ्या दिवशी सकाळी अमेरिकेच्या मदतीतून उभ्या झालेल्या एका वास्तूचा सायगावमध्ये उद्घाटन समारंभ होता. अध्यक्ष दिएमबरोबर लॉज या समारंभासाठी आले होते. तेथे त्यांना एका बाजूला घेऊन जनरल डॉन याने विचारले –

‘मिस्टर लॉज, कर्नल कॉनेईन याला तुमच्या वतीने बोलण्याचा अधिकार आहे ना?’

लॉज यांनी मानेने संमती दर्शविताच जनरल डॉन याने सांगितले –

‘सेनाधिकाऱ्यांची तयारी चालू आहे. अजून नक्की तारीख ठरलेली नाही!’

३१ ऑक्टोबरला कॅबट लॉज हे वॉशिंग्टनला जाण्याचा कार्यक्रम पूर्वीच जाहीर झालेला होता. त्यात कॅबट लॉज यांनी मुद्दामच आपण होऊन काही बदल केला नाही, कारण यामुळे दिएमला संशय आला असता. परंतु वॉशिंग्टनहून गुप्त संदेश आला की, ‘३१ ऑक्टोबरला आपण यायलाच पाहिजे असे नाही. जर जायचे ठरवलेत तर सूत्रे जनरल हार्किन्स यांचेकडे द्यावी.’

जनरल हार्किन्सकडे सूत्रे देऊन लॉज निघून जाते, तर कटवाल्यांनी पुनः अवसानघातकीपणा केला असता. जनरल हार्किन्स याचेशी कटवाल्यांनी गेला महिनाभर कसलेही संधान ठेवले नव्हते. कटवाल्यांना तो विश्वासू वाटत नव्हता. एकंदर विचार करून ३० ऑक्टोबरला कॅबट लॉज यांनी आपले वॉशिंग्टनचे प्रयाण रद्द केले.

## दिएम याची अखेरची घटका

एक नोव्हेंबर सकाळ झाली. पॅसिफिकमधील अमेरिकेन सेनादलाचे प्रमुख ॲडमिरल फेल्ट हे सायगावला आलेले असल्याने राजकीय रीत म्हणून त्यांच्यासह कॅबट लॉज हे अध्यक्षीय प्रासादात दिएम यांच्या भेटीला गेले. लॉज हे दिएमशी गप्पा मारीत होते तेव्हा बाहेर कटाला तोंड द्यावे लागले होते! अमेरिकेचे शासन त्यांच्या आश्रित राज्यकर्त्यांना कसे सहज लीलया खेळवते आणि प्रसंगी भुईसपाट करते याचा हा वस्तुपाठच होता. ज्या राज्यप्रमुखाशी कॅबट लॉज गप्पा मारीत होते, त्याचे या जगात पुरते २४ तासही उरलेले नव्हते.

कट आखल्याप्रमाणे घड्याळ्याच्या काट्यावर कार्यान्वित होत चालला. दुपारी एक वाजून तीस मिनिटांनी कटवाल्या सेनाधिकाऱ्यांनी पोलीस आयुक्तांचे कार्यालय, आकाशवाणी केंद्र, विमानतळ आणि शहरातील अशा प्रकारच्या महत्त्वाच्या यंत्रणा कब्जात घेतल्या. मग लगेचच अध्यक्षीय निवासाच्या अवतीभवती पसरलेल्या ‘स्पेशल फोर्स’ या दिएम-न्हू दुकलीच्या इशाऱ्यावर अत्याचार करणाऱ्या सैनिकांच्या बराकीवर हल्ला सुरू केला.

न्हू यांचेशी इमान असलेल्या अधिकाऱ्यांनी न्हू याला उठाव झाल्याचे वृत्त सांगितले. न्हू मनात हसला. त्याला वाटले कटवाल्यांना जाळ्यात पकडण्यासाठी जनरल दिन्ह याला आपण जो सापळा रचायला सांगितला होता त्यानुसार ही खोटीच बतावणी आहे! त्याने सर्वांना तंबी दिली –

‘काहीही असो. तुम्ही सर्व शांत रहा. यात तुम्हाला पडण्याचे कारण नाही.’

बुडत्यानेच गळ्याभोवतीची प्राणरक्षक पिशवी फेकून द्यावी तसे हे झाले. अध्यक्षीय निवासावर जेव्हा गोळीबार सुरू झाला तेव्हा न्हू याची दातखिळी बसली. त्याने जनरल दिन्ह याला फोन लावला. जनरल दिन्हच्या कचेरीतून सांगण्यात आले की ‘जनरल साहेब काही कामाला बाहेर गेले आहेत!’

सायगाव शहरात जो अल्पस्वल्प प्रतिकार झाला तो मोडून काढायला कटवाल्यांना तीन तासांपेक्षा कमीच वेळ लागला; कारण सर्व जनरल या कटात सहभागी झाले होते. आता फक्त अध्यक्षीय निवासातील रक्तपात अपेक्षित होता. फोन चालू ठेवला गेला होता, तो दिएम याला न्हू पासून वेगळा काढण्यासाठी. दिएम याला कटप्रमुखांनी फोन केला –

‘आपले दोन्ही बंधु, न्हू आणि थुक यांनी राजीनामे द्यावे व आपण देश सोडून जावे अशी आमची मागणी आहे!’

दिएमने दीर्घसूत्राचा जुना प्रयोग आरंभला. तो सांगू लागला – ‘तुम्ही सर्व माझ्या निवासात या. आपण चर्चा करून ठरवू.’

कटवाल्यांनी सांगितले –

‘नाही. आपले उत्तर काय ते सांगा. नाहीतर हे शासन आम्ही आता जागेवर ठेवणार नाही.’

## टेप केलेला अखेरचा संवाद

दिएमने फोन बंद केला व अमेरिकन वकिलातीचा नंबर फिरवला. कॅबट लॉज यांनी फोन उचलला. बोलायला सुरुवात करण्यापूर्वी त्यांनी टेपरेकॉर्डर सुरू करण्याची खूण केली. फोनवरील संवाद टेपवर उतरू लागला –

दिएम : काही सैन्यपथकांनी बंड केले आहे. याबाबतीत अमेरिकेचे धोरण काय राहील हे जाणून घेण्यासाठी मी फोन करतो आहे.

लॉज : मला वाटतं मला या संबंधात पुरेशी माहिती नसल्याने मी तुम्हाला काय सांगू? मी शहरात गोळीबाराचे आवाज ऐकतो आहे परंतु काय घडते आहे याची मला माहिती नाही. वॉशिंग्टनला आता पहाटेचे साडेचार झालेले आहेत, तिकडे की सल्लामसलत या अवेळी शक्य नाही.

दिएम : तुम्हाला या प्रकाराबद्दल सर्वसाधारण कल्पना असलीच पाहिजे! एका राज्याचा प्रमुख या नात्याने मी माझे कर्तव्य पार पाडलेले आहे. कर्तव्य आणि सद्भावना याला अनुसरून यावेळी मी वागेन. कर्तव्य हे मी सर्वप्रथम मानतो.

लॉज : आपण आपले कर्तव्य आतापर्यंत नक्कीच बजावलेले आहे. सकाळीच तुमच्याशी बोलताना मी म्हटलेच होते की तुमचे धैर्य आणि देशाची तुम्ही आजवर केलेली सेवा याचा मी चाहता आहे. आतापर्यंत तुम्ही जे देशासाठी काही केले त्याचे श्रेय कोणीही हिरावून घेऊ शकणार नाही. मला या क्षणी मात्र तुमच्या शारीरिक सुरक्षिततेविषयीची चिंता वाटत आहे. माझ्या कानावर असे आलेले आहे की तुमच्या देशाच्या आजच्या कारभाऱ्यांना तुम्ही व तुमचे बंधू यांनी सत्तात्याग करून देश सोडावा असे वाटत आहे... ऐकून येतंय ना?

दिएम : नाही (क्षणभर शांतता) तुमच्याकडे माझा टेलिफोन नंबर आहे ना?

लॉज : आहे. जर तुमच्या व्यक्तिगत सुरक्षिततेसाठी मी काही करू शकत असेन तर मला फोन करा.

दिएम : मी बंड मोडून पुन्हा व्यवस्था निर्माण करण्याचा प्रयत्न करतो आहे.

## दिएम निसटला, पण...

‘स्पेशल फोर्स’ सैनिकांनी अध्यक्षीय निवासाला जे काही काळ संरक्षण दिले, त्याचा फायदा घेऊन अध्यक्ष दिएम आणि न्हू हे दोघे बंधू रात्री साडेअकरा ते बाराच्या सुमारास भुयाराच्या वाटेने निवासाबाहेर पडले. दिएम हा ब्रह्मचारी होता आणि मादाम न्हू ही

अमेरिकेत दौऱ्यावर होती यामुळे इतर कुणाला बाहेर काढण्याचा प्रश्न नव्हता. दोघे बंधू निसटले व चोलान भागात (जिथे चिनी वस्ती जास्त आहे) तिथे तुयेन नावाच्या व्यापाऱ्याच्या घरात लपून बसले.

एक नोव्हेंबरच्या रात्री अध्यक्षीय निवासाभोवतीची झटापट संपली. अध्यक्ष व न्हू निसटून गेल्यानंतर झगडा करण्यात निवासरक्षकांना स्वारस्य वाटत नव्हते. कटवाले अध्यक्षीय निवासात शिरले तेव्हा मध्यरात्र झाली होती. तितक्यात फोन वाजला.

दिएमच फोनवरून सेनाधिकाऱ्यांशी बोलत होता. सकाळी ६-३० वाजता विमानमार्गाने तुम्हाला देशाबाहेर जाऊ देऊ असे अभिवचन कटवाले देत होते. जनरल मिन्ह याला दिएम याने होकार दिला, परंतु 'आपण कुठून बोलत आहात?' या त्याच्या प्रश्नाला उत्तर न येता फोन बंद झाला!

## पापांची कबुली आणि देहदंड!

२ नोव्हेंबरच्या पहाटे दिएम व न्हू हे दोघे चोलोन भागातून इतरत्र पळून जाण्याच्या प्रयत्नात असताना एका चिलखती गाड्यांच्या पथकाच्या कमांडरने त्यांना पकडले. दुसरा एक मतप्रवाह असा आहे की दोघे चोलोन भागातील सेंट फ्रान्सिस झेविअरच्या चर्चमध्ये गेले. तिथे त्यांनी ख्रिस्ती पादऱ्यांपाशी 'पापांचा कबुलीजबाब' दिला, ज्याला 'कन्फेशन' म्हणतात. मग फादरने दोघांसाठी येशूकडे प्रार्थना केली. चर्चमध्ये प्रार्थनेसाठी जमा झालेल्यांशी दोघे बोलत असताना त्यांनीच बोलावलेल्या चिलखती गाड्या आल्या व त्यांनी स्वतःला पकडून घेतले. दोघांनाही चिलखती गाडीतून स्टाफ क्वार्टर्सकडे नेण्याच्या उद्देशाने गाड्या निघाल्या. वाटेत काय झाले ते निश्चित समजले नाही. परंतु दोघांनाही चिलखती गाड्यातच गोळ्या घालण्यात येऊन त्यांचा वध झाला! दोघांचे हात मागे बांधलेले होते. सकाळी साडेनऊच्या सुमारास हे झाले असावे.

## नाही चिरा नाही पणती!

दिएम आणि न्हू या दोघांना ठार केल्याचे वृत्त सायगाव आकाशवाणी केंद्राने देताक्षणीच सायगावमधील जनतेने आनंदोत्सव सुरू केला. शहरात दिएमच्या मृत्यूने वाईट वाटावे असा कुणी नव्हताच. बौद्ध धर्माच्या शापाने दिएमची राजवट जनमानसातून संपूर्ण उतरलेलीच होती. नऊ वर्षांच्या उत्कर्ष, उतार आणि विनाश या संपूर्ण चक्रातून दिएमची राजवट पार झाली होती. त्रासदायक निपुत्रिक म्हातारा मरावा तसा मागे कसलाही वारसा न ठेवता दिएम काळाच्या पडद्याआड गेला होता.

दिएमचा दुसरा भाऊ नगो-दिन्ह-कॅन याला हुए येथे पकडण्यात येऊन त्याच्यावर सायगाव येथे झटपट खटला भरण्यात आला आणि भर चौकात त्याला गोळ्या घालण्यात

आल्या. पकडला जाण्यापूर्वी कॅन हा हुए येथील अमेरिकेच्या कॉन्सुलेटमध्ये गेला व त्याने आसरा मागितला. कॉन्सुलेटने सायगावला कॅबट लॉज यांना फोन लावला. लॉज यांनी फोनवर सांगितले की कॉन्सुलेटला आसरा देता येणार नाही. कॅनला अमेरिकेच्या वकिलातीत पाठवा. कॅन सायगावला आला परंतु कॅबट लॉज यांनी त्याला सैनिकी अधिकाऱ्यांकडे सुपूर्त केला. मादाम न्हू ही अमेरिकेत दौऱ्यावर होती आणि दिएमचा तिसरा ज्येष्ठ भाऊ आर्चबिशप थुक हा रोमला गेलेला होता. मादाम न्हू व आर्चबिशप ही दोघे आता पुन्हा कधीही दक्षिण व्हिएतनामला परतू शकणार नव्हती!

जनरल स्टाफ हेडक्वार्टर्सपासून १५० यार्ड अंतरावर, दिएम व न्हू यांचे दफन उरकण्यात आले. त्यांच्या त्या जागांवर 'नाही चिरा नाही पणती' ही स्थिती होती.

## तरीही हे व्हायला नको होते

दिएमचे जे विश्वासू सेनाधिकारी होते, त्यांनीच दिएमचा वध घडवलेला होता. सायगावचा लष्करी प्रशासक जनरल दिन्ह, जनरल स्टाफचा प्रमुख जनरल डॉन आणि सेनाप्रमुख जनरल मिन्ह हे तिघे या सर्व कारवाईचे प्रमुख सूत्रधार धरले जातात.

या लष्करी अधिकाऱ्यांनी धर्माने बौद्ध असलेल्या उपाध्यक्ष थो याला पंतप्रधान म्हणून नियुक्त केले. नव्या पंतप्रधानांनी घोषणा केली की नव्या राजवटीचा उत्तर व्हिएतनाममधील कम्युनिस्ट राजवटीशी जमवून घेण्याचा मुळीच विचार नाही. अध्यक्षपद जनरल मिन्ह यांच्याकडे ओघानेच आले.

सायगावमध्ये कॅबट लॉज यांनी अथवा वॉशिंग्टनला अध्यक्ष केनेडी यांनी दक्षिण व्हिएतनाममध्ये जे घडले त्यावर लगेच प्रतिक्रिया व्यक्त करण्यास धोरणीपणाने नकार दिला. सायगावमध्ये मात्र काही जण मजेने म्हणू लागले की अमेरिकेचे उपाध्यक्षपद लढवण्याची संधी १९६० साली कॅबट लॉज यांना त्यांच्या पक्षाने दिली नाही, तेव्हा आता निदान दक्षिण व्हिएतनामच्या रिकाम्या झालेल्या अध्यक्षपदाची निवडणूक त्यांनी लढवावी! ते नक्की निवडून येतील!!

दिएम व न्हू यांना सत्तेवरून दूर करण्यासाठी त्यांच्याविरुद्ध निर्माण झालेल्या कटाला अमेरिकेने आशीर्वाद दिला, साहाय्यभूत होईल अशी कडक आर्थिक उपाययोजना केली, कारवायांना आश्वासन दिले, कट रचण्यात मदत केली हे सर्व खरे असले तरी याचे पर्यवसान दिएम व न्हू यांच्या वधात होईल अशी कुणाची अटकळ नव्हती! दोघे परागंदा होतील आणि अमेरिकेत आश्रय घेतील. मग निरूपद्रवी नागरिक म्हणून त्यांना परागंदा अवस्थेत फारतर थारा देऊ, अशा विचाराने कॅबट लॉज हा कटवाल्यांना प्रोत्साहन देत गेला.

यामुळे दिएम व न्हू यांच्या हत्येची बातमी येताच अध्यक्ष केनेडीही काहीसे हादरले. असे व्हायला नको होते असे त्यांना मनापासून वाटलेही असेल. दिएम जिवंत राहता काय किंवा न्हू जिवंत राहता काय, अमेरिकेला ते दोघे नको होते. कारण कम्युनिस्टविरोधी लढा अमेरिकेच्या दृष्टीने महत्त्वाचा होता; आणि या दोघांची राजवट ही त्यात अडसर ठरली होती. परंतु राजकारणात नको असलेली माणसे गोळ्या घालून मारून टाकण्याची कल्पना अध्यक्ष केनेडीच काय, कुणाही सुसंस्कृत माणसाला नकोशी वाटते.

अध्यक्ष केनेडी यांना याची मात्र कल्पना नव्हती की फक्त वीस दिवसांनीच त्यांचाही असाच खून पडणार आहे!

त्यांचा मारेकरी त्यावेळी बंदुकीची साफसफाई करू लागलेला होता!

n

# १९ : जॉन्सन यांचा आत्मघातकी पवित्रा!

२२ नोव्हेंबर १९६३ या दिवशी दलासच्या वाटेवर अध्यक्ष केनेडी यांचा खून पडला. उपाध्यक्ष जॉन्सन यांच्याकडे अध्यक्षपदाची सूत्रे आली. वीस दिवसांपूर्वी दिएमच्या खुनानंतर दक्षिण व्हिएतनाममध्ये अनेक गोष्टी भराभर घडल्या. दिएमच्या जागी अध्यक्ष पदावर आलेला दक्षिण व्हिएतनाम सरकारचा नवा नेता जनरल मिन्ह हा तसा बरा मनुष्य होता. त्याच्याशी ४ नोव्हेंबरला पहिली औपचारिक गाठभेट झाल्यानंतर सायगावचे अमेरिकेचे वकील कॅबट लॉज यांनी वॉशिंग्टनला कळवले होते –

‘जनरल मिन्ह मनुष्य तसा चांगला आहे, परंतु सर्व गोंधळ निस्तरण्याइतपत तो कर्तबगार आहे का?’

## सायगावमधील लट्ठालट्ठी

लॉज यांनी व्यक्त केलेली शंका अगदी बरोबर ठरली. कारण तीन महिन्यांच्या आतच अध्यक्षीय प्रासादात थोडीशी लट्ठालट्ठी करून मेजर जनरल कान्ह याने सत्ता आपल्या हातात घेतली. हाती सत्ता घेताना कान्ह याने कारण दिले –

‘उत्तर व्हिएतनामविरुद्धच्या लढ्यात तटस्थ भूमिका घेणाऱ्यांकडे सत्ता राहू देणे धोक्याचे होते.’

सायगावच्या अध्यक्षीय प्रासादात लष्करी अधिकाऱ्यात ही जी झोंबाझोंबी सुरू झाली, त्याचा फायदा व्हिएतकाँगने बरोबर उठवला. सुरक्षित खेड्यांची आणि सुरक्षित वसाहतीची जी योजना गाजावाजा पावली होती, ती किती भुसभुशीत आहे याचे प्रत्यंतर मोठ्या प्रमाणावर येऊ लागले. दक्षिण व्हिएतनाममधील या सुरक्षित वसाहतींवर व्हिएतकाँगनी हल्ले करून त्या वस्त्याच कब्जात घ्यायला सुरुवात केली.

यावेळी दक्षिण व्हिएतनाममध्ये आलेल्या अमेरिकेच्या सैनिकांची संख्या फक्त १,६०० होती आणि ३,५०० बिगर लष्करी अमेरिकन सल्लागार दक्षिण व्हिएतनामच्या सरकारला मदत करीत होते. याचवेळी दक्षिण व्हिएतनाममध्ये लढणाऱ्या गनिमी व्हिएतकाँगीची संख्या २५,००० होती आणि तीन लाखांहून अधिक दक्षिण व्हिएतनामी नागरिकांची या गनिमी सैनिकांना सहानुभूती होती – मदत होती.

व्हिएतकाँगी गनिमी सैनिक हे आता इतके धीट झाले होते, की त्यांचेच राज्य सर्वत्र आहे असे खेड्यापाड्यातून जनतेला वाटू लागले होते. दिएमचा खून पडला त्याच्या आधी दोन-तीन दिवस, या व्हिएतकाँग गनिमांनी सायगाव ते हुए या हमरस्त्यावरून जाणाऱ्या येणाऱ्या सर्व मोटारींना व वाहनांना अडवले. उतारूंना बाजूच्या शेतात नेले.

तिथे त्यांच्यापुढे व्हिएतकाँग लढ्याचा अर्थ समजावून देणारे भाषण त्यांना ऐकवून, मग रहदारी चालू करण्यास परवानगी देण्यात आली. एवढे उरकून व्हिएतकाँगी पसार झाले! अशा तऱ्हेच्या धमक्या देऊन प्रवाशांचा खोळंबा करण्याच्या प्रकारात व्हिएतकाँगी एक हेतू साधीत असत, तो म्हणजे समुदायाची खात्री पटे की या माणसांना लोकांचे पैसे-दागिने नको आहेत. रानावनातून तळहातावर शीर घेऊन लढत जीवन कंठणाऱ्या या लोकांना, सामाजिक न्याय देणारी राजकीय व्यवस्था हवी आहे. यामुळे त्यांना क्रूर व लुटारू ठरवणाऱ्या प्रचाराला परस्पर छेद बसत असे.

जनरल मिन्ह याने दिएमच्या खुनानंतर सत्ता घेतल्याबरोबर दिलेल्या मुलाखतीत कबुलीच दिली होती –

'जुन्या राजवटीने देशातील सर्व राजकीय जीवनच बरबाद केले आहे.'

या पार्श्वभूमीवर व्हिएतकाँग गनिमांना जनतेत वाढता पाठिंबा दिवसेंदिवस मिळू लागला होता यात नवल नाही.

जॉन्सन साहेबांच्या सल्लागारांनी यावर उपाय काय काढला? अभ्यास सुरू झाला? कसला? उत्तर व्हिएतनामवर अमेरिकन सैनिकांनी छुपे बाँब हल्ले केले तर ते कसे करावे? कुठे करावे? यात अमेरिकेचा हात आहे हे कसे लपवावे? यामुळे उत्तर व्हिएतनामचे नुकसान किती होऊ शकेल? हा सर्व व्यासंगपूर्ण अंदाज बांधण्याची गरज त्यांना भासू लागली. २६ नोव्हेंबरला म्हणजे अधिकारावर आल्या आल्या चारच दिवसांनी अध्यक्ष या नात्याने जॉन्सन साहेबांनी NSAM २७३ हा गुप्त फतवा सायगावच्या 'मॅकव्ही' या आपल्या लष्करी संघटनेकडे रवाना केला. उत्तर व्हिएतनामविरुद्ध करण्यात यावयाच्या या गुप्त चढाईची प्रत्यक्ष आखणी व्हायला दोन महिने तरी लागतील असा अंदाज होता. मधल्या काळात संरक्षण सचिव मॅकनामारा हे १५ डिसेंबरच्या सुमारास सायगावला भेट देण्यासाठी आले.

## मॅकनामाराचा अहवाल

मॅकनामारा यांनी सायगावला आठवडाभर राहून अध्यक्षीय प्रासादातील दक्षिण लष्करी अधिकाऱ्यांच्या वेगवेगळ्या भेटीगाठी घेतल्या आणि वॉशिंग्टनला परतल्यावर २१ डिसेंबरला जॉन्सन यांच्यापुढे जो अहवाल ठेवला, तो सायगाव सरकारचे केविलवाणे चित्र रंगवणारा होता. या अहवालात नमूद होते –

'जनरल मिन्ह हा व्हिएतकाँगीशी कसा काय लढेल हा नंतरचा प्रश्न आहे. तूर्त तो चळवळ्या बौद्ध समाजाला काबूत ठेवून अधिकारावर टिकतो की नाही हाच प्रश्न आहे.

व्हिएतकाँगींनी सायगावमधील सत्ताबदलाचा व्यवस्थित फायदा उठवलेला असून सर्वत्र त्यांचा जोर झालेला आहे.'

संरक्षण सचिव मॅकनामारा यांची भेट फक्त राजकीय नव्हती. जॉन्सन यांनी जो गुप्त फतवा सायगावला धाडला होता, ते काम कसे काय चालले आहे हे पाहण्यासाठी ते गेले होते. यामुळे अध्यक्षांना त्यांनी आपल्या अहवालात यासंबंधी गुप्तपणाने कळवले –

'उत्तर व्हिएतनामवर आपल्याला यानंतर जे बाँबहल्ले करावे लागणार आहेत, त्याची पूर्वतयारी म्हणून बाँबहल्ले कोणकोणत्या ठिकाणांवर करावयाचे याची यादी तयार करणे भाग आहे.'

सायगावला दिलेली ही योजना आखण्याची कामगिरी 'मॅकव्ही' संघटनेने पार पाडली व २ जानेवारी १९६४ या दिवशीच्या गुप्त अहवालानुसार, अध्यक्ष जॉन्सन यांना शिफारस करण्यात आली –

'उत्तर व्हिएतनामच्या हद्दीत शिरून घातपात व गुप्त हल्ले करण्याचा कार्यक्रम बारा महिन्यांचा असावा. याचे दोन भाग राहतील, पूर्वार्धात फक्त वीस निवडक ठिकाणांवर हल्ले करावयाचे आहेत. उत्तरार्धात या हल्ल्यांची संख्या व व्याप्ती वाढवून उत्तर व्हिएतनामच्या औद्योगिक विभागावर लक्ष केंद्रित करावयाचे आहे.'

उत्तर व्हिएतनामवर बाँबहल्ले करण्याची सर्व जय्यत तयारी सायगावला 'मॅकव्ही' संघटना करू लागली. प्रत्यक्ष हा कार्यक्रम कधी सुरू करायचा हे आत्ताच सांगता येणार नव्हते. त्यासाठी काहीतरी खरीखोटी कुरापत निर्माण करण्याचे काम अजून करावयाचे होते. यासाठी जॉन्सन सरकारला आणखी सहा महिने वाट पाहावी लागणार होती. कारण फेब्रुवारीत मुळी सायगावलाच गडबड उडाली.

## हनोईला धमकी

जनरल मिन्ह याला बाजूला सारून जनरल कान्ह हा ३० जानेवारी ६४ ला पंतप्रधान झाला. आठवडाभरात मिन्ह व कान्ह यांच्यात समझोता होऊन मिन्ह हा पुनश्च अध्यक्ष व कान्ह हा पंतप्रधान झाला. म्हणजे मिन्ह-कान्ह या दोघांनी चलाखी करून दिएमच्या जागी आलेल्या उपाध्यक्ष थो याला थोडक्यात बाजूला केला!

मिन्ह-कान्ह ही जोडी सायगावच्या राजकीय मंचावर आता विराजमान झालेली असली तरी सत्तेसाठी आणि मानासाठी हपापलेले आणि भुकेले लष्करी अधिकारी 'विंगे'त वाट पाहत उभेच होते. जो तो रंगमंचावर प्रवेशाची संधी पाहात होता.

इकडे वॉशिंग्टनला जॉन्सनसाहेबांचे सल्लागार, अमेरिकेच्या अध्यक्षाला उत्तर व्हिएतनामबरोबर सरळ सरळ प्रत्यक्ष लढाई करण्याच्या दिशेने कसे चेपीत होते ते

पाहण्यासारखे आहे. जानेवारी ६४ ला सायगावहून आलेला उत्तर व्हिएतनामवरील गुप्त हल्ल्याचा आराखडा तपशीलासह पेंटॅगॉन संघटनेकडे आला. तो तपासून पेंटॅगॉनचे अध्यक्ष जनरल मॅक्स्वेल टेलर यांनी अध्यक्षांना २२ जानेवारी ६४ ला कळवले –

'या आराखड्यानुसार गुप्त हल्ले सुरू करायला आमची मुळीच हरकत नाही. परंतु या हल्ल्याचा हनोई सरकारवर निर्णायक परिणाम होईल अशी जर अटकळ असेल तर ती चुकीची ठरेल. यापेक्षा अधिक धीट मार्ग पत्करावे लागतील. ज्यात उत्तर व्हिएतनाममधील प्रमुख लष्करी केंद्रावर बॉँबहल्ले समाविष्ट असावेत. अर्थात ही बॉँबफेक सकृतदर्शनी दक्षिण व्हिएतनामचे वैमानिकच करतील. नंतर कदाचित एवढ्याने भागले नाही तर अमेरिकेच्या फौजांनाच प्रत्यक्ष लढावे लागेल.'

मॅकनामारा-टेलर यांच्या आग्रहामुळे अध्यक्ष जॉन्सन यांनी फेब्रुवारीत हनोई सरकारला जाहीर तंबी दिली -

> 'व्हिएतकाँग गनिमांना मदत करणारे हनोई सरकार तीव्र धोकादायक खेळ खेळत आहे.' (Hanoi is playing a deeply dangerous game.)

जॉन्सन यांच्या धमकीचा हनोईवर काहीही परिणाम झाला नाही. अनेक अमेरिकन नागरिकांच्या मनात मात्र अशुभ शंका थैमान घालू लागल्या. अमेरिकन वैमानिकांनी, अमेरिकेच्या विमानातून दक्षिण व्हिएतनामी लष्कराची हालचाल व रसदपुरवठा सुरू केला तो १९६२ अखेर. त्यातून मोठ्या प्रमाणावर अमेरिकन सैनिक आणि तंत्रज्ञ सायगावला 'मॅकव्ही' संघटनेच्या उभारणीसाठी आले ते १९६३ मध्ये. तोपर्यंत फारसे बिघडले नव्हते, कारण या कारवाईत अमेरिकन तरुण पोरांचा जीव फारसा धोक्यात आलेला नव्हता. पण आता जॉन्सन यांनी जी धमकी दिली होती, ती हनोई सरकारने धाब्यावर बसवली तर अमेरिका उत्तर व्हिएतनामशी प्रत्यक्ष लढाई करणार, बॉँबहल्ले करणार की काय? ही शंका सर्वांना भेडसावू लागली. पत्रकारांनी अध्यक्ष जॉन्सन यांना या बाबतीत पुन्हा विचारल्यावर जॉन्सन साहेब म्हणाले –

'That is what I said, that is what I meant.' (मी दिली ती धमकीच आहे आणि तसाच त्याचा अर्थ आहे.)

## सलगी देणे कैसे असे?

संरक्षण सचिव मॅकनामारा आणि पेंटॅगॉन संघटनेचे प्रमुख जनरल टेलर हे दोघे मार्चच्या पहिल्या आठवड्यात पुनश्च सायगावला निघाले. या दौऱ्याची सुरुवात सायगाव विमानतळावर कान्ह यांच्याकडून होणाऱ्या स्वागताने झाली. मुत्सद्दी कशा चुका करतात त्याचा प्रत्यय विमानतळावरच आला. कुणाला किती सलगी द्यावी हे विचारपूर्वक ठरवावे

लागते. सायगाव विमानतळावर मॅकनामारा उतरले तेव्हा स्वागताला लहान लहान मुले आणि फुले घेऊन देखण्या मुली उभ्या होत्याच. उतरल्यावर दुतर्फा उभ्या असलेल्या जमावातून जाताना मॅकनामारा यांनी जनरल कान्ह यांचा हात धरला होता आणि आपल्या हाताने त्यांचा हात उंच करीत मॅकनामाराही 'अमेरिका-कान्ह मैत्री चिरायू होवो' असे ओरडत होते. हा जनरल कान्ह अधिकारावर टिकणार आहे का? त्याची लायकी काय? यासंबंधी वॉशिंग्टनला लॉज यांनी कळवले असताना, मॅकनामारा यांनी ही जाहीर सलगी दाखविली. काही महिन्यातच कान्ह अधिकारावरून उडाला! दुसऱ्या देशांच्या प्रमुखांना आलिंगने देणे, हातात हात घालून घोषणा करणे हे नेहमीच आवश्यक नसते. जनरल कान्ह याने याचा अर्थ असा घेतला की, वॉशिंग्टनचे राज्यकर्ते आपल्या कारभारावर खूष आहेत!

१६ मार्चला वॉशिंग्टनला परतल्याबरोबर मॅकनामारा-टेलर यांनी जॉन्सनसाहेबांना अहवालात सल्ला दिला –

> 'दक्षिण व्हिएतनाममधील परिस्थिती अगदी बेकार झालेली आहे. नवा आणि लक्षणीय असा दबाव उत्तर व्हिएतनामवर आणायला हवा आहे. या दबावाचे स्वरूप असे असावे-दक्षिण-पूर्व लाओसमधून उत्तर व्हिएतनामी गनिमांनी रसदीचा आणि लष्करी पुरवठ्याचा मार्ग निर्माण केला आहे. या मार्गाला 'हो-चि-मिन्ह ट्रेल' असे म्हणतात. या मार्गावर सायगाव सैन्याने हल्ला चढवून तो बंद पाडणे. उत्तर व्हिएतनामवर दक्षिण व्हिएतनामी विमानांनी बॉंबहल्ले करणे आणि उत्तर व्हिएतनामच्या बंदरात सुरूंग पेरून नाकेबंदी करणे.'

या अहवालात हे सर्व दक्षिण व्हिएतनामी सैन्याने करावे अथवा दक्षिण व्हिएतनामी हवाईदलाने वा नाविक दलाने करावे असे म्हटलेले असले तरी याचा अर्थ या गोष्टी करायला अमेरिकेच्या भूदल, विमानदल व नाविक दलाने मदत द्यावी असाच होता. कारण याच अहवालात अमेरिकेची बी ५७ जेट विमाने जी जपानमध्ये होती, ती यासाठी दक्षिण व्हिएतनाममध्ये न्यावी असा सल्ला दिलेला आहे.

१७ मार्च १९६४ ला संरक्षणसचिव मॅकनामारा यांनी सादर केलेल्या या योजनेला अध्यक्ष जॉन्सन यांनी संमती दिली.

मॅकनामारा यांचा हा अहवाल बराच मोठा आहे. परंतु त्यात जी धोरण विषयक विधाने ग्रथित केलेली होती, त्यातूनच पुढील सर्व अनर्थ निर्माण झाला. त्यातली काही विधाने पाहा –

१) जनरल कान्ह हा राजकीयदृष्ट्या कम्युनिस्टांच्या नैपुण्याशी झगडण्यास पुरा पडणार नाही.

२) यामुळे दक्षिण व्हिएतनामी व उत्तर व्हिएतनामी यांच्यात परस्पर समझोता होऊ देणे म्हणजे कम्युनिस्टांनाच सर्व देश देण्यासारखे होईल.

३) झगडा नको, इथे अमेरिकन नकोत आणि कम्युनिस्टही नकोत असे म्हणणारा मोठा वर्ग सायगावमध्ये आहे. दोघांनी निघून जावे व दक्षिण व्हिएतनाम हा तटस्थ देश म्हणून जगू द्यावा अशी सूचना द गॉलसारखी माणसे करीत आहेत. त्यातही अर्थ नाही. कारण असे केले तर कम्युनिस्ट देश खाऊन टाकतील.

जॉन्सन यांनी मॅकनामारा यांनी आखून दिलेल्या धोरणाने जाण्याचा १७ मार्च ६४ ला जो निर्णय घेतला त्या निर्णयाचे स्वरूप केनेडी राजवटीचे खरकटे असे मुळीच नव्हते. अमेरिकेला व्हिएतनामी झगड्यात कम्युनिस्टांचा पराभव होईपर्यंत इर्षेने ढकलणारा हा निर्णय होता. तो जॉन्सन याचा स्वतःचा होता. कारण ज्यायोगे शांतता येईल असा पर्याय दक्षिण व्हिएतनामी यांनी काढला, तरीसुद्धा तो आम्ही अंमलात येऊ देणार नाही असा हा घातकी निर्णय होता.

## जनरल कान्ह शेफारला

मॅकनामारा यांनी आपल्या भेटीत जरूर पडल्यास बाँब हल्ल्याचा विचार करू असे तोंडी आश्वासन जनरल कान्ह याला दिल्याने, त्याला वारे भरल्यासारखे झाले होते. त्याने आता भाषणे करायला सुरुवात केली. 'घाव मुळावर घातला पाहिजे.' 'हनोई चलो' हेच कम्युनिस्टांना उत्तर आहे. '१७ वी अक्षांश रेषा आता आपण ओलांडली पाहिजे.' अशा घोषणा तो करू लागला. दक्षिण व्हिएतनाम सरकारने निर्माण केलेल्या सुरक्षित वस्त्यांपैकी निम्म्याहून अधिक वस्त्या या व्हिएटकाँगींनी आता कब्जात घेतल्या होत्या. सायगावपर्यंत गनिमांचे हात सहजी पोचू लागले होते. व्हिएतकाँगींनी 'मे दिन' साजरा केला. १ मे १९६४ ला सायगाव बंदरातली एक बोट त्यांनी बुडवली!

आपले राज्य बुडवण्याची घटका जवळ येत आहे या कल्पनेने घाबरलेला जनरल कान्ह हा ४ मे ६४ ला अमेरिकन वकिलाला बोलावून म्हणाला –

'लवकरात लवकर उत्तर व्हिएतनामशी युद्ध पुकारण्याचा माझा विचार आहे. अमेरिकेने बाँबहल्ले चढवावे व अमेरिकन सैनिकांनी लाओस, कंबोडिया सरहद्द सांभाळावी. आमचे सैन्य सरळ १७ वी रेषा ओलांडून उत्तरेत घुसेल.'

कॅबट लॉज यांच्या चेहऱ्यावरची रेषाही हलली नाही. त्यांनी थातुरमातुर करून जनरल कान्ह याला समज दिली की यातले काहीही तूर्त होणार नाही.

जनरल कान्ह रागावला. उत्तर व्हिएतनामविरुद्ध युद्ध पुकारण्याच्या वल्गना तो सोडीना. अध्यक्ष जॉन्सन यांनी व्हिएतनामबाबतच्या धोरणात अधिक सुसूत्रता आणण्यासाठी कॅबट लॉज यांना परत बोलावण्याचे ठरवले. लॉज हा लष्करी अधिकारी नव्हता. उत्तर व्हिएतनामवर बॉंबहल्ले सुरू करण्याच्या गुप्त योजना उद्या कार्यान्वित कराव्या लागल्या, तर सायगावला एखादा अनुभवी लष्करी अधिकारीच वकील म्हणून असलेला बरा या हिशेबाने पेंटॅगॉन संघटनेने प्रमुखत्व सोडायला लावून जॉन्सन यांनी जनरल टेलर यांनाच आता सायगावला वकील नेमले.

## जनरल वेस्टमोरलँड आले

'मॅकव्ही' लष्करी संघटनेचा प्रमुख जनरल हार्किन्स हा देखील नव्या उद्दिष्टांना फारसा अनुकूल नसल्याने, त्याच्या जागी वेस्टमोरलँड यांची नेमणूक जाहीर झाली. जनरल टेलर वकील म्हणून व जनरल वेस्टमोरलँड 'मॅकव्ही' संघटनेचे प्रमुख म्हणून जून ६४ मध्ये सायगावला आले. जॉन्सनसाहेबांचे लक्ष आता १९६४ अखेर होणाऱ्या अध्यक्षीय निवडणुकीकडे होते. केनेडी यांच्या मृत्यूमुळे जॉन्सन हे अध्यक्षपदावर आलेले असल्याने, १९६४ डिसेंबरात होणाऱ्या अध्यक्षीय निवडणुकीत त्यांना पुनः निवडून येण्यासाठी आता स्वतःची ठाशीव वेगळी प्रतिमा मतदारांपुढे मांडायची होती. रिपब्लिकन पक्षाचे अध्यक्षपदासाठी प्रयत्न करणारे उमेदवार बॅरी गोल्डवॉटर हे प्रत्येक सभेतून प्रश्न विचारीत होते – 'इतकी वर्षे झाली तरी व्हिएतनाममध्ये अजून यश का नाही?'

जॉन्सन राजवटीचे पहिले सहा महिने वाईटच गेले होते. दक्षिण व्हिएतनाम सरकारने निराशाच चालवली होती. परिणामी तेथील अमेरिकेच्या सैनिकांची संख्या २१००० झाली होती. अधिक अमेरिकन मुलकी सल्लागार रवाना झाले होते. परंतु याने भागणार नाही अशी जवळजवळ खात्री पटल्याने, गुप्तपणे उत्तर व्हिएतनामवर लष्करी हल्ले व बॉंबहल्ले करण्याचे आराखडेच काय ते तयार होत होते. हेलिकॉप्टर्स, विमाने, वैमानिक व लष्करी साहित्याची मदत सतत चालू होती. लाओस-व्हिएतनाम सरहद्द, १७ वी अक्षांश रेषा आणि व्हिएतनामची किनारपट्टी अशा तिन्ही अंगांनी दक्षिण व्हिएतनाम सरकारला संरक्षण देण्यासाठी अमेरिकन लष्कर, वैमानिक आणि नाविकदल पहारा देत होते.

हा पहारा देण्याची जी जबाबदारी जॉन्सन राजवटीने अंगावर घेतली, त्यातून टोंकीन उपसागरात एक गंभीर प्रकरण लवकरच उत्पन्न झाले. परंतु या प्रकरणाकडे वळण्यापूर्वी संयुक्त राष्ट्रसंघाचे सरचिटणीस ऊ थांट यांनी जो शांतता प्रयत्न केला त्याची नोंद घेतली पाहिजे. ऊ थांट यांनी जुलै ६४ मध्ये सूचना केली की जिनिव्हा परिषद पुनः भरवून व्हिएतनाम-युद्ध तूर्त स्थगित करावे. मागील अनुभव जमेत धरता अशा परिषदेला हो-चि-मिन्ह मान्यता देण्याची शक्यता यावेळी नव्हती. पण आपणही प्रतिस्पर्धी गोल्डवॉटर

यांच्याइतकेच युद्धसन्मुख आहोत, हे मतदारांना दाखवण्यासाठी अध्यक्ष जॉन्सन यांनी या प्रयत्नाला जाहीरपणे अपशकून केला. ते म्हणाले –

'धाकदपटशाल पाठीशी घालण्यासाठी भरणाऱ्या असल्या परिषदांवर आमचा विश्वास नाही. आमचे धोरण आहे तेच राहणार.'

## अमेरिकेचा खोटा कांगावा

२ ऑगस्ट १९६४ या दिवशी 'मॅडॉक्स' ही अमेरिकेची विनाशिका व्हिएतनाम किनाऱ्यापासून तीन मैल अंतरावर टोंकीनच्या आखातात शिरली. ही विनाशिका तेथे काय करीत होती? 'मॅडॉक्स' ही एकच बोट तिथे होती का? दक्षिण व्हिएतनामी निशाण फडफडवणाऱ्या बोटी टोंकीन आखातात उत्तर व्हिएतनामवर चोरटे हल्ले करण्यासाठी घुसत असत. त्यांना संरक्षण देण्यासाठी ही विनाशिका आंतरराष्ट्रीय समुद्रपट्टीत कायमची फिरत असे. या दिवशी याच कामगिरीवर ही विनाशिका होती. बरोबर तिची बहीण 'टर्नर' ही बोट देखील होती.

या विनाशिकेच्या मागावर उत्तर व्हिएतनामच्या तीन टॉरपेडो पाणबुड्या होत्या. या टॉरपेडो बोटींनी विनाशिकेला त्या दिवशी घेरले व टॉणपेडो मारले असे म्हणतात. परंतु विनाशिकेला काहीच झाले नाही. उलट अमेरिकन विमानांनी उत्तर व्हिएतनामच्या एका बोटीचेच नुकसान केले. तिन्ही पाणबुड्या मात्र पसार झाल्या.

अमेरिकेच्या विनाशिकेवर ती आंतरराष्ट्रीय हद्दीत उभी असताना उत्तर व्हिएतनामच्या टॉरपेडो बोटी हल्ला करतात हे कानावर येताच अध्यक्ष जॉन्सन म्हणे संतापले. त्यांनी ३ ऑगस्टला हुकूम सोडला –

१) किनारपट्टीचा पहारा चालूच राहिला पाहिजे.

२) विनाशिकांची संख्या दुप्पट करा.

३) विनाशिकांच्या संरक्षणासाठी विमानदल द्या!

४) कुणी शत्रूचे जहाज व टॉरपेडो बोट वाटेला जाईल तर त्यावर हल्ला करून शत्रूच्या बोटी नष्ट करा.

खरी परिस्थिती काय होती? १७ व्या अक्षांश रेषेच्या उत्तरेला किनाऱ्यापासून २०० मैल आत समुद्रात उत्तर व्हिएतनामच्या ताब्यात असलेले एक छोटेसे बेट होते. त्यावर काही दिवसांपूर्वी दक्षिण व्हिएतनामी बोटींनी हल्ला केला होता. तिथे काय नुकसान झाले ते पाहण्यासाठी तीन उत्तर व्हिएतनामी टॉरपेडो बोटी चालल्या होत्या. त्यांना अमेरिकेची विनाशिका दिसली. हल्ला करून परतणारे हेच ते जहाज आहे या कल्पनेने त्यांनी टॉरपेडो सोडले. परंतु चूक लक्षात येताच पळ काढला होता.

४ ऑगस्टला रात्रौ ९ वाजता पुनश्च ‘मॅडाक्स’ व ‘टर्नर’ या बोटीवरून संदेश येऊ लागले की बोटीवर उत्तर व्हिएतनामी पाणबुड्या हल्ला सुरू करण्याच्या प्रयत्नात आहेत. जॉन्सन यांनी धमकी देऊन चोवीस तास होतात न होतात तोच उत्तर व्हिएतनामच्या नाविक दलाने पुन्हा एकदा अमेरिकेच्या विनाशिकांच्या वाटेला जाण्याचे धैर्य दाखवावे, याचा विलक्षण संताप मॅकनामारा यांना आला. त्यांनी अध्यक्षांकडे हुकूम मागितला की, ‘बदला घेण्याची परवानगी द्या!’

अध्यक्ष जॉन्सन यांनी ताबडतोब परवानगी दिली आणि १७ व्या अक्षांश रेषेच्या उत्तरेकडे किनारपट्टीवर पूर्वीच पाहणी करून मुक्रर केलेल्या ठिकाणावर अमेरिकेच्या ६४ विमानांनी पाठोपाठ बाँबहल्ले केले. बारा तासात इतक्या वेगाने हे सर्व घडले की मुळात ४ ऑगस्टला रात्री हल्ला झाल्याची आवई ही बनावट असावी, या आरोपाला जागा राहते. राजकीय कारणासाठी अध्यक्ष जॉन्सन यांना – हम भी कुछ कम नही असे गोल्डवॉटर यांना बहुधा बजावायचे होते. अमेरिकेने उत्तर व्हिएतनामवर केलेला हा पहिला बाँबवर्षाव! यात उत्तर व्हिएतनामचे तीन नाविकतळ उद्ध्वस्त झाले. पंचवीस बोटी बुडाल्या. तेलसाठे धडाधड पेटले.

## अमेरिकन काँग्रेस जाळ्यात आली.

हल्ला सुरू झाल्याचा संदेश मिळताच अध्यक्ष जॉन्सन, दूरचित्रवाणीवर जनतेला सांगते झाले –

‘आम्ही नियंत्रित परंतु योग्य असे उत्तर दिले आहे. अजूनही मोठे युद्ध सुरू करण्याची मात्र आमची इच्छा नाही.’

एकीकडे जॉन्सन हे सांगत होते तरी प्रत्यक्षात सहा महिन्यापूर्वी ‘मॅकव्ही’ संघटनेने तयार केलेल्या आराखड्यानुसार कार्यवाही आता सुरूच झाली. जेट विमाने, बाँबर विमाने, फायटर विमाने यांचे काफिले सायगावच्या दिशेने उडू लागले. आता अडचण एकच होती. अमेरिकेच्या काँग्रेसच्या पाठिंब्याशिवाय अध्यक्षांना असे हल्ले सुरू करता येत नव्हते. काँग्रेसचा पाठिंबा मिळवण्यासाठी लगेच हालचाल सुरू झाली.

७ ऑगस्टला अमेरिकन काँग्रेसपुढे तशा अर्थाचा ठराव आला. उत्तर व्हिएतनामी पाणबुड्या बोटींनी अमेरिकेच्या विनाशिका बुडविण्याचा प्रयत्न केला तेव्हा त्यांना लक्षात राहील अशी अद्दल घडविण्यासाठीच काय ते बाँबहल्ले केले, अशा अर्थाचा इतका प्रचार झाला होता की काँग्रेसने जॉन्सनसाहेबाने जे काही केले त्याला पाठिंबा दिलाच, शिवाय पुढल्या कारवाईसाठीही कोरा चेक दिला.

या ठरावाचे दोन भाग आहेत. पहिल्या भागात म्हटलेले आहे –

‘सर्व सेनादलाचा कमांडर-इन्-चीफ या नात्याने अमेरिकेच्या अध्यक्षांना अमेरिकेच्या दलाविरुद्ध कुणी लष्करी आक्रमण केल्यास ते परतवण्यासाठी व पुन्हा आक्रमण घडू नये या दृष्टीने आवश्यक ती सर्व उपाययोजना करण्याचे अधिकार ही सिनेट व काँग्रेसची संयुक्त सभा देत आहे.’

दुसऱ्या भागात म्हटले आहे – ‘अमेरिकेची राज्यघटना, संयुक्त राष्ट्रसंघाचा जाहीरनामा आणि सेटो करारानुसार येणारी कर्तव्ये या सर्वांना अनुसरून अध्यक्ष ठरवतील त्यानुसार जागतिक शांततेसाठी सेनासामर्थ्याचा उपयोग ज्यात अंतर्भूत आहे असे कोठलेही उपाय योजण्यास ही सभा संमती देत आहे.’

ज्या ४ ऑगस्टच्या तथाकथित हल्ल्यातून हे सर्व प्रकरण इतक्या थराला नेण्यात आले, तो ४ ऑगस्टचा हल्ला प्रत्यक्षात झालेलाच नाही, याबद्दल आता सर्वसाधारणपणे सर्व जबाबदारी व्यक्ती एकमत व्यक्त करतात. मॅकनामारा यांचे एक सहाय्यक चेस्टर कूपर हे ‘दि लॉस्ट क्रुसेड’ या आपल्या पुस्तकात सांगतात –

‘टोंकीन आखातातील या प्रसंगाने अमेरिकन काँग्रेसचा पाठिंबा व विस्तृत अधिकार या गोष्टी अध्यक्ष जॉन्सन यांच्या पदरात पडल्या, आणि निवडणुकीच्या वर्षात हे घडल्याने त्याचे महत्त्व विशेषच राहिले. मात्र ज्या परिस्थितीत व पद्धतीने हे सर्व घडले त्यामुळे अध्यक्ष व काँग्रेसचे सभासद यांच्यात संशयाची बीजे पेरली गेली. अमेरिकन शासन आणि जनता यांच्या संबंधातही हेच घडले. काँग्रेसमधील आणि बाहेरील अनेक सज्जनांचे असे अजून मत आहे, की अमेरिकन सिनेट आणि काँग्रेस यांना शासनाने असा निर्णय घेण्यास चतुराईने भाग पाडले.’

यापेक्षा अधिक स्पष्टपणे लिहिणे चेस्टर कूपर यांना शक्यच नाही कारण त्यावेळी ते शासनाचाच घटक होते. परंतु बारकाईने वाचणाऱ्यांना हे लिहिण्यामागचा स्पष्ट अर्थ दिसतो तो असा की ४ ऑगस्टला विनाशिकांवर पुनः हल्ला झाला ही शुद्ध थाप होती! २ ऑगस्टला जो पहिला हल्ला करण्याचा प्रयत्न खरोखर झाला, त्याचा विकृत फायदा अमेरिकेच्या शासनाने व अध्यक्षांनी ४ ऑगस्टला उठवला होता.

अगदी थोड्या वक्त्यांनी ठरावावर बोलताना विरोध केला होता. त्यातले एक म्हणजे सिनेटर बायने मॉर्स. ‘मागली तारीख टाकून केलेली लढाईची घोषणा’ असे या ठरावाचे वर्णन करून सिनेटर मॉर्स यांनी इशारा दिला –

‘या ठरावाने, आपण अध्यक्षांना युद्ध जाहीर झालेले नसतानाही युद्ध करण्याचे अधिकार सुपूर्द करीत आहोत. माझी खात्री आहे की ही एक ऐतिहासिक चूक आहे.’

हा ठराव सिनेटने पुढे २४ जून १९७० रोजी रद्दबादल ठरवला! पण मधल्या काळात व्हायचे ते अनर्थ होऊन गेले होते.

## निवडणुकीवर लक्ष होते

अमेरिकेने अखेर उत्तर व्हिएतनामवर प्रत्यक्ष बाँबवर्षाव केलेला पाहताच जनरल कान्ह याला अत्यानंद झाला! त्याला वाटले की आपण जो 'चलो हनोई', 'चलो उत्तर' हा नारा गेले काही दिवस करीत आहोत, त्याच धोरणाचा हा विजय आहे. युद्धाचे वातावरण निर्माण करण्यासाठी जनरल कान्ह याने १६ ऑगस्टला दक्षिण व्हिएतनामभर 'आणीबाणीची परिस्थिती' जाहीर केली. यामुळे त्याच्या हातात सर्वाधिकार आले. जनरल मिन्ह याला पुन्हा एकदा डच्चू देण्यात आला. या सर्व उगाच केलेल्या हालचालींनी, लोकांचे स्वातंत्र्य धोक्यात येते या कारणावरून विद्यार्थी वर्ग व बौद्ध समाज त्याचप्रमाणे सुशिक्षित कॅथॉलिक समाजही यावेळी रस्त्यावर आला. या चळवळींना भूमिगत व्हिएतकाँगी खतपाणी घालू लागले.

१३ सप्टेंबरला काही लष्करी अधिकाऱ्यांनी जनरल कान्हचीच जवळ जवळ उचलबांगडी केली! दक्षिण व्हिएतनामचा विमानदलप्रमुख जनरल की याने कान्ह याला वाचवले. त्याने सायगाववर विमाने आणून बंडखोरांना सायगाववर बाँब टाकण्याची धमकी दिली. सायगावभोवती सर्व लष्करी यादव्या होत असल्याने, बहुतेक अधिकाऱ्यांनी आपापले लष्कर सायगावच्या परिसरातच ठेवले होते! व्हिएत-मिन्ह सैनिकांशी खेड्यापाड्यांतून लढणार कोण?

ऑगस्ट महिन्यात जॉन्सनसाहेबांनी लढाईची व्याप्ती वाढवण्याची जी तडफ दाखवली, त्याचा मागमूसही त्यांच्या निवडणूक प्रचारसभातून दिसत नव्हता. त्यांच्या भाषणाचा सूर हा बचावाचा असे. न्यू हँपशायर येथील सभेत जॉन्सन म्हणाले –

> 'आपलेच काही लोक सुचवितात की आम्ही उत्तर व्हिएतनाममध्ये घुसत का नाही? दुसऱ्या कुणावर आक्रमण करण्यापूर्वी अथवा मोठी चढाई अंगावर घेण्यापूर्वी जे हातात आहे त्याची आधी नीट व्यवस्था नको का लावायला? तिथे सायगावमध्ये ब्रिगेडियर उठतो, भराभरा पोलीस स्टेशन ताब्यात घेतो, रेडिओ स्टेशनवर अंमल बसवतो आणि बंदुकीची गोळीही न झाडता सरकार उलथवतो! अशा परिस्थितीत चढाई कसली करता?'

याच भाषणात जॉन्सन असेही म्हणाले –

> 'मी काही तुम्हाला व्हिएतनाममध्ये नेले नाही! गेली १० वर्षे तुम्ही तिथे आहातच. १९५४ साली अध्यक्ष आयसेनहॉवर यांनी पंतप्रधान दिएमला पत्र लिहिले. कळवले

की तुम्हाला कम्युनिस्ट व्हावे लागू नये म्हणून आम्ही मदत करतो, मदत देतो – तेव्हापासून आपण तेथे आहोत.'

प्रश्न हा होता की दहा वर्षाच्या अनुभवानंतर तरी अमेरिका व्हिएतनाममधून बाहेर पडू इच्छित होती की नवे अध्यक्ष तिला अधिक गुंतवीत चालले होते? अर्थात मागच्या राजवटीवर चुकांचे खापर फोडून मोकळे होण्याचा प्रयत्न राज्यकर्ते नेहमीच करतात.

सायगावहून ऑक्टोबर ६४ मध्ये एक चांगली बातमी तेवढ्यात आली. एक तात्पुरत्या स्वरूपाची राज्यघटना तयार करण्यात, त्यासाठी नेमलेल्या समितीला अखेर यश आले होते. लष्करी अधिकाऱ्यांची सुंदोपसुंदी संपून तेथे जनतेच्या प्रतिनिधींचे एक सरकार अधिकारावर आले. त्यासाठी नागरिकांच्या प्रतिनिधींचे एक कौन्सिल तयार करण्यात आले. फान-सू हा वृद्ध व सतत आजारी असलेला माणूस अध्यक्ष निवडला गेला व पंतप्रधान म्हणून त्रान-व्हान-हुआँग याची निवड झाली. अर्थात खरी सत्ता जनरल कान्ह याने आपल्या हातात ठेवून ही बाहुली उभी केली असली, तरी सायगाव सरकारचा तोंडवळा आता लष्करी उरला नव्हता.

## बिन्ह-होआवर हल्ला

या नव्या सरकारला व्हिएतकाँगींनी ऑक्टोबरच्या अखेरीस मोठा दणका दिला. बिन्ह-होआ येथे अमेरिकेचा सर्वात मोठा विमानतळ होता. या विमानतळावर व्हिएतकाँगींनी जबर हल्ला चढवून बी ५७ जातीची सात बॉम्बर विमाने नष्ट केली व २३ अमेरिकन सैनिकांना कंठस्नान घातले. जनरल टेलर यांनी याचा बदल घेण्यासाठी वॉशिंग्टनला उत्तर व्हिएतनामवर पुनश्च बाँबफेक करण्याची परवानगी द्यावी असे सुचवले. पण वॉशिंग्टनमध्ये निवडणुकीची इतकी धामधूम होती की बिन्ह-होआवरील गंभीर हल्ल्याची दखल घ्यायला तिथे कुणालाच वेळ नव्हता.

याचा अर्थ बिन्ह-होआवरील हल्ल्यानंतर जॉन्सन स्वस्थ बसले असा मात्र नव्हे. १ नोव्हेंबरला अध्यक्षांनी सिनेटर विल्यम बुंडी याच्या नेतृत्वाखाली एक मंडळ नेमले. या मंडळाकडे काम सोपवण्यात आले की त्यांनी उत्तर व्हिएतनामवर राजकीय व लष्करी अशा दोन्ही प्रकारच्या हल्ल्यांचे निरनिराळे पर्याय अभ्यासावे व अहवाल द्यावा.

३ नोव्हेंबर १९६४ ला अध्यक्ष जॉन्सन हे प्रचंड बहुमताने अमेरिकेचे अध्यक्ष निवडले गेले! केनेडीच्या मृत्यूसमयी उपाध्यक्ष असल्याने अध्यक्ष झालेले जॉन्सन हे तोपर्यंत कामचलाऊ अध्यक्षच होते. आता मात्र त्यांना जनतेच्या पाठिंब्याची, बहुमताची साथ सुरू झाली.

## बुंडी कमिशनचे पर्याय

२१ नोव्हेंबरला बुंडी-कमिशनने आपला अहवाल अमेरिकेच्या सिक्युरिटी कौन्सिलला दिला. यात जे तीन पर्याय सुचवण्यात आले, त्या तिन्ही पर्यायात कमीअधिक प्रमाणात उत्तर व्हिएतनामवर फक्त बाँबफेक सुचवलेली आढळते. पर्याय असे होते –

पर्याय अ –

बिन्ह-होआप्रमाणे व्हिएतकाँगी हल्ला करतील तेव्हाच केवळ नव्हे, तर झाल्या प्रकाराचा सूड म्हणून उत्तर व्हिएतनामवर अधूनमधून बाँब टाकावे. टोंकीन आखातात विनाशिकांचा पहारा चालूच ठेवावा. लाओसमध्ये व्हिएतकाँगींचे तळ आहेत त्यावर बाँब टाकावे व एकीकडे दक्षिण व्हिएतनाम सरकारला राज्यकारभारात सुधारणा करण्यास भाग पाडावे.

पर्याय ब –

जलद गतीने व अखंडपणे उत्तर व्हिएतनामवर बाँबफेक करावी. हनोईजवळचे विमानतळ व पूल उद्ध्वस्त करावे. चीनबरोबरच्या रेल्वे वाहतुकीवर बाँब टाकावे. याचवेळी काय अटीवर समझोता होईल यासंबंधी चर्चा चालू ठेवावी.

पर्याय क –

प्रथम लाओसमधील उत्तर व्हिएतनामी तळांवर व नंतर प्रत्यक्ष उत्तर व्हिएतनाममधील लष्करी तळांवर बाँबफेक करावी. हे हल्ले वाढवावयाचे झाले अथवा युद्धाची कक्षा मोठी करायची झाली, तर हे सर्व अमेरिकेच्या हातात राहण्याच्या दृष्टीने हा मार्ग सर्वोत्तम आहे.

सेक्रेटरी ऑफ स्टेट डीन रस्क, संरक्षणसचिव मॅकनामारा, जनरल व्हीलर व सिक्युरिटी कौन्सिलचे सभासद यांनी २४ नोव्हेंबरला पर्यायावर विचार सुरू केला. चर्चा चालू असतानाच अमेरिकेचे सायगावमधील नवे वकील जनरल टेलर हे २७ नोव्हेंबरला वॉशिंग्टनला आले व या चर्चेत सामील झाले. या चर्चेतून अखेरीस जो निर्णय तयार झाला तो विल्यम बुंडी यांनी लिहून काढला व १ डिसेंबर १९६४ रोजी अध्यक्ष जॉन्सन यांच्यापुढे ठेवला. हा निर्णय असा होता –

‘बाँबहल्ले सुरू करावे. परंतु त्यांच्या तीव्रतेत व संख्येत हळूहळू परिस्थिती असेल त्यानुसार वाढ करावी. १९ व्या अक्षांश रेषेखाली व १७ व्या अक्षांशरेषेवर असलेल्या पट्ट्यात घुसखोरांची ठिकाणे ही बाँबहल्ल्याच्या माऱ्याची स्थळे असावीत. पुढे आवश्यकतेनुसार उत्तर व्हिएतनामच्या बंदरात सुरूंग पेरणे, बंदराची नौदलाकरवी नाकेबंदी करणे व उत्तर व्हिएतनामच्या इतर लष्करी तळांवर बाँबवर्षाव करणे अशा

प्रकारचे उपाय योजावे लागतील. हे चालू असतानाच हनोई सरकार समझोता करू इच्छिते किंवा काय यावर नजर ठेवावी व अमेरिकेच्या हेतूंची साध्यता होणार असेल तर वाटाघाटीचा मार्ग चोखाळावा.'

उत्तर व्हिएतनामवर बाँबहल्ले सुरू करण्याचा निर्णय अध्यक्षांनी दिक्षिण १-१२-६४ रोजीच घेतला. आखलेल्या आराखड्यानुसार सुरुवातीचे हल्ले कमी प्रखर राहणार होते. तरीसुद्धा याची पूर्वसूचना सर्व मित्र राष्ट्रांना द्यायला हवी होती. विल्यम बुंडी हे स्वतः ४ डिसेंबरला न्यूझीलंड व ऑस्ट्रेलिया येथील राजकारण बाँबहल्ल्यांना अनुकूल करण्यासाठी, दौऱ्यावर रवाना झाले. ब्रिटनचे पंतप्रधान हॅरॉल्ड विल्सन हे ७ डिसेंबरला अमेरिका भेटीसाठी आले असताना, त्यांच्या कानावर हा निर्णय घालण्यात आला. अमेरिकन वकिलामार्फत कॅनडा व आशियातील देशप्रमुखांना ही गोष्ट कळविण्यात आली. वकिलामार्फत कॅनडा व आशियातील देशप्रमुखांना ही गोष्ट कळविण्यात आली. लाओसमधील अमेरिकेचे वकील सुलीव्हन यांनी पंतप्रधान सुवाना फूमा याला १० डिसेंबरला यासंबंधी माहिती दिली.

व्हिएतकाँगी व दक्षिण व्हिएतनाममध्ये घुसलेले व्हिएत-मिन्ह सैनिक यांना सामग्रीपुरवठा करणारा मार्ग जो 'हो-चि-मिन्ह' मार्ग म्हणून प्रख्याती पावला होता, हा मुख्यतः लाओसमधून जात होता व या मार्गावर प्रथम बाँबहल्ले सुरू होणार होते. यामुळे लाओसचे पंतप्रधान सुवाना फूमा यांना विश्वासात घेणे अगदी अगत्याचे होते. अमेरिकेने ही जी कारवाई आखली होती त्याचे नाव होते – ऑपरेशन बॅरल रोल!

१४ डिसेंबर १९६४ या दिवशी 'ऑपरेशन बॅरल रोल' ची अंमलबजावणी सुरू झाली. उत्तर व्हिएतनामींनी एखादे विमान पाडीपर्यंत अमेरिकेची विमाने बाँबफेक करीत आहेत, ही गोष्ट मान्यच करायची नाही असा आदेश दिला गेला होता. जर कुणी लाओसवर अमेरिकन विमाने का जातात असे विचारले तर लाओस सरकारच्या विनंतीवरून ती पाहणी करीत होती असे सांगण्याचे ठरवण्यात आले.

## जनरल टेलरचा जमालगोटा

वॉशिंग्टनमध्ये झालेला महत्त्वाचा निर्णय खिशात ठेवून अमेरिकेचा वकील जनरल टेलर सायगावला परतला, तोच तिथे गडबड सुरू झाली. पंतप्रधान हुआँग विरुद्ध बौद्धधर्मीयांची व विद्यार्थ्यांनी निदर्शने सुरू झाली. हुए येथील युसिसचे ग्रंथालय बौद्ध विद्यार्थ्यांनी जाळून टाकले! याचा फायदा घेऊन जनरल कान्ह याने दिक्षिण २० डिसेंबरला सत्ता पुनः लष्कराच्या हाती घेण्याचा डाव टाकला. सैन्यातील काही 'तरुण तुर्कांना' हाताशी धरून त्याने पंतप्रधान व अध्यक्ष यांना निवडणारे नॅशनल कौन्सिलच बरखास्त केल्याचे जाहीर केले. लगेच त्याने काही राजकीय धरपकडही सुरू केली.

जनरल टेलर याने याच दिवशी गडबड करू पाहणाऱ्या सर्व लष्करी तरुण तुर्कांना पाचारण केले. या जमलेल्या मंडळीतच जनरल की होता आणि पुढे दक्षिण व्हिएतनामचा अध्यक्ष झालेला जनरल थियू हा देखील होता.

व्रात्य पोरांची हजेरी घ्यावी तशी जनरल टेलर याने सर्वांची हजेरी घेतली. तो कडाडला –

'सगळ्यांना इंग्लिश समजतं की नाही?'

काहींनी माना हलवल्या. काहींनी 'येस् येस्' केले.

मग जनरल टेलरने साग्रसंगीत हजेरी सुरू केली –

'जनरल वेस्टमोरलँड यांच्याकडे भोजनासाठी रात्री तुम्ही जमला होता त्याच दिवशी मी तुम्हाला स्पष्ट सांगितले होते की आम्हा अमेरिकनांना आता तुमच्या या लष्करी कटांचा कंटाळा आलेला आहे. मी हे सर्व हवेत बोललो काय? कदाचित मी फ्रेंचमधून बोललो आणि माझे फ्रेंच तितकेसे बरे नसल्याने तुम्हाला कळले नसेल. मी अगदी परखडपणे सांगितले होते की तुमच्या सरकारच्या स्थिरतेवर सर्व लष्करी कारवाईचे यश अवलंबून आहे आणि तुम्ही हे काय चालवलं आहे? नुसता गोंधळ! लक्षात ठेवा, तुम्ही असे वागणार असाल तर आम्ही काही तुम्हाला आधार देऊ शकणार नाही.'

## पण कान्ह ऐकेना

जनरल टेलर याचे बोलणे वाया गेले. तरुण तुर्कांनी आपलाच हट्ट चालवला आणि पंतप्रधान हुआँग याची राजवट २७ जानेवारी ६५ ला रात्री संपवून टाकली! जनरल कान्ह हा राष्ट्रप्रमुख झाला! अमेरिकेच्या वकिलाने दिलेल्या व्याख्यानाला जनरल कान्ह हा स्वतः हजर नव्हता. जेव्हा त्याला टेलरने केलेला तमाशा कळला तेव्हा तो भडकला. २२ डिसेंबरला त्याने लष्करी पत्रक काढून जाहीर केले –

> 'देशाच्या स्वातंत्र्यासाठी आम्ही पडेल तो त्याग करीत आहोत – यापुढे करू – परंतु परकीय देशाचे धोरण राबवायला आम्ही बांधील नाही!'

दक्षिण व्हिएतनाममध्ये हा सत्तेचा खोखो पूर्वीप्रमाणेच चालू असताना अमेरिकेने मात्र उत्तर व्हिएतनामवर बॉंबफेक सुरू करून, व्हिएतनाममधील युद्धात खोलखोल रुतत जाण्याच्या दिशेने वाटचाल करावी, या दोन्ही गोष्टी एकदम पुढे आल्याने, अमेरिकेतील लोकमताला हेलकावा मिळाला. जॉन्सन सरकारवर वृत्तपत्रे आग पाखडू लागली. सिनेटर मंडळींनी अमेरिकन काँग्रेसमध्ये चर्चेची मागणी केली. या मागणीचा जोर विलक्षण वाढला. कारण १४ जानेवारी १९६५ रोजी लाओसवर घिरट्या घालणारी दोन अमेरिकन विमाने व्हिएतकाँगींनी अखेर खाली पाडली! लाओसवर अमेरिकन विमाने का जातात?

अमेरिकन तरुणांचे बळी निष्कारण का दिले जात आहेत? असे अडचणीत टाकणारे प्रश्न चौफेर विचारले जाऊ लागले.

इथे एक गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे की अमेरिकेची विमाने उत्तर व्हिएतनाम व लाओसमधून जाणाऱ्या हो-चि-मिन्ह रसद मार्गावर बाँबफेक करू लागल्याचे वृत्त अजून अमेरिकेच्या अध्यक्षांनी लपवून ठेवलेले होते.

## हा तर जंगलचा कायदा

१९ जानेवारी १९६५ या दिवशी सिनेटपुढे बोलताना जॉन्सनचा पूर्वीचाच विरोधक सिनेटर मॉसे म्हणाला –

> ‘१९६२ चा जिनिव्हा करार धाब्यावर बसवून अमेरिकेची विमाने लाओसवर हल्ला करीत आहेत. लष्करी बळाच्या जोरावर अमेरिका जंगलचा कायदा निर्माण करीत आहे. हे असेच चालू राहिले तर आशियात मोठे युद्ध अटळ आहे.’

एकेकाळी सेक्रेटरी ऑफ स्टेट या पदावरून डल्लेस यांनी अमेरिकेचे परराष्ट्रीय राजकारण विवक्षित दिशेने कसे रेटले होते याची हकीगत पूर्वीच्या निवेदनात येऊन गेली आहे. व्हाईट हाऊसमध्ये आता परिस्थिती निराळी होती. सेक्रेटरी ऑफ स्टेट डीन रस्क हे बरेच मवाळ गृहस्थ होते. याउलट संरक्षण सचिव मॅकनामारा हे आता मोठ्या प्रमाणावर अमेरिकेने व्हिएतनाम संघर्षात उतरावे यासाठी प्रयत्नशील होते. रस्क-मॅकनामारा हे अध्यक्ष जॉन्सन यांना दोन विरुद्ध दिशेने खेचीत असल्याने जॉन्सन हे प्रत्यक्षात काहीही जोराची हालचाल करू शकत नाहीत, अशी परिस्थिती निर्माण होत होती. यातून मार्ग काढण्यासाठी जॉन्सन यांनी २ फेब्रुवारी १९६५ रोजी मॅकजॉर्ज बुंडी व चेस्टर यांना सायगावला रवाना केले.

ज्या दिवशी मॅकजॉर्ज बुंडी याचे विमान सायगावला उतरले, त्याच दिवशी सोव्हिएट रशियाचे पंतप्रधान कोसिजिन यांनी हनोई भेटीची जाहिरात फडकावली. बुंडी यांच्याबरोबर सायगावला आलेले चेस्टर कूपर आपल्या पुस्तकात सांगतात –

‘डझनभर विद्यार्थी प्रतिनिधींशी माझी मुलाखत झाली. यातील वेगवेगळे युवक वेगवेगळ्या घोषणा करणारे होते. परंतु घोषणा आणि प्रत्यक्ष कार्यक्रम यातले अंतर कसे तोडावे याची कुणालाच कल्पना नव्हती. अनेक गोष्टींना त्यांचा विरोध होता. पण त्यांना नेमके काय हवे आहे ते मात्र कळत नव्हते. नॅशनल लिबरेशन फ्रंट या दक्षिण व्हिएतनाम सरकारच्या शत्रूशी कसलाही समझोता न करता, त्याच्याशी लढण्याची भाषा काही करीत होते. काही जणांची सैन्यात भरती होण्याची इच्छा होती, काहींनी अमेरिकेनेच सर्व युद्ध

चालवावे असे सुचवले, तर काहींनी अमेरिकेने ताबडतोब दक्षिण व्हिएतनाममधून निघून जावे असा आग्रह धरला.

'आम्ही प्रत्यक्ष जे पाहात होतो आणि सरकारीरित्या जे सांगण्यात येत होते त्यानुसार एक गोष्ट स्पष्ट दिसत होती की दक्षिण व्हिएतनाममधील सर्व खेड्यापाड्यांतून व्हिएतकाँगीचा जोर होता आणि खुद्द सायगावच्या परिसरात व्हिएतकाँगींची दहशत निर्माण झालेली होती.

## प्लैकू येथील चढाई

७ फेब्रुवारीला रविवार होता. मॅकजॉर्ज बुंडी यांनी अमेरिकेच्या आर्थिक व लष्करी मदत योजना प्रत्यक्ष नजरेखालून घालण्याकरता निरनिराळ्या ठिकाणच्या केंद्रांना भेटी देण्यासाठी सायगावबाहेर जायचे ठरवले होते. पण सकाळ होते न होते तोच वृत्त आले की, 'प्लैकू' या मध्य व्हिएतनाममधील अमेरिकेच्या लष्करी बराकीवर व्हिएतकाँगींनी जबर हल्ला चढवून ९ अमेरिकन सैनिक ठार केले व सुमारे १०० घायाळ केले आहेत! 'मॅकव्ही' कचेरीत या वृत्ताने एकच गोंधळ उडाला.

प्लैकू येथे व्हिएतकाँगींनी चढवलेल्या आकस्मित हल्ल्यामुळे व्हिएतनाममधील युद्धाने एकदम दुर्दैवी वळण घेतले. हल्ला झाल्यापासून पुरते १४ तास उलटायच्या आत अमेरिकेचा ४९ बाँबर जेट विमानांचा काफिला ७ व्या आरमारातील विमानवाहू बोटीवरून अंतराळात झेपावला आणि १७ व्या अक्षांश रेषेपलीकडे सुमारे चाळीस मैलांपर्यंत आत घुसून उत्तर व्हिएतनाममध्ये बाँबवर्षाव करू लागला. व्हाईट-हाऊसमधून अध्यक्ष जॉन्सन यांच्या अनुमतीने निघालेले यासंबंधीचे पत्रक वॉशिंग्टन रेडिओने ७ फेब्रुवारी १९६५ ला प्रसृत केले. यात म्हटले होते –

'हनोई सरकार ज्या ठिकाणाहून दक्षिण व्हिएतनाममध्ये व्हिएतकाँगी सैनिक घुसवते, अशा सर्व केंद्रांवर अमेरिकेच्या विमानांनी बाँबहल्ला करावा असा आदेश दिला गेला आहे. हनोई राजवटीने जो आक्रमक पवित्रा घेतला आहे त्याचा वचपा घेण्यासाठी म्हणून हा बाँबहल्ला सुरू करण्यात आला आहे.

'अमेरिकेने हे पुनः पुन्हा स्पष्ट केले आहे की युद्धव्यापी वाढवण्याची आमची इच्छा नाही परंतु हे घडवणे न घडवणे हे उत्तर व्हिएतनामी आक्रमकावर अवलंबून आहे. ही परिस्थिती पालटवणे हे उत्तर व्हिएतनामच्याच हातात आहे. त्यांनी उत्तर व्हिएतनाममधून होणारी घुसखोरी थांबवून शेजारी राष्ट्रावरील आक्रमण बंद केले तरच हे शक्य आहे.'

## शोकांतिकेची सुरुवात

अमेरिकेने हा जो मोठा विमानहल्ला तडकाफडकी चढवला त्याची सर्व पूर्वतयारी ‘ऑपरेशन फ्लेमिंग डार्ट’ या गुप्त नावाखाली पूर्ण झालेली होती. विमान फक्त इशाऱ्याचीच वाट पाहात होती. हा इशारा ७ फेब्रुवारी १९६५ ला आला आणि अमेरिकेने तत्क्षणी व्हिएतनामच्या युद्धात उघडपणे पदार्पण केले.

शोकांतिकेची ही सुरुवात होती.

n

# २० : नाटकी शिखर बैठका । अर्थशून्य संयुक्त पत्रके

७ फेब्रुवारी १९६५. या दिवशी व्हिएतनामच्या लढ्यात अमेरिका सर्वार्थाने सरळसरळ उतरली. अमेरिकेने उत्तर व्हिएतनामवर सुरू केलेल्या तुफानी बाँबवर्षावाचा हाच नागडा अर्थ होता. अमेरिकेच्या व्हिएतनाम धोरणाबाबत जगात जी थोडीफार सहानुभूती, काही काही ठिकाणी शिल्लक होती, ती या बाँबवर्षावाच्या पहिल्या लोळात जळून खाक झाली. उत्तर व्हिएतनामपाशी हवाईदल असे नव्हतेच आणि या हवाईहल्ल्याचा परिणामकारक प्रतिकार सर्वथैव अशक्य होता. जिथे कसलाही प्रतिकार शक्य नाही, अशा आकाशात भराऱ्या मारून मुलूखच्या मुलूख बेचिराख करत राहण्यात कुठला पुरुषार्थ होता?

## सूडाचे लंगडे समर्थन

आपण सुरू केलेला हा विद्ध्वंस आपल्या देशाला शोभा देणार नाही याची खंत अध्यक्ष जॉन्सन यांना होती. म्हणूनच या निर्णयाचे समर्थन करण्यासाठी ते आता पूर्वीच्या अध्यक्षांचा आडोसा शोधू लागले. ३१ मार्चला दिलेल्या एका वार्ताहर परिषदेत जॉन्सन यांनी तुणतुणे वाजवले –

'व्हिएतनाममधील आमचे आजचे धोरण हे अध्यक्ष आयसेनहॉवर आणि अध्यक्ष केनेडी यांच्या धोरणांचाच अटळ पुढचा भाग आहे. शस्त्रे बदलली असतील, प्रसंग निराळे असतील, परंतु आमचे धोरण तेच आहे. आमच्यावर कुणी शस्त्राघात करील तर आमच्या सेना त्याला चोख उत्तर देतील!

हीच तबकडी अमेरिकेचे अध्यक्ष यापुढेही वाजवत राहिले. परंतु अमेरिकेचे सैन्य दक्षिण व्हिएतनाममध्ये आले ते कोणत्या न्यायाने, याचे उत्तर या समर्थनात मुळी अंतर्भूतच नव्हते.

प्रथम प्रथम हे बाँबहल्ले उत्तर व्हिएतनामविरुद्ध सूडाच्या भावनेने केले जात आहेत, असे जगाला भासवण्याचा प्रयत्न अमेरिकेने सुरू केला. दक्षिण व्हिएतनाममध्ये व्हिएतकाँगी जे अत्याचार करतात, त्याचा 'कटलॉग' अमेरिकेची वृत्तपत्रे व रेडिओ देऊ लागली. 'व्हिएतकाँगींनी दानांग बंदरात सुरूंग पेरले, होईआन येथे उतारू बस लुटली, शाळेवर बाँब फेकला...' अशा या अत्याचारांच्या बातम्या रोज दिल्या जाऊ लागल्या, परंतु याचा अमेरिकेतील जनतेवर उलट परिणाम होऊ लागला! ५०,००० हून अधिक अमेरिकेचे सैन्य दक्षिण व्हिएतनाममध्ये असताना, व्हिएटकाँगींचा बंदोबस्त त्यांना का करता येऊ नये? आणि यासाठी उत्तर व्हिएतनामवर बाँबफेक करून ही गनिमी लढाई

कशी काय जिंकणार? असे हे प्रश्न होते. शेवटी सूड उगवण्यासाठी सुरू केलेली बाँबफेक ज्या गुप्त आराखड्यानुसार सुरू केली होती ती 'फ्लेमिंग डार्ट' योजना बदलण्यात आली. 'रोलिंग थंडर' (थडाकेबंद गडगडाट) ही नवी योजना कागदोपत्री लिहिण्यात आली. या नव्या धोरणानुसार, बाँबफेक का सुरू केली याचे मुत्सद्दी उत्तर अमेरिकेच्या अध्यक्षीय प्रासादात तयार झाले. जनरल टेलर यांनी पुढे वर्षभराने याचा जाहीर उच्चार केला. बाँबफेकीची सरकारी उद्दिष्टे ठरली –

१) दक्षिण व्हिएतनामी जनतेला दिलासा मिळावा की ज्या ठिकाणावरून त्यांच्यावरील आक्रमणाचे मनसुबे रचले जातात, त्या उत्तर व्हिएतनामवर आम्ही आग ओकीत आहोत.

२) उत्तर व्हिएतनाममधून दक्षिण व्हिएतनाममध्ये घुसणाऱ्या घुसखोरांना पायबंद घालण्यासाठी बाँबफेक आवश्यक आहे.

३) हनोई येथील पुढाऱ्यांना हे कळले पाहिजे की दक्षिणेतील व्हिएतकाँगींना ते पाठिंबा देत राहतील, तर त्याची अधिकाधिक किंमत त्यांना मोजावी लागणार आहे.

म्हणजे हनोई येथील हो-चि-मिन्ह याला गुडघे टेकायला लावण्यासाठी उत्तर व्हिएतनामवरील बाँबफेकीचा सर्व खटाटोप होता असा याचा अर्थ होता. मग यासाठी इतके दिवस अमेरिकेने वाट पाहाण्याची तरी काय गरज होती?

## अमेरिकेत चटके बसू लागले

आठवड्यागणिक अमेरिकेच्या बाँबहल्ल्यांची प्रखरता व जोर वाढवण्यात येऊ लागला. याचा परिणाम उत्तर व्हिएतनामची खेडीपाडी पेटू लागली, परंतु याचे चटके जॉन्सनसाहेबांनाच अमेरिकेत बसू लागले. मार्च महिन्यातच अमेरिकेतील विश्वविद्यालयातून अमेरिकेच्या या बाँबहल्ल्यांना विरोध करणारी निदर्शने विद्यार्थ्यांनी सुरू केली. मार्टीन ल्युथर किंग या अमेरिकेतील गांधी म्हणून ओळखल्या जाणाऱ्या निग्रो नेत्याने या युद्धाचे वर्णन 'It is America's tragic distraction' असे केले. (अमेरिकेची दुःखद धूळफेक)

केवळ अमेरिकेचीच नव्हे तर अध्यक्षांचीही ही दुःखांतिका ठरू लागली. सुमारे वर्षभरापूर्वी निवडणुकीत लाभलेली लोकप्रियता ओसरू लागल्याची चिन्हे दिसू लागली. अमेरिकेत सरकारने आपले व्हिएतनाममधील धोरण विषद करणारी एक श्वेतपत्रिका प्रसिद्ध केली. यामुळे तर सरकारचे सर्वत्र हसे सुरू झाले. श्वेतपत्रिकेत उत्तर व्हिएतनाम किती भयंकर शत्रू आहे याची माहिती देताना सांगितले होते – 'चिनी बनावटीच्या तीन बंदुका, सोव्हिएट बनावटीच्या सेहेचाळीस बंदुका, चाळीस मशिनगन्स आणि झेक

बनावटीचे एक पिस्तुल, अशी हत्यारे अमेरिकेच्या सैन्याने आतापर्यंत पकडलेल्या व्हिएतनाम सैनिकांकडून जप्त केलेली आहेत.'

वृत्तपत्रे विचारू लागली. 'यासाठी बाँबफेक कशाला?' श्वेतपत्रिकेत दक्षिण व्हिएतनाममधील भूमिगत काँगींना हनोई सरकार मदत करते याचा बराच कांगावा होता. याला उद्देशून न्यूयॉर्क टाईम्सने प्रश्न केला. '१९६१ सालापासून ८६० मिलियन डॉलर्स अमेरिकेने दक्षिण व्हिएतनामवर आतापर्यंत मदत म्हणून ओवाळून टाकले त्याचे काय?'

## सायगावची लाथाळी पुढे चालू

या बाँबहल्ल्यामुळे दक्षिण व्हिएतनामी जनतेला काय दिलासा मिळाला तो कुणास ठाऊक, परंतु दक्षिण व्हिएतनाम सरकारमधील लाथाळी पूर्ववत चालूच राहिली. पंतप्रधान हुआँग याचे सरकार जानेवारीत कोसळल्याचे मागील प्रकरणात सांगितले आहेच. त्यानंतर काय घडले ते पाहू.

राष्ट्रप्रमुख – चीफ ऑफ स्टेट – जनरल कान्ह याने पंतप्रधान म्हणून डॉ. क्वॅट या माणसाची नेमणूक केली. डॉ. क्वॅटचा शपथविधी पुरा होतो न होतो तोच, जनरल कान्हचे आसनच धोक्यात आले. सत्तेवर आल्यापासून त्याने अमाप पैसा जमा केला होता. याची उघड चर्चा सुरू झाली होती. राजवाड्यात रक्तविरहित क्रांती झाली आणि जनरल कान्ह याने २१ फेब्रुवारीला देश सोडून जाण्याची संधी साधली, दक्षिण व्हिएतनामचा फिरता वकील म्हणून तो सर्व पैसा घेऊन पसार झाला!

जनरल कान्ह याचा काटा निघाला, परंतु एका बाजूला त्याने नेमलेला पंतप्रधान डॉ. क्वॅट आणि दुसऱ्या बाजूला जनरल कान्ह याला खाली खेचणारा जनरल थियू यांच्यामध्ये सुंदोपसुंदी माजली. पाच महिने लट्ठालट्ठी सुरू होती. दोन्ही पक्षांनी परस्परांच्या नाड्या आवळल्या आणि याचा फायदा घेऊन जनरल थियू, जनरल की आणि जनरल को, हे तिघे तरुण लष्करी अधिकारी १२ जून १९६५ या दिवशी सत्ताधारी झाले. जनरल की यांचेकडे देशाचा सनदी कारभार सुपूर्त करण्यात आला. जनरल थियू राष्ट्रप्रमुख झाला. जनरल को यांचेकडे संरक्षण खाते दिले गेले.

दक्षिण व्हिएतनाम सरकारची ही अवलक्षणे काही खरी नाहीत. यांचा फायदा व्हिएतकाँगी घेतील हा भीतीचा गोळा अमेरिकेच्या वकिलाच्या पोटात फिरू लागला! अध्यक्ष जॉन्सन यांनी तडकाफडकी अधिक ५३,००० अमेरिकन सैन्य सायगावला रवाना करण्याचे फर्मान सोडले.

## मार्शल टिटोंची मध्यस्थी

जनरल कान्ह जाऊन त्याचे जागी थियू आणि कंपनीची राजवट यायच्या मध्यंतरात, एक महत्त्वाची हालचाल ‘बेलग्रेड’ येथे झाली होती. त्याची हकीगत महत्त्वाची आहे.

व्हिएतनाममधील युद्धाच्या ज्वाला भडकू लागलेल्या पाहून युगोस्लाव्हियाचे अध्यक्ष मार्शल टिटो यांनी बेलग्रेडमधील तटस्थ (नॉन् अलाईन्ड) राष्ट्रांची परिषद एप्रिल ६५ मध्ये बोलावली. १ एप्रिल १९६५ ला सतरा तटस्थ राष्ट्रांचे प्रतिनिदी बेलग्रेड येथे जमले. या परिषदेने मुक्ती आघाडी (NLF), हनोई सरकार, सायगाव राजवट व वॉशिंग्टनचे सरकार या सर्वांना एका ठरावाद्वारे जाहीर आवाहन केले की कसलीही पूर्वअट न घालता उभय पक्षांनी शांततेसाठी वाटाघाटी सुरू कराव्या.

तटस्थ राष्ट्रांच्या या विनंतीची दखल घेतल्यावाचून उभय पक्षांना गत्यंतर नव्हते. अपेक्षेप्रमाणे ७ एप्रिलला बाल्टिमोर येथे ‘जॉन हॉपकिन्स विश्वविद्यालया’त भाषण करताना अध्यक्ष जॉन्सन यांनी स्पष्ट शब्दांत सांगितले –

> ‘आमची कसलीही पूर्वअट न घालता वाटाघाटी सुरू करण्याची तयारी आहे. दक्षिणपूर्व आशियातील उत्तर व्हिएतनामसह सर्व देशांना भरपूर आर्थिक मदत देऊन, तेथील विकासास हातभार लावण्याची अमेरिकेची इच्छा आहे. याबाबतीत उ-थांट यांनी पुढाकार घ्यावा. आमच्या या प्रयत्नात सोव्हिएट रशियादेखील सहभागी होईल अशी मला आशा आहे.’

## हनोईच्या चार अपेक्षा

हनोई सरकारला अध्यक्ष जॉन्सन अशी महत्त्वाची घोषणा करतील याची कल्पना नव्हती, कारण दुसऱ्याच दिवशी म्हणजे ८ एप्रिलला उत्तर व्हिएतनामचे पंतप्रधान फाम-व्हान-डाँग यांनी आपल्या चार प्रमुख अपेक्षा स्पष्ट केल्या –

१) अमेरिकेने दक्षिण व्हिएतनाममधून आपले सैन्य, शस्त्रास्त्रे व सैनिकी तळ काढून घ्यावे व उत्तर व्हिएतनामविरुद्ध सर्व युद्धसन्मुख हालचाली बंद कराव्या.

२) उत्तर व दक्षिण व्हिएतनामचे एकत्रीकरण होत नाही, तोपावेतो दोघांनी आपल्या भूमीवर परकीय देशांना तळ निर्माण करू देता कामा नये व त्यांनी कोठल्याही लष्करी गटात कराराने सामील होऊ नये.

३) राष्ट्रीय मुक्ती आघाडीच्या कार्यक्रमानुसार दक्षिण व्हिएतनाममधील अंतर्गत प्रश्न सोडवण्यात यावेत.

४) दोन्ही व्हिएतनामचे एकत्रीकरण हे इतर कुणाच्या हस्तक्षेपाशिवाय व्हिएतनामी जनतेनेच करावयाचे आहे.

या चार मुद्यांच्या आधारेच आमचे सरकार राजकीय वाटाघाटी करील असे पंतप्रधानांनी स्पष्ट केले. पुढील काही वर्षे हनोई सरकार या चार मुद्यांनाच सतत आग्रह धरताना दिसून येईल.

## वकिलातीत स्फोट

एका बाजूने तटस्थ राष्ट्रांच्या शांतता प्रयत्नांना प्रोत्साहन देत असताना हनोई सरकार युद्ध आघाडीवर स्वस्थ बसले नव्हते. अमेरिकेने सुरू केलेल्या बाँबवर्षावाचा एक प्रतिकात्मक निषेध व्यक्त करण्यासाठी धाडसी व्यूह रचला गेला व ८ एप्रिलपूर्वीच तो कार्यवाहीत आणण्यात आला.

३० मार्चला सायगावमधील अमेरिकेची वकिलात बाँबने उडवून देण्याचा प्रयत्न झाला. दोन अमेरिकन व वीस दक्षिण व्हिएतनामी सैनिक या स्फोटात मारले गेले. सुमारे दोनशे जखमी झाले. वकिलातीच्या इमारतीची शान जावी एवढी मोडतोड झाली आणि ज्यांनी प्राण धोक्यात घालून हा संताप व्यक्त केला, ते सर्व व्हिएतकाँगी पळतापळता मशिनगनने मारले गेले.

अमेरिकेच्या बाँबहल्ल्यांनी हनोई सरकार गर्भगळीत झालेले नाही, उलट त्यांनी हे नवे आव्हान स्वीकारले आहे असाच याचा अर्थ होता. वॉशिंग्टनमध्ये या स्फोटाचा असाच अर्थ लावला गेला आणि तसाच तो लावला जावा अशी हनोई सरकारची इच्छा होती!

## लष्करी रंग गडद झाला

साहजिकच या पार्श्वभूमीवर ८ एप्रिलला हनोई सरकारच्या घोषणेची वॉशिंग्टनने योग्य ती दखल घेतली नाही. जून आणि जुलैमध्ये तर जॉन्सन-आदेशानुसार दक्षिण व्हिएतनामचा नवा नेता जनरल थियू याच्या दिमतीला येणाऱ्या सैन्यतुकड्या दानांग येथे उतरू लागल्या. दक्षिण व्हिएतनाममध्ये एवढ्या मोठ्या प्रमाणावर सैन्य येऊ लागताच, अमेरिकेच्या धोरणात महत्त्वाचा बदल होणे अपरिहार्य होते. आतापर्यंत व्हिएतनामबाबत धोरण ठरवताना, स्टेट डिपार्टमेंटचे सल्लागारच पुढे असत. फार फार तर संरक्षण सचिवालयातील कुणी यात भाग घेत. आता दक्षिण व्हिएतनाममध्ये प्रचंड संख्येने गेलेल्या सैनिकांची संरक्षणव्यवस्था प्राधान्य पावली आणि अमेरिकेच्या चीफ ऑफ स्टाफपासून सर्व लष्करीप्रमुख अध्यक्षांना सल्ला देण्यात भाग घेऊ लागले. यामुळे सल्ल्याचा रंग पालटला आणि धोरणेही अधिकाधिक हडेलप्पी होत गेली.

वॉशिंग्टनने सायगावला निर्माण केलेली 'मॅकव्ही' ही लष्करी यंत्रणा 'कमांडर ऑफ दि अमेरिकन फोर्सेस इन पॅसिफिक' या लष्करी हुकुमतीच्या वर्चस्वाखाली काम करीत असे. म्हणजे होनोलुलू बेटावर असलेला अमेरिकेचा पॅसिफिक कमांडर हा नुसता 'पोष्ट्या'

झालेला होता. सायगावची पत्रे वॉशिंग्टनला धाडायची आणि वॉशिंग्टनची सायगावला! परंतु लष्करी अधिकाऱ्यांना निर्णय पोचवण्याची ही वाकडीच वाट सोईची वाटे. त्याला काय करणार? यामुळे मॅकव्ही प्रमुखाला सर्व निर्णयाची अंतिम जबाबदारी ही होनोलुलू येथे बसलेल्या पॅसिफिक कमांडरची आहे असे वाटे. आणि तो परिणामांविषयी बेफिकीर राही.

## युद्ध कधी पुकारलेत?

सायगावमधील अमेरिकेच्या वकिलातीवर हल्ला ही मोठीच नामुष्की समजून, अमेरिकेच्या अध्यक्षांनी हनोई व हैपाँगबंदर या ठिकाणीही बाँबवर्षाव सुरू करण्यास परवानगी दिली. २९ जून १९६६ ला हनोई व हैपाँगवर पहिलाच जबर बाँबहल्ला झाला. अध्यक्ष हो-चि-मिन्ह याने हनोई आकाशवाणीवरून लढाईतील या नव्या आव्हानाचा स्वीकार करून जाहीर केले –

'कितीही बाँब पडू देत! पाच, दहा, वीस कितीही वर्षे लढण्याची आमची तयारी आहे.'

हनोई व हैपाँग या दोन्ही शहरातून विमानविरोधी तोफा अनेक ठिकाणी उभ्या केलेल्या होत्याच, अमेरिकेची विमाने यामुळे पाडण्यात यायला सुरुवात झाली. काही महिन्यातच अमेरिकेचे ३४ वैमानिक हनोईच्या कब्जात आले. या पकडलेल्या वैमानिकांचा अमेरिकेच्या या क्रौर्याची बदनामी करण्याकरता हनोईने उत्तम उपयोग केला.

प्रथम हनोई सरकारने तटस्थ देशातील आपल्या वकिलाकरवी पुकारा केला की पकडलेल्या वैमानिकांची 'युद्ध गुन्हेगार' म्हणून चौकशी होईल. या गुन्हेगारांना रस्त्यावरून चालत नेऊन नागरिकांना त्यांचे दर्शन घडवण्यात आले. वार्ताहरांनी ही मिरवणुकांची चित्रे छापली. या वैमानिकांना देहांत शासन देण्यात येईल या तर्काने अमेरिकेत गडबड उडाली. वॉशिंग्टनहून इशारा आला –

> 'पकडलेले वैमानिक हे युद्धकैदी आहेत. जिनिव्हा तरतुदी त्यांना लागू आहेत. त्यांना हनोईने युद्धकैदी म्हणून न वागवता, सामान्य मारेकरी म्हणून वागवल्यास गंभीर परिणाम होतील.'

हनोई आकाशवाणीने मग प्रश्न केला –

> 'पकडलेले वैमानिक युद्धकैदी कसे? अमेरिकेने आमच्याविरुद्ध रीतसर युद्ध कधी पुकारले आहे? युद्ध न पुकारताच आमच्या प्रदेशात येऊन नागरिक व आमची बायकामुले मारणारे हे गुन्हेगार नाहीत?'

या वैमानिकांना ठार मारण्यात हनोईला रस नव्हता. म्हणून उत्तर नसलेले प्रश्न विचारून हनोई सरकारने प्राग व पेकिंग येथील आपल्या वकिलातींमार्फत अमेरिकेला कळवले – 'वैमानिकांना आम्ही दया केली आहे. त्यांची युद्धगुन्हेगार म्हणून चौकशी होणार नाही!'

कित्येकवेळा सूड न घेणे हे प्रतिपक्षाला अधिक त्रासदायक ठरू शकते.

अविरत बाँबवर्षाव करून हनोई राजवट शांतता करारासाठी पदर पसरील हा भ्रम हळूहळू दूर झाला. सारी भिस्त आता ७०,००० च्या संख्येने दक्षिण व्हिएतनाममध्ये उतरलेल्या अमेरिकेच्या सैन्यदलावर आली होती. व्हिएतनाममधील व्हिएतकाँगी लष्करी चढाईच्या पावित्र्यातच होते. हल्ले ते चढवीत होते आणि मग अमेरिकेच्या सैन्याची हालचाल ठरत होती. अमेरिकेचा दक्षिण व्हिएतनाममधील सेनादलप्रमुख जनरल वेस्टमोरलँड याने वॉशिंग्टनला लवकरच अहवाल धाडला –

> 'प्रत्येक आठवड्याला दक्षिण व्हिएतनामी सैनिकांची एक पायदळ तुकडी (बटालियन) निकालात निघत आहे! प्रत्येक चढाईगणिक एका जिल्ह्याचे प्रमुख ठाणे शत्रूच्या हातात पडत चालले आहे. या वेगाने हल्ले चालू राहतील तर दक्षिण व्हिएतनाम सहा महिन्यात कोसळेल. हे टाळायचे तर अधिक सैन्य पाठवा!'

असे का होत होते? याला दोन प्रमुख कारणे होती. एक सायगाव सरकार ज्यांच्या हातात आले होते ते तिघे लष्करी अधिकारी – जनरल थियू, जनरल की आणि जनरल को हे धंदेवाईक लष्करी आसामी होते. दुसऱ्या महायुद्धात ते लढले होते ते परकीयांचे नोकर म्हणून. युद्ध हे राजकारणाचेच एक विस्तारित स्वरूप असते आणि मुत्सद्देगिरीशी लष्करी हालचालींचा मेळ घालावयाचा असतो, हे नाते त्यांच्या आकलनशक्तीच्या बाहेर होते. एकमेकांचे पाय ओढण्याची ताकद आणि परिस्थितीचा रेटा यामुळे ते राष्ट्रधुरीण झाले असले तरी नेतृत्वाची धमक तिघांपैकी एकातही नव्हती. उत्तर व्हिएतनामचा प्रमुख सेनानी जिऑप याच्याशी तुलना करता तर हे तिघे अगदीच नगण्य होते. यामुळे लढावे कसे हे त्यांना ठाऊक असले तरी जनतेचा संपर्क ठेवून राजकारणही कसे साधावे याचा त्यांना गंधदेखील नव्हता.

## अधिक भयावह फाळणी

दुसरे कारण जनरल वेस्टमोरलँडची चुकीची लष्करी नीती. या सेनानीने असे डोक्यात घेतले होते की प्लैकू शहराजवळ व्हिएतनामचे उत्तर-दक्षिण दोन भाग करण्यासाठी हनोई सरकार सर्व चढाई आखित आहे! यासाठी त्याने सर्व अमेरिकन सैन्य मध्य व्हिएतनाममध्येच एकवटले होते. वस्तुतः व्हिएतकाँगींनी दक्षिण व्हिएतनामची

फाळणी केलेलीच होती, पण ती उत्तर दक्षिण नव्हती! मध्य व्हिएतनाममधील सर्व खेडोपाडी ही व्हिएतकाँगींच्या कब्जात होती आणि सायगाव सरकारचा अंमल केवळ शहरापुरताच उरलेला होता. ही फाळणी अधिक भयावह होती, हे अमेरिकन जनरलच्या ध्यानात येत नव्हते.

१९६५ सालच्या अखेरीस जनरल वेस्टमोरलँडला आपली चूक उमगली. दक्षिणेकडे सायगाव धोक्यात आहे हे त्याच्या ध्यानात आले. कारण सायगाव आसमंतात व्हिएतकाँगींनी जे पाय रोवले होते, ते तोपर्यंत जाणवू लागले होते. नोव्हेंबर १९६५ मध्ये व्हिएतकाँगींनी दक्षिण व्हिएतनामी सैनिकांची एक रेजिमेंट सायगावजवळ कापून काढली! मग मात्र त्याने तातडीने अमेरिकेच्या सैन्य तुकड्या सायगावच्या उत्तरेला बिन्ह दुआँग प्रांतातही सरकावल्या.

जनरल वेस्टमोरलँडने अध्यक्ष जॉन्सन यांचेकडे नव्या हालचालींसाठी अधिक ५०,००० सैन्य मागितले. जॉन्सननी त्याऐवजी १,२५,००० सैन्य पाठवण्याचा निर्णय घेतला! वर्षअखेर अमेरिकन सैनिकांची संख्याही वाढता वाढता १,८४,००० झाली. टेलिव्हिजनवर केलेल्या भाषणात अध्यक्षांनी अमेरिकन जनतेला सांगितले –

‘जनरल वेस्टमोरलँड यांना मी जाहीर आश्वासन देतो की त्यांना लागेल ती सर्व मदत मी देईन.’ (We will meet his needs)

एवढ्या मोठ्या फौजफाट्यांसह अमेरिका दक्षिण व्हिएतनाममध्ये आल्याने एक गोष्ट मात्र घडली की दक्षिण व्हिएतनाममधील महत्त्वाच्या शहरांचा कब्जा सायगाव सरकारकडेच टिकून राहिला. सायगाव सरकार कसेतरी तग धरू शकले.

## मॅकनामारांचा भ्रमनिरास

नोव्हेंबर महिन्यात अमेरिकेचे संरक्षणसचिव रॉबर्ट मॅकनामारा हे सायगावला धावती भेट देऊन परत गेले. या भेटीने त्यांचा बराच भ्रमनिरास झाला होता असे दिसते. या भेटीत त्यांना असे आढळून आले, की अमेरिकेचे सैनिक उत्तम लढत आहेत, दक्षिण व्हिएतनामी सैनिकाला शिक्षण देऊन तयार करण्याचा अमेरिकेचा खटाटोप मोठ्या प्रमाणावर चालू आहे. बी-५२ बाँबर विमाने उत्तर व्हिएतनाममधील लष्करी तळांवर बाँबफेक करीत आहेत असे सर्व असूनही व्हिएतकाँगींची हालचाल दिवसेंदिवस वाढत आहे, उग्र होते आहे. उत्तर व्हिएतनामकडून शत्रूला अखंड रसद पोचत आहे. त्याने परतल्यावर उद्गार काढले –

‘व्हिएतकाँगी ज्या निर्धाराने लढत आहेत त्यावरून हा लढा प्रदीर्घ काळ चालणारसे दिसते!’

दोन वर्षांपूर्वी मॅकनामारांनी १९६५ संपायच्या आत अमेरिकन सैनिक कामगिरी आटोपून घरी परततील अशी फुशारकी मारली होती, तेच मॅकनामारा आता सांगत होते – लढाई दीर्घकाळ चालणार आहे! मॅकनामारा जे म्हणत होते ते सत्य होते. कारण खरोखरच उत्तर व्हिएतनामी सैनिक आणि मुक्ती आघाडीचे व्हिएतकाँगी यांची दक्षिण व्हिएतनाममधील संख्या यावेळी २,२१००० वर पोचली होती! म्हणजे अमेरिकेच्या सैन्याला तोडीस तोड असे हे संख्याबल होते.

## येलर गेले, लॉज आले

वरीलप्रमाणे परिस्थिती असूनही १९६५ अखेर अमेरिकेचे सैन्य सायगाव सरकारला काहीसा आधार देऊ शकले हे मान्यच केले पाहिजे. या सैन्याच्या अस्तित्वाने व्हिएतकाँगींच्या चढाईला थोडा फार पायबंद पडला होता, ही गोष्ट नाकारता येणार नाही. एवढेच माफक यश अध्यक्ष जॉन्सन यांना नेत्रदीपक वाटत होते हा भाग निराळा!

अमेरिकेचे दक्षिण व्हिएतनाममधील वकील जनरल मॅक्स्वेल टेलर यांना परत बोलावून त्यांचे जागी अध्यक्ष जॉन्सन यांनी परत हेन्री कॅबट लॉज यांची नियुक्ती यावेळी केली. कारण सायगावच्या लष्करी नेत्यांचे व जनरल टेलर यांचे फारसे जमत नव्हते.

लॉज यांचे व्यक्तिमत्त्व चांगले होते. ते चांगले उंचेपुरे उमदे गृहस्थ होते. त्यांचा हसतमुख आणि खेळकर स्वभाव यामुळे जनरल थियू व जनरल की यांच्याबरोबर त्यांनी लगेच जमवून घेतले. १९६४ साली लॉज सायगावला वकील असताना, त्यांचे व अमेरिकेचे जनरल हार्किन्स यांचे जमले नव्हते. हा अनुभव गाठीशी असल्याने, लॉज यांनी यावेळी आपल्या पूर्वीच्या चुका होऊ दिल्या नाहीत.

अमेरिकेच्या राज्यकर्त्यांच्या दृष्टीने आणखी एक आशादायी घटना या सुमारास घडत होती. सायगावचे सरकार आज कोलमडते की उद्या ही सतत वाटणारी भीती थोडी कमी झाली होती. जनरल थियू व जनरल की यांचा लष्करी गट नाही म्हटले तरी जवळजवळ ८-९ महिने अधिकारावर टिकून राहिला होता. सायगाव परिसरात तरी कसलाही नवा असंतोष धुमसत नव्हता. जनरल थियू आणि जनरल की यांच्यावर विसंबवावे अशी परिस्थिती निर्माण होत चालली होती.

## वरवर वाचनाचा बळी

व्हिएतनाममध्ये युद्ध धडाडत असताना शांतताप्रेमी व्यक्ती व राष्ट्रे शांतता प्रयत्नांत कसूर करत नव्हती. फिलीप डेव्हील या इतिहासकाराने अध्यक्ष हो यांना एक प्रश्नावली पाठवून दिली होती. १४ ऑगस्टला पाठवलेल्या उत्तरात हो-चि-मिन्ह यांनी कळवले होते –

‘शांतता निर्माण होण्यासाठी प्रथम अमेरिकेने उत्तर व्हिएतनाम सरकारने मांडलेले चारी मुद्दे स्वीकारले पाहिजेत. हे चारी मुद्दे नवीन नाहीत. १९५४ च्या जिनिव्हा करारात ते समाविष्ट आहेतच. आमच्या प्रदेशावरील बाँबहल्ले ताबडतोब बंद करावेत. आमच्या विरुद्धचे आक्रमण ताबडतोब स्थगित करावे आणि आमच्या देशाच्या दक्षिण भागातून अमेरिकेने आपले सर्व सैन्य व शस्त्रास्त्रे काढून घ्यावी अशी आमची मागणी आहे. सन्मानपूर्वक शांतता प्रस्थापित करण्याचा हाच एक मार्ग आहे. अन्य मार्गच नाही.’

हो-चि-मिन्ह याने आपली मागणी मांडताना, पंतप्रधान फाम-व्हान-डाँग याने काही दिवसांपूर्वी मांडलेल्या मुद्यांचाच पुनरुच्चार केला होता. अमेरिकेने ताबडतोब दोन गोष्टी कराव्या १) बाँबहल्ले थांबवावे, २) लष्करी आक्रमण थांबवावे. अशी अध्यक्ष हो याची मागणी होती. सैन्य काढून घेण्यासाठी ‘काही’ काळ लागेल हे माहीत असल्याने, ती गोष्ट ताबडतोब (Immediately) करावी असा त्याचा आग्रह नव्हता. या मागणीमागे ‘ताबडतोब’ विशेषण त्याने लावलेले नव्हते. परंतु या बारकाव्याकडे अमेरिकन मुत्सद्यांनी लक्षच दिले नाही!

हंगेरीचे एक मंत्री जानोस पीटर दोन महिन्यांनी म्हणजे ऑक्टोबर १९६५ मध्ये हनोईला जाऊन आले. त्यांनी देखील असे जाहीर केले की हनोई येथील कुणाही जबाबदार नेत्याने, अमेरिकेचे सैन्य दक्षिण व्हिएतनाममधून निघून गेल्याखेरीज शांतता प्रस्थापित होणारच नाही असे म्हटलेले नाही. जानोस पीटर यांनी हे विधान अध्यक्ष हो-चि-मिन्ह यांच्या पत्रातील सूक्ष्म बारकावा लक्षात घेऊन केलेले होते. वॉशिंग्टनच्या राज्यकर्त्यांनी मात्र जानोस पीटरच्या वक्तव्याकडे ‘मूर्खाचे वक्तव्य’ म्हणूनच पाहिले! कारण अध्यक्ष हो यांची मागणी त्यांना समजली ती अशी होती की शांतता आणायची तर प्रथम व्हिएतनाममधून सैन्य काढून घ्या असेच अध्यक्ष हो म्हणत आहेत. मुत्सद्यांचा वरवर वाचनाचा हा परिणाम होता.

## जाणार असतील तर पायघड्या अंथरू

आणखी काही दिवसांनी ग्रॅहॅम ग्रीन या ब्रिटिश लेखकाच्या पुतण्याने फेलिक्स ग्रीन याने, अध्यक्ष हो यांची मुलाखत घेऊन ती प्रसिद्ध केली. या मुलाखतीत अध्यक्ष हो यांनी सांगितले होते –

‘अमेरिकन म्हणतात आम्हाला हे युद्ध असेच चालू राहायला हवे आहे! असे त्यांना बोलवते तरी कसे? या बाँबहल्ल्यामुळे आमची जनता काय दुःख भोगीत आहे हे तुम्ही प्रत्यक्ष पाहिलेले आहे. हे भयानक युद्ध चालू राहावे असे कुणाला कसे वाटेल? परंतु

अमेरिकेने आम्हाला अन्य पर्यायच ठेवलेला नाही. काही झाले तरी आम्ही आमचे स्वातंत्र्य गमावणार नाही!'

यावर ग्रीन याने म्हटले –

'तुम्हाला चिनी म्हण ठाऊक आहे ना? शत्रूला नेहमी सन्मानाने पळण्यासाठी एक दरवाजा किलकिला ठेवावा-'

यावर अध्यक्ष हो म्हणाले –

'ठाऊक आहे – ठाऊक आहे मला ती म्हण! अमेरिकेपुढे आपली अब्रू सांभाळून या कटकटीतून कसे निसटायचे हाच नेहमीचा प्रश्न असेल, तर दरवाजा उघडा ठेवलेला आहेच! ते केव्हाही व्हिएतनाममधून निघून जाऊ शकतात. परंतु त्यांचे तसे नक्की ठरू द्या. आम्ही त्यांना या बाबतीत मदतच करू. जाणार असतील तर त्यांचेसाठी पायघड्या देखील अंथरू.'

हनोई शांततेसाठी अनुकूल आहे अशा आशादायक बातम्या बाहेर येत होत्या, आणि दुसरीकडे अनेक तटस्थ राष्ट्रे अमेरिकेवर बाँबहल्ले बंद करण्यासाठी दडपण आणीत होती. अखेर अध्यक्ष जॉन्सन यांनी ख्रिसमसच्या दिवशी म्हणजे २५ डिसेंबरपासून बाँबहल्ले काही काळ स्थगित केल्याची घोषणा केली.

## हॅरिमनची टोपली

ही घोषणा महत्त्वाची होती. अध्यक्ष जॉन्सन एवढेच करून थांबलेले नव्हते. त्यांनी ॲव्हरेल हॅरिमन यांना शांततेच्या शोधासाठी पश्चिम युरोपात धाडलेले होते. पोलंडसह बारा युरोपीय देशांतून हॅरिमन यांनी धावता दौरा लवकरच सुरू केला. हॅरिमन यांचेबरोबर सेक्रेटरी ऑफ स्टेट डीन रस्क यांनी १४ कलमांचे एक टिपण दिले होते. ही चौदा कलमे वाचली तर यावेळीच व्हिएतनाममध्ये युद्धबंदी का होऊ शकली नाही, याचे आश्चर्य वाटते. कलमे अशी होती –

१) १९५४ व १९६१ चे जिनिव्हा करार हे दक्षिणपूर्व आशियात शांतता निर्माण करण्यासाठी प्रमुख आधार आहेत.

२) यासाठी दक्षिणपूर्व आशियात कुठेही परिषद भरवल्यास अमेरिका त्यात भाग घेईल.

३) सतरा तटस्थ राष्ट्रांच्या विनंतीनुसार कुठलीही पूर्व अट न घालता अमेरिका वाटाघाटीसाठी येईल.

४) कुठलीही पूर्व अट न घालता आम्ही वाटाघाटी करू असे अध्यक्ष जॉन्सन यांनी पूर्वी जाहीर केलेलेच आहे.

५) ताबडतोब युद्धबंदी हे अशा परिषदेचे प्रथम काम राहील.

६) हनोई सरकारने पुढे केलेले चार मुद्दे इतर गोष्टींबरोबर चर्चेला घेता येतील.

७) अमेरिकेला दक्षिणपूर्व आशियांत लष्करी तळ नको आहेत.

८) शांतता प्रस्थापित झाल्यावर दक्षिण व्हिएतनाममध्ये सैन्य ठेवण्याची अमेरिकेची इच्छा नाही.

९) दक्षिण व्हिएतनाममध्ये मुक्तपणे निवडणुका व्हाव्या अशी अमेरिकेची इच्छा आहे.

१०) व्हिएतनामच्या एकत्रीकरणाचा प्रश्न व्हिएतनामी जनतेनेच निर्णय घेऊन सोडवावयाचा आहे.

११) दक्षिणपूर्व आशियातील देशांनी तटस्थ राहायचे की 'नॉन अलाईन्ड' राहायचे हा त्यांचा प्रश्न राहील.

१२) युद्धावर खर्च करण्यापेक्षा दक्षिणपूर्व आशियातील देशांच्या विकासासाठी खर्च करण्याची आमची इच्छा आहे.

१३) अध्यक्ष जॉन्सन यांनी म्हटलेले आहे – 'जर क्षणभर हनोईने आक्रमण थांबवण्याचे ठरवले तर व्हिएतकाँगीचे प्रतिनिधीत्व वाटाघाटीत करण्यासाठी अमेरिकेला काहीही अडचण येऊ नये. ही काही फार मोठी अडचण राहील असे मला वाटत नाही.'

१४) आम्ही जाहीरपणे व खासगीरित्या असे सांगितले आहे की शांततेच्या दृष्टीने पहिले पाऊल म्हणून आम्ही व्हिएतनाममधील बॉंबफेक थांबवण्यास तयार आहोत. परंतु हनोईकडून याला काही प्रतिसादच मिळत नाही किंवा पुढची हालचाल होत नाही.

या चौदा खुंट्यांच्या रिंगणात एकपात्री हॅरिमन सर्कस देशोदेशी खेळ करणार होती. हा चौदा कलमी मसुदा काय होता याचे वर्णन करताना डीन रस्क म्हणाले –

'या टोपलीत सर्व काही होते... फक्त दक्षिण व्हिएतनामची शरणागती तेवढी कोंबायची ठेवली होती.'

## अध्यक्ष हो यांची आडमुठी हालचाल

हॅरिमन यांनी पश्चिम युरोपातील पोलंड, हंगेरी आदी कम्युनिस्ट देशामार्फत हे सर्व म्हणणे हनोईपर्यंत यथाक्रम पोचवले होते. अध्यक्ष जॉन्सन वाट पाहात होते. २६ डिसेंबरला बॉंबफेक पुनः सुरू करण्याच्या आदेशावर सही करण्याचे त्यांनी नाकारले. निर्णय पुढे ढकलला. आठवडे गेले, महिना होत आला. अखेर २४ जानेवारीलाच अध्यक्ष हो-चि-मिन्ह यांनी काही राष्ट्रांना पाठवलेले पत्र सर्वत्र प्रसिद्ध झाले. हे पत्र असे होते –

'जोपर्यंत आमच्या भूमीवर अमेरिकेचे आक्रमण चालू आहे, तोपर्यंत आमची जनता लढत राहील. अमेरिकेला जर खरोखर शांतता हवी असेल तर त्यांनी आमच्या चार

मुद्यांचा स्वीकार करावा आणि हे चारी मुद्दे स्वीकारल्याचे प्रत्यक्ष कृतीने दाखवावे. कसलीही पूर्व अट न घालता त्यांनी बॉंबफेक थांबवावी आणि आमच्या विरुद्धचे युद्ध बंद करावे.'

या पत्रात हो यांनी आणखी एक मुद्दा सारला –

'जर वाटाघाटी करायच्या असतील तर त्या राष्ट्रीय मुक्ती आघाडी (NLF) बरोबर कराव्या. कारण दक्षिण व्हिएतनामी जनतेची तीच खरीखरी प्रतिनिधी आहे.

हो-चि-मिन्ह यांनी यावेळी जे आडमुठे धोरण पत्करले ते का, याचा उलगडा होत नाही. अमेरिकेला सन्मानाने माघार घेता यावी म्हणून दरवाजा उघडा ठेवू; इतकेच नव्हे तर जाणार असतील तर पायघड्या अंथरू असे सांगणारा हो आता नवेनवे मुद्दे उपस्थित का करू लागला? याचे उत्तर एकच संभवते – नोव्हेंबर ६५ ते डिसेंबर ६५ या दरम्यान हो-चि-मिन्ह याने पेकिंगवारी केली व माओबरोबर बोलणी केली होती. कदाचित येणारी शांतता ही पश्चिम युरोपातील कम्युनिस्ट देशांपर्यंत येत असल्याने, या वाटाघाटीचे श्रेय रशियाला जाईल या भीतीने माओने वाटाघाटींना मोडता घालण्याचा सल्ला हो यांना दिला असावा. परंतु हा केवळ तर्क आहे. असा सल्ला दिला गेला असेल याचा पुरावा नाही. दुसरी शक्यता अशी आहे की दक्षिण व्हिएतनाममध्ये प्रत्यक्ष लढणाऱ्या राष्ट्रीय मुक्ती आघाडीला NLF परस्पर शांतता वाटाघाटी व्हाव्या हे पसंत नसावे, व त्यांनी अध्यक्ष हो यांचेवर दडपण आणले असावे.

कसेही असो, जानेवारी १९६६ च्या अखेरीस अध्यक्ष हो यांच्या काहीशा कडवट पत्राने शांतता येईल ही अपेक्षा धुळीस मिळाली ही गोष्ट खरी.

२१ फेब्रुवारी ६६ ला इंग्लंडचे पंतप्रधान विल्सन हे मॉस्कोला जाणार होते. विल्सनमार्फत मॉस्कोकरवी हनोईवर दडपण आणता येईल अशी हॅरिमन यांची अपेक्षा असल्याने, त्यांनी आपले सहकारी चेस्टर कुपर यांचे मार्फत वॉशिंग्टनला विनंती केली की बॉंबफेकबंदी आणखी एक महिना वाढवावी.

परंतु अध्यक्ष हो यांनी पाठवलेल्या कडवट उत्तराने, अध्यक्ष जॉन्सन यांच्याकडून आता अधिक सौजन्याची अपेक्षा नव्हती. ३१ जानेवारी १९६६ च्या रात्री अमेरिकेने उत्तर व्हिएतनामवर पुनश्च बॉंबफेकीला सुरुवात केली.

## बादशहापुढची नर्तकी

हनोई सरकारशी वाटाघाटीचे पवित्रे टाकल्याने दक्षिण व्हिएतनाममधील युद्ध प्रयत्नात शिथिलता येऊ नये, म्हणून अध्यक्ष जॉन्सन यांनी ताबडतोब होनोलुलू येथे ४ फेब्रुवारी १९६६ ला जनरल की यांचेबरोबर बैठकीसाठी प्रस्थान ठेवले.

होनोलुलू बैठकीत विशेष काही दम नव्हताच. जनरल की याने तेथे एक नाटकी भाषण केले. तो म्हणाला –

‘शांतता आणण्याचा प्रयत्न झाला पाहिजे हे खरे. परंतु कम्युनिस्टांना हे कळले पाहिजे की दाती तृण धरून आम्ही शांततेसाठी आलेलो नाही. शिवाय आम्हाला आमच्या देशाची प्रगती त्यापूर्वी इतकी केली पाहिजे की कम्युनिझमचे खोटे आकर्षण कुणालाही वाटता कामा नये. अशी समाजरचना आम्ही निर्माण करू इच्छितो की तिथे प्रत्येकाला सन्मानाने जगता येईल – प्रत्येकाला काही भविष्य असेल – प्रत्येकाला अन्न-वस्त्र-निवारा...’ वगैरे वगैरे.

भाषण उत्तमच झाले! इतर देशांकडे सतत तोंड वेंगाळणारी आणि भीकमागी नेते मंडळी नेहमी जशी भाषणे करतात तसेच हे भाषण होते. या भाषणामुळे दक्षिण व्हिएतनामचे काय व्हायचे ते झाले असेल, परंतु जनरल की यांचेवर अध्यक्ष जॉन्सन यांची मर्जी बसली! राजवाड्यात खून पडलेला दिएम जसा एकेकाळी अमेरिकन पुढाऱ्यांना ‘दुसरा चर्चिल’ वाटत होता तसा आता जनरल की वाटू लागला. गंमत अशी होती की जनरल की याने भाषणांतील वाक्येच्या वाक्ये आणि जवळ जवळ सर्व विचार हे अध्यक्ष जॉन्सन यांनी पूर्वी वेळोवेळी केलेल्या भाषणांतून जसेच्या तसे उचललेले होते.

पूर्वी बादशहाकडे नर्तकी नाचवीत तसा हा जनरल की याचा शब्दांचा नाच होता. या तथाकथित शिखर बैठकीनंतर ‘संयुक्त पत्रक’ निघाले. या पत्रकाची थट्टा चेस्टर कूपर यांनी आपल्या पुस्तकात भरपूर केली आहे. कूपर लिहितात.

‘अशा तऱ्हेच्या शिखर परिषदांतून काय होणार हे पूर्वीच ठाऊक असते. एकदा परिषद सुरू झाल्यावर शांतपणे पत्रक तयार करण्यास फुरसत मिळत नाही म्हणून यावेळी आम्ही वॉशिंग्टनहून विमान सुटल्याबरोबर विमानातच शिखर परिषदेनंतर निघणारे पत्रक तयार केले. मजकूर नेहमीचाच. दोन्ही पुढारी भेटले. बोलणी झाली. दोघांचा शांतता आणण्याचा निर्धार आहे... वगैरे वगैरे...’

पत्रक विमानात तयार केल्याने जमिनीवरचे पाय सोडून जी भाषा अशा पत्रकातून असते त्याला विशेषच अर्थ प्राप्त झाला असावा!

अशा रितीने शिखर परिषदेपूर्वीच तयार केलेले पत्रक शिखर परिषदेनंतरचे पत्रक म्हणून होनोलुलू येथे प्रसिद्ध झाले.

n

# २१ : भ्रष्टाचारी लष्करी सुलतानांचे अधःपतन

होनोलुलूची शिखर परिषद आटपून अध्यक्ष जॉन्सन खुषीत वॉशिंग्टनला परतले. परंतु या परिषदेने दक्षिण व्हिएतनामच्या लष्करी सुलतानांच्या परस्पर संबंधात विष कालवले. पंतप्रधान जनरल की याचा होनोलुलू परिषदेत जो गाजावाजा झाला, त्याचा अमेरिकेच्या पुढाऱ्यांनी जो उदोउदो केला त्यामुळे भागीदारीत राज्य चालवणाऱ्या इतर भागीदारांच्या मनात असूया निर्माण झाली! जनरल की आपल्यापेक्षा इंचभर मोठा झाला तर आपल्या तनख्यांवर उद्या धाड येईल अशी भावना पसरली! हे का घडले हे समजण्यासाठी दक्षिण व्हिएतनामचे राज्य यावेळी कसे चालले होते आणि कोण चालवीत होते हे माहीत हवे.

कारभाराची आणि देशात पुरासारख्या येणाऱ्या संपत्तीची चोख वाटणी केलेली होती. जनरल की हा पंतप्रधान आणि जनरल थियू हा चीफ ऑफ स्टेट – राष्ट्रप्रमुख. तेव्हा त्यांची सर्व बाजूंनी चलती होती. प्रश्न होता इतरांचा. सैन्याचे चार भाग होते. प्रत्येकाचा कोअर कमांडर हा सत्तेत वाटेकरी होता. कारण या चौघांच्या खांद्यावर जनरल थियू आणि जनरल की उभे होते. हे चारजण म्हणजे पहिल्या कोअरचा कमांडर जनरल थी, दुसऱ्या कोअरचा कमांडर जनरल लॉक, तिसऱ्याचा जनरल बाओ त्री आणि चौथ्या कोअरचा जनरल क्वाँग.

## राजकीय पडसे झाले

हे सर्व लष्करी सुलतान तसे विलासी होते. त्यांची प्रेमप्रकरणे होती. बाया ठेवलेल्या होत्या. काही कमी नव्हते. तर यातल्या पहिल्या कोअरचा कमांडर जनरल थी – जो बौद्धधर्मीय होता याची एक कंबोडीयन प्रेयसी होती! ही प्रेयसी कम्युनिस्ट हेर आहे असा सर्वांना संशय होता. यामुळे जनरल थी याला हात लावणे जरी पंतप्रधानाला शक्य नव्हते तरी जनरल थी हा संशयास्पद वागतो, दिलेले हुकूम पाळीत नाही अशा असंख्य तक्रारी चालूच असत. थोडक्यात जनरल थी व पंतप्रधान जनरल की यांचे कधी फाटेल ते सांगता येत नव्हते. होनोलुलू परिषदेतून जनरल की परत आला आणि तिथे मिळालेल्या मानसन्मानाने तो बहकल्यासारखा झाला म्हणा, किंवा जनरल थी असूयेने त्याच्याविरुद्ध उचापती करू लागला म्हणून म्हणा, परंतु जनरल की याने आल्या आल्या जनरल थी याला हाकलून देण्याचे ठरवले.

१० मार्च १९६६ या दिवशी या पंतप्रधानाने जाहीर केले की कोअर कमांडर जनरल थी याने राजीनामा दिला असून, पडशाचा सतत त्रास असल्याने उपचारासाठी तो

अमेरिकेत चाललेला आहे. खरी गोष्ट अशी होती की त्याने अमेरिकेला निघून जावे असा पंतप्रधानांचा आग्रह होता. जनरल थी जात नव्हता, उलट लोकांना सांगू लागला –

> 'माझे नाक चोंदले आहे पण ते पडशाने नाही! सायगावमध्ये जो भयानक भ्रष्टाचार चालू आहे त्याची घाण मला सहन होत नाही आहे. मी अमेरिकेला वगैरे मुळीच निघालेलो नाही.'

पंतप्रधानाने मग जनरल थी याला त्याच्या घरातच नजरकैदेत ठेवला. त्याच्यावर नजर ठेवण्याचे काम सायगावच्या पोलीस प्रमुखाकडे दिले. हा पोलिसप्रमुखही बौद्ध होता आणि जनरल थी याचा दोस्त होता! यामुळे पोलीसप्रमुख जनरल की च्या वतीने जनरल थी वर लक्ष ठेवतो आहे, की जनरल थी च्या वतीने जनरल की वरच डोळे रोखून आहे हे कुणालाच नक्की ठाऊक नव्हते.

जनरल की याने मग जाहीर केले – 'अमेरिकेचे वकील हेन्री कॅबट लॉज यांच्या संपूर्ण अनुमतीने मी जनरल थी याला पदच्युत केला आहे!'

## सिंहासनाचे खांदेकरी

जी चूक पंतप्रधान दिएम याने केली तीच पंतप्रधान जनरल की याने केली. त्याची अशी समजूत झाली की अमेरिकेचा आपल्याला पाठिंबा आहे आणि आपण आपली सत्ता आता घट्ट करू शकतो! त्याची चूक एवढीच की आपण पंतप्रधान असलो तरी सत्ता आपल्यापाशी नाही हे तो विसरला. ज्या खांदेकऱ्यांच्या खांद्यावर त्याचे सिंहासन होते, त्यातल्या एकालाच त्याने लाथ घातली होती आणि हा माणूस तर बौद्ध जनतेचा प्रतिनिधी होता.

कोठारावर ठिणगी पडावी तसा निदर्शनांचा भडका उडाला. हुए शहर हा बौद्धांचा बालेकिल्ला. तिथे बौद्धांची जनरल थी याच्या हकालपट्टीविरुद्ध निदर्शने सुरू झाली. आणि मुख्य म्हणजे पोलीस या निदर्शनांकडे शांतपणे पाहात होते! कारण उघड होते. सायगावचा पोलीसप्रमुख हा जनरल थी चा दोस्त होता, आणि शिवाय बौद्ध होता.

१६ मार्चला सायगाव शहरात बौद्धांचा आणि प्रामुख्याने विद्यार्थ्यांचा मोठा मोर्चा निघाला. त्यांची मागणी होती – 'लष्करी राजवट हटाव!' मोर्चा बेबंद झाला. कुणी लाठ्या फिरवू लागले. मोटारींना आगी लागल्या, दुकाने लुटली गेली. शहरातले पत्रकार सर्वांना विचारू लागले. 'अहो काय झालं? हे बौद्ध इतके हिंसक का झाले?'

जनरल थी आणि पंतप्रधान जनरल की यांच्यातली ही खासगी वैमनस्ये रस्त्यावर आलेली दिसतात, या पलीकडे कुणी काहीच सांगू शकत नव्हते.

## हुएहून पंतप्रधान पळाले

हुए आणि सायगाव शहरांबरोबरच दानांग आणि होई-आन या शहरातही निदर्शने झाली. दानांग व होई-आन ही शहरे म्हणजे पहिल्या कोअरच्या कक्षेतील असल्याने, या निदर्शनांमागे काही सैनिकही आहेत ही गोष्ट स्पष्ट झाली. आठवड्यागणिक ही निदर्शने वाढू लागली. हुए शहरातील निदर्शने ही शिस्तबद्ध व अधिक परिणामकारक असत. बौद्ध भिक्षू अथवा विद्यार्थी नेतृत्व करीत आणि घोषणा देत शांतपणे मोर्चा सर्वत्र फिरत असे. कधी मशाल मिरवणूक काढीत. याउलट सायगाव शहराच्या बकालीपणामुळे तिथे जाळपोळ, लुटालुटीचे प्रकार होत असत. २२ मार्चला हुए शहरात विद्यार्थ्यांनी रेडिओ स्टेशन कब्जात घेतले आणि युनिव्हर्सिटीत कुलूप ठोकले! शहरातील सैनिक आणि सरकारी नोकरही विद्यार्थ्यांना सामील झाले. दानांग येथेही पाठोपाठ हाच प्रकार घडला.

हा सर्व उद्रेक कशाविरुद्ध आहे याचा शोध घेता अमेरिकेला असे दिसून आले की लष्करी राजवट आणि त्यांनी माजवलेला अभूतपूर्व भ्रष्टाचार आणि लाथाळ्या याला जनता विटलेली आहे आणि लढ्यात आता कॅथॉलिकांची सहानुभूतीही बौद्धांना मिळू लागली आहे.

हा सर्व प्रकार स्वस्थपणे पाहाणे सायगाव सरकारला शक्य नव्हते. दानांग येथील परिस्थिती कठीण होत चालली होती. म्हणून ६ एप्रिलला पंतप्रधान जनरल की आणि संरक्षणप्रमुख जनरल को हे सुमारे १५०० नाविक सैनिकांसह आणि पोलिसांच्या दोन कंपन्यांसह दानांगला आले. परंतु शहरात चळवळीत सामील झालेल्या कोअर क्रमांक एकच्या सैनिकांनी अडथळे उभे केले होते. विमानतळ अमेरिकेच्या कब्जात होता. पंतप्रधान आणि संरक्षणमंत्री विमानतळावर उतरल्याचे कळताच, चिडलेला जमाव विमानतळाकडे आला. दानांगच्या विमानतळावर उभ्या असलेल्या जनरल की बरोबर आलेल्या नाविक सैनिकांवर त्यांनी बाटल्या फेकल्या. विमानतळावरून जनरल की आणि संरक्षण प्रमुख सायगावला पसार झाले. विमानतळावर अडकलेल्या १५०० नाविक सैनिकांची सुटका अमेरिकन विमानांनी केली.

Force Failling nothing remains असे एडमंड बर्कचे सुप्रसिद्ध वचन आहे. बळाचा वापर फुकट गेल्यामुळे पंतप्रधान की याची सर्व बाजूंनी आता नाकेबंदीच झाली.

## सनदी सरकारचे आमिष

१० एप्रिलला सरकारने नांगी टाकली. राष्ट्राध्यक्ष जनरल थियू याने 'नॅशनल पोलिटिकल काँग्रेस' बोलावण्याची घोषणा करून लवकरच सनदी सरकार अधिकारावर येईल अशी घोषणा केली. तीन ते सहा महिन्यात घटनासमितीच्या निवडणुका घेऊ असे आश्वासन दिले.

होनोलुलूच्या शिखर परिषदेची फलश्रुती काही असेल तर ती ही निघाली! जनरल की हा आपले लष्करी सरकार स्थिर ठेवील ही आशा मावळून आता निवडणुकीच्या मार्गाने येणाऱ्या जनतेच्या सरकारलाच विरोधी सूर काढण्याचे अमेरिकेच्या नशिबी आले. कारण या सर्व चळवळीआड अमेरिकेला एक भीती वाटत होती की बौद्धांचा हा राष्ट्रवाद कदाचित या थराला जाईल की राष्ट्रीय मुक्ती आघाडी (NLF) या स्वधर्मीयांचे राज्य परवडले, परंतु हे अमेरिकन या भूमीवर नकोत, असे जर ते म्हणू लागले तर? दोन लाख पन्नास हजारांवर जे अमेरिकन सैनिक व्हिएतनाममध्ये आले होते, त्यांच्या भवितव्याचा आणि संरक्षणाचा हा प्रश्न झाला असता. सुदैवाने अजूनतरी अमेरिकाविरोधी वातावरण निर्माण झालेले नव्हते एवढाच काय तो आशेचा किरण होता.

पण निवडणुकीच्या मतपेट्यातून व्हिएतकाँगी सरकारात शिरले तर? या निवडणुकांमुळे कॅथॉलिकांच्या मनात बौद्ध वर्चस्वाची भीती रूजली तर? असे नाना त्रासदायक प्रश्न अमेरिकेच्या राज्यकर्त्यांपुढे उभे झाले.

एकीकडे राष्ट्राध्यक्ष जनरल थियू घटनासमिती बोलावण्याची तयारी दर्शवीत असताना, पंतप्रधान जनरल की याने निराळाच घाट घातला. एक हजार नाविक सैनिक व फायटर बाँबर विमाने दिमतीला घेऊन जनरल की दानांग बंदरात पुनः दाखल झाला (१४ मे ६६). विमानतळावर दाखल झाल्यावर झालेल्या अपमानाचा बदला त्याला घ्यायचा होता. दानांग येथील पहिल्या कोअरच्या सैनिकांनी जनरल की यांचे हुकूम मानण्यास नकार दिला. दक्षिण व्हिएतनामी सैन्यातच यादवी माजली!

## दानांगची यादवी

दानांग शहरात चकमकी सुरू झाल्या. अमेरिकेत गदारोळ झाला. अमेरिकेच्या सैनिकांनी यात कुणाची बाजू घ्यायची? उत्तर व्हिएतनामशी लढायचे का ही यादवी सोडवायची? जनरल की याने दानांगमधील या कारवाईची सूत्रे कर्नल लोन याच्याकडे दिली. हाच तो कर्नल, ज्याचे छायाचित्र तो सायगावला एका व्हिएतकाँगीच्या मस्तकात रिव्हॉल्व्हरने गोळी घालीत असताना कालांतराने एका वार्ताहराने टिपले आणि जगभर प्रसिद्ध केले. कर्नल लोन याने दानांगमध्ये बंडखोर सैनिकांना कंठस्नान घातले. शंभरावर माणसे मारली. दोनशे घायाळ केली.

दानांगचा कब्जा करून कर्नल लोन याने केलेल्या दडपशाहीचे आणि क्रौर्याचे वृत्त हुएला पोचले होते. सरकारी सैन्याचा प्रतिकार बौद्ध भिक्षू व विद्यार्थी नेते यांना अशक्य होता. परंतु सरकारी सैन्य पोचण्यापूर्वी या चढाईमागे अमेरिका आहे या कल्पनेने, शहरात युसिस्ची लायब्ररी विद्यार्थ्यांनी जाळून टाकली.

अमेरिकेच्या हुए येथील सेनाधिकाऱ्यांनी दंगा थांबवावा म्हणून ज्याच्यावतीने विद्यार्थी व बौद्ध मूळ पेटले होते त्या जनरल थी याला हुए येथे बोलावले. जनरल थी याने नकार दिला. जनरल की याला हुएचा कब्जा करणे सोपे जाईल असे काहीही करण्यास जनरल थी याची तयारी नव्हती. अमेरिकेच्या हुएमधील कॉन्सुलेटसमोर १२५ बौद्धभिक्षू उपोषणाला बसले. बौद्ध भिक्षू झालेल्या एका तरुण मुलीचे (कु. थिक) हुएमधील एका प्रार्थना मंदिरात स्वतःला पेटवून दिले! मरणापूर्वी तिने अध्यक्ष जॉन्सन यांना लिहिलेल्या पत्रात आरोप केला, की सायगावच्या लष्करी सरकारला पाठिंबा देऊन अमेरिका बेजबाबदारपणा करीत आहे.

कु. थिक हिच्या आत्मदहनाची वार्ता सायगावला पोचताच तिथेही २०,००० हून अधिक बौद्धांनी निदर्शने केली. सर्वत्र आत्मदहने घडू लगली.

३१ मे ला तर हुए शहरातील अमेरिकेची कॉन्सुलेटच निदर्शकांनी पेटवून दिली. हुएमधील अमेरिकन सैन्य यामुळे या यादवीत तटस्थ राहिले आणि बायोनेट घेतलेले कर्नल लोन याचे सैन्य शहरात घुसले. हुएमधील प्रतिकार त्यांनी मोडून काढला. जनरल थी याला पकडून सायगावला रवाना केले. परंतु बौद्ध विद्यार्थी पुढारी आणि शांतपणे चाललेल्या चळवळीचे नेते यांना मात्र दयामाया न दाखवता ठार केले.

याचा परिणाम व्हायचा तोच झाला. जे मागे उरले त्या तरुणांना 'राष्ट्रीय मुक्ती आघाडी'त सामील होण्यावाचून गत्यंतरच उरले नाही. हुए शहराचा कब्जा पंतप्रधान की याला मिळाला, परंतु हुए शहराचे मन मात्र हनोई सरकारकडे कायमचे झुकले.

## एकच पर्याय – भ्रष्टाचार पत्करा

बौद्धांनी निर्माण केलेला १९६६ मधील हा संघर्ष विस्ताराने सांगितला याचे कारण त्याशिवाय दक्षिण व्हिएतनाममधील राजकीय गोंधळाचे स्वरूप स्पष्ट झाले नसते. या असंख्य यादव्यांमुळे उत्तर व्हिएतनामविरुद्धच्या युद्धात मोठा अडथळा निर्माण झाला, यासाठी केवळ त्याची हकीगत महत्त्वाची नाही तर दक्षिण व्हिएतनाममध्ये ज्यांना कम्युनिस्ट राजवट नको होती, परंतु ज्यांना भ्रष्टाचारी लष्करी सरकारही नको होते अशा बहुसंख्यांना अमेरिकेजवळ काय उत्तर होते याचा शोध यामुळे घेता येतो.

अमेरिकेच्या राजकारण्यांजवळ याला उत्तर नव्हते असा स्पष्ट निष्कर्ष निघतो! दक्षिण व्हिएतनामी जनतेला अमेरिकेने पर्याय दिला होता तो एवढाच, की आमचा सायगावमधील सरकारला पाठिंबा आहे. ते सरकार भ्रष्टाचारी असले, लष्करी धटिंगणांचे असले, कसलेही सामाजिक ध्येयधोरण नसलेले असले, तरी एकतर ते पत्करा नाहीतर राष्ट्रीय मुक्ती आघाडी ज्यात, कम्युनिस्ट वर्चस्व आहे त्याचा स्वीकार करा! सर्वसामान्य बौद्ध जनतेला (ज्याची बहुसंख्या होती) यातला कुठलाच पर्याय मान्य नव्हता. अशांसाठी

अमेरिकेजवळ काहीही दिलासा नव्हता. सुमारे ३-४ महिने जगाने हा तमाशा पाहिला की अमेरिकेसारखे जगातले सामर्थ्यवान राष्ट्र जगातल्या लहानातल्या लहान राष्ट्रात तीन लाखांवर सैन्य पाठवते आणि तिथे माजणारी यादवी आणि लाथाळ्या सोडवण्यापलीकडे तिथे करते आहे काय? दोन्हीकडून फक्त दोषांचे धनी होते आहे. नालायक, उधळलेल्या घोड्याच्या पाठीवरील स्वारासारखी अमेरिकेची परिस्थिती झालेली आहे!

बौद्धांनी निर्माण केलेल्या या अल्पजीवी संघर्षामुळे अमेरिकेची धोरणे आखणाऱ्यांचे डोळे उघडले जरी नाहीत तरी किलकिले झाले. केवळ खेडोपाडी पसरलेली बौद्ध जनताच नव्हे, तर जनरल की आणि कर्नल लोनासारखे लष्करी अधिकारी हे देखील अमेरिकेच्या दक्षिण व्हिएतनाममधील अस्तित्वाचा सुप्त द्वेष बाळगून आहेत, असा द्वेष की ज्याला थोडे खतपाणी मिळताच अमेरिकेच्या वकिलातीच्या इमारती भस्मसात होतात, ग्रंथालये जाळली जातात!

एका बौद्ध विद्यार्थ्याने आपल्या मित्राला अमेरिकेत पाठवलेले या सुमाराचे पत्र अधिक बोलके आहे. यात तो लिहितो –

> ‘इथे प्रत्येकाला बंदूक चालवावीच लागते. कुणावर तरी त्याने नेम धरायलाच हवा! एका बाजूला शहरी लोक आणि त्यांचे अमेरिकन पाठीराखे सैन्य आणि दुसऱ्या बाजूला खेड्यापाड्यातील गावंढळ लोक आणि कम्युनिस्ट अथवा डाव्या विचारसरणीचे लोक आहेत.
>
> ‘मी यातलं काय निवडू?’
>
> ‘सर्व गोष्टी अखेर सापेक्ष असतात. मला कुणालाच पाठिंबा द्यावासा वाटत नाही. परंतु असे करता येत नाही. कुठल्यातरी एका बाजूने जायलाच हवे. अमेरिकेच्या बाजूने बंदूक धरावी तर साम्राज्यवाद्यांचे हस्तक, देशबांधवांनाच मारणाऱ्या परकीयांचे गुलाम, देशावर बॉंब टाकणाऱ्यांचे पाठीराखे ही दूषणे चुकत नाहीत.
>
> ‘छे! परिस्थिती जीव घेणारी आहे. यापेक्षा तुरूंगात डांबला गेलो तर फार चांगले!’

## गाडे ताळ्यावर येऊ लागले

या सर्व गोंधळाच्या पार्श्वभूमीवर, अध्यक्ष जॉन्सन यांना व्हिएतनाममध्ये काहीतरी राजकीय तडजोड लवकर निघेल तर बरं असे वाटल्यास नवल नाही. यासाठी दोन हालचाली त्यांनी केल्या. हॅरिमन यांची त्यांनी शांततेच्या शोधार्थ फिरता प्रतिनिधी म्हणून नेमणूक केली होतीच. हॅरिमन यांनी चेस्टर कूपर यांना मदतनीस म्हणून घेतले. दुसरी गोष्ट अशी केली की मनिला येथे सेटो राष्ट्रांची जी परिषद २४ ऑक्टोबर १९६६ ला सुरू

झाली, त्या परिषदेत दक्षिण व्हिएतनामच्या प्रतिनिधीमार्फत त्यांनी अशी सूचना पाठवली –

> ‘दक्षिण व्हिएतनामला असलेला कम्युनिस्टांचा धोका नाहीसा होताच, लगेच तेथून अमेरिकन सैन्य काढून घेतले जाईल असे आश्वासन अमेरिकेने द्यावे.’

हा प्रस्ताव दक्षिण व्हिएतनामच्या प्रतिनिधींकडून मांडला गेला तरी ती व्यवस्था अमेरिकेच्या राजकारण्यांनीच केली होती. मुख्यतः अशाकरता की अमेरिकेच्या जनतेला, ज्यांची पोरे व्हिएतनाममध्ये लढत होती त्यांना परस्पर दिलासा मिळावा. या परिषदेत अध्यक्ष जॉन्सन यांनी आश्वासन दिले –

‘हनोईने युद्ध बंद केले तर अमेरिकेच्या फौजा सहा महिन्यात दक्षिण व्हिएतनाममधून काढून घेण्यात येतील.’

हे आश्वासन महत्त्वाचे होते. याचा अर्थ शांतता करार झाला तर अमेरिका दक्षिण व्हिएतनाममधून निघून जाणार आणि सायगाव आणि व्हिएतकाँगी मग देशाचे काय करायचे ते करू शकतात!

## युद्धखोर निक्सन

अमेरिकेच्या अध्यक्षपदाची निवडणूक जवळ येत होती. रिपब्लिकन पक्षाचे उमेदवार रिचर्ड निक्सन यांनी ४ नोव्हेंबरला अध्यक्ष जॉन्सन यांनी मनिला इथे दिलेल्या आश्वासनावर टीकास्त्र सोडले. पुढे निक्सन हे राष्ट्राध्यक्ष झालेले असल्याने, त्यांच्या या टीकेचा उल्लेख आवश्यक वाटतो. निक्सन यांनी म्हटले –

> ‘वरवर पाहाता उभय पक्षांनी सैन्ये मागे घेण्याचा मनिला येथील जॉन्सन यांचा प्रस्ताव हा योग्य वाटतो. परंतु जरा विचार केला की लक्षात येते, यामुळे दोन वर्षापूर्वी आपण जेथे होतो त्याच परिस्थितीत पुनः जाऊ. अमेरिकन सैन्य जणू म्हणेल की, ‘आम्ही जातो, आता तुम्ही तुमचे भांडण व्हिएतकाँगींबरोबर लढा.’ मनिला घोषणेचा असा अर्थ आहे का की व्हिएतकाँगी आणि दक्षिण व्हिएतनाम यांच्यातील जो लष्करी विजय संपादन करील, त्याची राजवट आपण मानणार आहोत? असाच जर अर्थ असेल तर व्हिएतनाममध्ये अमेरिका ज्यासाठी गेली, त्याला बाध आणणारी ही घोषणा आहे.’

मनिला घोषणा देशोदेशी समजावून सांगण्यासाठी हॅरिमन-कूपर हे दोघे लगेच विमानात चढले. सिंगापूर, इंडोनेशिया, सिलोन, भारत, पाकिस्तान, इराण, इटली, फ्रान्स, जर्मनी, इंग्लंड असा त्यांचा दौरा सुरू झाला.

हॅरिमन-कूपर या अमेरिकन ग्रहांची कुणाकुणाशी कसकशी गाठ पडली याचे निवेदन सांगण्यापूर्वी हनोई येथून सुरू झालेल्या शांतता प्रयत्नांचीही दखल घेतली पाहिजे.

२४ जानेवारीला म्हणजे अध्यक्ष हो यांचे ते दुर्दैवी पत्र सर्व देशांत पोचल्यानंतर लगेचच अध्यक्ष हो यांनी द गॉल यांना स्वतंत्र पत्र पाठवले. त्यात जनरल साहेबांना त्यांनी आपले वजन खर्ची घालून, अमेरिकेला व्हिएतनाममधील साहसापासून परावृत्त करावे अशी विनंती केली होती. ८ फेब्रुवारीला द गॉल यांचे उत्तर अध्यक्ष हो यांना मिळाले. द गॉल यांनी कळवले,

‘जिनिव्हा कराराचे पालन करूनच शांतता प्रस्थापित करता येईल याबद्दल आमच्या मनात संशय नाही. लष्करी पद्धतीने हा प्रश्न सोडवण्यास आमचा विरोध आहे. यासाठी तेथे लढाई चालू राहावी, तिची उग्रता वाढवावी, कक्षा वाढवावी या गोष्टींनाही आमचा विरोध आहे.’

## जीन सेंटनी पुनश्च हनोईत

द गॉल यांनी पत्रात आश्वासन दिले हाते की शांतता आणण्यासाठी फ्रान्सला काही करता येण्यासारखे असेल ते फ्रान्स करील. द गॉल यांनी हो-चि-मिन्ह याचे जुने स्नेही जीन सेंटनी याला पुनः एकदा हनोईला धाडले. ७ जुलै ६६ या दिवशी या दोन पूर्वापार मित्रांची हनोई येथे पुनः एकदा गळाभेट झाली. दहा वर्षांपूर्वी रागावून, भांडून जीन सेंटनी व्हिएतनाममधून निघून गेला होता. अध्यक्षांना कधी भेटावे वगैरे विचारण्याच्या दृष्टीने जीन सेंटनी हा पंतप्रधान फाम व्हान डाँग यांचेबरोबर गप्पा मारीत बसलेला असतानाच, हो-चि-मिन्ह तिथे एकदम आत आले आणि दोघांनी परस्परांना मिठी मारली. सर्व तरुण सहकाऱ्यांना आश्चर्य वाटले की अध्यक्षांनी स्वतःच अनौपचारिकरित्या असे यावे? मिठीतून दूर होताच हो-चि-मिन्ह यांनी हसत सांगितले –

‘उद्या मला भेटा.’

आणि खोलीबाहेर जाता जाता डोळे मिचकावून हो-चि-मिन्ह म्हणाले

‘आपण दोघेच त्यावेळी असू.’

जीन सेंटनी हनोईला असताना दोघांच्या दोनदा प्रदीर्घ भेटी झाल्या. या भेटीत जीन सेंटनी यांनी महत्त्वाची गोष्ट पदरात पाडली ती ही की बोलणी सुरू होण्यापूर्वी अमेरिकन सैन्य दक्षिण व्हिएतनाममधून काढले गेले पाहिजे अशी त्रासदायक अट हो-चि-मिन्ह यांनी घातलेली नाही याची त्यांनी खात्री करून घेतली. जे असंदिग्ध असल्यामुळे वितुष्ट वाढत गेले होते, ते निसंदिग्ध शब्दात जीन सेंटनी यांनी हो-चि-मिन्ह यांचेकडून वदवून घेतले.

अमेरिकेने बाँबहल्ले थांबवले तर दक्षिण व्हिएतनाममधील संघर्ष थांबवण्याच्या दृष्टीने हनोई सरकार व्हिएतकाँगींना अमेरिकेबरोबर वाटाघाटी करण्यास आग्रहाने सांगेल असे आश्वासन हो-चि-मिन्ह यांनी जीन सेंटनी यांचेजवळ दिल्याचे वृत्त राजकीय स्तरातून जगभर सर्वत्र पसरले. शांततेच्या दिशेने जी चुकतमाकत वाटचाल १९६६ च्या अखेरीस हनोई व वॉशिंग्टन या दोन्ही दिशांनी सुरू झाली, त्या मार्गावरील हे एक महत्त्वाचे पाऊल होते.

## वेस्टमोरलँडची दर्पोक्ती

१९६६ साल संपले तेव्हा जानेवारी ६७ मध्ये जनरल वेस्टमोरलँड यांनी अध्यक्ष जॉन्सन यांना लढाईचा जो वर्षभराचा अहवाल पाठवला, त्यात अर्थात शांतता प्रयत्नाचा उल्लेख असण्याची शक्यताच नव्हती. कारण सेनानीवर्गाला शांततेच्या हालचालीत कधीही डोकावू दिले जात नाही. जनरल वेस्टमोरलँड यांनी कळवले – 'गेल्या वर्षात आमच्या सैनिकांनी शत्रूच्या चार चढाया मोडून काढल्या. उत्तर व्हिएतनामींचा हुए व दानांग शहराचा कब्जा करण्याचा प्रयत्न सिद्धीस जाऊ दिला नाही. यापूर्वी महिन्याला साधारणपणे चार हजार व्हिएतकाँगी मारले जात असत, त्यात खूपच प्रगती झाली असून हल्ली महिन्याकाठी सुमारे आठ हजार व्हिएतकाँगी आम्ही निकामी करीत आहोत.'

वेस्टमोरलँड यांची ही दर्पोक्ती खरी मानली तर प्रत्यक्ष लढाईचा रंग पालटलेला नव्हताच. ज्या ठिकाणी अमेरिकेचे सैन्यतळ होते ते भाग वगळता, अन्य ठिकाणी व्हिएतकाँगींनी आपली घटलेली संख्या नव्या भरतीने भरून काढली होती. ॲनलाओचे खोरे, दानांग, हुए, न्हागांग, सायगाव या शहरांची उपनगरे यावरील मुक्ती आघाडीचे वर्चस्व कायमच होते. असे जर नसते तर वेस्टमोरलँड याने पुनः वॉशिंग्टनकडे अधिक सेनेची मागणी कशाला केली असती? वेस्टमोरलँडने कळवले होते –

'५ ते ७ लाख अमेरिकन सैनिक इथे उपलब्ध होतील तरच निदान १९६८-६९ अखेर कम्युनिस्टांचा संपूर्ण काटा काढणे शक्य होईल.'

लाओस आणि कंबोडियात कम्युनिस्टांचे शस्त्रास्त्र साठे होते, त्यावर वेस्टमोरलँड याला स्वारी करण्याची देखील इच्छा होती. फक्त सैन्य कमी पडत होते!

अखेरची घटका मोजणाऱ्या रूग्णाला कोरॅमिनची इंजेक्शने देऊन डॉक्टर मंडळी जसा त्याला थोडा शांत ठेवण्याचा प्रयत्न करतात, तसाच प्रकार वारंवार शिखर परिषद घेऊन अध्यक्ष जॉन्सन यांनी आरंभला होता. बौद्धांच्या नुकत्याच झालेल्या बंडाने हादरलेल्या सायगाव राजवटीला दिलासा देण्यासाठी मार्च १९६७ मध्ये ग्वाम येथे पुनः दुसरी शिखर परिषद ठरवण्यात आली!

यावेळी वाटाघाटीसाठी जनरल की बरोबर थियू याने देखील मोठा भाग घेतला. सत्तेतला तिसरा भागीदार संरक्षणमंत्री जनरल को फक्त बेपत्ता होता. तो देश सोडून कुठे गेला होता हे कुणालाच ठाऊक नव्हते. या मंडळींनी आपल्याबरोबर अध्यक्ष जॉन्सन यांना दाखवण्यासाठी तयार झालेली नवी राज्यघटना आणली होती. जॉन्सनसाहेबांकडून यावेळी तिघांना बिल्ले वाटायचेच बाकी राहिले होते! जॉन्सन भेटीत जनरल की हा सारखा लढाईतील मिळालेल्या विजयाच्या गप्पा झोडीत होता. याउलट जॉन्सन म्हणत होते – 'छे छे, हा प्रश्न केवळ लष्करी विजयाचा नाही. हा प्रश्न असा गुंतागुंतीचा झाला आहे की याचे उत्तर कुणालाच ठाऊक नाही!'

संरक्षणमंत्री मॅकनामारा सांगत होते – 'कम्युनिस्ट मागे हटले आहेत हा तुमचा भ्रम आहे!'

## या सैनिकांपुढे ध्येय नाही

संरक्षणमंत्री मॅकनामारा यांना आता दक्षिण व्हिएतनामी सेनेचा योग्य अंदाज आला होता. शेवटी लढाई दक्षिण व्हिएतनामी सैन्यच लढणार होते आणि अमेरिका मदतीला होती. परंतु 'टाईम', 'न्यूजवीक' आणि इतर अमेरिकन दैनिकांचे वार्ताहर यांनी दक्षिण व्हिएतनामी सेनेतील भ्रष्टाचार, परस्पर हेवेदावे आणि निकृष्ट दर्जा यासंबंधी 'आँखो देखा हाल' प्रसिद्ध करण्याचा आता धडाका लावला. एका वार्ताहराने, त्याचे नाव हालबस्टॅम-पकडलेल्या एका व्हिएतनामी मेजरला विचारले –

'दक्षिण व्हिएतनामी सेनेविषयी तुमचे काय मत आहे?'

तो मेजर म्हणाला –

'उत्तर व्हिएतनामी सेनेचे एक डिव्हिजन सांभाळणे सोपे आहे, परंतु मला दक्षिण व्हिएतनामी सैनिकांचे एक प्लॅटून किंवा एक स्क्वॅड देखील सांभाळता येणार नाही! त्यांचा दोष नाही. या सेनेपुढे कसले ध्येय आहे का?'

## पोषाखी कलापथके

दक्षिण व्हिएतनाम सरकारचा राज्यकारभारही दिएमच्या काळात चाले त्याच पद्धतीने चाललेला होता. अमेरिकेचे सायगावमधील मिशन राज्यकारभार सुधारण्यासाठी एखादे नवे पिलू सोडून देई. मग जो तो त्याच उपायांचा उदो उदो करू लागे. १९६७ साली व्हिएतकाँगींच्या धर्तीवर खेड्यापाड्यात काम करण्यासाठी ६०-६० लोकांची पथके पाठवण्याचा कार्यक्रम ज्याच्या त्याच्या तोंडी होता! मोठमोठ्याने देशभक्तीची आणि समाजवादाची गाणी म्हणायला त्यांना शिकवलेले असे. आपल्याकडील कलापथकासारखाच त्यांचा उत्साह असे. प्रत्यक्ष खेड्यात जाऊन काय काम करायचे?

तिथे करण्यासारखी कामे व्हिएतकाँगींनी आधीच उरकलेली असत. शिवाय सरकारी नियमांच्या जंगलातून वाट काढताना बिचारे थकून जात. यातले जे प्रामाणिकपणे खरोखरच कामाला लागत त्यांचे असे लक्षात येई की लोकांना त्रास देणारे गावपाटील आणि गावगुंड यांचे हात सायगावला थेट सरकारी खात्यामार्फत पोचलेले! वरून निरोप येत 'तो आपला माणूस आहे. त्याच्या वाटेला जाऊ नका!' या योजनांचा फजितवाडा सुरू व्हायला मग किती वेळ लागणार होता?

## यांचे हे धंदे!

आता तर काय सायगावचे सर्वाधिकारी घटनासमिती आणि निवडणुकीच्या चक्रातही गुरफटत चालले. तत्पूर्वी सर्व भागीदारांनी सत्तेचे फेरवाटप उरकले. हे फेरवाटप आणि सत्ताधाऱ्यांचे खासगी व्यवसाय याची यादी वाचण्यासारखी आहे –

जनरल क्वांग – चौथ्या कोअरचा कमांडर (तांदुळाचा आणि अफूचा खासगी व्यापार.)

जनरल लाम व जनरल लॉक पहिल्या आणि दुसऱ्या कोअरचे कमांडर. (अमेरिकेतील असंख्य जिनसांचा खासगी व्यापार.)

जनरल को – संरक्षणमंत्री. तूर्त मुक्काम हाँगकाँग (खासगी अमाप इस्टेटी व जमिनी.)

जनरल थियू हा तर राष्ट्रध्यक्षच होता. त्याची बायको गळ्यात जो लखलखता मूल्यवान हिरा घालून समारंभातून मिरवे, त्याचीच किंमत एवढी जबर होती की थियूचे खासगी व्यवहार त्याची बायको उत्तम सांभाळते हे लक्षात येत असे. राहाता राहिला पंतप्रधान जनरल की, हा माणूस पैशापेक्षा सत्तेच्या आणि प्रसिद्धीच्या मागे होता. ज्या पैशांनी आपल्या बायकोच्या अंगावरही त्याला दागिने चढवता आले असते त्या पैशांचा खर्च तो गुंडांच्या टोळ्या पोसण्याकडे करीत असे. या टोळ्या 'भ्रष्टाचार विरोधी दल' म्हणून सांगितल्या जात. पुढे जनरल थियू याने या टोळ्याच अमाप भ्रष्टाचार आणि गुंडगिरी करतात म्हणून निपटून काढल्या. एक गोष्ट खरी की पंतप्रधान जनरल की याला राजवट भ्रष्टाचारी नसावी, व्यवहार प्रामाणिक असावे असे निदान वाटत असे. परंतु व्यक्तिशः पंतप्रधान भ्रष्टाचारी नसला म्हणजे हाताखालचे आणि भोवतालचे स्वच्छ असतात असे नाही. इथे तोच प्रकार होता. साहेब पैसे खात नसला म्हणजे हाताखालचे जसे त्याच्या नावे आलेला वाटाही गिळंकृत करतात, तसे घडत असे. भ्रष्टाचाराचा मुकाबला हातात सत्ता असूनही त्याला जमत नव्हता आणि परिणामी अमेरिकनांना हवी असलेली एकही सुधारणा वा प्रगती प्रत्यक्षात उतरणे अशक्य झाले होते.

पंतप्रधान हरामखोर सरकारी अधिकाऱ्यांच्या साध्या बदल्या करू शकत नसे! कारण लिलावात विकत घ्याव्या तशा अधिकाराच्या जागा, वरिष्ठापर्यंत पैसे चारून त्यांनी

बळकावलेल्या असत आणि या भानगडीत हात घालायचा तर सगळेच पोखरलेले दिसे! अमेरिकन अधिकारी सारख्या तक्रारी करत, हा जिल्हाधिकारी लाच खातो, तमुक माणूस नालायक आहे, अमुक सरकारी माणूस गुंडगिरी करतो. पंतप्रधानांचे नपुंसकत्व अशा वेळी अमेरिकन माणसांच्या ध्यानात येई.

म्हणूनच १९६८ च्या अध्यक्षीय निवडणुकीचा नारळ फोडताना पहिल्याच भाषणात सिनेटर रॉबर्ट केनेडी यांनी सायगाव सरकारच्या भ्रष्ट राजवटीचे पुरावे सांगून सूचना केली –

'या एका कारणासाठी तरी अमेरिकेने आपले सर्व सैन्य परत बोलवावे.'

## खोट्या दानतीचे आश्रित

एका अमेरिकन पत्रकाराने या सुमारास उत्तर व्हिएतनामचा प्रधानमंत्री फाम व्हान डाँग याची मुलाखत प्रसिद्ध केली. या मुलाखतीत डाँग याला प्रश्न केला होता –

'तुम्ही सायगाव सरकारला अमेरिकनांचे बगलबच्चे म्हणता, 'आश्रित' म्हणता! हे जर खरे असेल तर ते सरकार अमेरिकेच्या हिताविरुद्धच सतत वागते हे कसे काय?'

फॉम-व्हान-डाँग निमिषार्धात उत्तरला –

'ते आश्रित आहेतच! शिवाय ते खोट्या दानतीचे आश्रित आहेत!'

या मंडळींची दानत काय होती याचे उदाहरण म्हणून बौद्ध बंडानंतर लोकक्षोभाच्या भीतीने देशाबाहेर पळालेला संरक्षणमंत्री जनरल को याचे हाँगकाँगहून पाठवलेले पत्र वाचावे.

जनरल को याने मित्राला लिहिले होते –

'माझ्या कुटुंबात १२ मुले आहेत व आमचे चांगले चालले आहे. सर्वात मोठा एकोणीस वर्षांचा आहे. दलात येथे तो उच्च शिक्षण घेतो आहे. बाकीची अजून शाळेतच आहेत. तशी कुटुंबाची काळजी नाही. जनरल कान्ह हा माझा द्वेष करी, यामुळे मी सावध झालो होतो. रागरंग पाहून मी न्हात्रांग येथे सरकारी जमिनीवर मोठे घर बांधून ठेवले. अमेरिकनांनी ते भाड्याने घेतले आहे. वार्षिक भाडे तीन मिलीयन पिअ‍ॅस्ट्रे येते. (सुमारे ३०,००० डॉलर्स किंवा २,४०,००० रुपये.) वार्षिक कर वजा जाता निम्मे भाडे हातात पडते. यात माझ्या १२ मुलांचे सर्व नीट होईल. काळजी नसावी. जर मी हे केले नसते तर काय झाले असते कुणास ठाऊक?'

हा जनरल को देशाबाहेर राहून पुढे सायगावला सत्तेवर असलेल्या इतर भागीदारांचे व व्यापाऱ्यांचे हितसंबंध देत असे. याबद्दल भरपूर कमिशन त्याला मिळे अशी बोलवा होती. म्हणजे सत्तेवर असताना सरकारी जमिनीवर प्रचंड इस्टेट करून त्यावर जगणाऱ्या या

संरक्षणमंत्र्याला, आपण काही भयंकर कबुली देतो आहोत याचेही भान नव्हते! भ्रष्टाचारामुळे झालेल्या अधःपतनाची ही सीमा होती.

आता लवकरच निवडणुकाही होणार होत्या. भ्रष्टाचाराचे नवे दालन खुले होणार होते!

n

# २२ : सायगाव राजवटीवर मर्मप्रहार

ग्वाम येथे मार्च ६७ मध्ये भरलेल्या शिखर परिषदेत जी लिखित राज्य घटना जनरल थियू व जनरल की यांनी मोठ्या दिमाखाने अध्यक्ष जॉन्सन यांना दाखवली, आणि जी हातात घेऊन जॉन्सन साहेब गंमतीने म्हणाले – 'माझी पहिली मुलगी लिंडा ही जन्मल्यावर प्रथम हातात घेताना मला जो आनंद झाला तसा आनंद आज होतो आहे,' ती दक्षिण व्हिएतनाम राज्याची राज्यघटना एका निवडलेल्या घटना समितीने तयार केली होती.

## ओसाडगावचे इंद्रधनुष्य

घटना समितीच्या निवडणुका जाहीर झाल्या तेव्हा, एका टोकाला बिथरलेले बौद्ध नागरिक आणि दुसऱ्या टोकाला हुरळून गेलेले लष्करी अधिकारी यांच्यावर टेकवलेले मतामताचे एक अजब इंद्रधनुष्यच निर्माण झाले होते. या मतामतात संतापापासून तो बेपर्वाईपर्यंत विविध छटा मिसळलेल्या होत्या. तीन महिन्यांपूर्वी लष्करी राजवट हटाव म्हणून मागणी करणारे बौद्ध पुढारी आता म्हणू लागले की अमेरिकेचा हस्तक्षेप या निवडणुकात होणार असल्याने, या निवडणुका म्हणजे केवळ तमाशा आहे. आमचा निवडणुकांवर बहिष्कार राहील. अमेरिकेचे लष्करी अधिकारी युद्ध चालू असताना या निवडणुका निर्विघ्नपणे कशा काय पार पडणार या चिंतेत होते. व्हिएतकाँगींची 'राष्ट्रीय मुक्ती आघाडी' निवडणुकीत विक्षेप आणील असा त्याचा कयास होता, परंतु वरवर मात्र ते दक्षिण व्हिएतनामी सरकारी अधिकाऱ्यांना हसतमुखाने प्रोत्साहन देत होते.

११ सप्टेंबर १९६६ ला घटना समितीच्या सभासदांची निवडणूक झाली. राष्ट्रीय मुक्ती आघाडीने वा व्हिएतकाँगींनी यात कसलाही अडथळा आणला नाही. ८१ टक्के मतदान झाले असे सांगण्यात आले. ११७ प्रतिनिधी निवडून आले. निवडून आलेल्या सभासदांचे सरासरी वय ३४ होते. यातल्या अनेक जणांनी यापूर्वी सायगाव शहर पाहिलेलेच नव्हते. त्यात खालीलप्रमाणे प्रतिनिधी होते.

होआ-हाओ पंथीय — १२

काओ-दाई पंथीय — ५

निरनिराळ्या इतर पंथांचे — ९

लष्करी अधिकारी — २०

निरनिराळ्या राजकीय पक्षांचे — १९

चिनी — ३

आदिवासींचे प्रतिनिधी — ९

स्वतंत्र — ४०

एकूण — ११७

ऑक्टोबर ६६ मध्ये घटना समितीचे काम सुरू झाले. सल्ला देण्यासाठी जॉन रॉच नावाचा अमेरिकन सल्लागार अमेरिकेने दिला. कारण बहुतेक प्रतिनिधींना नेमके काय करायचे याची कल्पना नव्हती. इकडे ग्वाम परिषदेचा दिवस जवळ येत होता तरी घटना लिहून होईना. सभासद उत्साही होते. हॉप नावाच्या सायगाव भागातून निवडून आलेल्या घटना समितीच्या सभासदाने एका मुलाखतीत सांगितले –

> ‘सगळीकडे भ्रष्टाचार माजला आहे. आमच्या देशाला ४,००० वर्षांची परंपरा आहे. संस्कृतीचा वारसा आहे. परंतु इथे अमेरिकन सिनेमा आले, त्यांनी सत्यानाश केला. पोरे आई-बापांना मारतात. अमेरिकेत सैनिकांकरिता आपलेच तरुण भडवेगिरी करतात. आमच्या मुली शरीरविक्रय करीत आहेत, विद्यार्थी मुलींवर बलात्कार करीत असतात. पडद्यावर काऊबॉईज पाहातात आणि तसे सगळे वागू लागले आहेत. हे सगळे भयंकर आहे.’

उत्तम घटना तयार केली आणि एकदम निवडणुका झाल्या की हे सगळे सुधारेल असा भाबडा विश्वास सभासद व्यक्त करीत होते. जनरल थियू व जनरल की यांनी अगदी तगादा लावला तेव्हा घटना तयार झाली. त्यात विशेष डोके वापरण्याचा प्रश्न आला नाही. जगात इतक्या देशांच्या घटना उपलब्ध आहेत. घटना समितीच्याच काही सभासदांना घटनेचे शिल्पकार वगैरे शेंदूर फासण्यात आला आणि त्यांनी या घटनेतले थोडे, त्या घटनेतले थोडे अशी ओरबाडी करून घटना तयार केली. आपल्या घटनेसारखीच ही घटना होती. एक रबरस्टॅम्प राष्ट्राध्यक्ष, एक उपराष्ट्राध्यक्ष, एक पंतप्रधान. पंतप्रधान हा दोन संसदाना जबाबदार. ३५ वर्षांवरील कोणीही अध्यक्षपदासाठी उभे राहावे अशी तरतूद दक्षिण मानवी अधिकार, जगण्याचा हक्क, काम करण्याचा हक्क वगैरे वगैरे नेहमीचेच. १८ मार्च ६७ या दिवशी घटना समितीने ही घटना एकमताने पास केली व घटना काखोटीस मारूनच जनरल थियू व जनरल की हे ग्वाम येथे जॉन्सन भेटीला गेले.

परिषदेतून ही दुक्कल परत सायगावला येताच सार्वत्रिक निवडणुकीचे नगारे वाजू लागले. लोकशाही प्रेमिकांचा एक सिद्धांत असतो. जिथे मुक्त निवडणुका होतात ते मुक्त जग Free World आणि निवडणुका होत नाहीत ती राजवट कम्युनिस्ट तरी असते, फॅसिस्ट तरी असते किंवा मागासलेल्या जमातींची तरी असते! यामुळे दक्षिण व्हिएतनाममध्ये निवडणुका होणार म्हणजे जणू एक निर्दोष राजवटच निर्माण होणार, या

समजुतीने लोकशाहीप्रेमी हुरळल्याप्रमाणे झाले. लोकशाही मार्गाची निवडणुक आणि सच्चा व्यवहार यांचे नाते असतेच असे नाही, ही गोष्ट सर्वजण क्षणभर विसरलेच.

सर्वसामान्य दक्षिण व्हिएतनामी माणसाला या होऊ घातलेल्या निवडणुकात मुळीच रस नव्हता. काय व्हायचे आहे ते अमेरिकन करणार आहेत मग या निवडणुका हव्यात कशाला? हा त्यांचा पहिला प्रश्न. दुसरी गोष्ट, आपल्या मतदानामुळे कदाचित सरकारचे स्वरूप बदलू शकेल हे मतदाराला खरेच वाटत नव्हते. जो पक्ष किंवा माणसे अधिकारावर असतात ती हमखास निवडून येण्याची पक्की व्यवस्था करतात असा सर्वांचा अनुभव होता. मागे दिएमला नाही ९९ टक्के मते मिळाली? बौद्ध पुढाऱ्यांनी निवडणुकांवर बहिष्कार घालण्याचे ठरविले ते याच कारणामुळे. त्यांना हा सगळा तमाशा वाटत होता. कारण लढाई चालू होती. जनरल की हा अमेरिकनांना पसंत होता. त्याला अमेरिकनांचा पाठिंबा होता. अमेरिकनांना वगळून लढाई शक्यच नव्हती. तेव्हा या निवडणुकीत कसलाही पर्याय असा नव्हताच मुळी. अमेरिकनांना निवडणुका आवडतात म्हणून निवडणुका! जनरल की, जनरल थियू हेच निवडून येणार हे तर नक्कीच होते.

## उमेदवारांची रडारड

परंतु निवडणुकीसाठी उमेदवार जाहीर होण्याची वेळ आली आणि अनपेक्षितपणे अमेरिकनांना धक्का बसला. जनरल थियू याने राष्ट्राध्यक्षपदासाठी उमेदवारी जाहीर केली. हे अपेक्षित असले तरी तर्कात बसत नव्हते. कुठल्याही देशात सेनादल प्रमुख हे आपले पद न सोडता निवडणुकीला उभे राहू शकत नाहीत. शिवाय लष्करी राजवट संपवायची म्हणून ना घटना लिहिली आणि निवडणुका ठरल्या? मग पुन्हा आपला जनरल थियूच उमेदवार? जनरल की हा बरेच दिवस पंतप्रधानपद भोगलेला सत्ताभिलाषी माणूस होता. त्याने आपली उमेदवारी त्यापूर्वीच जाहीर करून ठेवली होती.

सर्वजण असे समजत होते की जनरल थियू हा नुसता रबरस्टॅम्प राष्ट्राध्यक्ष असून, सर्व सत्ता जनरल की यांच्याच हाती आहे. असे असताना जनरल की जर राष्ट्राध्यक्ष व्हायचे म्हणतो तर जनरल थियूने आता निवृत्त व्हावे. पण कोण कुणाला सांगणार? दोघे हट्टाला पेटले. हा पेचप्रसंग सोडविण्यासाठी जनरल को परागंदा झाल्यानंतर नव्याने संरक्षण मंत्री झालेला जनरल व्हिएत याने सर्व लष्करी अधिकाऱ्यांची बैठक बोलावली.

ही बैठक भलतीच रंगली. जनरल थियू आणि जनरल की यांनी परस्परांची गैरव्यवहारांची आर्थिक लफडी बाहेर काढली. जनरल थियू म्हणाला –

'पोलिसप्रमुख जनरल लोन हा सारखी लाच खातो.' आता पोलिसप्रमुख हा जनरल की याचा मित्र व विश्वासातला. जनरल लोन रागारागाने सभेतून निघून गेला. जनरल की याच्या भावना मित्रावरील हा प्रसंग पाहून अनावर झाल्या व तो रडू लागला! जनरल की

खरोखरच याबाबतीत चांगल्या चारित्र्याचा असल्याने त्याला निरपराधित्व सिद्ध करण्यासाठी निरीच्छ प्रदर्शनाचा झटका आला. तो म्हणाला – 'असे असेल तर मी उमेदवारी मागे घेतो.' सेनाधिकाऱ्यांना आता चालू असलेल्या तमाशाचा कंटाळा आला होता. त्यांनी सरळ जनरल की याची विनंती मान्य करून टाकली! अखेर जनरल की यांची समजूत घालून त्याला उपराष्ट्रपतिपदासाठी निवडले. मग जनरल थियूचे नाव जनरल की याने राष्ट्रपतिपदासाठी सुचवले आणि जनरल की चे नाव जनरल थियूने उपराष्ट्रपतिपदासाठी सुचवले. सर्वांना सोईस्कर असा गोड शेवट झाला.

## मतदारांचा सूचक दणका

३ सप्टेंबर १९६७ ला राष्ट्रपतिपदाच्या निवडणुकीचा निकाल लागला. दहा उमेदवार उभे होते. पन्नास लाखांवर मतदान झाले. त्यातली ३०-३५ टक्के मते मिळून जनरल थियू राष्ट्रपती झाला आणि जनरल की उपराष्ट्रपती. पण मतदारांनी एक दणका दिला. राष्ट्रपतिपदासाठी दुसऱ्या क्रमांकाची मते मिळाली ती ट्रुआंग त्झू या उमेदवाराला. आणि या उमेदवाराने निवडणुकीच्या जाहीरनाम्यात म्हटले होते – 'मला निवडून दिले तर राष्ट्रीय मुक्ती आघाडीला मी मान्यता देईन आणि शांतता वाटाघाटी सुरू करण्यास अमेरिकनांना भाग पाडीन.'

संशय असा होता की हाच उमेदवार निवडून येत आहे असा संशय येताच अधिकाऱ्यांनी मतपेट्यांत जनरल थियूच्या नावाने हजारो मतपत्रिका ठिकठिकाणी कोंबल्या. यात नक्कीच तथ्य असावे. कारण अधिकारग्रहण करताच हा उमेदवार तुरूंगात डांबला गेला.

या निवडणुकीत जनरल थियू व जनरल की हे निवडून आले खरे, परंतु त्यांची अधिकच अब्रू गेली. फक्त ३५ टक्के मतदारच त्याला अनुकूल आहेत. हे सिद्ध झाले. शिवाय निवडणुकीत गैरप्रकार झाले हे कालांतराने चारीमुखी झाले आणि लोक उघडपणे राष्ट्रपती व उपराष्ट्रपती यांची टिंगल करू लागले. यामुळे चिडलेल्या राष्ट्रपतीने विरोधकांना तुरूंगात डांबण्याचा सपाटा सुरू केला. लोकशाही मार्गाने निवडून आलेले सरकार अधिक दडपशाही करू लागले, अधिकच बदनाम होऊ लागले.

दक्षिण व्हिएतनाममध्ये निवडणुका झाल्या अथवा ग्वाम येथे शिखर परिषद झाली, या गोष्टींत वस्तुतः अध्यक्ष जॉन्सन यांचे मन फारसे गुंतलेले नव्हते. व्हिएतनाममधून सन्मानाने बाहेर पडावे यासाठी त्याचे प्रयत्न चालू होते. कारण लष्करी विजय मिळवून उत्तर व्हिएतनामला शरण आणण्याची शक्यता आता ते मनात आणू शकत नव्हते. या दृष्टीने ॲव्हरेल हॅरिमन व चेस्टर कूपर या दोघांना त्यांनी शांततेच्या शोधार्थ बाहेर पाठवलेले होतेच. या प्रयत्नांचे नेमके काय झाले हे थोडक्यात पाहाणे इष्ट आहे.

## हॅरिमन-कूपर शिष्टाई

जानेवारी ६७ मध्ये हॅरिमन हे पॅरीसला पोचले. तत्पूर्वी अनेक आशियाई व युरोपीय देशात फिरून त्यांनी अमेरिका, काही अटींवर शांतता निर्माण होण्याच्या दृष्टीने पावले उचलण्यास तयार आहे याची ढोबळ कल्पना अनेक जणांना दिली होती. पॅरीसमध्ये हेन्री किसिंजर या अलीकडे अमेरिकेचे फिरते राजदूत म्हणून प्रसिद्धीस आलेल्या गृहस्थाने हॅरिमन यांची जीन सेंटनी याचेशी गाठ घालून दिली. सेंटनीची पत्नी व किसिंजर हे हार्वर्ड विद्यापीठात एकत्र शिकलेले असल्याने सेंटनी कुटुंबाशी किसिंजर यांचा चांगलाच घरोबा होता.

जीन सेंटनी यांनी काही दिवसांपूर्वी केलेल्या हनोई-वारीची हकीगत हॅरिमन यांना सांगितली. सेंटनी यांनी हॅरिमन यांची खात्री करून दिली की जर अमेरिकेने बॉंबफेक थांबवली व उत्तर व्हिएतनामविरुद्धचे युद्ध स्थगित करण्याची तयारी दाखविली तर हनोई प्रतिसाद देईल. बोलणी सुरू होण्यापूर्वी दक्षिण व्हिएतनाममधून अमेरिकेचे सर्व सैन्य काढून घेतले पाहिजे, अशी आडमुठी अट हो याच्या बोलण्यात आलेली नाही. त्याच्या पत्रातूनही असा अर्थ निघत नाही.

जीन सेंटनी याने पुढे असे सांगितले की पूर्व युरोपातील देशांकडून शांतता प्रयत्न झाले तर हनोई त्याला प्रतिसाद देणार नाही. कारण हनोई-पेर्कींग संबंध बिघडावे अशी त्यांची इच्छा नाही. पूर्व युरोपीय राष्ट्रे ही अखेर मॉस्को-तंत्राने चालणारी आहेत.

या बोलण्यातून आवश्यक ती माहिती हॅरिमन यांना मिळाली. ही माहिती महत्त्वाची होती. म्हणून त्यांनी वॉशिंग्टनशी संपर्क साधला. याचा परिणाम होऊन जानेवारी महिन्याच्या अखेरीस (जाने. ६७) अध्यक्ष जॉन्सन यांनी स्वतःच हो-चि-मिन्ह यांना पत्र लिहावे हा विचार सुरू झाला.

भवति व भवति होऊन ८ फेब्रुवारी १९६७ या दिवशी अखेर जॉन्सन साहेबांचे हे गुप्त पत्र हनोईला रवाना झाले. या पत्रात जॉन्सन यांनी लिहिले होते –

> ‘व्हिएतनाममध्ये शांतता आणण्याची जबाबदारी ही प्रमुखतः आपल्या दोघांची आहे. यासाठी आपल्याबरोबर बोलणी करण्याची माझी तयारी आहे. तुम्ही दक्षिण व्हिएतनाममध्ये होणारे आक्रमण थांबवल्याचे आश्वासन देताच, अमेरिका बॉंबहल्ले थांबवील, आणि दक्षिण व्हिएतनाममध्ये सैन्य धाडण्याचे बंद करील अशी मी ग्वाही देतो.’

## तिखट उत्तर

या पत्राला १५ फेब्रुवारी १९६७ या तारखेचे अध्यक्ष हो यांचे आलेले उत्तर, अतिशय तिखट तर होतेच, परंतु शिवाय त्या उत्तराचा सूरही अपमानकारक होता. हो-चि-मिन्ह यांनी कळवले होते –

> 'अमेरिकेने हे आक्रमक युद्ध सुरू केलेले आहे. तेव्हा अमेरिकेने प्रथम आक्रमण थांबवावे. शांतता या मार्गाने येणार आहे. कुठलीही पूर्व अट न घालता प्रथम बाँबहल्ले थांबले पाहिजेत आणि युद्धाच्या सर्व कृती बंद झाल्या पाहिजेत. म्हणजे मगच व्हिएतनामचे प्रजासत्ताक राष्ट्र आणि अमेरिका यांच्यात बोलणी सुरू होऊ शकतील.'

इतकेच लिहून हो थांबला नाही, त्याने पुढे लिहिले – 'तुम्ही युद्धगुन्हे केले आहेत. व्हिएतनाममध्ये तुम्ही केलेला विनाश आणि निर्माण केलेले दुःख तुमच्या खिजगणतीतच दिसत नाही. मी विचारतो, कुणी केले हे अत्याचार? अमेरिका आणि तिच्या मांडलिक फौजा यांचे हे कृत्य आहे.'

हा सर्व पत्रव्यवहार गुप्त या सदराखाली झालेला असताना अध्यक्ष हो यांनी २१ मार्चला आपले उत्तर हनोई येथे प्रसिद्ध केले. याच दिवशी अध्यक्ष जॉन्सन आणि जनरल थियू ग्वाम बेटावर शिखर परिषदेसाठी जमलेले होते.

या प्रकारामुळे जॉन्सन यांना संताप येणे साहजिकच होते. ग्वाम परिषदेतून अध्यक्ष जॉन्सन परत फिरले, तो हा निर्धार करून की यापुढे शांततेसाठी अमेरिका आपला हात कधीही पुढे करणार नाही.

या निराश करणाऱ्या पत्रव्यवहारानंतर दक्षिण व्हिएतनाममध्ये निवडणुका झाल्या. निवडणुकांत हे सिद्ध झाले की दक्षिण व्हिएतनामी जनता ही बऱ्याच प्रमाणात युद्धविन्मुख आहे आणि राष्ट्रपती जनरल थियू आणि उपराष्ट्रपती जनरल की यांना चाळीस टक्के जनतेचाही पाठिंबा नाही.

अध्यक्ष हो-चि-मिन्ह यांच्या उत्तरात शेवटी जय आपलाच होणार हा जो आत्मविश्वास आढळला होता, त्याचे रहस्य हळूहळू अध्यक्ष जॉन्सन यांच्या मनात ठसू लागले. अमेरिकेचे व्हिएतनाममधील अस्तित्व हे केवळ दक्षिण व्हिएतनामची एक भ्रष्ट राजवट सांभाळण्याच्या कामासाठीच आहे की काय, असा विचार अध्यक्ष जॉन्सन आणि त्यांचे सल्लागार यांच्या मनात जोराने येऊ लागला.

१९६८ साल उजाडले तेव्हा अध्यक्ष जॉन्सन हे मनाने, काहीही करून व्हिएतनाममध्ये शांतता प्रस्थापित करून अमेरिकेने तेथून सन्मानाने बाहेर पडलेच पाहिजे या विचारांकडे झुकलेले होते आणि त्या प्रमाणात त्यांचा अध्यक्ष हो विषयीचा संताप ओसरून गेलेला होता.

## शांततेची पहिली झुळूक

सुदैवाने याचवेळी हनोईच्या दिशेने शांततेसाठी एक हालचाल झाली. उत्तर व्हिएतनामचे परराष्ट्रमंत्री त्रिन्ह यांचे एक भाषण हनोई रेडिओवरून १ जानेवारी १९६८ ला प्रसृत झाले. या भाषणात त्रिन्ह यांनी जाहीर केले –

'अमेरिकेने बाँबहल्ले थांबवले व आमच्या विरुद्ध युद्धकृती थांबवली की आम्ही अमेरिकेबरोबर वाटाघाटी सुरू करू.'

वॉशिंग्टनमधल्या अभ्यासकांनी या घोषणेची चिकित्सा केली. सर्वांचे असे मत पडले, की ही घोषणा शांततेच्या दृष्टीने पडलेले निश्चित असे प्रगतीचे पाऊल आहे. जॉन्सनसाहेब यांची भूमिका आणि हनोईची भूमिका या जवळ जवळ आल्या आहेत.

यावेळी वॉशिंग्टनने आडमुठेपणा केला. नाताळ आणि नववर्षासाठी स्थगित केलेला बाँबवर्षाव, नेमका २ जानेवारीलाच पुनः सुरू केला.

## टेट् सणाची चढाई

अर्थात जरी हा बाँब वर्षाव सुरू झाला नसता, तरी भवितव्यतेच्या पडद्याआड व्हिएतनाम लढाईतील ज्या एका भीषण पर्वाची पूर्वतयारी झपाट्याने पुरी होत चालली होती ते सर्व पर्व घडलेच असते. हे पर्व म्हणजे ३० जानेवारी १९६८ च्या मध्यरात्री दक्षिण व्हिएतनाममधील प्रत्येक महत्त्वाच्या शहरात आणि नगरात व्हिएतकाँगींनी केलेला प्रचंड उठाव! व्हिएतनामी नववर्ष जानेवारी अखेर प्रतिवर्षी सुरू होते. हा जानेवारीचा अखेरचा आठवडा सर्व व्हिएतनामी जनता नाताळसारखा सण साजरा करते. या सणाला टेट् (Tet) म्हणतात. व्हिएतनामी युद्धात दोन्ही बाजू हे सणाचे आठ दिवस युद्धबंदी आतापर्यंत स्वेच्छेने पत्करीत आलेल्या होत्या. यावर्षीही सर्व व्हिएतनामवर टेट् सणाच्या आनंदात सर्व व्हिएतनामी जनता मग्न असताना ३० जानेवारी १९६८ च्या रात्री व्हिएतकाँगींनी या युद्धातील सर्वात रक्तरंजित लढाईला अचानक तोंड फोडले. टेट्ऑफेन्सिव्ह-टेट् चढाई, म्हणून त्या लढाईचा उल्लेख तेव्हापासून होत आलेला आहे.

टेट् सणाच्या निमित्ताने निर्माण झालेल्या बेसावधपणाचा फायदा यापूर्वी व्हिएतकाँगी भूमिगतांनी कधीही घेतला नव्हता. असे असताना याचवेळी हा सर्वात मोठा हल्ला या सणांच्या काळात सुरू करण्याची निकड व्हिएतकाँगींना का वाटली? याला तशीच काही कारणे होती.

अमेरिकन सैन्याच्या प्रतिष्ठेला कायमचा तडा जाईल असा एक तरी मोठा तडाखा दिल्याखेरीज, दक्षिण व्हिएतनाममध्ये प्रचंड अमेरिकन सेनेचा मुकाबला करणाऱ्या राष्ट्रीय मुक्ती आघाडी आणि व्हिएतकाँगी याचे मनोधैर्य वाढणार नाही, याची जाणीव हनोईला

झालेली होती. परंतु ही हालचाल कधी करायची? वर्मी बसेल असा तडाखा कुठे द्यायचा? यासाठी सैन्य किती खर्ची घालायचे? या सर्व प्रश्नांचा विचार उत्तर व्हिएतनामचे नेते वर्षभर तरी करीत होते.

१९६८ साल हे अमेरिकेतील नव्या अध्यक्षीय निवडणुकीचे वर्ष होते. या काळात अमेरिकेच्या राजकारणात गलथानपणा पसरतो. कारण जुना अध्यक्ष नवे निर्णय घेण्याचे टाळतो आणि नवा अध्यक्ष कोण असेल याचा कुणालाच अंदाज येत नसतो. सर्व दृष्टींनी विचार करता १९६८ साल हेच अशा तऱ्हेच्या हल्ल्यासाठी सुयोग्य वेळ आहे हे व्हिएत-मिन्ह नेत्यांच्या ध्यानात आले.

दुसरी एक काळजी उत्पन्न करणारी घटना सतत घडत होती. अमेरिकेच्या ताब्यात दक्षिण व्हिएतनाममधील बहुतेक शहरे-नगरे होती. अमेरिकेची विमाने उत्तर व्हिएतनामवर बाँबफेक करीत, त्याचप्रमाणे दक्षिण व्हिएतनाममधील व्हिएतकाँगीच्या कब्जातील खेड्यापाड्यांवरही बाँब फेकीत. एकंदरीत शहरातले जीवन हे खेड्यापाड्यापेक्षा जास्त सुरक्षित होते. यामुळे मरणाच्या भीतीने लाखो व्हिएतनामी लोक खेड्यातून शहरांकडे सतत येत होते. यामुळे व्हिएतकाँगींचे फारच नुकसान होत होते. ज्या खेडुतांच्या घरांतून व्हिएतकाँगी भूमिगतांना थारा होता अशी कुटुंबेच शहराकडे निघाली होती. शिवाय याच कुटुंबातून नवेनवे तरुण व्हिएतकाँगींना मिळत असत. भूमिगत हालचालीचे निरोप पोचविणे, भूमिगतांना अन्न पोचवणे अशी कामे करणारी सर्व शेतकरी खेडूत मंडळीच होती. तेव्हा काहीही करून शहराकडे निघालेला हा ओघ थांबवणे आवश्यक होते. हा ओघ थांबवणार कसा? एक उपाय होता आणि तो म्हणजे शहरेदेखील सुरक्षित नाहीत ही भावना सर्वत्र फैलावली तर काम भागणार होते. म्हणूनच नव्या मोठ्या चढाईचे प्रमुख सूत्र ठरले, शहरांचा कब्जा करून तिथे असे दहशतीचे वातावरण निर्माण करणे, की ज्यामुळे शहराकडील लोंढा केवळ थांबणार नाही तर तो उलट दिशेने वाहू लागेल.

उत्तर व्हिएतनामी नेत्यांची आणखी अशी अपेक्षा होती की ज्या मोठ्या संख्येने अमेरिकन सैन्य दक्षिण व्हिएतनाममध्ये लोटण्यात आले आहे, त्यावरून पाहाता लवकरच कंबोडिया व लाओसमध्येही हे सैन्य चढाई केल्याशिवाय राहाणार नाही. असे काही झाले तर कंबोडियाच्या हद्दीत मुक्ती आघाडीचे आणि व्हिएतकाँगींचे जे तळ होते ते धोक्यात येणार होते. असे काही घडण्यापूर्वीच अमेरिकनांना धडा शिकवू शकेल, असा मोठा हल्ला शक्य आहे. तेव्हा जे करायचे ते त्वरित उरकले पाहिजे.

## सायगाव चॅन्सरी

दक्षिण व्हिएतनाममध्ये घुसलेल्या उत्तर व्हिएतनामी सैनिकांची संख्या यावेळी सुमारे ७०,००० होती. या भूमिगत सैनिकांचे नेतृत्व कर्नल डाक हा यावेळी करत होता. वस्तुतः

हे नेतृत्व जनरल थान्ह याचेकडे होते. अमेरिकेचे उत्तर व्हिएतनाममध्ये पडणारे बरेचसे बाँब हे बहुतेक जंगलात वा शेतात पडून निकामी ठरत असले, तरी काही वेळा बाँबफेक अचूक होई आणि भूमिगत व्हिएत-मिन्हचे एखादे गुप्त मोहोळ उद्ध्वस्त होत असे. अशाच एका बाँबहल्ल्यात कंबोडिया व उत्तर व्हिएतनामच्या सरहद्दीवर जनरल थान्ह हा जुलै १९६७ मध्ये जखमी झाला. नॉम-पेन्ह येथून विमानाने उपचारासाठी त्याला हनोईला आणण्यात आले. परंतु झालेल्या जखमांमुळे हा सेनानी ६ जुलै १९६७ रोजी हनोईच्या लष्करी रूग्णालयात मरण पावला. त्यावेळी त्याचे वय ५३ वर्षांचे होते. जनरल थान्ह याच्या निधनानंतर कर्नल डाक याने त्याची जागा घेतली, ती जुलै ६७ मध्येच. जनरल थान्ह याच्या दफनप्रसंगी हजर राहून कर्नल डाक कंबोडियातल्या भूमिगत लष्करी तळावर परतला तो हनोईहून हल्ला चढविण्याच्या पूर्वसूचना घेऊनच.

या मोठ्या प्रमाणावरील हल्ल्याची तयारी कर्नल डाक याने लगेचच सुरू केली. या योजनेत सायगावमधील अमेरिकेच्या चन्सेरीवरील हल्ला हा महत्त्वाचा होता. सायगाव शहरात जो धुमाकूळ घालायचा होता त्याचा आराखडा ऑक्टोबर १९६७ मध्ये पुरा करण्यात आला. यासाठी लागणारी शस्त्रास्त्रे आणि दारूगोळा बैलगाड्यांतून आणि भाजीपाल्याच्या पाट्यांतून सायगावकडे रवाना होऊ लागला.

टेट् सणाच्या महिनाभर आधी कर्नल डाक याने कंबोडियातले ठाणे सोडले. तो सायगावच्या खेड्यात येऊन राहिला. कर्नल ट्रुएन याच्याकडे सायगावच्या विमानतळावर हल्ला करण्याची कामगिरी होती. डिसेंबर ६७ च्या शेवटच्या आठवड्यात नाताळ सणासाठी सायगावमध्ये येणाऱ्या विद्यार्थ्यांच्या घोळक्यात मिसळून हा कर्नल स्वतःच वेष पालटून सर्व विमातनळ फिरून आला. विमानतळावर जाण्याच्या भरपूर प्रवेशपत्रिका उपलब्ध होतील, अशी व्यवस्था करून तो परत आला.

दक्षिण व्हिएतनाममध्ये घुसलेले व्हिएत-मिन्ह आणि राष्ट्रीय मुक्ती आघाडी, टेट् सणाच्या दिवशीच मोठी गडबड उडवण्याची तयारी करीत असताना हनोईला मात्र नेहमीप्रमाणे व्यवहार चालू होते. हो-चि-मिन्ह हा आता ७७ वर्षाचा झालेला होता. परंतु त्याची लोकप्रियता शिगेला पोचली होती. दक्षिणेत जी मोठी चढाई सुरू होणार होती, ती त्याच्याच प्रेरणेने. त्याला उघड आशीर्वाद देणे या क्रांतिकारक नेत्याला शक्य नव्हते. कारण दक्षिणेत लढणारी ‘राष्ट्रीय मुक्ती आघाडी’ ही स्वतंत्र संघटना आहे, हनोईशी त्याचा संबंध नाही अशी हनोई सरकारची अधिकृत भूमिका होती. उ. व्हिएतनामी सेनेच्या २३ व्या वर्धापन दिनानिमित्त होणाऱ्या समारंभाला अध्यक्ष हो स्वतः हजर झाला व दक्षिणेत सुरू होणाऱ्या चढाईला आशीर्वाद देण्याची संधी त्याने घेतली.

ज्या सरकारी इमारतीमध्ये हा समारंभ हनोई येथे साजरा होत होता त्या इमारतीवर विमानवेधी तोफ उभी केलेली होती. कारण अमेरिकेचा बाँबहल्ला नाताळसाठी म्हणून स्थगित व्हायला अजून दोन-चार दिवस होते. चार महिन्यात प्रथमच अध्यक्ष हो जाहीर समारंभात लोकांना दिसणार होता. सभागृह गच्च भरलेले होते. भाषणशच्या सुरुवातीलाच हो याने म्हटले 'मला आज वीस वर्षांनी तरुण झाल्याचा भास होतो आहे...'

नंतर त्याने सूचक उद्गार काढले, 'अमेरिकन हे आपले आक्रमण मागे घेऊ इच्छित नाहीत. यामुळे तीन कोटी व्हिएतनामी आबालवृद्धांनी, स्त्रियांनी आणि तरुणांनी केवढाही त्याग करावा लागला, तरी त्याची पर्वा न करता विजयासाठी झगडा केला पाहिजे. विजयासाठी लढायांतून मोठाले पराक्रम करण्याची संधी त्यांनी सोडता कामा नये.'

नव्या वर्षाची गुलाबी रंगाची भेटकार्डे हनोई सरकारने परदेशी मुत्सद्यांना आणि राष्ट्रप्रमुखांना रवाना केली. या कार्डावर हो-चि-मिन्ह याची फक्त एक लहान कविता छापलेली होती. व्हिएतनामी भाषेत लिहिलेल्या या कवितेचा इंग्रजी तर्जुमा असा –

Let South and North emulate each other.
In fighting U. S. Aggressor.
Forward!
Total victory shall be ours.

१ जानेवारी १९६८ ला हीच कविता हनोई आकाशवाणीवरून प्रसृत करण्यात आली. या कवितेत दक्षिण व उत्तर व्हिएतनाम या दोघांनी परस्परांचे अनुकरण करून अमेरिकेशी लढावे असे सांगून अध्यक्ष हो यांनी आशीर्वाद दिलेला होता.

'आगे बढो, अंती जय आपलाच आहे.'

शक्यता आहे की याच दिवशी हनोई आकाशवाणीवरून परराष्ट्रमंत्री त्रिन्ह यांचे जे शांततेचे आवाहन करणारे भाषण प्रसारित झाले, त्याचा हेतू दक्षिण व्हिएतनामी व अमेरिकेचे सैन्य अधिकच बेसावध राहावे हा असेल. कदाचित ते मनापासून केलेले अखेरचे आवाहनही म्हणता येईल.

या आवाहनाचा प्रत्यक्ष परिणाम अमेरिकेची सायगावमधील वकिलात बेसावध राहाण्यात झाला ही गोष्ट मात्र खरी.

अमेरिका ज्याप्रमाणे प्रत्येक नाताळात व्हिएतनाममधील बाँबवर्षाव स्थगित ठेवत असे, त्याचप्रमाणे 'राष्ट्रीय मुक्ती आघाडी' देखील प्रतिवर्षी नाताळसाठी व टेट् सणासाठी युद्ध हालचाली बंद ठेवत असे. १७ नोव्हेंबर १९६७ या दिवशी राष्ट्रीय मुक्ती आघाडीने ख्रिसमसचे तीन दिवस जानेवारी १, २, ३ हे नव्या १९६८ या इंग्रजी वर्षाचे तीन दिवस

आणि टेट् सणाचे जानेवारी अखेरचे सात दिवस अशी युद्धस्थगिती घोषित केली होतीच. यापैकी नाताळ व ख्रिस्ती नववर्ष आगमनप्रसंगी काहीही घडले नाही. जानेवारी अखेरीस टेट् सण चालू असतानाच हनोई आकाशवाणीवरून काही तडजोड पत्करणारे शांततेचे आवाहनही प्रसृत झाले. या सर्वांचा परिणाम म्हणून अमेरिकेची वकिलात, युद्धआघाड्या आणि सायगाव सरकार ही शिथिल अवस्थेतच होती.

हा टेट् सण असतो तरी काय? नवे कपडे शिवावे, नव्या वर्षाचे नवे संकल्प करावे, परस्परांना भेटकार्डे धाडावी आणि पूर्वजांची श्राद्धे करावी, यासाठी गोडधोड करावे, दारूकाम उडवावे असा हा देशव्यापी आनंद सोहळा सर्व व्हिएतनामभर प्रतिवर्षी साजरा होतो. याच सणासाठी तयार करण्यात येणारे केक हे विवक्षित झाडाच्या पानातच गुंडाळण्याची वहिवाट आहे. या पानाची मोठ्या प्रमाणावर यावेळी सर्व खेड्यातून व शहरातून आयात होते, सणाचे दिवस असल्याने भाजीपाला, फळफळावळ यांच्या करंड्याच्या करंड्या इकडून तिकडे जात असतात. यावेळी तर काय पाऊस चांगला होऊन पीकपाणी उत्तम झाले होते.

## शेवटचा चकवा

यावर्षी हनोईत तर हा सण खूपच आनंदात आणि उत्साहात पार पडत होता. व्हिएतनामी नवे वर्ष मंगळवारी ३० जानेवारीला मध्यरात्री सुरू होणार होते. परंतु हनोई सरकारने यावेळी मुख्य समारंभ आणि सण २९ जानेवारीलाच साजरा करण्याचे ठरविले. कारण असे दिले की २८ तारखेला रविवार आहे, त्याच दिवशी मध्यरात्री म्हणजे १२ नंतर अनायासे फार चांगला दिवस येतो आहे असे ग्रहस्थितीवरून दिसते. हनोईतील नागरिक जरा बुचकळ्यात पडले. परंतु ४८ तासांनी त्यांना सर्व उलगडा झाला. ३० जानेवारीला रात्री दक्षिण व्हिएतनामवर व्हिएतकाँगींनी जो हाहाःकार माजविला, त्यामुळे हनोईवर बाँबहल्ला होण्याची शक्यता होती. तो सर्व दिवस हनोईहून नागरिकांना बाहेर काढण्यासाठी सरकारने मोकळा सोडला होता.

२९ जानेवारीला सकाळपर्यंत राष्ट्रीय मुक्ती आघाडीचे सैनिक नेमून दिलेल्या शहरात मोक्याच्या जागी दबा धरून बसलेले होते. एकंदर ६७,००० मुक्ती सैनिक या हल्ल्यात लोटलेले होते. या सर्वत्र विखुरलेल्या तुकड्यात जी खास आज्ञा वाचून दाखविण्यात आली त्यात म्हटले होते.

‘आज आपण जी लढाई खेळणार आहोत, ही आपल्या सबंध इतिहासातील सर्वात मोठी लढाई ठरणार आहे. या लढाईमुळे जगात मोठाले बदल होणार आहेत आणि अर्थात यासाठी आपल्याला विपुल त्याग करावा लागणार आहे. आपल्या पितृभूमीचे भवितव्य या लढाईत ठरणार आहे. या लढाईला तोंड लागताच जग स्तिमित होईल आणि

साम्राज्यवाद्यांच्या टोळी-प्रमुखांना आपली घटका भरत आल्याचे कळून येईल. आगे बढो, अंतिम विजय आपलाच होणार आहे.'

सायगाव या राजधानीच्या शहरात काय घडले ते पाहा.

सायगाव शहरात मध्यभागी अमेरिकेची वकिलात (चॅन्सेरी) होती. वकिलातीची सहा मजली भव्य आणि देखणी वास्तू १९६५ मध्ये बांधायला सुरुवात केली. सप्टेंबर १९६७ मध्ये या इमारतीचे रीतसर उद्घाटन होऊन अमेरिकेच्या व्हिएतनाममधील राजकारणाची सूत्रे येथून हलायला सुरुवात झाली.

या इमारतीची रचना एखाद्या 'बंकर' सारखी होती. इमारतीभोवती काँक्रीटची, भगदाड पडणार नाही अशी आठ फुटी जाड दगडी भिंत होती. एखादी पिल बॉक्स असावी तशी ही काँक्रीटची इमारत लांबून दिसे. इमारतीच्या माथ्यावर हेलिकॉप्टर उतरण्याची सोय केलेली होती.

## २९ जानेवारीच्या मध्यरात्री

२९ जानेवारीला मध्यरात्री म्हणजे ३० जानेवारी उजाडण्याच्या आधी काही तास सायगाव शहरात फटाक्यांचे आवाज सुरू होते. दारूकामामुळे उभी होणारी ठिणग्यांची रंगीबेरंगी चकाकती झाडे सगळीकडे उभी होत होती. धुराचे लोट जागोजाग हवेत तरंगत होते. रस्त्या रस्त्यांतून दिवाळी चालली होती.

यावेळी अमेरिकेच्या चॅन्सेरीपासून चार-पाच इमारती टाकून असलेल्या एका मोटार दुरूस्तीच्या वर्कशॉपमध्ये काही व्हिएतकाँगी जमा झालेले होते. शहराच्या इतर भागातही हल्ल्याची तयारी जोरात सुरू होती. मोटार वर्कशॉपमध्ये जमा झालेल्या काँगींची संख्या १८-१९ होती. व्हॅन साऊ या अशिक्षित शेतकऱ्याला सर्व शस्त्रास्त्रे व दारूगोळा या वर्कशॉपमध्ये आणण्याचे काम सोपवले गेले होते. ते त्याने चोख पार पाडले होते. सरपणाची लाकडे वाहणाऱ्या बैलगाडीतून त्याने सर्व दारूगोळा आणला. पिस्तुले, मशीनगन्स, हॅन्डग्रेनेडस्, रॉकेटस् असे काही सामान वर टोमॅटो रचलेल्या भाजीच्या हाऱ्यांतून वर्कशॉपमधून पोचलेले होते. वर्कशॉपचे दार लोटून सर्वांना शस्त्रास्त्रे वाटण्यात आली. प्रत्येकाने काय कामगिरी उरकायची आहे हे सर्वांना समजावून देण्यात आले. पळून जाण्याचा प्रश्नच नव्हता. सर्वांना आपण मरणार याची कल्पना होती. प्रत्यक्ष कृतीचा क्षण जवळ येत होता.

पहाटे २-४५ ला हे सर्व घडले. हे सर्वजण एका ट्रकमध्ये आणि टॅक्सीत चढले. हा ट्रक आणि ही टॅक्सी वकिलातीच्या भिंतीच्या कडेच्या रस्त्याने मुख्य दरवाज्याच्या जरा अलीकडे कोपऱ्यावरच थांबविण्यात आली. काही क्षणाने टॅक्सी मुख्य दरवाज्याकडे पुढे

जाऊ लागली. कोण येते आहे हे पाहण्याकरता देवडीवरचे मिलिटणी पोलीस निरखून टॅक्सीकडे पाहात असतानाच त्यांच्यावर टॅक्सीतून गोळ्या झाडण्यात आल्या. टॅक्सी तशीच पुढे गेली. दरवाज्यावरचे पहारेकरी सैनिक अंगावर येणाऱ्या गोळ्या चुकवीत मुख्य दरवाज्यातून आत गेले व त्यांनी दरवाजा आतून बंद केला.

ट्रकमधून रॉकेटस् खाली उतरविण्यात काय वेळ गेला तेवढाच, एक रॉकेट कपौंडच्या भिंतीवर आदळताच प्रचंड स्फोट झाला आणि माणूस आत शिरू शकेल एवढे खिंडार बाहेरच्या भिंतीला पडले. काँगी त्यातून आत घुसू लागले.

वकिलात आता सावध झाली होती. भगदाडातून आत शिरणाऱ्यांना टिपण्यासाठी मशीनगन सज्ज झाली होती. पहिले दोघे आत गेले, ते निमिषार्धात गोळ्या लागून गतप्राण झाले. परंतु आत पाठोपाठ येणाऱ्या बाकीच्यांनी वकिलातीवर हॅन्डग्रेनेड फेकायला सुरुवात केली. मशीनगन बंद पडली आणि वकिलातीच्या काँक्रीट इमारतीवर रॉकेट्सचा मारा काँगींनी सुरू केला.

वकिलातीवर हल्ला सुरू झाल्याचा रेडिओ-संदेश बाहेर पाठवला गेल्याने, तास भरात इमारतीबाहेर एक सैनिक तुकडी दाखल झाली. आता इमारतीभोवती काँगी व भिंतीबाहेर अमेरिकन सैनिक होते. इमारतीत काही नोकरवर्ग अडकला होता आणि इमारत आणि सभोवतालची भिंत यामधील जागा काँगींनी कब्जात घेतली होती. चॅन्सेरीच्या वरच्या मजल्यांवर रॉकेट्सचा मारा आणि ग्रेनेड्सचा मारा भिंतीच्या आत सुरू होता.

सर्वत्र काळोख असल्याने भिंतीबाहेरच्या सैनिकांना हे काँगी आवारात कुठून शिरले हेच कळेना. कारण भिंतीला पडलेले भगदाड काळोखात दिसत नव्हते. शिवाय आत किती काँगी शिरले आहेत याचा अंदाज येत नव्हता. एक हेलिकॉप्टर इमारतीच्या माथ्यावर उतरण्याचा प्रयत्न केला, परंतु ग्रेनेड आणि रॉकेट्सच्या माऱ्यामुळे हेलिकॉप्टर उतरविण्याचा वैमानिकाला धीर होईना.

शहरात अनेक ठिकाणी हल्ले सुरू झाल्याने सर्वत्र गोंधळ माजला होता. या गदारोळात तीन-चार तास गेले. उजाडल्याबरोबर भिंतीतले भगदाड स्पष्ट झाले आणि अमेरिकन सैनिक आत शिरले. आवारात कोंडल्या गेलेल्या सर्व व्हिएतकाँगींनी मरेपर्यंत लढाई केली आणि अखेर ते मरून पडले. प्रेते मोजली. १५-१६ होती. मरण्यापूर्वी या काँगींनी अमेरिकेचे वकिलातीच्या आवारात फडफडणारे निशाण खाली खेचले होते. त्याची लक्तरे केलेली होती आणि दर्शनी भागात अमेरिकन सरकारचे लटकणारे मोठे बोधचिन्ह ॲन्टी-टँक रॉकेट वापरून उद्ध्वस्त केलेले होते.

टॅक्सीत असलेले दोन काँगी, व्हॅन साऊ आणि गिअँग हे फक्त जिवंत हाती सापडले. त्यांना अमेरिकन लष्कराने दक्षिण व्हिएतनामी सरकारच्या सुपूर्त केले. त्यांचे काय झाले

ते पुढे कोणालाच कळले नाही.

या हल्ल्याला तसा म्हटला तर मोठा लाक्षणिक अर्थ होता. व्हिएतनाम भूमीत उभे केलेले अमेरिकेचे निशाण आम्ही उपटून फेकून देत आहोत, परकीय सत्तेची खुद्द सायगाव शहरातील वकिलात ही आमच्यापासून सुरक्षित नाही हे अमेरिकेला उमगावे यासाठी व्हिएतकाँगींचा हा प्रयत्न होता.

सायगाव आणि हुए या दोन शहरांसह सर्व दक्षिण व्हिएतनामी शहरांतून व्हिएतकाँगींनी २९ जानेवारीच्या मध्यरात्री याच धर्तीवर हाहाःकार उडवून दिला.

## हुए शहरावर काँगी कब्जा

दोन उत्तर व्हिएतनामी बटालियन्स हुए शहरावरील चढाईसाठी नियोजित केलेल्या होत्या. हा हल्ला ३० जानेवारीला पहाटे ३-३० वाजता सुरू झाला. टेट्स सण संपून सुस्तावलेले शहर हादरू लागले. रॅकेट्सचे आवाज आणि मशीनगनच्या फैरींनी सर्व आसमंत दुमदुमून गेले. हुए हे शहर पुरातन राजधानीचे शहर असल्याने मोठमोठ्या इमारती, चर्चेस आणि बौद्ध मंदिरे हे या शहराचे वैशिष्ट्य होते. शहराच्या मध्यभागातून वाहणारा 'परफ्यूम' नदीचा प्रवाह शहराचे दोन भाग करून पूर्व-पश्चिम वाहतो. यामुळे शहराच्या एका भागापासून दुसरा भाग काहीसा वेगळा पडल्यासारखा वाटतो. नदीच्या दोन्ही अंगाला एकदमच लढाई पेटली. अमेरिकन सैनिक शहराच्या दक्षिण भागात होते, संख्येने फारसे नव्हते. सर्व शहराचा अवघ्या चार-पाच तासांत काँगींनी कब्जा केला. पुढचे तीन आठवडे हुए शहरावर राष्ट्रीय मुक्ती आघाडीचे निशाण फडकत होते. २४ फेब्रुवारीला दक्षिण व्हिएतनामी सेना आणि अमेरिकेचे सैन्य मोठ्या संख्येने हुए शहरावर चालून आले आणि त्या लोंढ्यापुढे टिकाव लागणे कठीण हे ओळखून काँगींनी माघार घेतली. २५ फेब्रुवारीला हे शहर पुनश्च दक्षिण व्हिएतनामी सैन्याच्या ताब्यात आले. या लढाईत १४२ अमेरिकन सैनिक आणि ३८४ दक्षिण व्हिएतनामी सैनिक मारले गेले. परंतु या व्यतिरिक्त साम्राज्यवाद्यांचे हस्तक ठरवून २१ दिवसात सुमारे ३,००० लोकांना काँगींनी ठार केले. यात हुए शहरातील निरनिराळ्या मिशनचे पाद्री आणि बरेच कॅथॉलिक नेते अंतर्भूत होते. शहरातील ८० टक्के इमारती या लढाईत जमीनदोस्त झाल्या आणि शहराला स्मशानाची अवकळा चढली.

जे हुए शहरात घडले तेच कान-थो, मी-थो, व्हिनलाँग, राच-गिआ, बेन-ट्री, न्हा-त्रांग, तुई-होआ, दलात या शहरातून घडले. मुक्ती आघाडीच्या सेनेने या शहरांवर ३० जानेवारीच्या पहाटे हल्ले चढविले. त्या ठिकाणी असलेल्या दक्षिण व्हिएतनामी सैनिकांना एकतर बराकीत कोंडून घातले, अथवा मारून पिटाळून लावले. शहरे ताब्यात घेतली. यातली काही सात दिवस तर काही पंधरा दिवस तर काही संपूर्ण तीन आठवडे मुक्ती

आघाडी आपल्या ताब्यात ठेवू शकली. या काळात तुरूंगात कोंडलेले व्हिएतकाँगी मुक्त झाले. दक्षिण व्हिएतनाम सैन्याने पुनश्च जमवाजमव करून अमेरिकन सैन्याच्या मदतीने ही शहरे कब्जात घेण्यात अखेर यश मिळविले असले, तरी शहराभोवतालच्या खेड्यापाड्यांवर आणि शेतांवर यासाठी अमेरिकेनांना हल्ले करावे लागले. याचा परिणाम अमेरिकेच्या बाँबवर्षावाखाली आपलीच घरे आणि गावे उद्ध्वस्त पाहाण्याचे दक्षिण व्हिएतनामी जनतेच्या नशिबी आले.

जनरल वेस्टमोरलँड यांनी या चढाईचे विस्तृत क्षेत्र आणि झपाटा पाहून उद्गार काढले –

> ‘अशा रितीने प्राणावर उदार होऊन व्हिएतकाँगी हल्ले चढवतील अशी आमची कल्पना नव्हती. परंतु त्यांनी प्रत्यक्ष हे केले. फार मोठ्या प्रमाणावर काँगी वेशांतर करून शहरातून घुसले याचा सुगावा दक्षिण व्हिएतनामी पोलिसांना अजिबात लागला नाही. या घटनेमुळे आमची झोपच उडाली.’

## हेतू साध्य झाला

टेट् सणाची संधी साधून व्हिएतकाँगींनी हा जो मोठा हादरा दिला त्यात प्राणहानी प्रचंड झाली. एकूण १,००० अमेरिकन सैनिक, २,१०० दक्षिण व्हिएतनामी आणि ३०,००० काँगी तीन आठवड्यात मृत्युमुखी पडले. परंतु या हत्याकांडात खरी आहुती पडली ती अमेरिकेच्या जगातील दबदब्याची! आपली दक्षिण व्हिएतनाममध्ये लढणारी पोरे तशी सुरक्षित आहेत, या अमेरिकन आईबापांना वाटणाऱ्या विश्वासाची!

या भीषण चकमकीतून एक गोष्ट निर्विवाद सर्वांपुढे आली ती ही की, अमेरिकेने विपुल पैसा ओतून आणि सैनिकी साहाय्य देऊनही, दक्षिण व्हिएतनाममधील सर्वसामान्य जनतेचा विश्वास आणि सहानुभूती व्हिएतकाँगींकडेच आहे. शहरे वगळली तर खेड्यापाड्यातून काँगींचेच सर्वत्र वर्चस्व आहे. आतापर्यंत निदान शहरे तरी काँगींच्या धोक्यापासून मुक्त आहेत असे समजले जात होते, परंतु टेट् चढाईमुळे आता तो विश्वासही उरलेला नाही. जनरल वेस्टमोरलँड याने अधिक सैन्य पाठवा अशी मागणी केली.

अमेरिकेतील जनतेला या सर्व प्रकाराने प्रथम संताप आला आणि मग संतापाची जागा विषण्णतेने घेतली. मोठमोठे विचारवंत आणि मुत्सद्दी म्हणू लागले – या लढाईत अमेरिकेला यश अशक्य आहे. निवृत्त सेक्रेटरी ऑफ स्टेट डीन ॲचेसन यांनी जाहीरपणे सांगितले. ‘अमेरिकेने दक्षिण व्हिएतनाममधील युद्ध हेतूच्या दृष्टीने गमावलेले आहे.’ प्रोफेसर केनेथ गालब्रेथ या भारतात यापूर्वी वकील म्हणून आलेल्या विचारवंताने सल्ला दिला. ‘व्हिएतनामी राष्ट्रवादाविरुद्ध अपयश देणारी लढाई अमेरिकेने बंद करावी,

व्हिएतनाममधून सैन्य काढून घेण्यातच शहाणपणा आहे.' फक्त दक्षिण व्हिएतनाममध्ये अमेरिकेचा वकील अेल्सवर्थ बंकर म्हणत होता, 'गालब्रेथ यांचा सल्ला बरोबर नाही.'

## अधिक सैन्य कशाला?

अध्यक्ष जॉन्सन तर चक्रावून गेले. त्यांनी मतामताच्या गलबल्यातून मार्ग काढण्यासाठी चीफ ऑफ स्टाफ यंत्रणेचे प्रमुख जनरल व्हीलर यांना व्हिएतनामला धाडले. २३ फेब्रुवारी ६८ ला व्हीलर सायगावला आला. जनरल वेस्टमोरलँडबरोबर चर्चा करायला त्याने सुरुवात केली. जनरल वेस्टमोरलँडने सांगितले –

'टेट् हल्ल्यात भाग घेणाऱ्या ६७,००० कॉंगींपैकी आम्ही निम्मे तरी ठार केले आहेत.'

मग प्रश्न आला की आता तर निम्मेच उरले आहेत, तर सध्या आहे तेवढ्या सैन्यात का भागणार नाही?

जनरल वेस्टमोरलँड यांनी सांगितले, 'कॉंगींची भरती वेगाने होते. त्यांना रसद येते. कंबोडियातील 'हो-चि-मिन्ह' मार्ग म्हणून ओळखल्या जाणाऱ्या मार्गाने ही रसद सरळ दक्षिर व्हिएतनाममध्येच येते. लाओस आणि कंबोडियाच्या सरहद्दी ओलांडून छापे घालायचे तर अधिक सैन्य हवे.'

जनरल व्हीलरने विचारले –

'अधिक म्हणजे किती?'

उत्तर आले, 'किमान दोन लाख.'

२५ फेब्रुवारीला जनरल व्हीलर अमेरिकेला यायला निघाला. तत्पूर्वी जनरल वेस्टमोरलँडची नवी मागणी त्याने वॉशिंग्टनला तारेने कळविली होती.

संरक्षण सचिव मॅकनामारा हे १ मार्चला आपल्या कामाचा चार्ज सोपवणार होते. नवे डिफेन्स सेक्रेटरी म्हणून क्लार्क क्लिफोर्ड यांची नेमणूक जाहीर झाली होती. दोन दिवसासाठी या नव्या मागणीवर मत देऊन वाईटपणा कशाला घ्या? म्हणून अधिक सैन्य पाठवा या मागणीबद्दल काय करायचे, याचा निर्णय नव्या संरक्षण सचिवावर ढकलून मॅकनामारा तसेच निवृत्त झाले.

नवे संरक्षण सचिव क्लिफोर्ड यांनी चीफ ऑफ स्टाफकडे विचारणा केली –

'दोन लाख अधिक सैन्य पाठवावयाचे ठरले, तर त्याचे जे आर्थिक परिणाम अमेरिकेच्या अर्थव्यवस्थेवर होतील त्याचा विचार नंतर करू. परंतु दोन लाख सैनिक पाठवल्यामुळे लगेच विजय तरी मिळणार आहे का?'

चीफ ऑफ स्टाफ कचेरी काही सांगेनाच. कितीही सैनिक पाठविले तरी नजिकच्या भविष्यात ही लढाई संपत नाही, हे या प्रश्नाचे उत्तर होते. क्लिफोर्ड यांनी अध्यक्ष जॉन्सन

यांना सल्ला दिला –

‘इतके जादा सैन्य पाठवू नये. जास्तीत जास्त १३,५०० सैनिक जादा पाठविले जातील आणि जर ही लढाई गमावल्यासारखी असेल तर शांतता प्रयत्नाला तरी लागू या.’

n

# २३ : अमेरिका बावचळली । जॉन्सन चिंताग्रस्त

टेट् सणाची संधी साधून 'राष्ट्रीय मुक्ती आघाडी' (NLF) आणि दक्षिण व्हिएतनाममध्ये भूमिगतपणे वावरणाऱ्या उत्तर व्हिएतनामी सैन्य तुकड्या यांनी ३० जानेवारी ६८ पासून तीन आठवडे, दक्षिण व्हिएतनाममधील सर्व शहरातून जो दणका दिला , त्याच्या हळूहळू बाहेर येणाऱ्या हकिगती अध्यक्ष जॉन्सन यांना विलक्षण चिंताग्रस्त करणाऱ्या होत्या. या चढाईचे परिणाम व्हिएतनामी युद्धावर दोन प्रकारचे झाले होते – लष्करी आणि राजकीय.

लष्करी परिणामांचा विचार करायचा तर सर्व शहरांचा अमेरिकेच्या सैन्य मदतीने, दक्षिण व्हिएतनामी सैन्याने जरी पुन्हा कब्जा केला तरी या शहरातून हुसकलेले व्हिएतकाँगी, शहराभोवतालच्या खेड्यापाड्यातूनच परागंदा झाले. प्रत्येक शहराभोवती असलेल्या खेड्यापाड्यातून या काँगींना हुसकण्यासाठी अमेरिकेने बाँबवर्षावाचा आश्रय केला. दुसरे काय करावे ते अमेरिकेच्या लष्करी अधिकाऱ्यांना सुचले नाही. याचा परिणाम असा झाला की दक्षिण व्हिएतनाममधील शेते व जंगल संपत्ती आणि खेडोपाडी ही सर्व अमेरिकेच्याच बाँबहल्ल्याखाली बेचिराख झाली. उत्तर व्हिएतनामी गेली अनेक वर्ष काय भोगीत होते, याचे दर्शन दक्षिण व्हिएतनामी नागरिकांनाही झाले.

## फंदफितुर असंख्य आहेत

ज्या पद्धतीने एवढ्या मोठ्या प्रमाणावर एकाच वेळी हे हल्ले चढवले गेले, त्यावरून एक गोष्ट स्पष्ट झाली ती ही की दक्षिण व्हिएतनामी सैन्यात बरेच व्हिएतकाँगी घुसले आहेत. फंद-फितुरी विलक्षण आहे आणि विश्वास टाकावा अशी दक्षिण व्हिएतनामी सैन्याची स्थिती आता राहिलेली नाही. हजारोंच्या संख्येने, शस्त्रास्त्रांसह व्हिएतकाँगी शहरात शिरतात आणि दक्षिण व्हिएतनामी सेनेला अथवा पोलिसांना याचा सुगावा लागत नाही याचा अन्य काय अर्थ होता?

या आघातामध्ये जो विध्वंस झाला तो इतका प्रचंड होता की हल्ला झालेली शहरे पूर्वस्थितीत यायला किमान २-३ वर्षे लागणार होती. अमाप पैसा आणि श्रम याशिवाय ते शक्य नव्हते. इमारतींच्या ढिगाऱ्यांतून शहरवासी आपल्या नातेवाईकांची प्रेते धुंडाळत होते आणि कुजलेल्या प्रेतांची दुर्गंधी नाकाला सहन होत नव्हती.

जनरल वेस्टमोरलँड आणि अमेरिकेचे सायगावस्थित वकील अेल्सवर्थ बंकर हे मात्र सांगत होते, 'झाल्या प्रकाराने जनतेचे मनोधैर्य वाढले आहे. सर्व शहरे पुनः ताब्यात घेतली गेल्याने, सायगाव सरकारवरचा जनतेचा विश्वास वाढला आहे.' परंतु या त्यांच्या सांगण्यात खोट्या प्रचाराचाच सर्वथैव भाग आहे हे कुणालाही समजण्यासारखे होते.

## दूरचित्रवाणी आणि लोकमत

अध्यक्ष जॉन्सन यांना सर्वात त्रासदायक वाटत होता तो मात्र या हल्ल्याचा राजकीय परिणाम. सायगावमध्ये झालेली आणि इतरत्र झालेली लढाई अमेरिकन जनतेने दूरचित्रवाणीवर पाहिली. कर्नल लोनसारखा जबाबदार माणूस, सायगावच्या रस्त्यावर व्हिएतकाँगी असल्याचा नुसता संशय येताच एका तरुणाच्या मस्तकात गोळी झाडतो, ही गोष्ट अमेरिकेतील जनतेने टी.व्ही.च्या पडद्यावर पाहिली. मस्तकातून गोळी घुसली आणि रक्ताच्या चिळकांड्या उडत असतानाच तो तरुण पायात मोडल्यासारखा खाली कोसळताना पाहताना, अमेरिकेतील लोकांच्या अंगावर शहारे आले. सायगावच्या वकिलातीच्या आवारात पडलेली काँगींची प्रेते, नॅपलाम बाँबच्या आघातानंतर नग्नावस्थेत सैरावैरा धावणाऱ्या पोरीबाळी, हुएमधील उद्ध्वस्त इमारती आणि प्रेतांचा खच हे सर्व दूरचित्रवाणीच्या पडद्यावर पाहात असताना युद्धाची शिसारी आता सर्वसामान्य अमेरिकन माणसाच्या घराघरात पसरली.

जॉन्सन यांचे विरोधक आता या अनर्थाचे खापर अध्यक्ष जॉन्सन यांच्यावरच फोडू लागले. रॉबर्ट केनेडी यांनी शिकागो येथे आपल्या एका भाषणात सांगितले. 'सरकारी यंत्रणेने तयार केलेल्या भ्रमाचा बुरखा शत्रूने आता फाडला आहे. प्रत्यक्षात दक्षिण व्हिएतनाममध्ये काय चालू आहे हे सर्वांना आता कळले आहे.'

## युद्ध कशासाठी?

व्हिएतनाम प्रश्नाकडे एकदा समग्रपणे पाहिल्याखेरीज गत्यंतर नाही, अशी जॉन्सन यांची खात्री झाली. १९६८ अखेर होणाऱ्या अध्यक्षीय निवडणुकीला उभे राहण्यास नकार देण्याचा त्यांचा मनोमन निर्धार याच सुमारास झाला असला पाहिजे. आपल्या कारकीर्दीत घडलेला अनर्थ, कारकीर्दीच्या अखेरच्या ८-१० महिन्यात जेवढा निस्तरता येईल तेवढा निस्तरावा, निदान हाताबाहेर गेलेले युद्ध आटोपते घ्यावे असे अमेरिकन अध्यक्षांना वाटू लागले. व्हिएतनाम युद्धात अमेरिकेने लक्ष घातले, तेव्हा या प्रश्नाकडे अमेरिका कोणत्या अर्थाने पाहात होती आणि पाहाता पाहाता काही वर्षात तिथे असा सर्वांगीण अनर्थ का झाला? अमेरिकेची शोकांतिका कशी घडली? काय चुकले? कुठे चुकले? पुढे काय? असे अनंत प्रश्न अध्यक्षांना करू लागले. जॉन्सनसाहेबांची झोप उडाली. ते अधिक थकलेले आणि म्हातारे दिसू लागले.

दुसऱ्या महायुद्धानंतरची काही वर्षे आणि १९६८ सालची जागतिक परिस्थिती यात महद्‌अंतर पडले होते. दुसऱ्या महायुद्धानंतर लगेच लोकशाही राष्ट्रे विरुद्ध जागतिक साम्यवाद असे सर्व जागतिक प्रश्नांचे एक अतिसोपे रूप होते. मॉस्को आणि पेकींग या दोन्ही कम्युनिस्ट राष्ट्रांची गट्टी होती. युरोपात सोव्हिएट रशियाने युरोपीय राष्ट्रांवर पोलादी

पडदा सोडलेला होता. कोरिया, ग्रीस, ब्रह्मदेश, इंडोनेशिया, फिलीपाईन्स या सर्व ठिकाणी कम्युनिस्टांच्या नेतृत्वाखाली बंडे उभी झाली होती. कोरियात अध्यक्ष आयसेनहॉवर यांनी यशस्वीरित्या लष्करी कारवाई करून कम्युनिस्ट आक्रमण रोखल्याचे दृश्य सर्वांनी पाहिलेले होते. या पार्श्वभूमीवर अध्यक्ष आयसेनहॉवर आणि त्यावेळेचे सेक्रेटरी ऑफ स्टेट डल्लेस यांनी व्हिएतनामच्या अंतस्थ संघर्षात अमेरिकेला गुंतवले तेव्हा त्यात फार चुकले असे कोणालाच वाटले नाही.

अध्यक्ष केनेडी यांनी आयसेनहॉवरचा वारसा पत्करला, तेव्हा आंतरराष्ट्रीय क्षेत्रात कम्युनिस्टांनी लाओस, मलेशिया, इंडोनेशिया इथे आपल्या अस्तित्वाची चुणूक दाखवली होती. सोविएट रशियाबरोबर वस्तुनिष्ठ संबंध जोडण्याची अध्यक्ष केनेडी यांची इच्छा होती, प्रयत्न होते. क्यूबा प्रकरणात केनेडी यांनी १९६२ साली मॉस्कोचे जे वस्त्रहरण केले व तिथे आणली जाणारी सोविएट क्षेपणास्त्रे रशियाला हटवावी लागली, त्यामुळे केनेडी यांचा आत्मविश्वास वाढला. आयसेनहॉवर पासून सुरू असलेले व्हिएतनाममधील कम्युनिस्ट विरोधी युद्ध दक्षिण व्हिएतनामला जिंकून देण्यासाठी केनेडी राजवटीने आता जोरदार प्रयत्न सुरू केले.

सीमीत युद्धक्षेत्राचा – Limited War – खेळ कम्युनिस्टांनी सुरू केला, तर त्यालाही आम्ही उत्तर देऊ शकतो अशी त्यांची ठाम भूमिका होती. व्हिएतनामचे रणक्षेत्र यासाठी केनेडी यांना आयतेच उपलब्ध होते. भूमिगत राहून कम्युनिस्टांनी एखाद्या देशात अंतर्गत यादवी सुरू केली, तर त्यांच्याशी लढताना त्या देशातील जनतेचा पाठिंबा आणि सहानुभूती कम्युनिस्टांचा मुकाबला करू पाहाणाऱ्या परकीयांना आवश्यक आहे हे यशाचे सूत्र राहाणार होते. परंतु व्हिएतनामी सैनिकांनी मोठ्या प्रमाणावर दक्षिणेत घुसून संघर्षाला चांगलेच युद्धाचे रूप आणले.

## बुडता खांद्यावर चढतो

केनेडी यांचेनंतर सूत्रे अवचितपणे जॉन्सन यांचेकडे आली ती याचवेळी! युद्ध जॉन्सन यांनी सुरू केलेले नव्हते. युद्ध आवाक्यात ठेवणे अथवा अजिबात बंद करणे हे दोन पर्याय जॉन्सन यांचेपुढे होते. केनेडी यांनी अध्यक्ष दिएमच्या सायगाव राजवटीच्या बाजूने भक्कमपणे उभे राहाण्याची अमेरिकेची भूमिका स्पष्ट केलेली होती. दिएम याचा खून पडल्या पाठोपाठ केनेडी यांचा खून झाला. परंतु नव्या सायगाव राजवटीला दिलेले आश्वासन पत्करणे अमेरिकेला भाग होते आणि जॉन्सन या भुलभुलैयात खेचले गेले. गालब्रेथसारखे काही जण १९६२ सालीच इशारा देत होते की, ‘व्हिएतनाममध्ये काहीतरी राजकीय तड लावणे हा खरा उपाय आहे आणि अमेरिकन सरकारने सायगाव राजवटीला मदत करणे काही मर्यादेपर्यंतच अंगावर घ्यावे. युद्ध अमेरिका व उत्तर व्हिएतनाम यांचेमध्ये

चालू आहे असे जगाला वाटण्याइतपत या युद्धात अमेरिकेने गुरफटू नये.' परंतु प्रत्यक्ष व्यवहारात हा विवेक पाळणे जरा कठीणच होते. बुडत्याला मदत करायची किंवा नाही हे एकदाच ठरवावे लागते. गळ्याला मिठी मारण्याइतके अंतर आधार देणाऱ्याने आधीच काटलेले असेल, तर बुडता माणूस वाचवणाऱ्याच्याच गळ्याला मिठी मारल्याशिवाय राहात नाही. जॉन्सन यांची अशीच स्थिती झाली. सायगाव राजवट अमेरिकेच्या खांद्यावर चढून बसली. जॉन्सनसाहेब लोकमताच्या दबावाखाली व्हिएतनाममध्ये मोठ्या प्रमाणावर सैन्य धाडत राहिले. १९६३ सालापर्यंत दक्षिण व्हिएतनाममध्ये फक्त १८,००० अमेरिकन सैन्य होते, तो आकडा १९६७ अखेर पाच लक्षांवर गेला आणि टेट् चढाईनंतर जनरल वेस्टमोरलँड आणि अमेरिकेचा वकील अेल्सवर्थ बंकर म्हणत होते, 'किमान आणखी दोन लाख सैनिक पाठवा.'

व्हिएतनाम युद्धात अमेरिका कशाकरता उतरली आहे याची जी असंख्य कारणे सोयीनुसार वॉशिंग्टन राज्यकर्त्यांनी दाखवली, त्यावर नजर टाकली तरी या धोरणामागचा गोंधळ लक्षात येतो. कारणे काय सांगितली जात होती? दक्षिणपूर्व आशियात कम्युनिस्ट आक्रमण रोखण्यासाठी अमेरिका तिथे गेली आहे, लाल चीनचे आक्रमण वाढू नये म्हणून अमेरिका तिथे गेली आहे, दक्षिण व्हिएतनामला लोकशाही राष्ट्र म्हणून जगता यावे यासाठी अमेरिका तिथे गेली आहे, सीमित युद्धे पेटवली तरी अमेरिका यशस्वी करते हे कम्युनिस्टांना कळावे म्हणून अमेरिका तिथे गेली आहे, मित्रांना दिलेले वचन अमेरिका पाळते हे जगाला कळावे म्हणून अमेरिका तिथे गेलेली आहे. ज्यावेळी जे उपयोगी पडेल ते कारण पुढे केले गेले होते. हे निरनिराळे हेतू वरवर पाहाता एकाच हेतूच्या छटा वाटल्या, तरी या प्रत्येक हेतूच्या पूर्ततेसाठी करावी लागणारी उपाययोजना मात्र वेगवेगळी होती, ही गोष्ट अमेरिकेच्या राजकारण्यांनी १९६४ नंतर ध्यानात घेतली नाही. पुन्हा पुनः अध्यक्ष जॉन्सन एकच तुणतुणे वाजवीत की मी ज्या मार्गाने जातो आहे तो मार्ग आयसेनहॉवर आणि केनेडी यांनीच आखून दिलेला आहे. हे संपूर्ण सत्य नव्हते.

## जॉन्सन यांचे दुर्दैवी निर्णय

बदलत्या परिस्थितीनुसार मार्गातील फेरबदल अपेक्षित असतात! वारसा हक्काने आलेल्या मार्गानेच वाटचाल करायची म्हटली तर कायदा एकच असतो की काही घोटाळा झालाच, तर त्याचा दोष मागच्यावर ढकलता येतो. वस्तुतः १९६३ साली अवचितपणे अधिकारावर आल्या आल्या अध्यक्ष जॉन्सन यांना सायगाव राजवटीची वागणूक पाहून, अमेरिकेच्या मदतीचा ओघ आवरता घेण्याचा उपाय योजता आला असता. १९६४ साली अध्यक्षपदाची निवडणूक जिंकल्यानंतर व्हिएतनाम युद्धाचा वस्तुनिष्ठ विचार करण्याची दुसरी संधी त्यांना लाभली होती. १९६५ साली उत्तर व्हिएतनामवर बॉंबहल्ले सुरू

करण्याचा निर्णय घेण्यापूर्वीही त्यांनी जरा जास्त गंभीरपणाने सर्व प्रश्नांचा सखोल विचार करायला हवा होता. १९६५ साली बौद्धभिक्षूंचे बंड सुरू झाले, तेव्हा तरी अध्यक्ष जॉन्सन यांना जाग यायला हवी होती. यातले काहीच दुर्दैवाने घडले नाही.

उत्तर व्हिएतनामवरील बॉंबहल्ल्याचा निर्णय, अमेरिकन लष्कराने दक्षिण व्हिएतनामच्या लढाईत प्रत्यक्ष भाग घेण्याचा निर्णय, हे अध्यक्ष जॉन्सन यांनी घेतलेले निर्णय अत्यंत दुर्दैवी होते. यामुळे व्हिएतनाममधील युद्ध हे अमेरिकेचे व उत्तर व्हिएतनामचे युद्ध झाले आणि अमेरिकेतील जनतेच्या घरापर्यंत युद्ध येऊन भिडले. मोठ्या प्रमाणावर अमेरिकन तरुण मृत्यूमुखी पडू लागले. प्रतिवर्षी अमेरिकेच्या तिजोरीवर आर्थिक ताण वाढत गेला आणि हे सर्व नशिबात येऊनही विजय दृष्टीपथातही न आल्याने, जॉन्सन यांची लोकप्रियता झपाट्याने घसरत गेली. १९६८ साली टेट् चढाईनंतर तर जॉन्सन हे सर्वत्र अप्रिय झाल्याचा प्रत्यय येऊ लागला होता.

## युरोपीय जातीच केवळ श्रेष्ठ नसतात!

उत्तर व्हिएतनामवर बॉंबफेक ही सूडातून जन्माला आली. माणूस सूड घेतो, शिक्षा करतो ती अशा व्यक्तीला, की ज्या व्यक्तीवर कायदेशीररित्या व नैसर्गिकदृष्ट्या आपला अधिकार आहे, अशी भावना त्या माणसाजवळ असते. उत्तर व्हिएतनामी जनता बॉंबवर्षावाखाली गर्भगळीत होईल असे अमेरिकेच्या सेनावरिष्ठांना का वाटावे? दुसऱ्या महायुद्धात जर्मनीच्या बॉंबहल्ल्याखाली इंग्लिश लोकांचे धैर्य खचले नव्हते, हा इतिहास काय अमेरिकनांना अज्ञात होता? परंतु अमेरिकन राजकारणी, लष्करी नेते आणि अध्यक्ष जॉन्सन हे असे धरून चालले होते, की उत्तर व्हिएतनामी जनता ही मानसिकदृष्ट्या मुळी इंग्लिश किंवा तत्सम जातींपेक्षा कमकुवतच आहे! युरोपात अमेरिकेने नॅपलाम बॉंब, फॉस्फरस बॉंब कधी वापरले नाहीत, पण उत्तर व्हिएतनाममध्ये वापरले. का? या मागेही अशीच चुकीची भावना होती. हो-चि-मिन्ह यांच्या नेतृत्वाखाली उत्तर व्हिएतनामी जनता पडेल त्या त्यागाला तयार झालेली असेल, याची अध्यक्ष जॉन्सन यांना कल्पना आली नाही.

बॉंबवर्षाव सुरू झाला होता तेव्हा अशी कल्पना आली नाही. दक्षिण व्हिएतनामला अनेकांनी वारंवार भेटी देऊनही ही कल्पना येऊ शकली नसती, हेदेखील समजण्यासारखे आहे. परंतु बॉंबवर्षाव हनोई आदी शहरातील आणि खेड्यापाड्यातील जनता किती असामान्य धैर्य आणि सहनशीलता प्रकट करीत आहे याची प्रत्यक्ष भेटीनंतर लेखकांनी आणि पत्रकारांनी केलेली सचित्र वर्णने ६६-६७ या दोन्ही वर्षात अमेरिकेतील वृत्तपत्रेच प्रसिद्ध करीत नव्हती काय? ली लॉकवुड या पत्रकाराने हनोई आदी शहरांचा २८ दिवस दौरा करून आपला सचित्र वृत्तांत 'लाईफ' नियतकालिकात प्रसिद्ध केला

होता. (एप्रिल ६७) पूर्वी आलेल्या वृत्तांतापेक्षा हा अधिक विस्तृत आहे. १७ व्या अक्षांशावर जो निर्लष्करी पट्टा जिनिव्हा करारानुसार निर्माण केला गेला होता, त्या पट्ट्यात फक्त लॉकवुड याला हनोई सरकारने जाऊ दिले नाही. परंतु बाकी सर्व भागांत त्याला मुक्तपणे फिरू देण्यात आले. त्याने घेतलेली छायाचित्रे तर विलक्षण बोलकी होती.

## बॉंब वर्षावातील हनोई

एकदा हा पत्रकार हनोई रस्त्यावरून फिरत असताना बॉंबहल्ल्याचा इशारा झाला. रस्ता गजबजलेला होता, तो काही मिनिटांतच निर्मनुष्य झाला. रस्त्याच्या फुटपाथवर आणि उघड्या मैदानात जागोजागी सिमेंट पाईप जमिनीत पुरून संरक्षक 'बिळे' तयार केलेली होती. त्यात सर्व माणसे पाहता पाहता उतरली व भूमीआड झाली. घरांच्या छपरांच्यावरून विमानविरोधी तोफांशी नेमलेली माणसे हजर झाली. धोका संपल्यावर भोंगा वाजताच रस्ता पुन्हा गजबजू लागला. एखादा चित्रपट चालू असताना क्षणभर फिल्म तुटावी आणि लगेच तो पुन्हा चालू व्हावा तसे घडले. गहबड नव्हती, गोंधळ नव्हता.

हनोई शहराच्या दक्षिणेला बॉंबमुळे बरीच उद्ध्वस्तता आलेली होती. मुख्य रस्त्यावर चाळीस चाळीस फुटांचे खड्डे पडले होते. रात्री आठ वाजता निर्माण झालेल्या या खोल खोल विहिरी दोनदोनशे स्वयंसेवकांनी सतत खपून पहाटे दोनपर्यंत बुजवूनही टाकल्या होत्या. नदी आणि ओढ्यावरचे तात्पुरते पूल पहाटे तयार केले जात होते; आणि सकाळ झाली की ते उतरून बाजूला केले जात. शाळांतून डेस्कांच्या खालीच, बॉंबहल्ला सुरू होताच मुलांना उतरवण्यासाठी चर खणलेले होते. पाठीवर बंदुका लावून सरहद्दीवरचे शेतकरी स्त्री-पुरुष रोपे लावत होते, नांगरटी करीत होते, बॉंबहल्ल्यातून गुराढोरांचे संरक्षण करण्यासाठी त्यांच्या उंचीइतके चर वा मातीच्या भिंती तयार केलेल्या होत्या.

हनोई शहरातले सरकारी दुकान पहाटे ५-३० ते ७-३० फक्त उघडे राहात असे. एका घरात एका वेळी १२ पेक्षा अधिक माणसे असू नयेत असा सरकारी हुकूम होता. यामुळे लग्नाचे स्वागत समारंभही एकावेळी १०-१२ माणसेच एकत्र येतील अशा पद्धतीने आखण्यात येत होते.

## ली लॉकवुड लिहितो –

'हनोईहून थेट सायगावपर्यंत पोचू शकणाऱ्या हमरस्त्यावर बॉंब पडून आपोआप निर्माण झालेली प्रचंड भुयारे बुजवलेली दिसत होती. हनोई शहर सोडल्यानंतर पंधरा मैलांवर जी गावे लागली त्या गावातले प्रत्येक घर पडलेले होते. बॉंबवर्षावात सापडून रूळावरून कलंडलेल्या रेल्वे गाड्या प्रचंड शवासारख्या शेतातच पडलेल्या होत्या. रस्ता

फक्त रात्री वाहनांनी भरलेला दिसे. रशियन आणि चिनी बनावटीचे ट्रक्स आणि जीपगाड्या यांचा ओघ अखंडपणे दक्षिणेच्या दिशेने सुरू होता.

'हनोई शहराच्या दक्षिणेचे महत्त्वाचे रेल्वे-जंक्शन फू-ली संपूर्णपणे उद्ध्वस्त झालेले दिसले. गावातले सर्वच्या सर्व सुमारे ७,७०० लोक गाव सोडून गेलेले होते. या शहरावर चाळीस वेळा बाँब पडले होते. टोंकिनच्या आखातातील नाम-दिन्ह शहराची हीच अवस्था झालेली पाहिली. नाम-दिन्हहून सायंकाळच्या वेळी आम्ही निघालो. वाटेत रात्र झाली. परंतु आकाशात चंद्र होता. इतक्यात एका जेटने आमच्या पुढेच सुरकांडी मारली आणि आमच्या मोटारीच्या पुढे ५० फुटांवरच एक रॉकेट आणि सहा बाँबचा भडिमार त्याने केला. जवळच्या शेतात प्रचंड स्फोट झाला आणि आसमंत हादरले. मी घाबरून आमची मोटार थांबताच उडी मारली आणि रस्त्याकडेच्या खणलेल्या एका चरात शिरलो.

'ॲन्टी-एम गावात ज्या शाळेवर बाँब पडून ३० मुले आणि त्यांचे शिक्षक नुकतेच मारले गेले होते ती उद्ध्वस्त शाळा मी पाहिली.

'अमेरिका जे भयंकर बाँब वापरीत आहे, त्याविरुद्ध मला सर्वत्र संताप आढळला. हे सी-बी-यू (कलर बाँब युनिटस्) बाँब असतात. हा बाँब पडताना हवेतच फुटतो आणि आतून बेसबॉलच्या चेंडूच्या आकाराचे तीनशे गोळे चौफेर उडतात. या प्रत्येक गोळ्यातून शेकडो तीक्ष्ण सुया अतिशय वेगाने बाहेर फेकल्या जातात. या शेकडो सुयांवर नॅपलमचे रोंगण असते आणि यामुळे प्रत्येक सुई जिथे घुसते तिथे ती चिकटून बसते. व्हिएत-ट्री या गावातील एका कारखान्याच्या भिंतीवर मी अशा बाँबमुळे उमटलेल्या वर्तुळाकार खुणा पाहिल्या. या बाँबवर्षावात उडालेल्या सुयांमुळे जखमी झालेल्या रूग्णांची मी हॉस्पिटलात भेट घेतली. सी. बी. यू. बाँबमधून उडालेल्या सुया कुणाच्या डोळ्यात तर कुणाच्या पोटात घुसलेल्या होत्या.'

उत्तर व्हिएतनाममधील या जीवनमरणाच्या झगड्याचे संपूर्ण चित्र दाखवून लॉकवुडने अखेर निष्कर्ष काढला होता –

> 'उत्तर व्हिएतनाममधील ज्या ज्या लोकांना मी भेटलो त्यांच्या दृष्टीने युद्ध म्हणजे हे बाँबहल्ले होते. त्यांचा सर्वांचा असा ठाम समज दिसला की अमेरिकेने हे सर्व हल्ले चालवले आहेत, त्यामागे त्यांचा साम्राज्यवादच आहे. दक्षिण व्हिएतनाममध्ये तुमचे सैनिक घुसत आहेत याला पायबंद घालण्यासाठी हे हल्ले केले जात आहेत, असे सांगण्याचा प्रयत्न केला, त्याचा उपयोग झाला नाही. काहींना आश्चर्य वाटले, काही कुचेष्टेने हसले! आश्चर्याची गोष्ट मात्र ही की उत्तर व्हिएतनामी जनतेने आता हा बाँबवर्षाव रोजचाच समजून पुरता पचवला आहे.'

इतके सगळे होत असूनही अमेरिकनांचा केवळ अमेरिकन म्हणून लॉकवुड याला कुठेही द्वेष आढळला नाही. नॉर्मन मॉरिगन नावाच्या अमेरिकन माणसाने व्हिएतनाममधील युद्धाचा निषेध म्हणून वॉशिंग्टनला पेंटॅगॉन कचेरीसमोर स्वतःला जाळून घेतले. त्याच्या नावाने हनोईत एक रस्ता लॉकवुड याला आढळला. अध्यक्ष जॉन्सन यांच्या खिजगणतीतही हा मॉरिगन उरला नव्हता, परंतु हनोई त्याला विसरलेली नव्हती.

## भ्रष्टाचारी सायगाव राजवट

एका बाजूला बाँबवर्षावात ताठ मानेने जगणारे उत्तर व्हिएतनामी जनतेचे हे जीवन सर्वपरिचित झाले होते, तर दुसऱ्या बाजूला दक्षिण व्हिएतनाममधील भीषण परिस्थिती अनेकांनी वर्णन केली होती.

सायगाव सरकारने ज्या ज्या गोष्टीत हात घातला, त्या सर्वांचे वाटोळे केले होते. सायगावचे सचिवालय म्हणजे वॉशिंग्टनच्या सचिवालयाचाच एक अत्यंत गलथान आणि निष्क्रीय विभाग झाला होता. कितीही चांगली योजना तयार करून पाठवली तरी त्याचा बट्ट्याबोळ व्हायला तिथे उशीर लागत नसे. जमीन सुधारणा, सुरक्षित वस्त्यांची योजना, खत वाटप, निर्वासितांचे पुनर्वसन यातली एकही गोष्ट सायगाव सरकारला व्यवस्थितपणे हाताळता आली नाही. तरीही कारभार सडत चालला असल्याचे भान कुणाला आले नाही. अमेरिका डॉलर ओतीत होती. सायगाव शहरातील राहणीमानाने उच्चांक गाठला होता. १९६५ च्या आणि १९६७ च्या जीवनमानात २०० टक्क्यांनी वाढ झाली होती. काळा बाजार, लाचलुचपत उघडपणे आणि मोठ्या प्रमाणात सर्व थरात चालू होती. श्रीमंत अधिक श्रीमंत होत होते. गरीब नामशेष होण्याच्या अवस्थेला आलेले असूनही मरत नव्हते. लोक जगण्यासाठी वाटेल ती नीच कर्मे करू लागले होते. सायगाव सरकारातील राष्ट्रपती, उपराष्ट्रपती आणि पंतप्रधान यांनी सत्तेवर आल्यापासून किती पैसा केला याची उघड चर्चा सर्वत्र ऐकू येत होती. काही वर्षांपूर्वी जी कर्मे करताना सरकारी अधिकाऱ्यांना थोडीफार तरी लाज वाटत असे, ती देखील आता वाटत नसे. अधिकाऱ्यांच्या जागा जणू लिलाव करून भराव्या तशा भरल्या जात.

जगात दोन प्रकारचे भ्रष्टाचार असतात. एका प्रकारात अहितकारक जाचक नियमांचाच गैरफायदा घेतला व दिला जातो, परंतु दुसऱ्या प्रकारात भ्रष्टाचार हा मूळ जीवनपद्धतीचाच एक भाग बनून जातो. हा दुसरा प्रकार एखाद्या रोगासारखा समाजपुरुषाला पोखरून टाकतो. सायगाव सरकारने माजवलेला भ्रष्टाचार हा या दुसऱ्या प्रकारचा होता.

सिनेटर विल्यम फुलब्राईट यांनी उघडपणे ६७ साली सांगितले होते – 'सायगाव शहर हे अमेरिकेचे रांडगृह झालेले आहे.'

या उद्गारात एका अंशाचीही अतिशयोक्ती नाही, नव्हती. सायगाव शहराचा चेहरामोहरा अमेरिकन सैनिकांनी संपूर्ण बदलून टाकला होता. रात्र पडली की दक्षिण व्हिएतनामी पोरे 'होंडा' मोटार-सायकली घेऊन बराकीबाहेर उभी असत. अमेरिकन सैनिकांना दारूच्या बारमध्ये पोचविणे आणि तिथून त्यांना वेश्यावस्तीत नेण्याच्या कामाबद्दल त्यांना सैनिक भरपूर पैसे देत. सायगाव शहराच्या या नव्या अर्थरचनेत सायगावमधील वेश्या ही जवळ जवळ मंत्र्यांच्या पगाराएवढी महिन्याची कमाई करीत होती! टॅक्सी ड्रायव्हरला युनिव्हर्सिटी प्रोफेसरपेक्षा जास्त पैसे मिळत होते!

असे रोगग्रस्त सायगाव सरकार उत्तर व्हिएतनामविरुद्ध लढू शकेल यावर कोणाचाच विश्वास बसण्यासारखा नव्हता. प्रत्यक्षात दक्षिण व्हिएतनाम सरकारचे स्वरूप जरी असे नपुंसक होते, तरी अमेरिकन राजकारणी मात्र ते कार्यक्षम दाखवण्याचा अखंड प्रयत्न करीत होते. जे नाही ते भासवण्याचा ताण अखेर इतका वाढला, की अमेरिकेच्या फसलेल्या धोरणाचे टीकाकार दक्षिण व्हिएतनामच्या नालायक सरकारवरील आपला संतापच अधिक तीव्र स्वरूपात व्यक्त करू लागले! अगदी सुरुवातीपासूनच हा प्रकार सुरू असल्याचे लक्षात येते.

## हा सौदा परवडणारा नाही

१९५३ अखेर व्हिएतनाममध्ये तेव्हा लढणाऱ्या फ्रेंचांची काय स्थिती होती? आपण का आणि कशासाठी येथे लढत आहोत हे त्यांना कळेनासे झाले होते. लढाईत हानी होत होती, माणसे मरत होती. हे फ्रेंचांना नवीन नव्हते. कुठल्याही लढाईत या गोष्टी होतातच. परंतु हे सर्व कशाकरता? या प्रश्नाचे उत्तर जेव्हा फ्रेंचांना मिळेनासे झाले तेव्हा व्हिएतनाममधून फ्रेंच निघून गेले. वस्तुतः हो-चि-मिन्ह २० डिसेंबर १९४६ ला हनोईतून निसटला तेव्हा त्याने बजावले होते –

'हा सौदा तुम्हाला परवडणारा नाही. एका फ्रेंच सैनिकामागे तुम्ही आमची १० माणसे मारलीत तरी या हिशोबाने जय शेवटी आमचाच होणार आहे.'

१५ वर्षांनी अमेरिकनांवर आता तोच प्रसंग आला होता. अध्यक्ष हो याचे अमेरिकनांनाही तेच सांगणे होते –

'हा सौदा तुम्हाला परवडणारा नाही.'

नवे संरक्षण सचिव क्लिफोर्ड यांनी अध्यक्ष जॉन्सन यांना १९६८ च्या मार्च महिन्यात जो सल्ला दिला होता, तो अशाच स्वरूपात होता. अध्यक्ष जॉन्सन विचारांती या निष्कर्षावर आले की व्हिएतनामच्या युद्धात जेव्हा अमेरिका उतरली तेव्हा त्याला जो अर्थ होता, तो केव्हाच पुसला गेला आहे. गेली काही वर्षे ज्यांच्या वतीने आपण युद्धात

उतरलो ते सायगाव सरकार आणि अमेरिकेचे सरकार यांच्यातील संवाद हा मुक्या-बहिऱ्याच्या संभाषणासारखा अर्थशून्य झाला आहे. कितीही सैन्य दक्षिण व्हिएतनाममध्ये पाठविले आणि उत्तर व्हिएतनामवर कितीही बाँब टाकले तरी लष्करी विजय हाती येणार नाही. अशा परिस्थितीत उत्तर व्हिएतनामवरील बाँबहल्ले बंद करून हनोई सरकारशी समेटाचा प्रयत्न करणे हाच मार्ग उरतो. मान सन्मानाचा प्रश्न विसरून आपल्याला हे पाऊल उचलले पाहिजे. वर्तमानाची ती निकड आहे. आपण वर्तमानाचे हे देणे लागतो.

n

# २४ : जॉन्सन अस्तंगत । निक्सन सत्तेवर

व्हिएतकाँगींच्या ज्या चढाईने अमेरिकेतील राज्यकर्त्यांना हादरा दिला, त्या चढाईबद्दल व्हिएतकाँगींनी मात्र अतिशय वस्तुनिष्ठ परीक्षण केले. ३०-३१ जानेवारीला शहरावरील आघात सुरू झाल्यानंतर ४८ तासांनी लढाईच्या यशापयशाच्या बातम्या 'राष्ट्रीय मुक्ती आघाडी'च्या कंबोडियाच्या रानातील मुख्य लष्करी ठाण्यावर येऊ लागल्या. काँगी नेतृत्वाने या बातम्यांच्या आधारे सुरू झालेल्या चढाईसंबंधी आपले मत एका निवेदनाद्वारे आपल्या सैन्याधिकाऱ्यांकडे पाठविले. ते निवेदन पुढीलप्रमाणे होते – 'एकाचवेळी जवळ जवळ सर्व शहरांवर व नगरांवर ठरलेल्या वेळी आपण चढाई केली. पहिल्या धडाक्यात आपण बरेच यश पदरात पाडले. सायगावच्या तैनाती सरकारची या धक्क्यामुळे शुद्ध गेल्यासारखी झाली आणि अमेरिकेचे लष्करी प्रतिष्ठान गोंधळात सापडले.

'परंतु आपल्यामध्ये अजून खालील उणीवा आणि कमतरता आहेत असे लक्षात आले.

१) शत्रूच्या तुकड्यांचा ताबडतोब उच्छेद करणे आपल्याला जमले नाही. यामुळे जे विभाग आपण जिंकले ते हाती राखू शकलो नाही.
२) राजकीय आघाडीवर जुलमी सत्तेविरुद्ध स्थानिक जनतेला उठाव करावासा वाटावा असे वातावरण निर्माण करण्यात आपण अयशस्वी ठरलो.'

यावेळी लढाई जारी होती. हुए, खेसानसारख्या शहरांवर काँगी कब्जा करून होते. १८ फेब्रुवारीला काँगी सैनिकांनी दुसरा हल्लाही सुरू केला होता. तरीही पहिल्या झडपेत जे जमू शकले नव्हते, याची जाणीव व्हिएतकाँगींना झाली होती.

## जनरल व्हिलर-वेस्टमोरलँड यांचे गुपित

जनरल वेस्टमोरलँड याच्या सायगावमधील कचेरीत फेब्रुवारीच्या मध्याला काँगींना बहुतेक शहरातून हुसकवल्याचा विजयोत्सव चाललेला होता. वॉशिंग्टनहून जॉईंट चीफ ऑफ स्टाफ चे अध्यक्ष जनरल व्हिलर हे परिस्थितीची प्रत्यक्ष पाहणी करण्याकरता सायगावला येत असल्याचा संदेश फक्त पोहोचला होता. आत्तापर्यंत अमेरिकेत व्हाईट हाऊसमधील मुत्सद्यांनी चीफ ऑफ स्टाफ यंत्रणेला व्हिएतनाम युद्धासंबंधात संपूर्ण अधिकार सुपूर्त करण्याचे नाकारले होते. लढाईचे क्षेत्र आणि स्वरूप कसे ठेवायचे याचे सर्व अधिकार अध्यक्ष जॉन्सन यांनी स्वतःच्या हातात ठेवले होते. चीफ ऑफ स्टाफ यंत्रणेला दक्षिण व्हिएतनाममध्येच बऱ्याच गोष्टी करण्याची इच्छा होती. त्यांना

व्हिएतनाममध्ये किमान साडेसात लाख सैन्य हवे होते. लाओसमार्गे येणारी कॉंगींची रसद तोडण्यासाठी त्यांना त्या देशात घुसून ते मार्ग उद्ध्वस्त करावयाचे होते. हैपॉंग बंदर सुरूंग पेरून निरूपयोगी करावे व उत्तर व्हिएतनामवरती प्रचंड बॉंबवर्षाव सतत सुरू करावा, असे या अमेरिकेतील लष्करी अधिकाऱ्यांच्या मनात होते. व्हिएतनामचे युद्ध मग चुटकीसरशी संपेल असा त्यांचा कयास होता. जनरल व्हिलर येत होते ते बहुधा अशाच काहीतरी योजना घेऊन, असे जनरल वेस्टमोरलॅंडला वाटत होते.

२३ फेब्रुवारीला जनरल व्हिलर आपल्या सल्लागारांच्या ताफ्यासह सायगावला पोहोचले. जनरल वेस्टमोरलॅंड व अध्यक्ष थियू यांच्याशी चर्चा केल्यानंतर जनरल व्हिलर याचे असे मत झाले की, शहरावरील कॉंगींचे हल्ले फसले असले तरी शहराभोवती त्यांचा कायम वेढा यापुढे पडलेला राहणार आहे. मिळालेल्या धक्क्यातून दक्षिण व्हिएतनामचे सैन्य कितपत सावरू शकेल आणि पुन्हा लढू शकेल हे सांगता येत नव्हते. सायगाव राजवट कोसळली नव्हती, परंतु हिंदकळून निघाली होती. जर पुन्हा असाच ‘एक और धक्का’ कॉंगींनी दिला, तर संरक्षणाचा सर्व भार अमेरिकेच्या लष्करावर पडणार होता. जनरल व्हिलर यांनी काढलेला परिस्थितीचा निष्कर्ष बरोबर होता. जनरल वेस्टमोरलॅंड यांचेबरोबर यावरील उपायांचीही चर्चा झाली. त्यातूनच निर्णय झाला की चीफ ऑफ स्टाफनी अध्यक्षांकडे आणखी दोन लाख सैन्याची मागणी करावी.

लष्करी सेनानींनी ही जी नवी मागणी मुक्रर केली, ते एक लष्करी गुपितच त्यावेळी होते. या मागणीप्रमाणे सैन्य पाठवायचे झाले तर अमेरिकेतील राखीव सेना दलाला सेवेसाठी पाचारण करणे भाग होते. हा नवा आर्थिक बोजा अमेरिकेची कॉंग्रेस मान्य करीलच, याचा भरवंसा नव्हता. व्हिएतनाममधील अलीकडील लढाईतील क्रौर्य आणि भीषणता दूरचित्रवाणीवर पाहून या अर्थशून्य युद्धाला विटलेल्या जनतेत, या नव्या मागणीच्या पूर्ततेने नक्कीच असंतोष माजणार होता. यामुळे ही सर्व बोलणी अतिशय गुप्त स्वरूपाचीच ठेवलेली होती. जनरल व्हिलर आणि अध्यक्ष जॉन्सन यांच्यात चाललेल्या महत्त्वाच्या खलबतांचा सुगावा अमेरिकेतील चाणाक्ष पत्रकारांना लागला. ते बातमीच्या मागावर फिरू लागले.

## अखेर बातमी फुटलीच

अखेर ‘न्यूयॉर्क टाईम्स’ च्या बातमीदाराने भेद केला. ९ मार्च ६८ च्या अंकात मोठा मथळा देऊन बातमी आली –

‘वेस्टमोरलॅंड’ यांची दोन लक्ष सहा हजार सैनिकांची मागणी! अध्यक्ष जॉन्सन यांची सल्लागारांशी चर्चा.’

व्हाईट हाऊसमधील अधिकाऱ्यांनी या बातमीचा इन्कार केला नाही अथवा ही बातमी खरी असल्याचेही कबूल केले नाही. पाठोपाठ ११ मार्चला 'न्यूज वीक' नियतकालिकाने भरपूर छायाचित्रे देऊन खेसानच्या लढाईचे वृत्त देण्याच्या मिषाने आत्तापर्यंत त्या नियतकालिकाने घेतलेली भूमिका संपूर्ण बदलून टाकली व लिहिले –

'व्हिएतनाममधील अमेरिकेच्या भूमिकेचा पुनर्विचार करण्याची वेळ आलेली आहे. ही लढाई अमेरिकेचे राष्ट्रीय जीवन आणि तिचे आंतरराष्ट्रीय संबंध पूर्णपणे विस्कटल्याखेरीज जिंकता येणार नाही हे नागडे सत्य आहे. आता २,०६,००० आणखी सैन्य हवे अशी मागणी आलेली आहे. परंतु यापूर्वी कम्युनिस्टांनी सैन्य वाढीला जशी दाद दिली नाही तसेच यावेळीही घडेल. अण्वस्त्रांचा उपयोग करायचा नसेल, तर अमेरिकेने एक सत्य आता स्वीकारले पाहिजे की व्हिएतनाममध्ये अमेरिकेला लष्करी वर्चस्व कधीही प्रस्थापित करता येणार नाही.'

याच नियतकालिकाने पुढे मागणी केली होती –

'व्हिएतकाँगींना धुंडाळून नष्ट करण्याचा उद्योग अमेरिकेने थांबवावा. दक्षिण व्हिएतनामच्या सरहद्दीवर पाठवलेले आणि विशेषतः निर्लष्करी टापूलगत धाडलेले आपले सैन्य मागे घ्यावे आणि लढाई संपवण्याच्या दृष्टीने शांततेसाठी प्रयत्न सुरू करावे.'

वृत्तपत्रांतून आलेले वृत्त शंभर टक्के खरेच होते. पेंटॅगॉन या अमेरिकेच्या सर्वोच्च लष्करी यंत्रणेत जनरल व्हिलर बरोबर लष्करी तज्ज्ञांच्या बैठकीवर बैठकी चालू होत्या. स्वतः जनरल व्हिलर, जनरल रोस्टोव्ह आणि जनरल टेलर यांचे म्हणणे असे होते की काँगी आता आपल्या भूमिगत ठाण्यातून बाहेर पडून मैदानात उतरले आहेत. त्यांना चिरडण्यासाठी आयतीच संधी आली आहे तर ती राबवावी. या पद्धतीने व दिशेने विचार सुरू असल्याने अमेरिकेने बॉंब वर्षाव थांबवावा या प्रस्तावाचा कुणी विचारही केला नाही.

सेक्रेटरी ऑफ स्टेट डीन रस्क हे मात्र ब्रिटीश परराष्ट्रमंत्री जॉर्ज ब्राऊन यांनी केलेल्या सूचनेवर विचार करीत होते. व्हिएतनाम प्रश्नाची उकल सोपी व्हावी म्हणून अमेरिकेने उत्तर व्हिएतनाम क्षेत्रातील बॉंब वर्षाव ताबडतोब स्थगित करावा अशी जाहीर सूचना ब्राऊन यांनी केली होती.

१४ मार्चला रॉबर्ट केनेडी यांनी संरक्षण सचिव क्लिफोर्ड यांची भेट घेऊन सांगितले –

'अध्यक्षपदासाठी उभे राहण्याचे मी ठरवले आहे. जर जॉन्सन यांनी व्हिएतनाम लढाईचा पवित्रा बदलला आणि शांततेसाठी वाटाघाटी सुरू करण्याचे ठरवले, तर मात्र त्यांचे करता मी माझी उमेदवारी मागे घेईन.'

## अपयशाचे धनी कोण?

यावेळेपर्यंत जॉन्सन हे डेमोक्रेटिक पक्षाचे उमेदवार म्हणून रिचर्ड निक्सन या रिपब्लिकन पक्षाच्या उमेदवाराविरुद्ध उभे राहातील अशी अपेक्षा होती. डेमोक्रेटिक पक्षातील जॉन्सन यांचे प्रतिस्पर्धी म्हणून रॉबर्ट केनेडी यांना कसलेही आश्वासन देण्यास क्लिफोर्ड यांनी नकार देताच, १६ मार्चला रॉबर्ट केनेडी यांनी अध्यक्षीय तिकिटासाठी पक्षाकडे मागणी केली.

अध्यक्ष जॉन्सन यांच्या मनात काय चालू होते याचा कुणालाच अंदाज येत नव्हता. १७ मार्चला जॉन्सनसाहेब आपल्या कुटुंबियांबरोबर रविवार घालविण्यासाठी टेक्सासमधील आपल्या घरी गेले. रविवारी सकाळी कन्या लिंडा आणि तिचा नवरा रॉब यांचेबरोबर ते चर्चला गेले. रॉब हा लवकरच व्हिएतनाममधील युद्धात भाग घेण्यासाठी सायगावला जायचा होता. यामुळे सर्व कुटुंबीय जमले होते.

दक्षिण व्हिएतनाममध्ये लाओस सरहद्दीला लागून असलेल्या खे-सान येथील अमेरिकेच्या लष्करी तळाच्या परिसरात लढाई जोरात सुरू होती. खे-सानच्या आसपास अमेरिकेचे तुफानी बॉंबहल्ले सुरू होते. खे-सान तळ सायगावला जोडणारा रस्ता कॉंगींनी अडवून धरला होता. १५ मार्चला जनरल वेस्टमोरलँड यांनी वॉशिंग्टनला संदेश पाठवला की खे-सान चा रस्ता मोकळा करण्यासाठी नवी चढाई सुरू होते आहे.

व्हाईट हाऊसमध्ये नेमके काय चालू होते? अनेक वावड्या उठत होत्या. लोकांची अधिरता वाढत चालली होती. बाहेरच्यांना कल्पना नसली तरी अध्यक्षीय निवासात झपाट्याने गोष्टी घडायला सुरुवात झाली होती.

यशाचे पितृत्त्व घेण्यासाठी अनेकजण पुढे सरसावतात परंतु अपयश मात्र नेहमी पोरके ठरते. अध्यक्ष जॉन्सन यांच्या व्हिएतनामविषयक धोरणाची फटफजिती उडाली होती. या अपयशाला अध्यक्ष जॉन्सन यांचेच काही निर्णय कारण होते. उ. व्हिएतनाम दाती तृण धरून शरण येते, तर या यशाचे श्रेय घेण्यास अध्यक्ष जॉन्सन व माजी अध्यक्षांचे अभिमानी असलेले लष्करी सेनानी आणि व्हाईट हाऊसमधील आजी व माजी अधिकारी सर्व पुढे सरसावले असते. सिंहाचा वाटा अध्यक्ष जॉन्सन यांनी पटकावला असता. परंतु विपरीत घडले होते. अपयशाचा दोष चिकटून व्हिएतनाममधून अप्रतिष्ठेनिशी बाहेर पडण्याचा प्रश्न होता. हा निर्णय घेण्यापूर्वी अध्यक्ष जॉन्सन यांना अनेकांची सोबत हवी होती. आश्वासन हवे होते. अनेक जबाबदार माणसे या मताची आहेत असा विश्वास हवा होता. निदान विरोधकांची धार बोथट होईल अशी व्यवस्था करायची होती. कारण अध्यक्ष जॉन्सन यांच्या अडचणींचा फायदा घेऊन रिपब्लिकन पक्षाचे उमेदवार रिचर्ड निक्सन मतदारांना आश्वासन देऊ लागले होते, ‘अध्यक्ष झाल्याबरोबर मी पहिली गोष्ट जी करीन

ती म्हणजे व्हिएतनाममधील युद्ध संपवीन.' म्हणजे नेमके काय करीन हे निक्सन सांगत नव्हते; सत्तेवर नसल्याने त्यांच्यावर ती जबाबदारीही नव्हती.

## वाईझ, ओल्ड मेन

या सर्व प्रचाराला उतारा म्हणून २५ आणि २६ मार्चला व्हाईट हाऊसमध्ये व्हिएतनाममधील युद्धाशी संबंधित अशा लष्करी आणि बिनलष्करी नेत्यांचे एक मोठे संमेलन जॉन्सन यांनी भरवले. निमंत्रणे अध्यक्षांच्या सहीने रवाना झाली होती. यात कॅबिनेट सेक्रेटरी होते. वकील होते. लष्करी जनरल होते.

२५ मार्चला सोमवारी सायंकाळी ७-३० वाजता ही सर्व निमंत्रित मंडळी गोळा झाली. Wise-old-men वयोवृद्ध विचारी माणसे, असे त्यांचे वर्णन करता येईल. कोण कोण होते? आता सरकारात नसलेले पूर्वीचे सेक्रेटरी ऑफ स्टेट डीनॲचेसन, जॉर्ज बॉल, मॅक-जॉर्ज बुंडी, डग्लस धिलोन, जनरल रिजवे याशिवाय व्हिएतनाममधील पूर्वीचे अमेरिकन वकील हेन्री कॅबट लॉज आणि जनरल मॅक्स्वेल टेलर हे दोन्ही वकील तूर्त सरकारात होतेच. सरकारी ज्येष्ठ राजकारणी सेक्रेटरी ऑफ स्टेट डीन रस्क, संरक्षण सचिव क्लिफोर्ड, जनरल रास्टोव्ह, ॲव्हरेल हॅरिमन, विल्यम बुंडी, अर्थुर गोल्डबर्ग ही सर्व मंडळी हजर होती. या बैठकीत अध्यक्ष जॉन्सन नव्हते व बैठकीचे संचालन डीन रस्क करीत हाते. बैठक गुप्त होती.

प्रथम संरक्षण सचिव क्लिफोर्ड यांनी अमेरिकेपुढे युद्धाबाबत कोणते पर्याय आहेत ते सुसूत्रपणे मांडले. ते पर्याय असे हाते –

अ) युद्धाची कक्षा व व्याप्ती वाढविणे. राष्ट्रीय लष्कर भरती करून लाओस, कंबोडिया आणि उत्तर व्हिएतनामवर चढाई करण्यासाठी आवश्यक ते अमेरिकन सैन्य दक्षिण व्हिएतनाममध्ये धाडणे.

ब) आहे हीच परिस्थिती चालू ठेवणे. थोडेफार सैन्य वाढवायचे परंतु तूर्त युद्ध जसे चालू आहे ते तसेच, त्याच कक्षेत चालू ठेवणे.

क) बॉंबवर्षाव कमी करणे व खे-सानसारखी बाहेरच्या बाजूची, एका बाजूला असलेली ठाणी सोडून देणे, हळूहळू युद्धाची सर्व जबाबदारी दक्षिण व्हिएतनामी सैन्यावर सोपवून, सैन्य दाट लोकवस्तीच्या शहराच्या संरक्षणापुरतेच ठेवणे.

## हेच का ते ॲचेसन?

बाओ-दाई सरकारला मान्यता देऊन सायगाव सरकारला आवश्यक ती मदत अमेरिका देईल, अशी १८ वर्षांपूर्वी लगोलग घोषणा करणारे दिवंगत अध्यक्ष

आयसेनहॉवर यांचे सेक्रेटरी ऑफ स्टेट, डीन अॅचेसन हे अजून हयात होते व बैठकीला आलेले होते. त्यांनी प्रांजळपणे या बैठकीत कबुली दिली –

'गेल्या नोव्हेंबरपासून माझे मन पालटू लागले होते. मी आता अशा निष्कर्षाला आलो आहे की लष्करी बळाच्या वापराने व्हिएतनाममधील आपले ध्येय साध्य होणे अशक्य आहे. तिथे जास्त सैन्य पाठवायला माझा विरोध आहे.'

अॅचेसन हे सर्वात वृद्ध, माजी परराष्ट्रमंत्री. त्यांचे हे भाषण ऐकून बैठकीवर त्याचा परिणाम झाला. हॅरिमन यांनी अॅचेसन यांनाच पाठिंबा दिला. गोल्डबर्ग-रोस्टोव्ह या दोघांनी मात्र पहिला पर्याय योग्य असल्याचे आग्रहाने प्रतिपादन केले.

मंगळवारी दुपारी या मंडळींपैकी फक्त १३ जणांची अध्यक्ष जॉन्सन यांच्याशी मसलत झाली. हे १३ जण होते – उपाध्यक्ष हंप्रे, जनरल व्हिलर, जनरल टेलर, कॅबट लॉज – हे सरकारातील चार जण आणि अॅचेसन, बॉल, ब्रॅडले, मॅक जॉर्ज बुंडी, धिलाँन, फोर्टास, मर्फी, रिजवे आणि व्हान्स. प्रत्येकाशी अध्यक्ष जॉन्सन स्वतंत्रपणे बोलले आणि शिवाय एकत्र चर्चा झाली. रस्क आणि क्लिफोर्ड या दोघांना त्या मसलतीत घेतले गेले नव्हते. ज्या मॅक-जॉर्ज बुंडी यांच्या अहवालावर विसंबून अध्यक्ष जॉन्सन यांनी तीन वर्षांपूर्वी उत्तर व्हिएतनामवर बाँबवर्षाव सुरू केला, त्याच राजर्षींनी अध्यक्षांना यावेळी सल्ला दिला, 'बाँबवर्षाव थांबवला पाहिजे. संपूर्णपणे थांबवला पाहिजे. कारण यापायी अमेरिकेतील लोकमतच अधिक कलुषित होते आणि लष्करीदृष्ट्या या हल्ल्यांचा फारसा उपयोग देखील होत नाही. अधिक सैन्य पाठवण्यासही माझा विरोध आहे.' डग्लस-धिलाँन हे रिपब्लिकन पक्षाचे होते. त्यांचा तर युद्धाची व्याप्ती वाढवायला सक्त विरोधच होता.

जनरल रिजवे यांनी कोरियाच्या युद्धात मॅक-ऑर्थरच्या पदच्युतीनंतर त्याचे जागी सेनापतीपद भूषविलेले होते. त्यांनी सूचना केली – 'दक्षिण व्हिएतनामच्या सरकारला आपण शस्त्रास्त्रे व साधनसामग्री फक्त द्यावी. दोन वर्षांची नोटीस द्यावी की दोन वर्षांत त्यांनी युद्धाची जबाबदारी पत्करावी, त्यानंतर अमेरिकेचे सैन्य काढून घ्यायला सुरुवात होईल. मग तेथे काहीही परिस्थिती असो.'

फोर्टास हे जनरल होते. आश्चर्य म्हणजे फोर्टास हे कसल्याही वाटाघाटी सुरू करण्यास ही वेळ अनुकूल नाही या मताचे निघाले!

अॅचेसन, कॅबट लॅज यांनी अर्थात शांततेचा मार्ग अनुसरण्याचा पर्यायच पसंत केला.

एकएक जण आपले मत मांडीत असताना अध्यक्ष जॉन्सन यांचा चेहरा अधिकाधिक गंभीर होत चालला होता. अखेर अध्यक्ष म्हणाले, 'माझी समजूत झाली आहे की तुमच्यापैकी मर्फी, ब्रॅडले, टेलर, फोर्टास आणि जनरल व्हिलर यांचा अपवाद करता, बाकी सर्वांचा व्हिएतनाम युद्धातून अंग काढून घ्यायच्या धोरणाला पाठिंबा आहे.' 'अंग

काढून घेणे' (disengagement) या शब्दावर कॅबट लॉज व बुंडी यांनी अध्यक्षांशी थोडा वितंडवाद केला व त्यांचे समाधान केल्यावर बैठक संपल्याचे अध्यक्ष जॉन्सन यांनी जाहीर केले.

१९६८ च्या अखेरीस होणाऱ्या निवडणुकीतील रिपब्लिकन उमेदवार रिचर्ड निक्सन हे ३१ मार्चला सायंकाळी साडेसहा वाजता, अमेरिकेतील सर्व रेडिओ केंद्रांवरून आपले भाषण प्रसारित करणार होते. अमेरिकेतील बदलते लोकमत पाहून निक्सन यांनी आपला पवित्रा बदलला होता. रॉबर्ट केनेडी जे डेमॉक्रेटिक पक्षाच्या तिकिटासाठी प्रयत्न करीत होते, त्यांच्या शिडातील हवा काढून घेण्यासाठी ते एकाएकी आपणही अध्यक्ष झाल्यावर शांततेच्या दिशेने पावले टाकणार आहोत असे मतदारांना भासवू लागले होते. या दृष्टीने या भाषणाचा उपयोग करून घ्यायचा त्यांचा विचार होता. नक्की काय करणार हे मतदारांना न सांगता निक्सन मोघम बोलत राहिल्याने टिंगलीचा विषय होऊ लागले होते. आपल्या भाषणात अशा टीकाकारांना उत्तर देण्याचा निक्सन यांचा बेत होता.

परंतु निक्सन यांचे हे भाषण झाले नाही. कारण अध्यक्ष जॉन्सन यांनी दिनांक ३१ ला रात्री आपल्या रेडिओवरील व दूरचित्रवाणीवरील निवेदनासाठी वेळ मागून घेतली. जॉन्सन यांचे निवेदन आधी होऊन गेले, तर निक्सन यांना आपली भूमिका मांडणे अधिक सोपे जाणार होते. म्हणून त्यांनी अध्यक्ष जॉन्सन यांना अग्रहक्क दिला व त्यांचे भाषण होईपर्यंत आपले स्वतःचे भाषण स्थगित केले. त्यादिवशी रात्री ९ वाजता दूरचित्रवाणीवर जॉन्सन राष्ट्राशी बोलणार होते. सायंकाळी ६ वाजताच रशियाचे अमेरिकेतील वकील डोब्रीनिन यांना पाचारण करून त्यांनी आपल्या निवेदनाचे स्वरूप त्यांना सांगितले. याचा उद्देश उघड होता. आपल्या घोषणेनंतर हनोईला प्रतिसाद देण्यासाठी मॉस्कोने दडपण आणावे अशी अध्यक्षांची अपेक्षा होती.

## ३१ मार्चची घोषणा

रात्री ९ वाजता अध्यक्ष जॉन्सन यांचा चेहरा अमेरिकेच्या दूरचित्रवाणीच्या पडद्यावर उजळला. पाठोपाठ त्यांचा आवाज घुमू लागला –

'गुड इव्हिनिंग, प्रिय अमेरिकन बंधूंनो,

'आज तुमच्याशी मला व्हिएतनाम आणि दक्षिण-पूर्व आशियातील शांततेसंबंधी बोलावयाचे आहे. या प्रश्नाइतका आपणा सर्वांना व्यग्र करणारा दुसरा कोणताही प्रश्न तूर्त नाही. गेली काही वर्षे आपल्या सरकारचे प्रतिनिधी आणि इतर काही जण शांततेची बोलणी सुरू करण्यासाठी व काही उपाय शोधण्यासाठी जगभर प्रयत्नशील होते. या प्रयत्नांना हनोईने प्रतिसाद दिला नाही. बोलणी सुरू करण्याची मागणी त्यांनी फेटाळली.

शांततेचा शोध चालू असताही उत्तर व्हिएतनामने दक्षिण व्हिएतनामवर राक्षसी हल्ला चढविण्याची तयारी जारीने सुरू ठेवली.

'टेट् सणाच्या सुट्टीची संधी साधून त्यांनी चढविलेला हल्ला फसला. त्यांचा हेतू साध्य झाला नाही. कम्युनिस्टांची ही अपेक्षा होती, शहरातील जनता उठाव करील. ही अपेक्षाही पुरी झाली नाही. हल्ला चढविलेल्या ३० शहरांपैकी एकही शहर ते कब्जात घेऊ शकले नाहीत. उलट त्यांची प्रचंड हानीच झाली.

'परंतु त्यांनी दक्षिण व्हिएतनाम सरकारला आणि त्यांच्या सहकारी शक्तींना शहरापासून दूर असलेल्या फौजा शहरांत आणण्यास भाग पाडले. मोठ्या प्रमाणावर उलथापालथ झाली आणि लोकांना अतिशय यातना सहन कराव्या लागल्या. अर्ध्या लक्षाहून अधिक माणसे बेघर झाली.

'शक्यता आहे की कम्युनिस्ट कुठल्याही दिवशी पुन्हा हल्ला चढवतील. दक्षिण व्हिएतनामची तड १९६८ साली लावण्याचा त्यांचा प्रयत्न दिसतो. जय होवो वा पराजय होवो, संघर्षातील हे नवे वर्ष पान उलटणारे ठरणार असे दिसते.

'एक गोष्ट स्पष्ट आहे की जरी त्यांनी चढाईची दुसरी एक फेरी सुरू केली, तरी दक्षिण व्हिएतनाम आणि त्याचे सहाय्यकर्ते यांची प्रतिकारशक्ती नेस्तनाबूत करण्यात त्यांना कधी यश मिळणार नाही. परंतु शोकांतिका अशी आहे की लढणाऱ्या दोन्ही बाजूंची अनेक माणसे यात नाहीशी होणार आहेत. जे राष्ट्र गेली २० वर्षे युद्ध भोगीत आहे, तेच अधिक यातना भोगणार आहे. दोन्ही सैन्याची हानी होईल आणि युद्ध पुढे चालूच राहील.

'असे असण्याचे खरोखर कारण नाही. जी बोलणी झाल्याने हे अनेक वर्षे चाललेले रक्तरंजित युद्ध थांबू शकेल, ती सुरू करण्यास विलंब करण्याची जरूरी नाही.

'आज या रात्री, मी पुनः मागल्या ऑगस्ट महिन्यात देऊ केलेली बाँबवर्षावाची सूट पुन्हा घोषित करतो आहे. उत्तर व्हिएतनामवरील बाँबवर्षाव आम्ही थांबवीत आहोत. आमची अपेक्षा आहे की बोलणी लगेच सुरू होतील आणि ती शांततेसाठी असतील. आम्ही असे धरून चालतो की बोलणी चालू असताना, हनोई आम्ही आमच्यावर लादलेल्या माघारीचा गैरफायदा घेणार नाही.

'वाटाघाटीच्या मार्गाने, शांततेच्या दिशेने वाटचाल करण्याची आमची तयारी आहे. म्हणून आज या रात्री मी करत असलेल्या गोष्टींनी लवकर वाटाघाटी सुरू होतील, या अपेक्षेने मी संघर्षाचे स्वरूप लहान करण्याच्या दृष्टीने पहिले पाऊल टाकीत आहेत. आज मी आपल्या विमानांना आणि नाविक दलाला उत्तर व्हिएतनामवर हल्ले न चढविण्याचा आदेश पाठविला आहे. याला अपवाद फक्त निर्लष्करी पट्ट्यांचा राहील. कारण या

ठिकाणी शत्रूने जी बंदिस्ती केली आहे, त्यामुळे आमची आघाडी धोक्यात येण्याचा संभव आहे.'

येथे लिहून काढलेले जे भाषण होते त्याचे वाचन संपले. परंतु तरीही अध्यक्ष उत्स्फूर्तपणे पुढे बोलतच राहिले –

'अमेरिकेची तरुण मुले दूर आघाडीवर आहेत. आपल्या व सर्व जगाच्या आशा जेव्हा शांततेकडे लागलेल्या आहेत, अशा वेळी माझ्या दैनंदिन जीवनाचा एखादा तासही अन्य गोष्टीत दवडणे मला योग्य वाटत नाही. यासाठी आगामी निवडणुकीत माझ्या डेमॉक्रेटिक पक्षाने अध्यक्षपदाचा उमेदवार म्हणून माझी नियुक्ती करावी असा प्रयत्न मी करणार नाही आणि नियुक्ती झाली तरी मी ती पत्करणार नाही.'

अध्यक्ष जॉन्सन यांच्या या दोन्ही घोषणांनी अनेकांनी सुटकेचा निश्वास सोडला. या भाषणात संपूर्ण सत्य सांगितलेले नसले, तरी असत्य असे काहीही नव्हते. व्हिएतनाम युद्धात अमेरिकेला आपला मूळ हेतू साध्य करण्याच्या दृष्टीने जे अपयश आले आणि अमेरिकेच्या लष्करी सामर्थ्याचे जे वस्त्रहरण झाले, त्याचा पाढा अध्यक्षांनी जाहीरपणे वाचावा, अशी अर्थात कोणाची अपेक्षा नव्हती.

## अखेर प्रतिसादही आला

अध्यक्ष जॉन्सन यांच्या या अहवालाला या वेळी हनोई येथून तातडीने प्रतिसाद आला. तीन दिवसांनी (३ एप्रिल) हनोई रेडिओवरून एक निवेदन प्रसिद्ध झाले. निवेदनाचा पूर्वार्ध अर्थात व्हिएतनामी युद्धाची दुसरी बाजू प्रतिपादणारा होता. दक्षिण व्हिएतनाममध्ये लढणाऱ्या भूमिगत दक्षिण व्हिएतनामी सेनेनेच अमेरिकन आक्रमक फौजांना नामोहरम करून मर्मी घाव घातल्याने, अमेरिकेचा पराजय स्पष्ट झाला व यामुळे हा लढा आता नव्या कालखंडात प्रवेश करत आहे, ही गोष्ट निवेदनाच्या सुरुवातीलाच आग्रहपूर्वक मांडलेली होती. अध्यक्ष जॉन्सन यांच्या निवेदनात उत्तर व्हिएतनामच्या लष्करी दडपणाची जी अवहेलना करण्यात आली होती, त्याला हे उत्तर होते. मात्र नंतर स्पष्ट म्हटले होते –

'हनोई सरकार वाटाघाटींना तयार आहे.'

पुढे पुस्ती होती –

'मात्र बोलणी सुरू होण्यापूर्वी बाँबवर्षाव संपूर्णपणे थांबायला हवा.'

५ एप्रिल १९६८ रोजी हनोई सरकारचा परराष्ट्रमंत्री त्रिन्ह याने अमेरिकन प्रतिनिधींच्या भेटीसाठी आपला प्रतिनिधी पाठवण्याचे मान्य केले.

परंतु या वाटाघाटी लगेचच सुरू करण्यात आता दोन अडचणी उभ्या होत्या. एक म्हणजे ज्या वाटाघाटीत दक्षिण व्हिएतनामी राजवटीचा प्रधान शत्रू, राष्ट्रीय मुक्ती आघाडी (NLF) चे प्रतिनिधी भाग घेत आहेत, त्यात सायगाव राजवटीने भाग घेणे म्हणजे सायगाव सरकारने राष्ट्रीय मुक्ती आघाडीचे अस्तित्व व सत्तेतील संभाव्य वाटा मान्य केल्यासारखे होते. अध्यक्ष जॉन्सन यांचा राष्ट्रीय मुक्ती आघाडीच्या प्रतिनिधींनी वाटाघाटीत भाग घेण्यास प्रत्यवाय नव्हता. तसे त्यांनी जुलै १९६५ च्या आपल्या निवेदनात म्हटले होते. प्रश्न होता तो सायगाव सरकारच्या म्होरक्यांचा. दक्षिण व्हिएतनामचा राष्ट्राध्यक्ष जनरल थियू याला हे मान्य नव्हते.

दुसरी अडचण हनोई सरकारने उभी केली होती. ३ एप्रिलला हनोई रेडिओ निवेदनातील अखेरच्या भागात जाहीर केल्याप्रमाणे उत्तर व्हिएतनामवरील बाँबवर्षाव अमेरिकेने संपूर्णपणे थांबविल्याखेरीज हनोई सरकार वाटाघाटीसाठी प्रतिनिधी धाडणार नव्हते. राष्ट्रीय मुक्ती आघाडीला वाटाघाटीत प्रतिनिधीत्व मिळायलाच हवे, अशी हनोईची दुसरी अट होती. कारण दक्षिण व्हिएतनाममध्ये उत्तर व्हिएतनामचे सैन्य लढत असून दक्षिण व्हिएतनामी जनताच लढत आहे असा हनोईचा प्रथमपासूनच दावा होता.

अध्यक्ष जॉन्सन यांनी काही महिने ताणून धरले. परंतु अखेर हनोई सरकारचा दोन्ही प्रश्नांवर विजय झाला. राष्ट्रीय मुक्ती आघाडीचे प्रतिनिधी वाटाघाटीत भाग घेऊ शकतील, हा निर्णय अमेरिकेने दक्षिण व्हिएतनाम सरकारवर बंधनकारक ठरवला आणि ३१ ऑक्टोबरला रात्री अध्यक्ष जॉन्सन यांनी – 'उत्तर व्हिएतनामवरील हवाई, नाविक आणि तोफा या सर्व प्रकारचे हल्ले १ नोव्हेंबर १९६८ ला सकाळी ८ पासून बंद केले आहेत.' अशी स्पष्ट घोषणा केली.

सायगाव येथे राष्ट्राध्यक्ष थियू याने त्रागा सुरू केला,

'अमेरिकेने आम्हाला न विचारताच हा निर्णय जाहीर केला आहे.'

थियू हे समजून चुकला की यापुढे शांततेसाठी आपल्या हो-नाही ची अध्यक्ष पर्वा करणार नाहीत. या घोषणेने रिचर्ड निक्सन यांचाही विरस झाला. अध्यक्ष निवडणुकीत डेमोक्रेटिक उमेदवार हंप्रे यांचे पारडे जड करण्यासाठी जॉन्सन यांनी ही गोष्ट केली असे त्यांना साहजिकच वाटले.

## सायगाव अखेर नमले

जनरल थियू याला आता आशा वाटू लागली की समजा अमेरिकेच्या निवडणुकीत हंप्रे यांचा पराभव होऊन, रिचर्ड निक्सन हे रिपब्लिकन पक्षाचे उमेदवार अमेरिकेच्या अध्यक्षपदाच्या जागेवर आले, तर अध्यक्ष जॉन्सन यांनी उचललेली पावले आणि मनात

कबूल केलेली शरणागती संपते. पुन्हा एकदा शांततेच्या वाटाघाटी मग परस्पर उधळल्या जातील. या अपेक्षेने दक्षिण व्हिएतनाम सरकार वाटाघाटी सुरू करण्याची तारीख पुढे ढकलू लागले. अखेर १२ नोव्हेंबरला सेक्रेटरी ऑफ डिफेन्स क्लिफोर्ड याने सांगितले –

> 'सायगाव सरकारला त्यांचे प्रतिनिधी पॅरीस येथे सुरू होणाऱ्या वाटाघाटींसाठी पाठविणे आवश्यक आहे हे पटवण्याचे सर्व प्रयत्न आम्ही करू. एवढे सांगूनही त्यांची तिथे येण्याची इच्छा नसेल, तर त्यांच्याशिवाय वाटाघाटी पुढे चालू ठेवण्याची अमेरिकेच्या अध्यक्षांची जबाबदारी आहे.'

हा जमालगोटा लागू पडला! याल तर तुमच्यासह न याल तर तुमच्याशिवाय हीच सर्व अडेलतट्टूंना समजणारी भाषा असते. परंतु ही माणसे शक्य असेल तेव्हा प्रतिपक्षाची हानी करीत असतातच. नोव्हेंबरच्या ५ तारखेला अमेरिकेत अध्यक्षपदाची निवडणुक होती. हंप्रे यांचा पराभव करून रिचर्ड निक्सन निवडून आले! निक्सन यांच्या यशात दूरान्वयाने आपलाही वाटा आहे असे नतद्रष्ट समाधान सायगाव सरकारला लाभले. अध्यक्ष जॉन्सन यांच्याभोवतीचे सत्तेचे वलय आता काळवंडलेले होते आणि नव्या वर्षाच्या सुरुवातीला रिचर्ड निक्सन यांच्या हाती सूत्रे देऊन ते राजकारणातून जवळ जवळ अस्तंगतच होणार होते.

## तरी शेपूट वाकडे होतेच

क्लिफोर्ड यांच्या धमकीला घाबरून सायगाव सरकारने पॅरीसला प्रतिनिधी पाठवण्याचे मान्य केले. परंतु त्यांनी एक नवीनच खेंकटे उपस्थित केले. दोन्ही बाजू टेबलाभोवती कशा कशा बसणार? हा प्रश्न त्यांनी उपस्थित केला. टेबल साधारणपणे चौकोनी असते. अमेरिकेचे प्रतिनिधी, सायगावचे प्रतिनिधी, उत्तर व्हिएतनाम सरकारचे प्रतिनिधी आणि राष्ट्रीय मुक्ती आघाडीचे प्रतिनिधी असे या भांडणाचे चारच तर भागीदार होते. हा काही मोठा वादाचा प्रश्न नव्हता. परंतु चिडलेल्या आणि क्षणाक्षणाला रूसून बसून स्वतःचे महत्त्व वाढवणाऱ्या सायगाव सरकारने हा प्रतिष्ठेचा प्रश्न केला. त्यांचे म्हणणे असे की चारही पक्ष असे टेबलाच्या चार अंगाला बसले, तर राष्ट्रीय मुक्ती आघाडी ही समान दर्जाची होते. मूर्खाच्या नादी लागणे नको, म्हणून पॅरीसला खास सुतार आणून चांगले मोठे अंडाकृती टेबल बनविण्यात आले! सर्वजण वर्तुळाकार बसतील, कोणाच्याच पुढे कसली नावाची पाटी असणार नाही, निशाणे असणार नाहीत असे उभय पक्षांनी ठरविले. परंतु या खुळचट वादविवादात सायगाव सरकारने महत्त्वाचा वेळ काढला. १६ जानेवारी १९६९ ला सर्व कटकटी मिटवून वाटाघाटींना रस्ता मोकळा झाल्याचे पॅरीस येथून जाहीर झाले.

१९ जानेवारी १९६९ ला रिचर्ड निक्सन यांचा अमेरिकेचे अध्यक्ष म्हणून वॉशिंग्टन येथे शपथविधी झाला. ज्यासाठी सायगाव सरकारने वाटाघाटी सुरू करण्यापूर्वीच बरेच तिढे वर्तन केले होते, ती घटना अखेर घडली होती.

n

# २५ : हो-चि-मिन्ह कालवश : ३ सप्टेंबर १९६९

व्हिएतनाममधील युद्ध लवकरात लवकर संपवीन या घोषणेने रिचर्ड निक्सन यांनी निवडणुक जिंकली असल्याने, निक्सन अध्यक्ष होताच लवकरच व्हिएतनाममधील रक्तपात थांबेल अशी अमेरिकेतील जनतेची अपेक्षा होती.

परंतु रक्तपात थांबला नाही, तो अधिक मोठ्या प्रमाणात सुरू झाला. निक्सन राजवटीच्या पहिल्या तीन वर्षात १५,००० अमेरिकनांची या युद्धात आहुती पडली. आधीच्या पहिल्या तीन वर्षात जेवढे दक्षिण व्हिएतनामी सैनिक मृत्युमुखी पडले, त्यापेक्षा काही पटीने अधिक दक्षिण व्हिएतनामी सैनिक या वर्षात मारले गेले. नव्या राजवटीच्या या पहिल्या तीन वर्षात नागरिकांच्या मृत्यूचे प्रमाणही विलक्षण वाढले. आत्तापर्यंत फक्त दक्षिण व्हिएतनामी व उत्तर व्हिएतनामी मरत होते. आता लाओसमधील आणि कंबोडियातील नागरिकही मरू लागले. पॅरीस येथे शांततेच्या वाटाघाटी एकीकडे रेंगाळत असतानाच दोन वर्षांत, जे फक्त व्हिएतनामपुरते युद्ध होते, ते सर्व फ्रेंच इंडोचायनाचे युद्ध झाले. व्हिएतनामबरोबर लाओस आणि कंबोडिया हे दोन्ही देश युद्धाच्या खाईत ढकलले गेले.

## निक्सन पुढील पर्याय

असे का झाले? कारण निक्सन सरकारला शांततेचा पर्याय पत्करल्यानंतर घडू पाहणारे परिणाम स्वीकारण्याची इच्छा नव्हती. एखादे सुरु झालेले युद्ध बंद व्हावे अशी इच्छा प्रदर्शित करणे निराळे, आणि ज्यासाठी युद्ध पेटले त्या प्रश्नांना सरळ भिडणे निराळे. या वेगळ्या गोष्टी असतात. अध्यक्ष जॉन्सन यांना युद्ध थांबायला हवे होते, परंतु ते गमावून थांबावे असे त्यांनाही वाटत नव्हते. २१ जानेवारी १९६८ च्या त्यांच्या दूरचित्रवाणीवरील भाषणात हीच सर्व तारेवरची कसरत होती.

निक्सन यांना तर सत्तेवर आल्या आल्या युद्ध गमावण्याची जबाबदारी अंगावर यायला मुळीच नको होती. निक्सन यांचे प्रमुख सल्लागार हेन्री किसिंजर यांनी म्हणूनच म्हटले होते –

‘नकळत, शांतपणे जॉन्सन यांनी तुम्हाला युद्धात ढकलले. आता तशाच रितीने त्यातून बाहेर पडण्याचा आमचा विचार आहे.’

अर्थ स्पष्ट होता. सायगाव सरकारचा आधार काढून घेतला तर जनरल थियू कोसळणार होता. सायगाव राजवट कोसळणे याचाच अर्थ अमेरिकेने व्हिएतनामयुद्ध

गमावले असा होणार होता. युद्ध जिंकण्याची आशा शाबूत राखणे आणि किमान युद्ध न गमविणे, हे दोन अन्य पर्याय होते व ते निक्सन यांनी पत्करले होते.

निक्सन यांनी धूर्तपणे पावले टाकली. त्यांनी व्हिएतनाम संबंधात जे नवे धोरण आखले त्याचा उल्लेख त्यांनी व्हिएतनामीकरण (Vietnamization) असा केलेला आहे. युद्धाचे व्हिएतनामीकरण म्हणजे व्हिएतनाममधून सुसज्ज सैन्य उभे करायचे. १९५० साली दक्षिण व्हिएतनाममधून जाताना फ्रेंचांनी असेच काहीसे केले. फ्रेंच निघून गेले. परंतु आपली जागा तत्पूर्वी त्यांनी अमेरिकेच्या सैन्याला दिली. फ्रेंचांनी युद्धाचे 'अमेरिकीकरण' केले. फरक इतकाच फ्रेंचांना खांदेपालट नीटशी जमली नाही, कारण दक्षिण व्हिएतनामवर त्यांचे लष्करी वर्चस्व नव्हते. अमेरिकेला तो फायदा मिळण्याची आशा होती. सायगाव राजवट अनंतकाळ सांभाळता येईल एवढे सैन्यबळ, हवाईबळ आणि नाविक बळ अमेरिकेपाशी होते. ५ लाख सैन्य हप्त्याहप्त्याने काढून घ्यायचे तरी अमेरिका बराच वेळ युद्ध रेंगाळत ठेवू शकत होती.

८ जून १९६९ ला २५ हजार अमेरिकन सैनिक परत बोलाविल्याची घोषणा निक्सन यांनी केली. पुढील तीन वर्षात सर्व सैनिक काढून घेतले जातील, मात्र पॅरीस वाटाघाटी सफल होईपर्यंत ४० हजार सैनिक दक्षिण व्हिएतनाममध्ये राहातील असा कार्यक्रमही अध्यक्षांनी जनतेला सांगितला.

## टीकाकारच संपले

अमेरिकेतील शांततावादी निक्सन यांच्या घोषणेने फसले आणि खूष झाले. पुढचे दीड वर्ष निक्सन यांना घरच्या आघाडीवर कुणी टीकाकारच राहिला नाही. अमेरिकेचे सैन्य यापुढे व्हिएतनाममधून बाहेर पडण्याच्या तयारीत आहे, या कल्पनेने उत्तर व्हिएतनामी फौजा थंड राहिल्या. राष्ट्रीय मुक्ती आघाडीच्या हालचालीही मंद झाल्या.

जनरल वेस्टमोरलँड यांच्या जागी नव्या अध्यक्षांनी जनरल अब्राम यांची नियुक्ती केली. व्हिएतनामी युद्धात शत्रूने पत्करलेल्या थंडपणाचा फायदा जनरल अब्राम यांनी उठवला. दक्षिण व्हिएतनामच्या ताणलेल्या सरहद्दीवर विखुरलेले सैन्य त्यांनी आंतर भागात घेतले आणि दक्षिण व्हिएतकाँगींचे अड्डे आणि ठाणी साफ करण्याचा कार्यक्रम त्यांनी गुपचूप हाती घेतला. व्हिएतकाँगींच्या ताब्यातील खेड्यावर बाँब फेकावे, त्यांची शेती जाळावीत, पिके उद्ध्वस्त करावीत, संशयित म्हणून कुणालाही पकडावे असा धडाका सुरू झाला.

मे १९६९ मध्ये जनरल थियू याने सक्तीची लष्करभरती जारी करून १७ ते ४३ वयाच्या सर्व धट्याकट्या पुरुषांना सैन्यात भरती केले. या मार्गाने दक्षिण व्हिएतनामी सैन्यात चार लाखांची वाढ करण्यात आली. अमेरिकेचे ५ लाख सैन्य निघून जायचे तर

त्याची जागा दक्षिण व्हिएतनामी सैन्याने घ्यायला हवी, हा युक्तिवाद पुढे केल्याने साहजिकच कुणाला आक्षेप देखील घेता येईना.

जनरल वेस्टमोरलँड प्रमुख असताना ज्या प्रकारची अत्याधुनिक शस्त्रास्त्रे व्हिएतनाममधील अमेरिकन सेनेने पाहिली देखील नव्हती, अशी शस्त्रास्त्रे अगदी प्रथमच या नवजात दक्षिण व्हिएतनामी सैन्याला मोठ्या प्रमाणात निक्सन सरकार पुरवू लागले. या शस्त्रास्त्रात काय नव्हते? पायदळाच्या हातात एम-१६ या ॲटोमॅटिक-स्वयंचलित-बंदुका आल्या, ग्रेनेड फेकण्याची यंत्रे आली, मशीनगन आल्या. हेलिकॉप्टर्स, पहारा देणाऱ्या बोटी, रणगाडे, जेट बाँब या सर्व गोष्टी दक्षिण व्हिएतनामी सैनिकांना भरपूर प्रमाणात आता देण्यात आल्या. आठवड्याला शंभर दक्षिण व्हिएतनामी सैनिक गटागटाने ही शस्त्रास्त्रे चालविण्याचे शिक्षण घेण्यासाठी अमेरिकेत जाऊ लागले.

या सर्वांचा परिणाम असा झाला की दक्षिण व्हिएतनामी जनतेपैकी निम्मी माणसे अत्याधुनिक शस्त्रधारी होऊन, ती उरलेल्या निम्म्यांवर राज्य करीत आहेत असे दृश्य तयार झाले.

## हो-चि-मिन्ह यांचे निधन

दक्षिणेत मोठ्या प्रमाणावर युद्धज्वर भिनत असतानाच, उत्तरेत हनोई, येथे ३ सप्टेंबर १९६९ च्या पहाटे हो-चि-मिन्ह याचे देहावसान झाले. उत्तर व्हिएतनामच्या लोकशाही प्रजासत्ताकाचे पहिले अध्यक्ष आणि अखिल व्हिएतनाम देशाचे राष्ट्रपिता म्हणून हो-चि-मिन्ह यांचे कर्तृत्व व्हिएतनामच्या इतिहासात सुवर्णाक्षरांनी लिहिले जाईल. जवळ जवळ तीन महिने ते आजारी असल्याचे वृत्त बाहेर पसरले होते. मात्र प्रकृती गंभीर झाल्याचे फक्त निधनाच्या आदल्या दिवशी रात्री जाहीर करण्यात आले. त्यांच्या निधनाचे वृत्त पसरताच हजारो माणसे त्यांच्या दर्शनासाठी अध्यक्षीय निवासाभोवती जमा होऊ लागली. लोकांचा वेळ आणि पैसा वाया जाऊ नये यासाठी 'माझे संस्कार साधेपणाने व जलद उरका' असे त्यांनी मृत्यूपत्रात लिहून ठेवलेले आढळले.

अंत्यविधी हो-चि-मिन्ह यांच्या इच्छेनुसार केवळ ३० मिनिटे चालू होता. पंतप्रधान फाम-व्हान-डाँग, सोविएत रशियाचे पंतप्रधान कोसिजीन, कंबोडियाचे राष्ट्रप्रमुख प्रिन्स सिंहनुक आणि लाल चीनचे उपाध्यक्ष लित्सिनीन एवढीच प्रमुख मंडळी या प्रसंगी हजर होती. सायगाव येथून काही विधानसभा सदस्यांनी अंत्यविधीला हजर राहाण्याची परवानगी सरकारकडे मागितली होती, ती जनरल थियू सरकारने फेटाळून लावली.

शोक प्रदर्शित करणारे मुख्य भाषण व्हिएतमिन्ह पक्षाचे जनरल सेक्रेटरी ले-दुआँ यांनी केले. त्यानंतर कम्युनिस्ट राष्ट्रगीत 'इंटरनॅशनल' म्हणण्यात आले. तद्नंतर, नेत्याला

आदरांजली वाहणारे एक गीत म्हटले गेल्यावर ले-दुआँ यांनी हो-चि-मिन्ह यांचे मृत्युपत्र वाचून दाखविले.

## शेवटचा दीस गोड झाला

हे मृत्यूपत्र खरोखरच अद्वितीय आहे. यातील अखेरचे परिच्छेद तर जीवाला चटका लावणारे होते. तो भाग असा-

‘उत्तरेतील व दक्षिणेतील आपले सर्व राष्ट्रभक्त एका छपराखाली लवकरच नांदू लागतील. आपला देश अतिशय चिटुकला असून, फ्रेंच आणि अमेरिकन अशा दोन प्रचंड साम्राज्यवादी शक्तींशी झुंज देवून त्याने त्यांचा पराभव केला, हा मोठाच सन्मान मिळविलेला आहे. राष्ट्राच्या मुक्ततेच्या चळवळीला यामुळे महत्त्वाचा हातभार लागलेला आहे.

‘मी माझे आयुष्य क्रांतिकार्याच्या सेवेसाठी वाहिलेले होते. यामुळे आंतरराष्ट्रीय कम्युनिस्ट कामगार चळवळीची वाढ पाहून मला जेवढा अभिमान वाटतो आहे, त्याच्याहून मोठ्या प्रमाणात, भाऊ-भाऊ असणाऱ्या देशातील वैमनस्य मला क्लेशदायक होत आहे. मला आशा आहे की आपला कामगारांचा पक्ष, अंतःकरणाचा आणि कार्यकारण भावाचा कौल घेऊन मार्क्सिस्ट-लेनिनिस्ट आणि दलितांच्या आंतरराष्ट्रीयतेवर आधारलेल्या भातृभावी पक्षात, पुनश्च एकी निर्माण करण्यासाठी सर्व काही करेल.

‘माझ्यापुरतेच सांगायचे तर मी माझ्या देशाची, क्रांतिकार्याची आणि जनतेची मनापासून सर्व शक्तिनिशी आयुष्यभर सेवा केली. आता मला हे जग सोडून गेले पाहिजे. पश्चात्ताप वाटावा असे माझ्या हातून काहीही घडलेले नाही.

‘माझ्या सर्व लोकांना, पक्षाला, सैन्यदलाला, माझ्या लहानग्या पुतण्यापुतणींना, तरुणांना आणि मुलांना माझ्या प्रेमाच्या सदिच्छा आणि सहकाऱ्यांना, मित्रांना आणि जगातील सर्व तरुणांना आणि मुलांना माझा बंधुभावनेने नमस्कार.

‘माझी अखेरची इच्छा एवढीच आहे की सबंध पक्षाने आणि सर्व जनतेने शांततावादी, अखंड, स्वतंत्र, लोकशाहीनिष्ठ अशा व्हिएतनामच्या निर्मितीसाठी कराव्या लागणाऱ्या संघर्षात परस्परांना साथ द्यावी, आणि जागतिक क्रांतिकार्यात त्यांनी मूल्यवान भर टाकावी.’

हो-चि-मिन्ह

हनोई, १० मे १९६९

हनोई येथे या वृद्ध नेत्याचे अंत्यसंस्कार चालू असताना पॅरीस येथे व्हिएतनाममधून हद्दपार झालेल्या कॅथालिकांनी एका चर्चमध्ये जाऊन हो-चि-मिन्ह यांना भावपूर्ण श्रद्धांजली अर्पण केली. फादर थी या व्हिएतनामी कॅथॉलिक धर्मगुरुने, हो-चि-मिन्ह याने दलितांसाठी आणि देशबांधवांसाठी ज्या सेवाबुद्धीने कार्य केले, त्याचा गौरव करताना ख्रिस्ताचे शब्द उच्चारले –

“You should love one another as I have loved you. Greater love hath no more than, that a man give up his life for his friends.”

व्हिएतनामच्या भूमीत मिसळून जाण्यापूर्वी याची देही याची डोळा, आयुष्याचे थोडेफार साफल्य हो-चि-मिन्ह याला पाहाता आले. एक म्हणजे व्हिएतनाममधून अमेरिकेचे सैन्य बाहेर पडू लागल्याची सुरुवात झालेली त्याने पाहिली. सायगाव भागात अखंड व्हिएतनामचे स्वप्न पाहणारी संघटना, ‘राष्ट्रीय मुक्ती आघाडी’ ही मान्यता पावलेली त्याने पाहिली. त्याचा ‘शेवटचा दीस’ या दृष्टीने गोड झाला यात संशयच नाही. परंतु तो यापेक्षाही मधुर होण्याची संधी आली होती. ३१ मार्च १९६८ ला जर अध्यक्ष जॉन्सन यांनी वाटाघाटी सुरू करण्याचा निर्णय घेतला होता, तर पुढील दीड वर्षात वाटाघाटी पूर्ण होऊन युद्धबंदीदेखील होऊ शकली असती. पण सायगावचे लष्करी नेते आणि अमेरिकेचे अंतर्गत राजकारण याच्या फेऱ्यात वाटाघाटींचा मुहूर्त लांबत गेला, आणि युद्धबंदी झाल्याचे शुभ वर्तमान काही हो-चि-मिन्ह यांच्या कानावर पडू शकले नाही.

परंतु प्रत्येक माणसाचे जीवन हा तसा अगदी स्वतंत्र ग्रंथ असतो. या दृष्टीने राष्ट्रवादी साम्यवादाचा प्रवर्तक, आणि मानवी प्रयत्न हाच यंत्रापेक्षा आणि शस्त्रापेक्षा अधिक मूल्यवान आहे याचे प्रात्याक्षिक जगापुढे मांडणारा जागतिक नेता म्हणूनच हो-चि-मिन्ह नामक ग्रंथाचे भरतवाक्य लिहिले जाणार आहे. गांधी, लेनिन, माओ या राष्ट्रपुरुषांच्या मालिकेत हो याचे नाव इतिहासाला दाखल करावेच लागेल.

हो-चि-मिन्ह काळाच्या पडद्याआड गेला, परंतु त्याने सचेतन केलेले राष्ट्र निक्सन यांच्या नव्या नव्या कारवायांचा धैर्याने मुकाबला करू लागले. नवी नवी आयुधे हातात असूनही दक्षिण व्हिएतनामी सैनिक शौर्य, धैर्य आणि त्याग या उत्तम गुणात उत्तर व्हिएतनामी सैनिकांची बरोबरी करू शकत नव्हते, असा लवकरच अनुभव आला.

## ‘माय-लाय’ येथील हत्याकांड

टेट् चढाईच्या संतापातून अमेरिकेच्या एका सैन्य तुकडीने मानवजातीला काळिमा फासणारे एक दुष्कृत्य मार्च १९६८ मध्ये केले होते. या गोष्टीला १९६९ मध्ये वाचा फुटली. खेड्यापाड्यांतील संशयित व्हिएतकाँगींना पकडणे, त्यांच्या जबान्या घेणे, प्रसंगी

घातपाती कृत्यात सापडल्यास त्यांना जागच्याजागी ठार मारणे, यासाठी अमेरिकेच्या सैनिकी टोळ्या सर्वत्र फिरत असत. अशीच एक कंपनी 'माय-लाय' या खेड्यात मार्च १९६८ मध्ये एका कुठल्यातरी दिवशी दाखल झाली.

या खेड्यातून भूमिगत काँगींना सहाय्य मिळते असा संशय होता. परंतु असा संशय दक्षिण व्हिएतनाममधील कोणत्या खेड्याबद्दल नव्हता? तेव्हा मोठ्या प्रमाणावर हत्या करायला हे काही सबळ कारण नव्हते. अमेरिकन सैनिकांनी 'माय-लाय' खेड्यातील तीनशे सत्तेचाळीस नागरिकांना एकत्र केले. यात स्त्रिया होत्या, अर्भके होती. या सर्वांना या अमेरिकन सैनिकांनी मशिनगनने गोळ्या घालून ठार केले!

अमेरिकेचे सैनिक हा अत्याचार करीत असताना, त्यांना याची कल्पना नव्हती की एक छायाचित्रकार फोटो घेत आहे. आकांत करीत सैरावैरा पळताना कोसळणाऱ्या स्त्रियांचे आणि मुलांचे फोटो या छायाचित्रकाराने घेतले. एका मोठ्या चरात शेकडो प्रेतांचा पडलेला खच त्याने फोटोत टिपला. अत्याचार होऊन वर्ष उलटले तरी या दुष्कृत्याची रीतसर चौकशी देखील होईना. 'माय-लाय' खेड्यात सैनिकांनी बलात्कार केले, काही माणसे मारली ते सर्व काँगी असावेत, अशी वदंता हळूहळू सर्वत्र पसरत चालल्या होत्या. या सैनिकी तुकडीच्या लेफ्टनंटचे नाव अखेर उजेडात आले. हा नराधम होता, लेफ्टनंट विल्यम कॅली! छायाचित्रकाराने एक एक छायाचित्र अमेरिकेत प्रसिद्धीला द्यायला सुरुवात केली. काहीतरी संतापजनक घडले असा सर्वत्र बोभाटा होताच, अमेरिकेच्या काँग्रेसने एक चौकशी समिती नेमली.

चौकशी समितीने असंख्य जबान्या घेतल्या. 'माय-लाय' ला भेट दिली व अहवाल दिला.

> 'माय-लाय' मध्ये जे घडले ते इतके विपरीत व आमच्या सैनिकांच्या स्वभावधर्माला सोडून आहे, की ज्यांनी हे अत्याचार केले त्यांची डोकी ठीक होती की नाही असा कायदेशीर प्रश्नही उपस्थित करता येईल.'

लेफ्टनंट कॅलीसह पाच सैनिकी अधिकाऱ्यांवर कोर्ट मार्शल करणे अमेरिकेला भाग पडले. या पाच युद्धगुन्हेगारांना तपासणाऱ्या डॉक्टरांनी निर्वाळा दिला, की हत्या करीत असताना ती थंडपणाने व जाणुनबुजून केली आहे. डोकी ठिकाणावर राहू नये असे तर काहीही घडले नव्हते. नागरिकांना एवढ्या संख्येने ठार मारणे ही या नराधमांची केवळ चैन होती.

मग हे अमेरिकेच्या सैनिकांच्या स्वभावात न बसणारे अति दुष्ट कृत्य घडले कसे?

अमेरिकेचे सैनिक हे इतर सैनिकांप्रमाणेच सामान्य माणसेच होती. इतक्या दूरवर लढण्यासाठी म्हणून ते व्हिएतनाममध्ये आले होते. समोर शत्रूचे ठाणे असेल तर हल्ला कसा चढवावा, बॉंब कसे फेकावे हे सर्व लष्करी ज्ञान त्यांच्यापाशी होते. दक्षिण व्हिएतनाममध्ये लढाई या प्रकारची नव्हती. शत्रूला चेहरा नव्हता. तो दिसत नसे. त्याला शोधण्यासाठी शेते तुडवावी, जंगले हुडकावी लागत. या पायपिटीत व्हिएतकाँगींकडून काही अमेरिकन सैनिकच मारले जात. संशयावरून काहींना पकडले तरी जबान्यांतून पुष्कळ वेळा काहीच निष्पन्न होत नसे.

खेड्यात उन्हातान्हात निष्कारण फिरावे लागे. ठेंग्या ठुसक्या पिवळट वर्णाच्या खेडुतांत जे काँगी असत ते मिसळलेले असत. जे सरकारी अधिकारी व दक्षिण व्हिएतनामी सैनिक असत त्यात कामचुकार, आळशी, लाचखाऊ अधिक. यामुळे अमेरिकेचे सैनिक कावून जात. अमेरिकेच्या एखाद्या सैनिकाला डुलकी लागली तर दारिद्र्याने गांजलेला एखादा खेडूत त्याच्या मनगटावरचे घड्याळच पळवी! खेड्यापाड्यातून यांना अशाच काही घटना सतत ऐकाव्या लागत. कुणी सांगत ‘नुकताच व्हिएतकाँगींनी गावात धुमाकूळ घातला. शेकडो जण एकदम आले आणि त्यांनी सायगाव राजवटीशी इमान ठेवणाऱ्यांना गोळ्या घातल्या!’ कधी गावकरी सांगत, ‘हे सायगावचे पोलीस आणि सैनिकच आमच्यावर अत्याचार करतात, पैसे खातात, आमच्या मुलीबाळींवर बलात्कार करतात.’ अशावेळी अमेरिकन सैनिकांना वाटे, काँगी काय आणि दक्षिण व्हिएतनामी सैनिक काय, साले सगळेच तसे आहेत! व्हिएतनामी लोकांकडे पाहण्याचा या सैनिकांचा दृष्टिकोण यामुळे हळूहळू बदलत गेला. शत्रू आहे त्याला बदमाष नसला तरी मारलेला चांगला आणि ज्याच्यासाठी पण इथे जीव धोक्यात घालून वावरतो ते सुद्धा सगळे बदमाष असतील तर उडदामाजी निवडायचे काय? सगळ्यांनाच गोळ्या घाला म्हणजे कटकट मिटली!

कॅली याने खटल्यानंतर हेच सांगितले –

‘माझ्या सैनिकांवर जेव्हा छुपा हल्ला होई आणि त्यांची कत्तल होई, तेव्हा त्या हत्येला कारणीभूत कोण असे विचारले तर सांगितले जाई की हे सर्व कम्युनिझमचे बळी आहेत! कम्युनिझम म्हणजे काय? तर जो मी पाहू शकत नाही, अनुभवू शकत नाही, स्पर्श करू शकत नाही असा कुणी शत्रू! केवळ तत्त्वज्ञान शत्रू असू शकते, हे माझ्या आकलनशक्तीच्या बाहेर होते. माझा व्हिएतनाममधील शत्रू तर हा असा होता.’

कॅलीच्या वकिलांनी जो प्रश्न उपस्थित केला तो अधिक महत्त्वाचा होता. त्यांनी विचारले –

'या सबंध युद्धात अमेरिका बॉंबहल्ले करून आणि तोफा डागून जो मानवसंहार करीत आहे, त्याला तरी काय नैतिक अधिष्ठान आहे? कॅलीने एका खेड्यातील सर्व व्हिएतनामी मारले, कारण त्याला कॉंगी निवडून काढणे कठीण वाटले. हे जर दंडाई असेल, तर आकाशातून अमेरिकन विमानांनी टाकलेले बॉंब ज्यांच्या डोक्यावर पडले ते काय सर्वच्या सर्व कम्युनिस्ट होते की काय?'

लष्करी कोर्टाने हे स्फोटक प्रश्न विचारातच घेतले नाहीत. अशा प्रकारचे अत्याचार केल्याने 'न्यूरेंबर्ग' खटल्यात नाझींना मृत्यूदंड मिळाला. त्याचीही दखल कोर्टाने घेतली नाही. लष्करी कोर्टाने पुढे २९ मार्च १९७१ ला 'माय-लाय' हत्याकांडात लेफ्ट. कॅली याला दोषी ठरवले. कॅली फक्त बडतर्फ झाला.

परंतु या 'माय-लाय' चौकशीतून जे प्रश्न निर्माण केले गेले, विचारले गेले, त्याचा मतितार्थ स्पष्ट होता. या सर्व अत्याचारांची जबाबदारी ही अमेरिकेच्या व्हिएतनामविषयक नीतिशून्य धोरणावरच पडते. अमेरिकेच्या सैनिकांचे व्हिएतनाममधील अस्तित्व हेच मुळी नीतीला धरून नाही. या धोरणाला जे जबाबदार आहेत त्यांना 'माय-लाय' हत्याकांडाची जबाबदारी टाळता येणार नाही!

## कंबोडियावर आघात

जानेवारी ७० मध्ये अमेरिकेच्या कॉंग्रेसला (लोकसभेला) आपले परराष्ट्र धोरण विशद करण्यासाठी पाठवलेल्या संदेशात निक्सन यांनी म्हटले होते –

'दक्षिण व्हिएतनामला मदत करण्याची जबाबदारी आम्ही पत्करली आहे. लक्षावधी दक्षिण व्हिएतनाममधील स्त्री-पुरुषांनी आमच्यावर विश्वास टाकला आहे. त्यांना आम्ही आज वाऱ्यावर सोडले, तर तिथे इतक्या भयानक कत्तली होतील, की मानवी जीवनाची कदर करणारे जग हादरून जाईल.'

'माय-लाय' च्या पार्श्वभूमीवर संदेशातील भोंदूपणा चांगलाच उठून दिसतो.

खरी परिस्थिती अशी होती निक्सन यांची धोरणे, व्हिएतनामच्या प्रश्नांची उकल करणारी नव्हती, तर अमेरिका ज्या लष्करी कोड्यात अडकलेली होती ते कोडे अधिकच गुंतागुंतीचे करून सोडणारी होती. युद्धाचे व्हिएतनामीकरण एवढा निक्सन धोरणाचा एकच भाग राहिला असता तर ते ठीक होते. परंतु रिचर्ड निक्सन हे एवढ्यावरच थांबले कुठे?

एप्रिल ७० मध्ये त्यांनी दक्षिण व्हिएतनामी आणि अमेरिकन सैनिकांची मोठी फौज कंबोडियात घुसवली. या आक्रमणाचे कारण दिले की कंबोडियाच्या सरहद्दीला लागून असलेल्या डोंगराळ आणि जंगली भागात उत्तर व्हिएतनामी सैन्याचे लष्करी तळ आहेत.

कंबोडियात घुसण्याची संधी अमेरिकेला यावेळी मिळाली की ती मिळेल अशी व्यवस्था केली गेली? नकाशाकडे बारकाईने नजर टाकली तर लक्षात येईल की दक्षिण व्हिएतनाम हा अर्धवर्तुळाकृती आहे. बर्हिगोल भिंगासारखा (Convex Lens) त्याचा विस्तार आहे. त्याची सर्व पश्चिम सरहद्द ही लाओस व कंबोडिया यांना भिडलेली आहे. उत्तर व्हिएतनाममधून निघालेली शस्त्रास्त्रे व दारूगोळा, लाओसमधून कंबोडियात उतरून तेथून पुढे थेट दक्षिण व्हिएतनामच्या सायगाव परिसरात पोहोचू शकतो. ही सर्व वाट डोंगराळ प्रदेश आणि जंगले यामुळे गुप्त हालचालींना अतिशय सोयीची होती. याच मार्गाने उत्तर व्हिएतनाम, व्हिएतकाँगींना दक्षिण व्हिएतनामभर भरपूर शस्त्रसामग्री व रसद पोहोचवू शकत असे. या मार्गाचे नाव पडले होते हो-चि-मिन्ह मार्ग. हा मार्ग या नावाने चांगलाच ख्याती पावलेला होता. हा मार्ग उपलब्ध नसता तर अॅन-लॉक, मी-थो, व्हीन-लाँग या शहरातून चढाई करणे, टेट् सणाच्या चढाई योजनेत, व्हिएतकाँगींना शक्य झाले नसते. या मार्गाप्रमाणेच कंबोडियाचे बंदर सिंहनुकव्हिला याचा कम्युनिस्टांना सायगावच्या दक्षिण भागातील आक्रमणासाठी उपयोग होत असावा असा संशय होता.

लाओस व कंबोडिया या देशाचे दक्षिण व्हिएतनामी राजवटीशी परंपरागत वैर होते. यापुढे येथील राजवटी या दक्षिण व्हिएतनाममधील राजवटीच्या शत्रूंना मदत करण्यास नेहमी उत्सुक असत. लाओस व कंबोडिया स्वतंत्र कशी झाली याचा इतिहास पूर्वीच्या निवेदनात आलेला आहे. आपपतः त्यांना स्वातंत्र्य मिळाले. फ्रेंच निघून गेल्यावर त्यांना ज्यांच्या स्वातंत्र्य प्रयत्नाने आयतेच स्वातंत्र्य लाभले, त्या हनोई राजवटीबद्दल आदर आणि सायगाव राजवटीबद्दल द्वेष लाओस-कंबोडियात वसत होता.

तरीही व्हिएतनाम संघर्षात लाओस व कंबोडिया हे देश तटस्थ समजले जात असत. कंबोडियाचा अध्यक्ष प्रिन्स नोरोदम सिंहनुक हा पेकिंगशी सलोखा राखून असे. त्याचे खमेर सैन्य हे सर्व चिनी कम्युनिस्टांनी उभे केलेले होते. त्याची सहानुभूती संपूर्णपणे हनोईला असल्याने, उत्तर व्हिएतनामी सैनिक व व्हिएतकाँगी हे कंबोडियामागे मोकळेपणाने सैन्य वाहतूक व रसदीची ने-आण करत असत. कंबोडिया व दक्षिण व्हिएतनामच्या सरहद्दीवरील जंगली भागात भूमिगत व्हिएतकाँगींची मोहोळ तयार झाली होती. या सर्व घटनांमुळे प्रिन्स सिंहनुक हा अमेरिकेच्या डोळ्यात सलत होता.

लाओसचा राष्ट्रप्रमुख प्रिन्स सुवाना फूमा याची स्थिती थोडी निराळी होती. लाओसची सरहद्द ही उत्तर व्हिएतनाम, दक्षिण व्हिएतनाम व कंबोडिया या सर्वांना खेटून असल्याने लाओसमध्ये वावरणारे सुमारे ३०,००० कम्युनिस्ट-पॅथे लाओ, यांनी सर्व पूर्व सरहद्द जवळजवळ उत्तर व्हिएतनामींच्या मदतीने आपल्या ताब्यातच घेतली होती. या पॅथेलाओ फौजा सुवाना फूमा याच्या वडिलांना एका सामान्य स्त्रीपासून झालेला मुलगा

प्रिन्स सुपान वाँग याला आपला राजा मानीत. सुपान वाँग याला Red Prince लाल राजपुत्र असेही लोक म्हणत. म्हणजे सुवाना-फूमा व रेड प्रिन्स सुपान वाँग यांचा झगडा हा काहीसा कौटुंबिक भांडणाच्या स्वरूपाचाही होता. प्रिन्स सुवाना फूमा याच्या लाओ-फौजा या पॅथे-लाओ यांना आवर घालू शकत नव्हत्या, पण यासाठी काही झाले तरी, अमेरिकेची मदत मागायची नाही असा सुवाना-फूमा याचा निर्धार होता.

१८ मार्च ७० या दिवशी कंबोडियाचा लष्करी जनरल लोन नोल याने कंबोडियाचा राष्ट्राध्यक्ष प्रिन्स नोरोदम सिंहनुक याला देशाबाहेर हुसकून सत्ता बळकावली. सत्ता हाती येताच कंबोडियाच्या सैन्याने कंबोडियाच्या हद्दीतील उत्तर व्हिएतनामी सैनिक व व्हिएतकाँगी यांना सरहद्दीबाहेर हुसकवण्यास सुरुवात केली. येथपर्यंत अमेरिकेने हनोई राजवटीवर उलटवलेला डाव म्हणून या कृतीचा दोष अमेरिकेला देता आला नसता. परंतु जनरल लोन-नोल याला आपण सत्तेवर राहू की नाही याची खात्री नसल्याने, त्याने अमेरिकेची मदत मागावी व नंतर मोठ्या संख्येने अमेरिकेच्या मदतीने दक्षिण व्हिएतनामी सैन्य तुकड्या कंबोडियात घुसवाव्या हा सगळा बनाव पूर्वी ठरल्याप्रमाणे घडलेला असावा असा संशय येतो.

कंबोडियावर आक्रमण करण्यास जनरल नोल याने पाचारण करावे आणि अमेरिकेच्या वैमानिकांनी कंबोडियात घुसावे, ही गोष्ट अमेरिकेतील लोकमताला रूचणारी नव्हती. अमेरिकेत कॉलेज विद्यार्थ्यांनी या कृतीविरुद्ध निदर्शने सुरू केली. एकीकडे दक्षिण व्हिएतनाममधून अमेरिकेचे सैन्य मागे घेण्याच्या कार्यक्रमाचे आश्वासन द्यायचे आणि दुसरीकडे तेथील लढाईची व्याप्तीच वाढवायची, हे निक्सन यांचे राजकारण अमेरिकेत गदारोळ उभे करू लागले. मे ७० आणि जून ७० हे दोन महिने अमेरिकेचे सैन्य कंबोडियात घुसलेले होते. जुलै ७० मध्ये ते मागे घेण्यात आले.

जनरल लोन-नोल याने कंबोडियातून व्हिएतकाँगींची हकालपट्टी करण्याची मोहीम हाती घेताच, कंबोडिया-व्हिएतनाम सरहद्दीवरील जंगलातून वावरणाऱ्या सुमारे ४०,००० व्हिएतकाँगींनी प्रतिहल्ले सुरू केले. जनरल लोन-नोल याने दहशतीसाठी पकडलेल्या व्हिएतकाँगींना आणि संशयितांना ठार मारण्याचा कार्यक्रम हाती घेतला. कंबोडियाची राजधानी नॉम-पेन्हकडून वाहात येणाऱ्या मेकाँग नदीच्या पात्रातून शेकडो प्रेते तरंगत येऊ लागली. इंडोनेशियात १९६० साली कम्युनिस्टांची जशी निर्घृण कत्तल झाली, तशीच ही कत्तल सुरू झाली. पण व्हिएतकाँगींचे प्रतिहल्ले प्रखर होऊ लागले व नॉम-पेन्हच्या दिशेने त्यांचा दबाव येऊ लागताच, जनरल लोन-नोल याने अमेरिकेची मदत मागितली. अमेरिकेची सर्व जय्यत तयारी होतीच. सुमारे २०,००० दक्षिण व्हिएतनामी सैनिक, अमेरिकन लष्करी तुकड्यांसह कंबोडियाची सरहद्द ओलांडून, व्हिएतकाँगींवर

कंबोडियाच्या हद्दीत मागल्या बाजूने लढाई करू लागले. अमेरिकेने कंबोडियाच्या सरहद्दीवर बाँबवर्षाव सुरू केला.

कॅन्टोन येथे परागंदा राष्ट्राध्यक्ष प्रिन्स नोरोदम सिंहनुक, पॅथे-लाओ पुढारी प्रिन्स सुफान वाँग आणि उत्तर व्हिएतनामचा पंतप्रधान फाम-व्हान-डाँग यांची बैठक भरून सल्लामसलत झाली. ज्याप्रमाणे जनरल लोन-नोल याच्या मदतीला दक्षिण व्हिएतनामी व अमेरिकेचे लष्कर आले, त्याचप्रमाणे व्हिएतकाँगींच्या मदतीला पॅथे-लाओ कंबोडियात उतरले. याचा वर्षभराने अमेरिकेने सूड घेतला.

या आक्रमणाचा लष्करी फायदा तरी झाला का? उत्तर व्हिएतनामचे बरेच शस्त्रास्त्र साठे नष्ट करण्यात आले आणि सिंहनुकव्हिला हे बंदर व्हिएतकाँगींना बंद झाले एवढाच फायदा. परंतु जनरल लोन-नोल याची लष्करी राजवट आता गचके देऊ लागली. कंबोडियातील उत्तर व्हिएतनामच्या मित्रांनी जनरल लोन याचेशीच देशात संघर्ष सुरू केला. दक्षिण व्हिएतनामचा कोसळणारा डोलारा सांभाळताना नाकात दम आलेली अमेरिका, जनरल लोन-नोल याची ही राजवट सावरण्याची जबाबदारी आता अंगावर घेऊन बसली.

## लाओस साहस अंगावर शेकले

अनुभवाने शहाणे होणारे अमेरिकन मुत्सद्दी एकूण नव्हतेच. असेलच तर फार थोडे. कंबोडियात केलेला प्रयोग लाओसवर करून हो-चि-मिन्ह मार्ग पूर्णपणे मोडून काढण्याचे अमेरिकेने वर्षभरात ठरविले. १९७१ च्या फेब्रुवारी महिन्यात २२००० राखीव दक्षिण व्हिएतनामी सैन्य अमेरिकेची बाँबर विमाने आणि हेलिकॉप्टर विमाने याचे साहाय्य घेऊन, लाओसची सरहद्द ओलांडून लाओसमध्ये घुसले. परंतु लाओसची सरहद्द ही उत्तर व्हिएतनामलाही बिलगलेली आहे ही गोष्ट अमेरिकेचे अध्यक्ष व सेनानी विसरले. लाओसमधील चिंचोळ्या डोंगरदऱ्यांतून या सैन्याला उत्तर व्हिएतनामी सैन्याने पुरेसे पुढे येऊ दिले. हो-चि-मिन्ह मार्गाच्या निम्म्यावर हे सैन्य पोचले मात्र, उत्तर व्हिएतनामच्या सैनिकांनी टँकदल व रॉकेटच्या साहाय्याने हे सैन्य चहूबाजूंनी घेरले.

या कोंडल्या गेलेल्या दक्षिण व्हिएतनामी सैन्याची सुटका करण्यासाठी, अमेरिकेच्या विमानांनी लाओसमध्ये प्रचंड प्रमाणावर बाँबवर्षाव केला. बरेच उत्तर व्हिएतनामी सैनिक या वर्षावाखाली खलास झाले ही गोष्ट खरी; परंतु दक्षिण व्हिएतनामी सैन्य पळू लागताच उत्तर व्हिएतनामींनी त्यांचा फडशा उडवला. शस्त्रास्त्रे आणि रणगाडे टाकून सैन्य लाओसबाहेर पळत आले. ३८०० दक्षिण व्हिएतनामी सैन्य लढाईत मेले. ५२०० जखमी झाले.

लाओस सरहद्दीलगत खेसान या ठिकाणच्या अमेरिकेच्या लष्करी तळावरील वैमानिक व सैनिक मिळून १६००० अमेरिकन सैन्य, या लाओस साहसात भाग घेत होते. लढाईत हेलिकॉप्टरनी दक्षिण व्हिएतनामी सैनिकांची ने-आण करणे व दक्षिण व्हिएतनामी सैन्याला सहाय्यभूत होईल असा लाओसच्या हद्दीत बाँबवर्षाव करणे, एवढीच कामगिरी जनरल अब्राम याने या सैन्यावर सोपवलेली होती. आपण, आपली विमाने, हेलिकॉप्टर ही सर्व सुरक्षित आहेत, अशी या अमेरिकेच्या सैन्याची कल्पना होती, कारण जनरल अब्राम याने कागदावर आखलेल्या चढाईनुसार दक्षिण व्हिएतनामी सैन्य लाओसमध्ये खेसान नजीकच्या चिंचोळ्या डोंगरभागातून पुढेच घुसत राहणार होते. परंतु डाव उलटला! अनोळखी भागात व डोंगरदऱ्यात दक्षिण व्हिएतनामी सैनिकांना पुढे धाडण्याचा हा जनरल अब्रामचा निर्णय चुकीचा ठरला. दक्षिण व्हिएतनामी सैन्य मृत्यूच्या सापळ्यात अडकले व जबर हानी सोशीत चौफेर पळू लागले. वाईट हवामानामुळे अमेरिकेचे विमानदल खेसान तळावरच अडकून पडल्याने तर सगळाच मामला अंगावर उलटला. लाओस सरहद्द ओलांडून उत्तर व्हिएतनामी खेसान परिसरात घुसले व त्यांचेच तोफगोळे खेसानवर धडाडू लागले.

सुमारे दहाबारा व्हिएतकाँगी सॅपर्स खेसान तळावर घुसले व त्यांनी तेथील रॉकेट्सचे व तोफगोळ्यांचे दोन प्रचंड अमेरिकन साठे पेटवून दिले. सगळे आसमंत आकाशात उडणाऱ्या ग्रेनेड-रॉकेट्सनी पेटल्यासारखे झाले. एकच हाहाःकार माजला. सात हेलिकॉप्टर विमाने या आगीत जागच्याजागी भस्मसात झाली. पुढे घुसलेले सर्व व्हिएतकाँगी सॅपर्स मारले गेले खरे, परंतु त्यांनी लढाईचा रंगच पालटून टाकला!

भक्ष्यावर एकाग्रतेने तुटून पडलेले कावळे, एखादा वार होताच आकाशात उधळावे, त्याप्रमाणे दारूगोळ्याच्या साठ्यांना आगी लागताच अमेरिकन वैमानिकांनी वाचवता येतील तेवढी हेलिकॉप्टर विमाने व बाँबर विमाने घेऊन आकाशात भराऱ्या घेतल्या. खेसान तळाची दुर्दशा पाहाताच त्यांनी अंतर्भागात पळ काढला. अमेरिकन सैनिकांनी तळ खाली करून घेण्यास सुरुवात केली. पायात शेपूट घालून मागे पळत येणाऱ्या दक्षिण व्हिएतनामी सैनिकांच्या डोक्यावरील अमेरिकेच्या विमानांचे संरक्षण छत्रदेखील असे एकाएकी उद्ध्वस्त होताच, त्या सैन्याची चारी अंगानी उत्तर व्हिएतनामी सैनिकांनी लांडगेतोड केली.

उत्तण व्हिएतनामने मिळवलेला हा विजय बराच निर्णायक ठरला. जनरल अब्राम याची व्हिएतनाम युद्धातील ही मोठीच घोडचूक ठरली. या साहसात अमेरिकेची जी फटफजिती झाली त्याचे तीन प्रमुख परिणाम झाले.

१) अध्यक्ष निक्सन हे पाहता पाहता अप्रिय झाल्याची चिन्हे दिसू लागली. त्यांच्या शब्दावरचा जनतेचा विश्वासच उडाला.

२) लोकप्रतिनिधींची अमेरिकेची काँग्रेस, ही अमेरिकेने व्हिएतनाम युद्धात अधिकाधिक रुतू नये म्हणून अध्यक्ष निक्सन यांचेवर सतत बंधने घालीत असूनही, अध्यक्ष निक्सन यांनी आपल्या कार्यकारी अधिकारात लाओस चढाईचा वेडाचार केला होता. यामुळे अमेरिकेच्या राजकारणात लोकप्रतिनिधी सभेला काही किंमत आहे की नाही असा सवाल सर्वत्र विचारला जाऊ लागला.

३) या युद्धात अमेरिकेचे नागरिक मरत नसले तरी सतत होणारी नाचक्की सहन करीत व सत्कृतदर्शनी कसलाही फायदा नाही हे दिसत असताना, अमेरिकेचे सैनिक असे किती काळ लढतील? त्यांचे मनोधैर्य खचत जाणार नाही का? हे गंभीर प्रश्न अमेरिकेच्या लष्कर प्रमुखांना भेडसावू लागले.

कंबोडियातील आक्रमण थोडेफार तरी यशस्वी झाले असे मानले, तर लाओसमध्ये आक्रमण संपूर्ण फसले आणि हकनाक मोठ्या प्रमाणावर उभयपक्षांची प्राणहानी झाली. निक्सन यांना समाधान हवे असेल तर एवढेच की दोन्ही बाजूंनी व्हिएतनामीच मेले!

निक्सन यांच्या हातात बाँबवर्षाव हेच एक प्रभावी अस्त्र आता उरले होते. कारण अमेरिकेचे सैनिक मोठ्या प्रमाणावर या लढाईत मरावे अशी अमेरिकेतील जनतेची आता इच्छा नव्हती आणि दक्षिण व्हिएतनामचे सैन्य कितीही सुसज्ज केले, भयानक शस्त्रास्त्रांनी सज्ज केले तर लढाईच्या तंत्रात ते कमी पडत होते. १९६९ नंतर दोन सव्वादोन वर्षात निक्सन राजवटीने इंडोचायनात एकंदर किती बाँबवर्षाव करावा? दुसऱ्या महायुद्धात युरोपात आणि पॅसिफिकमध्ये अमेरिकेने एकंदर जेवढे टन बाँब टाकले, त्यापेक्षा या थोड्या काळात अधिक टन बाँब टाकले गेले. सायगावचे थियू सरकार गादीवर राहावे आणि सायगाव क्षेत्रात अमेरिकेचे अस्तित्व चालू राहावे, यासाठी केवळ आता हा बाँबवर्षाव केला जात होता.

पण याचवेळी एकीकडे दहा-दहा हजारांनी अमेरिकेचे सैनिक प्रतिमासी घरी परतत होते. त्या प्रमाणात अमेरिकेने दक्षिण व्हिएतनाममध्ये आणलेली चलनाची सुबत्ता घटत चालली होती. यावर उपाय म्हणून अमेरिकेने जनरल थियू याला करवाढ करून शिवाय पिॲस्ट्रे या व्हिएतनामी चलनाचे अवमूल्यन करण्याचा सल्ला दिला.

## निवडणूक तमाशा

दक्षिण व्हिएतनामचा राष्ट्राध्यक्ष जनरल थियू व उपराष्ट्राध्यक्ष जनरल की यांचे अशा कोसळणाऱ्या आर्थिक संकटात परस्परांशी पटत नाहीसे झाले. जनरल थियू याने

राष्ट्राध्यक्षपदाची नवी निवडणूक घेण्याचे ठरवले. गंमत म्हणजे या पदासाठी एकच उमेदवार उभा राहिला आणि तो म्हणजे स्वतः जनरल थियू! लोकशाहीची ही क्रूर थट्टा होती. एकच उमेदवार मग निवडणूक कशी? जनरल थियू याने जाहीर केले की जर कुणाला उमेदवाराला मत द्यायचे नसेल तर त्याने कोरी मतपत्रिका मतपेटीबाहेर जमिनीवर टाकावी! मतपत्रिका पेटीबाहेर कोण टाकतो हे थियूची लष्करी राजवट पाहाणार आणि त्याला व्हिएतकाँगी ठरवून नंतर त्याचा छळ होणार हे ठरल्यासारखेच हाते. ८५% मतदान झाले आणि त्यापैकी ९५% मते जनरल थियूला मिळाली. या हास्यास्पद लोकशाही निवडणुकीवर जनरल थियूचा पूर्वीचा उपराष्ट्रपती जनरल की याने देखील बहिष्कार टाकला होता. त्याने लोकांना आवाहन केले होते –

'जनतेने या निवडणुकीत भाग घेऊ नये. मतदानाला जाऊ नये व या निवडणुकीचा निर्णय स्वीकारू नये.'

निक्सनसाहेबांना देखील हा तमाशा आवडला नाही. ऑक्टोबर १९७१ मध्ये हा लोकशाही खेळ करून जनरल थियू पुनः सायगाव राजवटीचा प्रमुख झाला खरा, परंतु ही बुडती नौका आहे अशी निक्सन यांची आता खात्री होऊ लागली.

यानंतरच्या काही महिन्यात अशा काही महत्त्वाच्या घटना घडल्या की ज्यांचा परामर्ष घेतल्याखेरीज, व्हिएतनाममध्ये जे घडले त्याचा नीट अन्वय लागणार नाही.

## राष्ट्रसंघात चीनचा प्रवेश

पेकिंग येथे १९४९ मध्ये माओ हा सत्ताधारी होताच त्याने संयुक्त राष्ट्रसंघाच्या अध्यक्षांना तार करून कळवले होते की तैवान बेटावर पळून गेलेला चँग-कै-शैक हा आता चिनी जनतेचा प्रतिनिधी नाही. तेव्हा संयुक्त राष्ट्रसंघातील त्याच्या प्रतिनिधींना हाकलून द्यावे व त्या जागी आता आपण लाल चीनचा प्रतिनिधी बोलवावा. राष्ट्रसंघात अमेरिकेचे सर्वस्वी वर्चस्व असल्याने, सतत २२ वर्षे राष्ट्रसंघाने जगाच्या पाठीवरच्या सर्व लोकसंख्येच्या एक चतुर्थांश लोकांवर हुकुमत प्रस्थापित केलेल्या लाल चीनला मान्यता देण्याचेच नाकारले. सतत २२ वर्षे हा मूर्ख आग्रह चालू होता! ऑक्टोबर १९७१ मध्ये राष्ट्रसंघाने लाल चीनला मान्यता दिली व माओचे प्रतिनिधी राष्ट्रसंघात दाखल झाले. राष्ट्रसंघात अशा अर्थाचा ठराव होऊन चँग-कै-शैकच्या प्रतिनिधीला जाण्यास सांगण्यात आले. प्रतिनिधी पाठवा, अशी तार पेकिंग येथे चीनचा परराष्ट्रमंत्री चाऊ-एन-लाय याचे हातात पडली, तेव्हा अमेरिकेच्या राष्ट्राध्यक्षाचे खास दूत हेन्री किसिंजर यांचेबरोबर चाऊ हा मद्य घेत होता. तार वाचून तो उद्गारला – 'आश्चर्य आहे! असो, मला आनंद होत आहे.'

हेन्री किसिंजर यांनी अमेरिकेला परतल्यावर रिचर्ड निक्सन हे नव्या वर्षाच्या सुरुवातीला पेकिंगला भेट देतील असे जाहीर केले. चाऊ-एन-लाय विषयी किसिंजर

यांनी म्हटले –

'चाऊ हा सामान्य माणूस नाही. त्याचा दृष्टीकोण उदार आहे. मला भेटलेल्या राजकारणी पुरुषात चाऊ हा अत्यंत बुद्धीमान वाटला.

राष्ट्रसंघात सिक्युरिटी कौन्सिलवर आता व्हेटो वापरू शकतात असे पाच सभासद झाले. अमेरिका, इंग्लंड, फ्रान्स, रशिया आणि लाल चीन.

हेन्री किसिंजर यांच्या उद्गारावरून आणि रिचर्ड निक्सन यांच्या होणाऱ्या पेकिंग भेटीवरून असा निष्कर्ष निघू लागला की अमेरिका व चीन यांचे धोरण यापुढे योग्य त्या अंतरावर परंतु परस्परांच्या सदिच्छेचे राहाणार.

अमेरिकेच्या अध्यक्षांच्या पेकिंगवारीचे पडघम जानेवारी ७२ मध्ये जोरात वाजू लागले. एडगर स्नो या माओच्या पहिल्या चरित्रकाराने उद्गार काढले, "पूर्वी मांडलिक राजे भेटी घेऊन पेकिंगवाऱ्या करीत असत. परंतु जगातील सर्वात सामर्थ्यशाली राष्ट्राचा अध्यक्ष पेकिंगला इतिहासात प्रथमच येतो आहे!"

आदल्या वर्षी लाओस आणि कंबोडियावर अमेरिकेने चढवलेले हल्ले आणि केलेला बाँबवर्षाव हनोई सरकारला मूग गिळून सहन करावा लागला होता. कारण लाओस आणि कंबोडिया हे देश काही उत्तर व्हिएतनामचे भाग नव्हते. या देशातून जाणाऱ्या हो-चि-मिन्ह मार्गाचा विध्वंस करण्याचा हेतू निक्सन यांनी सांगितला असल्याने, अमेरिकेतील जनताही अपेक्षा होती तेवढ्या प्रमाणात, या कृत्याने क्रुद्ध झाली नाही. अमेरिकेच्या हल्ल्यामुळे हो-चि-मिन्ह मार्गाने पार दक्षिणेपर्यंत येणारी रसद आणि शस्त्रास्त्रे उत्तर व्हिएतनामने उत्तर-दक्षिण व्हिएतनामची सरहद्द असलेल्या, निर्लष्करी पट्ट्यात उत्तरेला खेचून घेतली. कारण लाओसमधून या निर्लष्करी पट्ट्याच्या उत्तरेलाही रस्ते येतात.

१९५४ च्या जिनिव्हा करारानुसार दक्षिण व्हिएतनाम व उत्तर व्हिएतनाम अशी १७व्या अक्षांश रेषेवर जी फाळणी झाली, तेव्हा या निर्लष्करी टापू निर्माण केला गेला. ६ मैल रूंदीचा पट्टा पश्चिमेला लाओसच्या सरहद्दीपासून सुरू होऊन, डोंगराळ भागातून, बेन-हाई नदीच्या दोन्ही अंगांनी पूर्वेकडे टोंकिन आखातापर्यंत जातो. १९५४ ते १९६५ हा पट्टा शांत होता. ऑगस्ट १९६६ मध्ये या भूपट्टीत अमेरिकेने बाँबवर्षाव सुरू केला.

या निर्लष्करी भागात जमा केली गेलेली लष्करी सामग्री नष्ट करण्याची खुमखुमी अमेरिकनांना होती. डिसेंबर १९७१ मध्ये अखेरच्या आठवड्यात अमेरिकेने पूर्वीच्या वचनाचा भंग करून २० व्या अक्षांशावर उत्तर व्हिएतनामच्या सरहद्दीवर बाँबवर्षाव सुरू केला. बाँबवर्षाव बंद केला अशी वचनबद्धता असल्याने अमेरिकेने ही जी दगाबाजी केली ती गुप्त राखली. परंतु ज्यांच्या डोक्यावर आणि घरादारावर हा वर्षाव झाला ती माणसे कशी स्वस्थ राहातील?

हनोई सरकारने जाहीर केले, माथेफिरू अमेरिकेने थान-होआ, नघे-आन आणि काँग-बिन्ह या दाट लोकवस्तीच्या आमच्या प्रदेशात बाँबवर्षाव करून वचनभंग केला आहे. आम्ही अमेरिकेची १९ विमाने नष्ट केली आहेत.

## निक्सन यांची पेकिंगवारी

१९ फेब्रुवारी ७२ अमेरिकेचे अध्यक्ष पेकिंग यात्रेसाठी वॉशिंग्टन सोडणार होते. जगाचे लक्ष या भेटीने खेचून घेतलेले होते. या भेटीमुळे कदाचित व्हिएतनाम युद्ध बंद होण्याची शक्यता सर्वांना वाटत होती. या पार्श्वभूमीवर अमेरिकेने केलेली दगाबाजी अमेरिकेतील जनतेनेही खपवून घेतली. निक्सन यांचे नवे संरक्षण सचिव मेलव्हीन लायर्ड यांनी बाँबवर्षाव केल्याचे मान्य करून खुलासा दिला –

'दक्षिण व्हिएतनाममध्ये अजून असलेल्या आमच्या १ लाख ५८ हजार सैनिकांच्या संरक्षणासाठी हा बाँबहल्ला आवश्यक होता.'

लायर्ड खोटे बोलत होते. एकीकडे निक्सन यांचा व्हिएतनामीकरणाचा कार्यक्रम भलताच सफल झाल्याच्या वल्गना करायच्या, दक्षिण व्हिएतनामी सैन्य आता आपल्या देशाचा बचाव करू शकेल असेही सांगायचे आणि तिथले अमेरिकन सैनिक धोक्यात आहेत अशीही बोंब मारायची! हा सर्व प्रकार बनवाबनवीचा होता. जॉन्सनसाहेबांचे पूर्वीचे संरक्षण सचिव क्लार्क क्लिफोर्ड यांनी तारे तोडले –

'बाँबवर्षाव करणारच नाही असे वचन कोणी दिले होते? वाटाघाटी सुरू होणार असतील तर बाँबवर्षाव बंद करू असे म्हटलेले होते. हनोईने एकीकडे बोलणी चालू ठेवून दक्षिण व्हिएतनाममधील घुसखोरी बंद केलेली नाहीच. आता निक्सन यांनी मोठ्या प्रमाणावर बाँबवर्षाव केल्यानंतर अमेरिकेने शांतता वाटाघाटी चालू ठेवून ढोंग तरी करू नये.'

निक्सन यांच्या पेकिंग भेटीत सात दिवसांच्या वास्तव्यात त्यांची माओबरोबर गुप्त बोलणी झाली. भेटीनंतर काढलेल्या संयुक्त पत्रकात नेहमीचीच गोलमाल भाषा होती. परस्पर आदर वगैरे! जगातील ताण कमी करण्यासाठी ही बोलणी होती असे सांगण्यात आले होते. पण तो ताण जिथेजिथे जाणवत होता, त्या प्रश्नांचा संयुक्त पत्रकात उल्लेखही नव्हता.

दक्षिण व्हिएतनामचा प्रमुख जनरल थियू हा मात्र धास्तावून गेला होता. गुप्त बोलणी काय झाली असतील? निक्सन यांनी एकीकडे माओच्या गळ्यात एक हात टाकला आहे. अमेरिकेचे सैन्य काढून घेतले जात आहे. हनोई सरकारशी म्हटले तर पॅरीसमध्ये बोलणी सुरू आहेत. आम्हाला रिचर्ड निक्सन दगा देणार की काय?

हनोई सरकारचा अमेरिकेला आणखी एक धडा शिकविण्याचा बेत हळूहळू आकार घेत होता. अमेरिकेने बाँबहल्ला थांबविल्यामुळे उत्तर व्हिएतनाम, दक्षिण व्हिएतनाम या ठिकाणी युद्ध बंद झाल्यासारखे होते. परंतु अमेरिकेने पुनश्च बाँबवर्षाव सुरू करूनही हनोई सरकार गप्प राहिले तर निक्सन सरकार शेफारून जाईल, अधिक धीट बनेल आणि पूर्ववत सतत बाँबहल्ले चालू करील अशी आशंका हनोई सरकारला होती. उत्तर व्हिएतनामचा नवा हल्ला अपेक्षित होता. फेब्रुवारीत निक्सन हे पेकिंग येथे असताना, या माओ-निक्सन शिखर परिषदेला अपशकुन करण्याकरिता, त्याचवेळी ही चढाई होईल असे अंदाज व्यक्त केले जात होते. परंतु शत्रूला अपेक्षित वेळेला हल्ला चढविण्याचा जनरल जिॲप याचा मुळीच पायंडा नव्हता!

फेब्रुवारीच्या शेवटच्या आठवड्यात अध्यक्ष निक्सन माओ-भेट उरकून वॉशिंग्टनला परतले. मार्च ७२ तसाच गेला. अपेक्षित हल्ला आता होत नाही अशी दक्षिण व्हिएतनाममध्ये भावना पसरू लागली. एप्रिल ७२ उजाडला आणि दक्षिण व्हिएतनामच्या उत्तर सरहद्दीवरून निर्लष्करी पट्टा ओलांडून उ. व्हिएतनामच्या फौजा दक्षिण व्हिएतनाममध्ये घुसल्या. टेट् सणाच्या चढाईनंतर झालेला हा हल्ला जास्त प्रखर होता.

## वचपा काढणारी मुसंडी

उत्तर व्हिएतनामच्या पायदळी तुकड्या, चिलखती गाड्यांसह आणि रशियन बनावटींच्या तोफांसह काँग-ट्री प्रांतात मुसंडी मारून एकाएकी पुढे आल्या. चढाई सुरू होऊन चार दिवस झाले न झाले तोच निर्लष्करी पट्ट्यालगतची ठाणी सोडून दक्षिण व्हिएतनामी लष्कर पळत सुटले. सरकारी पत्रकात 'दक्षिण व्हिएतनामच्या जनरल लाम याच्या फौजांनी यशस्वी माघार घेतली! शत्रूची विलक्षण नुकसानी केली. दोन रणगाडे गारद केले.' वगैरे मजकूर होता – जो नेहमीच असतो.

खरी गोष्ट अशी होती की काँग-ट्रीमधून माघार घेऊन जनरल लाम हा ३० मैल खाली दक्षिणेत असलेल्या हुए शहराकडे ससैन्य पळाला होता. काँग-ट्री शहरात ७५ ते १०० अमेरिकेचे लष्करी सल्लागार होते. ते देखील अर्थात हेलिकॉप्टरने पळाले. सुमारे ८ हजार दक्षिण व्हिएतनामी सैन्याची अशी दाणादाण उडाली. रणगाडे, चिलखती गाड्या टाकून हे सैनिक पळाले आणि सर्व हत्यारे उत्तर व्हिएतनामच्या हाती पडली. जनरल लाम याला थियूने पदच्युत केला! पहिल्याच मुसंडीनंतर हा हल्ला इथंच थांबणार आहे की पसरत जाणार आहे याचा नक्की अंदाज दक्षिण व्हिएतनाममधील अमेरिकेचे सेनाप्रमुख जनरल अब्राम यांना आला नाही. आता उत्तर व्हिएतनामींना तोंड देण्याचे काम त्यांनी जातीने आपणाकडे घेतले कारण काँग-ट्री शहर पडल्याने सायगाव-वॉशिंग्टन येथे काळजीचे वातावरण पसरले.

जनरल अब्राम यांनी नेहमीचे हत्यार उपसले. हनोई व हैपाँग बंदरावर अमेरिकन विमाने चार वर्षांनी प्रथमच आली व त्यांनी मोठ्या प्रमाणावर बाँबफेक सुरू केली. सुमारे १००० वर बाँबर विमाने (बी-५२) यासाठी वापरली गेली. यावरून हल्ल्याची भीषणता कळून येईल. हैपाँग बंदरात अमेरिकेने पाणसुरूंग पेरले. हल्ल्यांत उत्तर व्हिएतनामच्या पेट्रोल साठ्यापैकी ३० टक्के साठा नष्ट करण्यात आला असे अमेरिकेने जाहीर केले.

उत्तर व्हिएतनामच्या दक्षिणेस लढाई पेटली आणि त्याच वेळेस कंबोडियाच्या सरहद्दीवरून पुढे येऊन उत्तर व्हिएतनामी सैन्याने ॲन-लॉक या शहरावर वेढा घातला. अमेरिकेचे वैमानिक दल व दक्षिण व्हिएतनामी सैन्य यांना अनेक ठिकाणी एकाच वेळी लढाई करावी लागावी, यासाठी सायगावच्या उत्तरेस ६० मैलावर ही दुसरी मुसंडी मारण्यात आली होती.

काँग-ट्री पाठोपाठ हुए शहर देखील जनरल जिॲपच्या फौजांनी सर केले असते तर दक्षिण व्हिएतनामी पाहाता पाहाता कोलमडणार होते. उत्तरेस हुए, दक्षिणेत सायगावजवळचे ॲन-लॉक आणि कंबोडिया सरहद्दीजवळचे कोंटुम या तीन शहरांभोवती जिॲपच्या फौजा झडप घालण्याच्या पावित्र्यात उभ्या ठाकल्या. हा हल्ला केव्हा होणार? जनरल जिॲप याचे लढाईचे मुख्य सूत्र होते, 'Strike to win. Strike only if success is certain.' म्हणजे हल्ला करा पण यशाची १०० टक्के खात्री असेल तर. १८ वर्षांपूर्वी दिएन-बिएन-फू च्या लढाईत त्याने मोठा विजय मिळविला होता आणि तेव्हापासून एकही लढाई तो हरला नव्हता. यावेळी जिॲपचे वय ६० वर्षांचे होते. इतक्या वर्षांच्या अनुभवाने तो अधिक चाणाक्ष झाला होता. पंजात असलेल्या तीन शहरांवर संपूर्ण झडप केव्हा टाकायची हे तो ठरविणार होता.

प्रत्येक चढाईचे मूल्यमापन केवळ लष्करी यशाने न करण्याचे भान जिॲप याचेजवळ होते. टेट्र सणाची चढाई ही अमेरिकेला मानसिकदृष्ट्या हवालदिल करण्यासाठी होती आणि ती त्या पद्धतीने त्याने आखली होती. या नव्या चढाईचा त्याचा राजकीय हेतू काय होता हे अजूनपर्यंत स्पष्ट झालेले नव्हते.

अमेरिकेचे सैन्यप्रमुख जनरल अब्राम, अमेरिकेचे सायगावमधील वकील अेल्स्वर्थ बंकर आणि जनरल थियू हे सर्व गोंधळून गेले होते. अध्यक्ष निक्सन यांनी पॅरीसमधली वाटाघाटींची बोलणी स्थगित करून टाकली. व्हिएतनाममधील सुरू झालेली नवी चढाई मागे घेतल्याखेरीज उत्तर व्हिएतनामच्या प्रतिनिधींशी कसल्याही वाटाघाटी करणार नाही असा पवित्रा अमेरिकन प्रतिनिधींनी घेतला. उलट बाँबहल्ला पुन्हा सुरू करून अमेरिकेनेच वाटाघाटींना सुरूंग लावला असा आरोप उत्तर व्हिएतनामच्या प्रतिनिधींनी केला.

## जरा सबूर!

उत्तरेत कॉंग-ट्री शहराच्या आसपास सुमारे १ लाख उत्तर व्हिएतनामी सैन्य होते. सायगावच्या उत्तरेस ६० मैलांवरच्या ॲन-लॉक शहराच्या परिसरात २० हजार आणि बिनदिन्ह प्रांतातील कोंटुम शहराच्या परिसरात ३० हजार सैन्य जनरल जिॲप याने लोटलेले होते. या प्रांतातून उत्तर व्हिएतनामी सैन्याचे खेडोपाडी स्वागत झाले. दक्षिण व्हिएतनाममध्ये आपल्या अस्तित्वाची चुणूक दाखविणे हा या चढाईचा एक उद्देश असावा. दक्षिण व्हिएतनाममध्ये जून ७२ मध्ये ८०,००० उत्तर व्हिएतनामी सैन्य घुसलेले होते. रिचर्ड निक्सन यांच्या व्हिएतनामीकरणाच्या कार्यक्रमाचा संपूर्ण बोजवारा उडालेला आहे हे निक्सन यांना कळावे, हे या चढाईचे दुसरे उद्दिष्ट होते. ही दोन्ही राजकीय उद्दिष्टे होती. ही दोन्ही राजकीय उद्दिष्टे पुरेपूर साध्य करून उत्तर व्हिएतनामी फौजा हळूहळू जिंकलेल्या परिसरातच खंदक खणू लागल्या.

व्हिएतनाममध्ये पुन्हा युद्ध उसळले यावर मत व्यक्त करताना चाऊ-एन-लाय यांनी पेकिंग येथे सांगितले –

‘लढाईची कक्षा वाढवून मागे उपयोग झाला नाही. यापुढेही होणार नाही.’

जनरल अब्राम व जनरल जिॲप या दोघांनाही ‘सबुरीने घ्या’ असा हा माओचा इशारा होता.

n

# २६ : पॅरीस शांतता करार। युद्धबंदी झाली

पॅरीस येथे शांतता वाटाघाटी सुरू झाल्यानंतर रिचर्ड निक्सन हे अमेरिकेत सत्ताधारी झाले. पाहता पाहता चार वर्षे व्हायला आली. अध्यक्षपदाची नवी निवडणूक १९७२च्या अखेरीस पुन्हा होणार होती. लोकांनी निवडून दिले तर व्हिएतनामयुद्ध ताबडतोब बंद करीन हे १९६८च्या निवडणुकीपूर्वी निक्सन यांनी दिलेले आश्वासन त्यांनी पाळले नव्हते. उलट वचनभंग करून त्यांनी युद्ध अधिकच भडकवले होते. व्याप्ती वाढवली होती. शांतता अधिक दूर नेली होती.

आता पुन्हा मतदारांकडे मतासाठी याचना करण्याची वेळ ५-६ महिन्यात येणार होती आणि तत्पूर्वी तरी निदान व्हिएतनामयुद्धाचा सोक्षमोक्ष लावणे निक्सन यांना आवश्यक होते.

## 'हॉटेल मॅजेस्टिक' : मुक्काम पॅरीस

फ्रान्समध्ये पॅरीस येथे 'हॉटेल मॅजेस्टिक' या आलिशान इमारतीत वाटाघाटींचा घोळ गेली चार वर्षे चालू होता. बोलण्यात भाग घेणारे अमेरिकेचे मुख्य प्रतिनिधी दोनदा बदलले. प्रथम कॅबट लॉज होते. मग त्यांची जागा ब्रूस यांनी घेतली आणि जानेवारी १९७२ पासून अमेरिकेचे वकील विल्यम पोर्टर यांनी चर्चेची सूत्रे हाती घेतली होती. आठवड्याला एक याप्रमाणे सुमारे १४० हून अधिक वेळा उभय बाजूंचे प्रतिनिधी एकत्र बसले आणि सरकारी खर्चाने चहा-फराळ फस्त करून, एकमेकांच्या उखाळ्या-पाखाळ्या काढण्याचे काम फक्त त्यांनी जारीने केले. उत्तर व्हिएतनामच्या हनोई सरकारच्यावतीने मुख्य प्रवक्ते होते झुआन-थुई, जे पूर्वी हनोई सरकारात परराष्ट्रमंत्री होते आणि राष्ट्रीय मुक्ती आघाडी (N.L.F.)च्या प्रतिनिधींची प्रमुख होती एक देखणी व्हिएतकाँगी स्त्री, मादाम बिन्ह. दक्षिण व्हिएतनामचा प्रतिनिधी होता नग्युएन फोंग. वादाचा मुद्दा एकच होता. युद्ध थांबवल्यानंतर दक्षिण व्हिएतनाममधील सत्तेचे वाटप. अमेरिकेच्या लष्करी सामर्थ्यावर कसातरी सत्ता सांभाळणारा जनरल थियु याच्या जागी दक्षिण व्हिएतनामी जनतेचे प्रतिनिधीत्व करणारे सरकार तिथे आले पाहिजे असा हनोई सरकारचा आग्रह होता. आणि अमेरिका हे सारे सत्य मनात ठसवून घ्यायला तयार नव्हती! कारण त्यात अमेरिकेचे काही अंतस्थ हेतू होते. हनोईचे प्रतिनिधी या प्रश्नावर एक तसूभरही माघार घ्यायला तयार नव्हते, म्हणून वाटाघाटी रेंगाळत पडल्या होत्या.

फेब्रुवारी ७२ मध्ये निक्सन चीनला जाऊन आले. त्यांचे प्रमुख सल्लागार हेन्री किसिंजर हे त्यावेळी बरोबर होते. त्यावेळी व्हिएतनामचा प्रश्न गुप्त बोलण्यात निघाला

असला पाहिजे. परंतु या प्रश्नावर बोलणे झाले नाही, असेच आजपर्यंत सांगण्यात येत होते. आता तीन महिन्यांनी निक्सन मॉस्को भेटीसाठी निघाले होते. हेन्री किसिंजर आणि सेक्रेटरी ऑफ स्टेट विल्यम रॉजर्स यांच्यासह, मे महिन्याच्या दुसऱ्या आठवड्यात निक्सन मॉस्कोला दाखल झाले. ही शिखर परिषद होते की नाही अशी परिस्थिती नुकतीच निर्माण झाली होती. हैपाँग बंदरातून रशियाची मदत हनोई सरकारला येत असे. या बंदराची सुरूंग पेरून अमेरिकेने नाकेबंदी केली होती. हनोई, हैपाँगवर बाँबफेक करून रशियातून आलेले तेलाचे साठे अमेरिकेने पेटवून दिले होते. या घटना ताज्या होत्या. तेव्हा कदाचित मास्कोहून ही शिखर परिषद रद्द झाल्याची घोषणा होईल, अशी धाकधूक शेवटच्या घटकेपर्यंत होती. परंतु तसे काही घडले नाही. ब्रेझनेव्ह-निक्सन बोलणी मॉस्कोत सुरू झाली. या बोलण्यातून व्हिएतनामच्या वाटाघाटी लगेच मार्गी लागाव्या अशी अपेक्षा नव्हती. परंतु दक्षिण व्हिएतनाममध्ये युद्धबंदीनंतर कोणते सरकार यावे, हा प्रश्न युद्धबंदीच्या वाटाघाटीत सोडवण्याचा आग्रह हनोईने सोडावा याकरता हनोई सरकारवर मॉस्कोने दडपण आणावे असा प्रयत्न निक्सन यांनी नक्कीच केला असे समजायला आधार आहे. कारण या भेटीनंतर काही दिवसांनी वाटाघाटी यशस्वी होण्याचा रागरंग दिसू लागला.

## ले-डक्-थो आले

या दृष्टीने पहिली गोष्ट घडली म्हणजे हनोईहून वाटाघाटीत माग घेण्यासाठी ले-डक्-थो हा वरिष्ठ नेता पॅरीस येथे दाखल झाला. उत्तर व्हिएतनामच्या लाँग-डाँग पक्षाच्या पॉलिट ब्यूरोचा हा सभासद होता. त्याने स्पष्ट सांगितले –

'दक्षिण व्हिएतनाममध्ये कम्युनिस्टच सत्ताधारी व्हावे असा आमचा आग्रह नाही.'

एकीकडे अमेरिकेची विमाने सतत बाँबवर्षाव करीत होती. उत्तर व्हिएतनाममधील जवळजवळ सर्व रेल्वे मार्ग उद्ध्वस्त झाले होते. नदीवरील पूल कोसळले होते. ६५ टक्के कारखानदारी उद्ध्वस्त झाली होती. यासंबंधी ले-डक्-थो याने फक्त म्हटले,

'निक्सन यांनी युद्ध अधिक भडकवल्यामुळे उत्तर व्हिएतनामी जनतेला अनेक अडचणींना तोंड द्यावे लागत आहे यात शंका नाही.'

अडीअडचणींना तोंड द्यावे लागत आहे असे म्हटल्याने अमेरिकेच्या अध्यक्षांना हवे होते ते मानसिक समाधान मिळत नव्हते. उत्तर व्हिएतनाम नामोहरम होत चालले आहे, तेव्हा कसेही करून हे हल्ले थांबवा अशी भाषा काही हनोई अजून काढीत नव्हती! उलट ॲन-लॉक, हुए आणि कोंटुम या तीन दक्षिण व्हिएतनामी शहरांच्या वेशीवर पाय रोवून उत्तर व्हिएतनामी सैन्य उभे होते. ते मागे घेतले जाईल अशी लक्षणे मुळीच दिसत नव्हती. अमेरिकेला पूर्वीचाच अनुभव पुन्हा येत होता की बाँबवर्षावाने हनोई खचत नव्हती.

पॅरीसमधल्या वाटाघाटींना तर अमेरिकेनेच सुरूंग लावून त्या बंद पाडलेल्या होत्या. या पेचप्रसंगातून बाहेर पडण्याची अमेरिकेची धडपड आता सर्वांच्या लक्षात येऊ लागली.

जून ७२ च्या अखेरीस किसिंजर एकटेच पुनश्च पेकिंगला दाखल झाले. चाऊ-एन-लाय बरोबर चार दिवस त्यांची बोलणी चालू होती, ती प्रामुख्याने व्हिएतनामविषयकच. कारण किसिंजर पेकिंगला येण्यापूर्वी आठवडाभर ले-डक्-थो हा पेकिंगला येऊन गेला होता. रशियाचे अध्यक्ष पोडगोर्नी हे हनोईला याच सुमारास भेट देऊन आले. निक्सन यांनी माओ व ब्रेझनेव्ह यांची बहुधा खात्री पटवली असावी, की एकदा युद्धबंदी झाली की सर्व व्हिएतनाम हा आज ना उद्या उत्तर व्हिएतनामच्या कब्जात जाणारच आहे. अमेरिका आपले सैन्य काढून घेऊ इच्छिते. तेव्हा लष्करी समझोत्यामध्ये राजकीय प्रश्न मिसळू नका, असा सल्ला तुम्ही हनोईला द्या. अर्थात हे सर्व पडद्याआड चालू होते.

ले-डक्-थो यांना पडद्यामागे काय हालचाली चालू आहेत याचा अंदाज आला असला, तरी जाहीरपणे याची दखल घ्यायचे कारण नाही, म्हणून जून ७२ च्या अखेरीस पॅरीसमध्ये त्यांनी पत्रकारांना सांगितले,

‘किसिंजर पेकिंगला जातात, पोडगोर्नी हनोईला जातात, याचा उपयोग नाही! आमच्याशी सरळ बोलणी केल्याशिवाय अमेरिकेला हा प्रश्न सोडविता येणार नाही.’

युद्ध आघाडीवर यावेळी शांतता नव्हती. ॲन-लॉक सायगाव मार्ग उत्तर व्हिएतनामी सैन्याने तोडला होता. ॲन-लॉक शहराचा वेढा उठविण्यासाठी दक्षिण व्हिएतनामी फौजा टकरा खात पराभूत होत होत्या. व्हिएतनामी सैन्याचा लेफ्ट. जनरल मिन्ह याला काही ॲन-लॉक मुक्त करणे जमत नव्हते.

हुए शहरात दक्षिण व्हिएतनामी जनरल टूऑँग हा शहर सांभाळून होता. परंतु शहराभोवती पडलेली उत्तर व्हिएतनामी सैन्याची नांगी त्याला रोज डसत होती.

अमेरिका एक नवा धडा शिकली होती. अमेरिकेने पाशवी बॉंबहल्ले केले तर उत्तर व्हिएतनामची चढाई रोखता येते. परंतु त्यांनी मुसंडी मारून कब्जात घेतलेला प्रदेश काही दक्षिण व्हिएतनामी सैन्याला परत जिंकता येत नाही. दक्षिण व्हिएतनामी सैन्याची ही दुर्दशा पाहून सायगाव येथे जनरल थियू याची काळजी वाढली. लोकमत त्याच्या विरुद्ध होऊ लागले. आणीबाणीची परिस्थिती हे कारण दाखवून त्याने सहा महिने सर्वाधिकार स्वतःकडे घेतल्याचे जाहीर केले.

## रूसवा संपला

पॅरीस वाटाघाटीतून, उत्तर व्हिएतनामने दक्षिण व्हिएतनामवर केलेले आक्रमण हे कारण दाखवून अमेरिकेचे प्रतिनिधी विल्यम पोर्टर वाटाघाटीच्या टेबलावरून तीन

महिन्यांपूर्वी निघून गेले होते. आक्रमण होते तिथेच होते. तरीही किसिंजर यांच्या प्रयत्नाने आता त्यांना बोलणी सुरू करायला त्यांनी संमती दिली. जुलै १९७२ च्या तिसऱ्या आठवड्यात, दहा आठवड्यांच्या रूसव्यानंतर विल्यम पोर्टर व हनोईचे प्रतिनिधी झु-ऑन थुई हे दोघे पुनश्च 'हॉटेल मॅजेस्टिक' मध्ये एकत्र बसले. ही १५० वी बैठक होती. उभय पक्षांच्या शांततेच्या अटी आता स्पष्ट झाल्या होत्या. व्हिएतकाँगच्या प्रतिनिधी मादाम बिन्ह यांची मागणी होती –

१) विवक्षित तारखेपूर्वी सर्व अमेरिकेचे सैन्य काढून घेतले जावे.

२) जनरल थियू याने राजीनामा द्यावा व त्या जागी सर्वपक्षीय सरकार यावे. यात अर्थात 'राष्ट्रीय मुक्ती आघाडी' असेल.

याउलट रिचर्ड निक्सन यांनी ८ मे ७२ ला अमेरिका जास्तीत जास्त काय देऊ शकते ते जाहीर केले होते. म्हणून विल्यम पोर्टर यांची मागणी त्या निवेदनानुसार अशी होती –

१) युद्धबंदी प्रथम व्हावी.

२) अमेरिकेचे पकडलेले सर्व सैनिक हनोई सरकारने मुक्त करावे.

३) यानंतर चार महिन्यांनी अमेरिकेने संपूर्ण सैन्य काढून घ्यावे.

४) दक्षिण व्हिएतनाम सरकार काय असावे हा नंतरचा प्रश्न आहे. तो व्हिएतनामने नंतर सोडवावा.

पॅरीसमध्ये बोलणी पुनश्च सुरू होण्यापूर्वी, काँग-ट्री हे उत्तर व्हिएतनामींनी जिंकून घेतलेले शहर परत कब्जात घेण्याचा दक्षिण व्हिएतनामी सेनेने आटोकाट प्रयत्न केला. परंतु ते त्यांना जमले नाही.

पोर्टर-थुई वाटाघाटी हॉटेल मॅजेस्टिकमध्ये रीतसर चालू असताना, हेन्री किसिंजर यांनी हनोईतून आलेले उत्तर व्हिएतनाममधील व्हिएत-मिन्ह पक्षाचे नेते ले-डक्-थो यांच्याबरोबर गुप्त भेटीत बोलणी सुरू केली. या बोलण्यास आता अधिक महत्त्व येत चालले. कारण किसिंजर हेच निक्सन यांचे विश्वासातले प्रमुख सल्लागार असल्याने, या वाटाघाटी म्हणजे निक्सन व हनोई यांच्यातील सरळ बोलणीच होती. अमेरिकेत होणाऱ्या अध्यक्षीय निवडणुकीपूर्वी व्हिएतनाम समझोता जाहीर करण्याची किसिंजर यांची सर्व धडपड होती. वॉशिंग्टनबरोबर पेकिंग-मॉस्को हे दरवाजे देखील त्यांना आता उघडे होते. विचारविनिमयासाठी ले-डक्-थो वारंवार हनोईला जात. येताना व जाताना पेकिंग वारी उरकीत.

ऑक्टोबर ७२ उजाडला आणि अमेरिकेतील निवडणुकीत निक्सन यांना मदत करण्यासाठी किसिंजर वॉशिंग्टनला परतले, तेव्हा त्यांचा चेहरा उजळलेला होता. पॅरीस वाटाघाटीत बरेचसे मतैक्य होऊ लागल्याचा तो आनंद होता. युद्धबंदीक्षण जवळ येतो आहे, याची दुसरी निशाणी ही होती की किसिंजर यांचे सहकारी मेजर जनरल हेग हे जनरल थियू यांच्याशी बोलणी करण्याकरिता, ऑक्टोबरातच सायगावला गेले. पॅरीसला जे काही ठरले त्याला थियूची संमती मिळविण्याचाच हा प्रयत्न होता.

## शांतता आली हो आली!

डॉ. हेन्री किसिंजर यांनी २६ ऑक्टोबर १९७२ रोजी वॉशिंग्टन येथे पत्रकारांना खुलासेवार माहिती देताना जाहीर केले –

'आमचा विश्वास आहे की शांतता हाताच्या अंतरावर आली आहे. समझोता दृष्टीपथात आला आहे. हा समझोता अध्यक्ष निक्सन यांच्या ८ मे ७२ च्या प्रस्तावावर आणि त्यावर सुचवलेल्या दुरूस्त्यांवर आधारलेला असून, तो सर्व पक्षांना न्याय देणारा आहे. अंतिम मसुदा पक्का होण्यात अद्याप काही अडचणी असल्या तरी त्या दिशेने बहुतेक पल्ला गाठलेला आहे आणि तुलनेने कमी महत्त्वाच्या काही बाबीच फक्त अजून नक्की व्हावयाच्या आहेत.

'आज सकाळी हनोई आकाशवाणीने अगदी बरोबर सांगितलेले आहे की ८ ऑक्टोबरला उत्तर व्हिएतनामने आम्हाला जो प्रस्ताव केला, त्यामुळे बोलण्यांना गती मिळाली. हनोईने अशी सूचना केली की प्रथम आपण या संघर्षाच्या लष्करी भागाचा विचार करू आणि तो संपवून टाकू आणि मग काही मार्गदर्शक तत्त्वे ठरवू की ज्यानुसार दक्षिण व्हिएतनाममधील राजकीय परिस्थितीवर तोडगा नंतर निघू शकेल. त्यांनी दक्षिण व्हिएतनाममध्ये संयुक्त सरकार आणावे ही आपली मागणी मागे घेतली. सध्याच्या सरकारात कोण असावे, कोण नसावे याबद्दल त्यांचा आग्रह देखील त्यांनी सोडला.

'आता मी तुम्हाला करारात कोणत्या अटी आहेत ते सांगतो. या अटींचा गोषवारा हनोई आकाशवाणीने दिला तो बरोबर आहे. जी वेळ ठरवण्यात येईल त्या वेळेपासून दक्षिण व्हिएतनाममधील युद्ध थांबेल. करार झाल्यापासून ६० दिवसात सर्व अमेरिकन सैन्य काढून घेण्यात येईल. त्यानंतर कोणतेही बाहेरचे सैनिक आत घेतले जाणार नाहीत. आज दक्षिण व्हिएतनाममध्ये जी शस्त्रास्त्रे आहेत त्यात वाढ होणार नाही. फक्त एखादे निकामी झाले तर दुसरे त्याजागी आणता येईल. करार झाल्यापासून ६० दिवसात सर्व अमेरिकेच्या युद्धकैद्यांची मुक्तता केली जाईल. दक्षिण व्हिएतनामचा स्वयंनिर्णयाचा हक्क मान्य केला जाईल, म्हणजे आपल्याला कसे सरकार हवे हे त्यांचे त्यांनी ठरवायचे आहे.

## हनोई रेडिओ पुकारा

हनोई आकाशवाणीने त्याच दिवशी सकाळी आतापर्यंत गुप्त राहिलेल्या समझोत्याच्या अटी प्रसारित केल्या होत्या, यामुळे हनोई रेडिओवरून जे सांगितले गेले ते लपवून ठेवणे, डॉ. किसिंजर यांना अशक्य होते. त्यांनाही यामुळे पत्रकारांजवळ प्रदीर्घ खुलासा करावा लागला होता. हनोई आकाशवाणीने प्रसारित केलेल्या नऊ अटी पुढीलप्रमाणे होत्या –

१) १९५४ च्या जिनिव्हा करारानुसार अमेरिका व्हिएतनामचे अखंडत्व मान्य करीत आहे.

२) करारावर सही झाल्यापासून २४ तासात अमेरिका आपली सर्व युद्धकृती बंद करील, बाँब हल्ले थांबवील, उत्तर व्हिएतनामच्या समुद्रात पेरलेले सुरूंग काढून घेईल आणि ६० दिवसांच्या आत दक्षिण व्हिएतनाममधून सर्व फौजा काढून घेईल.

३) सर्व युद्धकैद्यांची मुक्तता अमेरिकेने सैन्य काढून घेतल्यावर दोन्ही पक्ष करतील.

४) दक्षिण व्हिएतनाममध्ये मुक्तपणे व लोकशाही पद्धतीने निवडणुका घेण्यात येतील व त्या आंतरराष्ट्रीय देखरेखीखाली होतील.

५) दोन्ही व्हिएतनामचे एकीकरण शांततेच्या मार्गाने होईल.

६) करार झाल्यापासून ३० दिवसात, अमेरिका, उत्तर व्हिएतनामी, व्हिएतकाँगी आणि सायगाव सरकार यांचे एक लष्करी मंडळ आणि निवडणुकीवर देखरेख करणारे आंतरराष्ट्रीय मंडळ तयार करण्यात येईल.

७) कंबोडिया व लाओस यांचे १९५४ च्या जिनिव्हा कराराने मान्य केलेले स्वतंत्र अस्तित्व सर्व पक्ष मान्य करीत आहेत. त्या देशांचे अंतर्गत प्रश्न त्या देशांच्या जनतेने सोडवायचे आहेत.

८) इंडोचायनामधील देशाच्या पुनर्रचनेकरता अमेरिका मदत करील.

९) करारावर सह्या झाल्या की तो बंधनकारक होईल.

नोव्हेंबरच्या पहिल्या आठवड्यात अमेरिकेत अध्यक्षपदाची निवडणूक झाली. व्हिएतनाममधून अमेरिकन सैन्याचे मोठ्या प्रमाणात पुनरागमन, मॉस्कोबरोबर सुधारलेले अमेरिकेचे संबंध आणि हैपाँग बंदरात सुरूंग पेरून आणि बाँबफेक करूनही ब्रेझनेव्ह यांनी निक्सन यांचे केलेले स्वागत या सर्व गोष्टींमुळे, निक्सन हे बहुमताने निवडून येणार अशी अपेक्षा होतीच. विशेषतः वरीलपैकी दुसरी घटना आणि किसिंजर यांनी ऑक्टोबर महिन्यात अमेरिकेला आल्या आल्या 'व्हिएतनामची शांतता दृष्टीपथात आली आहे. हाताच्या अंतरावरच आहे,' हा केलेला खुलासेवार पुकारा, यामुळे या, निवडणुकीत अमेरिकेच्या मतदारांपुढे व्हिएतनाम युद्धाचा प्रश्न नव्हताच.

## लॅन्डस्लाईड व्हिक्टरी?

प्रत्यक्षात निक्सन हे भरघोस मताने निवडून आले – ज्याला इंग्रजीत 'लँड स्लाईड व्हिक्टरी' म्हणतात. १९२० साली वॉरेन हार्डिंग यांना ६०.३ टक्के मते पडली होती. रूझवेल्ट यांना १९३६ साली ६०.८ टक्के मते मिळाली होती. नंतर जॉन्सन यांना १९६४ मध्ये ६१.१ टक्के मते मिळाली होती. निक्सन यांनी ६०.७ टक्के मते मिळवून एक प्रकारे उच्चांकच गाठला. यामुळे निक्सन यांनी व्हिएतनाम संबंधात ज्या घोडचुका केल्या, त्या सर्वांवर आता लोकप्रियतेचे पांघरूण पसरले गेले. डेमॉक्रेटिक पक्षाचे उमेदवार मॅकगव्हर्न यांच्या या संबंधातील टीकेकडे मतदारांनी लक्ष दिले नाही.

हेन्री किसिंजर अमेरिकेतील निवडणूक आटोपून डिसेंबरात पॅरीसला परतले. आता फक्त ३-४ दिवसात वाटाघाटी सफल झाल्याचे जाहीर होणार अशी सार्वजनिक अपेक्षा होती. ४ डिसेंबरपूर्वी किसिंजर व ले-डक्-थो यांच्यात अगदी गुप्त बोलणी होऊनही, ठरल्या दिवशी म्हणजे ४ डिसेंबर १९७२ ला प्रतिनिधींची बैठक होणार नसल्याचे जाहीर झाले! काहीतरी घोटाळा झाला होता. आठ दिवस बोलणीच स्थगित झाली. २३ ऑक्टोबरला पूर्वी एकदा वाटाघाटीत असाच व्यत्यय आणला तो अमेरिकेने. त्या दिवशी निक्सन यांनीच वॉशिंग्टनहून, अधिक खुलाशासाठी वेळ हवा म्हणून बोलणी पुढे ढकलली होती. आता उत्तर व्हिएतनामी प्रतिनिधीने हाच प्रयोग निक्सन यांचेवर सुरू केला. नाना खुसपटे काढून खुलासे विचारायला त्यांनी सुरुवात केली. आमचे सैन्य दक्षिणेत नाहीच तेव्हा काढून घेण्याचा प्रश्नच कुठे येतो? सर्व राजकीय कैदी थियू सोडणार का? या टोलवाटोलवीचा हेतू उघड होता. उत्तर व्हिएतनामला कधी एकदा युद्ध बंद होते असे झाले आहे, अशी जर अमेरिकनांची समजूत झाली असेल, तर ती त्यांनी सुधारावी. किसिंजरही हुषार होते. किसिंजर यांनी या सर्व खुलाशासाठी वॉशिंग्टनला पुन्हा जाऊन थियूच्या प्रतिनिधींशी वाटाघाटी आवश्यक असल्याचे सांगितले! वस्तुतः थियूवर लगेच दडपण आणणे अमेरिकेला शक्य होते. किसिंजर पुनश्च वॉशिंग्टनला परतले. याचवेळी जनरल थियू याचा पॅरीस येथील प्रतिनिधी फ्यू-डक हा देखील वॉशिंग्टनला आला.

## मादाम बिन्ह हिचे आरोपपत्र

२३ ऑक्टोबरला अमेरिकेने बोलणी पुढे ढकलली तेव्हाच मादाम बिन्ह हिने पॅरीस येथून आरोप केला होता –

> 'दोन्ही पक्षांना मान्य झालेल्या मसुद्यावरील ठरलेल्या तारखेला म्हणजे ३१ ऑक्टोबरला सह्या करण्यास अमेरिकेने नकार दिला आहे. आता विलंब करण्याचे वस्तुतः काहीच कारण नाही. किसिंजर सांगतात की 'सायगावहून थियू याने अडचण

उपस्थित केली आहे.' परंतु अमेरिका, सायगाव सरकारला भरपूर शस्त्रास्त्रे पुरवण्यास वेळ मिळावा म्हणून हे वेळकाढू धोरण अवलंबित आहे.'

मादाम बिन्ह ही बाई व्हिएतकाँगींची प्रतिनिधी असल्याने तिचे इतर बाबतीतले म्हणणेही महत्त्वाचे होते.

'लाख-दीड लाख उत्तर व्हिएतनामी सैनिक दक्षिण व्हिएतनाममध्ये आहेत हा आरोप खोटा आहे. आम्हाला व्हिएतनाम सरकार मदत करते, परंतु सर्व व्हिएतकाँगी सैन्य हे आमच्या दक्षिण व्हिएतनामच्या अस्थायी क्रांतिकारी सरकारच्या हुकमतीखाली आहे. निक्सन सरकारला आता हवे आहे तरी काय? वस्तुस्थितीकडे डोळेझाक करून दक्षिण व्हिएतनामवर त्यांना सोयीची राजवट लादण्याचा विचार आहे की काय? दक्षिण व्हिएतनाममध्ये दोन सरकारे आहेत, दोन सेना आज आहेत. जनतेचा कुणाला पाठिंबा आहे हे नंतर होणाऱ्या निवडणुकीत ठरेल.'

तेव्हा जनरल थियू हटून बसला होता. त्याचे म्हणणे, जसे अमेरिकन सैन्य काढून घेतले जाणार आहे, त्याचप्रमाणे दक्षिण व्हिएतनाममधून उत्तर व्हिएतनामचे सैन्यही काढून घेतले जावे. हनोईचे म्हणणे होते, आमचे सैन्यच दक्षिण व्हिएतनाममध्ये नाही. या म्हणण्याला जोर यावा म्हणून दक्षिण व्हिएतनाममध्ये घुसून जिंकलेले काँग-ट्री शहर खाली करून उत्तर व्हिएतनामी सैन्य नोव्हेंबरात मागे हटले होते. ज्याचा अर्थ काँग-ट्री पुन्हा जिंकून घेतले असा जनरल थियू याने लावला होता.

## यात लबाडी होतीच

उत्तर व्हिएतनामी सैन्य दक्षिणेत नाही या म्हणण्यात लबाडी होती यात संशय नाही. परंतु ही लबाडी दोन कारणांकरिता क्षम्य मानली पाहिजे. एक म्हणजे व्हिएतनामची फाळणी ही हनोई सरकार तात्पुरती व्यवस्था समजत होते. दुसरी गोष्ट थियू राजवटीविरुद्ध सशस्त्र लढा देणारे सर्वच उत्तर व्हिएतनामी होते हा थियू याचा दावा सपशेल खोटा होता. व्हिएतकाँगींनी शहराभोवतालच्या असंख्य खेड्यांवर राजकीय कब्जा केलेला होता. दक्षिण व्हिएतनाममधील कम्युनिस्टांना व्हिएतकाँगी म्हणत असत. ते काय सर्व उत्तरेकडून आयात केलेले होते की काय?

४ डिसेंबरला वाटाघाटी स्थगित करून वॉशिंग्टनला गेलेले हेन्री किसिंजर निक्सनबरोबरची खलबते आटोपून, लगेचच पॅरीसला आले व ले-डक्-थो बरोबर त्यांची गुप्त बोलणी पुन्हा सुरू झाली. दोन-तीन वादग्रस्त मुद्देच आता टेबलावर होते.

१) ज्यायोगे उत्तर व्हिएतनामने आपले सैन्य दक्षिण व्हिएतनाममधून काढून घेतले असे दर्शविता येईल असे नेमके काय घडवून आणायचे?

२) अमेरिकेचे पकडलेले सैनिक हनोई सरकारने मुक्त करायला मान्यता दिल्यावर, थियूच्या ताब्यातील उत्तर व्हिएतनामी सर्व कैदी सुटणार की नाही?

३) दक्षिण व्हिएतनाममध्ये नंतर होणाऱ्या निवडणुकींवर लक्ष ठेवण्यासाठी जी यंत्रणा तयार करायची, त्याचे अधिकार व कर्तव्ये काय राहतील?

## किसिंजर बिथरले

यातला दुसरा प्रश्न फारच बिकट होता. जनरल थियूच्या तुरूंगात जवळ जवळ ९०,००० लोक होते. यातले युद्धकैदी किती आणि सामान्य गुन्हेगार किती? शूर लढवय्ये किती आणि सामान्य खुनी किती? हनोई व मादाम बिन्ह यांची मागणी होती की सर्व राजकीय कैदी सुटले पाहिजेत. जनरल थियू याने सर्वाधिकार हाती घेतल्यापासून तो रोज दोन-तीनशे माणसे पकडून तुरूंगात पाठवीत होता. बरे, त्यांच्यावर खटला नाही, चौकशी नाही. कारण आणीबाणी! म्हणून हा प्रश्न सोडवताना अमेरिकन युद्धकैद्यांशी त्यांची सांगड घालणे जनरल थियू याला पेचात टाकणारे होते. ऑक्टोबरमध्ये जेव्हा वाटाघाटी जवळजवळ सफल झाल्या होत्या, तेव्हा सर्व राजकीय कैदी सोडण्याचा आग्रह ले-डक्-थो याने धरलेला नव्हता. आता अखेरच्या क्षणी हा प्रश्न त्यांनी काढल्यामुळे किसिंजर चांगलेच कुद्ध झाले. आधीच ऑक्टोबर ७२ मध्ये घाईघाईने शांतता जवळ आल्याचा त्यांनी केलेला पुकारा ही थाप होती अशी चौफेर टीका सुरू झाल्याने ते बिथरले होते. त्यात ही नवी अडवणूक सुरू झाली.

वॉशिंग्टनला जाऊन किसिंजर यांनी आपली रूष्टता अध्यक्ष निक्सन यांचेजवळ प्रकट करताच, निवडणुकीत मिळालेल्या यशाच्या धुंदीत निक्सन यांनी हनोई सरकारला ७२ तासांचे अंतिमोत्तर धाडले –

‘नवे प्रश्न उपस्थित करून वाटाघाटीत मोडता घातलात तर पुनश्च बॉंबहल्ले सुरू करावे लागतील.’

१४ डिसेंबर १९७२ ला हा इशारा रवाना झाला आणि १८ डिसेंबरला उत्तर व्हिएतनामवर पुनश्च बॉंबवर्षाव सुरू झाला.

## नाझींना लाजविणारा विनाश

शांततेच्या आशा मावळल्या. निक्सन यांच्या या आततायीपणाला जगातून सार्वत्रिक चपराका सुरू झाल्या. ‘ल मॉंडे’ या पत्राने लिहिले. ‘नाझींना लाजवणारा हा विनाश आहे.’ इंग्लंडच्या ‘डेली मिरर’ पत्राने लिहिले – ‘अमेरिकेने पुनश्च बॉंबहल्ले सुरू केले हे पाहिल्यावर जगाला धक्का बसून उबग आला आहे.’

हातातोंडाशी आलेली शांतता प्रस्थापित करण्याची संधी रिचर्ड निक्सन आक्रस्ताळेपणा करून गमावीत आहेत, अशी खुद्द अमेरिकेत आणि जगात जोराची टीका सुरू झाली म्हणून म्हणा, किंवा ले-डक्-थो यांनी नंतर सांगितले त्याप्रमाणे, पुन्हा एकदा अमेरिकेला बाँबवर्षावाने हनोई नमत नाही हे कळून आले म्हणून म्हणा, परंतु १५ जानेवारी १९७३ ला निक्सन यांनी बाँब व तोफांचा भडिमार आणि पाणसुरूंगांची पेरणी, ही सर्व युद्धकृत्ये बंद करण्याचा पुनः आदेश दिला. कारण नसताना निक्सन यांनी जवळ जवळ महिनाभर मोठ्या प्रमाणावर विद्ध्वंस केला.

डॉ. किसिंजर लगेच पॅरीसला आले व ले-डक्-थो यांचेबरोबर उभय पक्षांनी ऑक्टोबरातच मान्य केलेल्या समझोत्याच्या मसुद्यातील वादग्रस्त झालेल्या बाबींचा विचार सुरू केला. काही देवाण-घेवाण होऊन उभयतांनी या करारावर २६ जानेवारीला मान्यतेच्या सह्या केल्या. डॉ. किसिंजर व ले-डक्-थो हे काही दोन्ही पक्षांचे अधिकृत प्रतिनिधी नव्हते. तेव्हा करारावर अधिकृत प्रतिनिधींनी प्रत्यक्ष सह्या करण्याचा दिवस २७ जानेवारी १९७३ हा ठरविण्यात आला.

## करारावर सह्या : २७ जानेवारी ७३

पॅरीसमधील ‘हॉटेल मॅजेस्टिक’ मध्ये २७ जानेवारी ७३ या दिवशी सकाळी करारावर सह्या करण्याचा समारंभ झाला. याप्रसंगी या कराराचे जनक डॉ. हेन्री किसिंजर व ले-डक्-थो हे जसे हजर नव्हते, त्याचप्रमाणे सायगाव सरकारचे प्रमुख जनरल थियू व हनोई सरकारचे पंतप्रधान फाम-व्हॉन-डाँग हे दोघे देखील हजर नव्हते! करारावर सह्या केल्या त्या, त्या त्या सरकारच्या परराष्ट्रमंत्र्यांनी, उत्तर व्हिएतनामचा परराष्ट्रमंत्री त्रिन्ह, मादाम-बिन्ह, जनरल थियू यांचा परराष्ट्रमंत्री ट्राम-व्हान-लाम आणि अमेरिकेचे परराष्ट्रमंत्री विल्यम रॉजर्स यांच्या सह्या करारावर आहेत. त्या कराराची कलमे वॉशिंग्टन, हनोई व सायगाव आकाशवाणी केंद्रावरून एकाचवेळी ध्वनिक्षेपित करण्यात आली.

या शांतता कराराचे ९ विभाग आहेत. प्रत्येक भागात खालील नऊ मुद्यांचा विस्ताराने परामर्ष घेतलेला आहे. अधिकृत कराराचे हे नऊ मुद्दे असे–

१) १९५४ च्या जिनिव्ह करारानुसार सर्व पक्ष व्हिएतनामचे स्वातंत्र्य, सार्वभौमत्व व भौगोलिक एकता यांना मान्यता देत आहेत.

२) २७ जानेवारीपासून सर्व व्हिएतनामभर युद्धबंदी लागू होईल व जे सैन्य जेथे आहे ते तिथेच राहील. यात लाओस व कंबोडियाचा समावेश नाही. यानंतर साठ दिवसात कोणतेही परकीय सैन्य दक्षिण व्हिएतनाममध्ये येणार नाही.

३) सर्व लष्करी कैदी ६० दिवसात मुक्त केले जातील. जे कैदी बेपत्ता आहेत त्यांचा शोध लावण्याचा प्रयत्न केला जाईल. दक्षिण व्हिएतनामच्या तुरूंगात जे बिनलष्करी कैदी आहेत, त्यांचा सुटकेबाबत तिथे असलेल्या दोन सत्ता यांनी वाटाघाटी करायच्या आहेत.

४) स्वतःचे राजकीय भवितव्य ठरविण्याचा दक्षिण व्हिएतनामचा अधिकार मान्य करण्यात येत आहे. दक्षिण व्हिएतनाममधील दोघा पक्षांनी निवडणुकांवर देखरेख करण्यासाठी एक आंतरराष्ट्रीय मंडळ तयार करावयाचे आहे. या मंडळात तटस्थ प्रतिनिधी धरून दोन्ही सत्तांचे समान प्रतिनिधी राहतील.

५) जोपर्यंत दोन्ही भागांचे एकत्रीकरण होत नाही, तोपर्यंत व्हिएतनामच्या दोन भागांची तात्पुरती लष्करी सरहद्द ही निर्लष्करी पट्टा राहील. दोन्ही भागांचे एकत्रीकरण हे त्यांच्या त्यांच्या सरकारच्या वाटाघाटीतून शांततेच्या मार्गाने केले जाईल. हा निर्लष्करी पट्टा उत्तर व दक्षिण व्हिएतनाम हे दोघे मान्य करतील.

६) युद्धबंदीची जबाबदारी सांभाळण्यासाठी निरनिराळ्या संयुक्त यंत्रणा निर्माण करण्यात येतील. उभय बाजूंकडील मिळून सर्व चारी पक्षांचे एक लष्करी मंडळ, शिवाय केवळ हनोई व सायगाव यांच्या प्रतिनिधींचे एक लष्करी मंडळ आणि एक आंतरराष्ट्रीय देखरेख मंडळ (International Control Comission) या त्या यंत्रणा असतील. या ३० दिवसात निर्माण करण्यात येतील.

७) लाओस व कंबोडिया यांचा स्वयंनिर्णयाचा व तटस्थ राहण्याचा हक्क मान्य करण्यात येत आहे. या दोन्ही देशात कुणाही परक्या देशाला लष्करी तळ ठेवता येणार नाहीत.

८) इंडोचायनामधील आणि विशेषेकरून उत्तर व्हिएतनामच्या पुनर्रचनेला अमेरिका साहाय्य करण्याचे अभिवचन देत आहे.

९) सर्वजण या कराराचे पालन करण्याचे आश्वासन देत आहेत.

३१ ऑक्टोबरची नऊ कलमे आणि २७ जानेवारीला ज्यावर सह्या झाल्या ती कलमे यात असा कोणता तीव्र फरक आहे की ज्याकरिता निक्सन यांनी सतत महिनाभर बाँबवर्षाव करून दहशतीचे वातावरण पसरवले? कलम नं. पाचमध्ये दोन्ही भागांचे एकत्रीकरण व्हावे असेही म्हटले आहे, आणि जोपर्यंत हे होत नाही तोपर्यंत निर्लष्करी पट्टा ही उत्तर व्हिएतनामची दक्षिण सरहद्द म्हणूनही सांगितली आहे. हेच कलम काय ते नवे आहे. आणि ज्या स्वरूपात ते आहे, त्याचा अर्थ इच्छा असेल तसा उभयपक्षांना लावता यावा अशा पद्धतीनेच ते लिहिले आहे.

## जॉन्सन-निधन

२७ जानेवारीला या करारावर प्रत्यक्ष सह्या झाल्या. याच्या आधी तीनच दिवस अमेरिकेचे माजी अध्यक्ष आणि व्हिएतनाम युद्धाचे प्रमुख म्होरके लिंडन जॉन्सन हे आपल्या खाजगी निवासस्थानी वयाच्या ६५ व्या वर्षी निधन पावले. त्यांना अखेर हृदयविकाराचा झटका आला. आदले दिवसापर्यंत डॉ. किसिंजर आणि रिचर्ड निक्सन यांनी त्यांना पॅरीस वाटाघाटीचा प्रवास कळेल अशी व्यवस्था केलेली होती. शांतता करारावर फक्त सह्याच व्हायच्या आहेत ही गोष्ट मरणापूर्वी जॉन्सन यांना कळली होती. कारण तीन दिवसांपूर्वीच त्यांनी आपल्या चिटणीसाला बोलावून करार होताच, काय पत्रक काढावयाचे ते लिहावयाला घेण्यास सांगितले होते. पत्रक काढण्याची संधी काही यमराजाने त्यांना दिली नाही!

## जितं मया! जितं मया!

भारतीय वेळेप्रमाणे २७-१-७३ ला रविवारी सकाळी पहाटे साडेपाच वाजता व्हिएतनाममधील युद्ध थांबले. युद्ध तहकुबी प्रत्यक्ष अमलात येण्यापूर्वीच पॅरीस करारात वापरलेल्या गोलमाल भाषेचा अर्थ प्रत्येक पक्ष आपापल्या इच्छेनुसार लावून मोकळा झाला होता. कराराची ओढाताण सुरू देखील झाली होती.

ज्या युद्धात लष्कर व नागरिक मिळून ३१ वर्षात १० लाखांवर लोक मृत्यूमुखी पडले आणि ज्या युद्धावर अमेरिकेने १० हजार कोटी डॉलर खर्च केला त्याची फलश्रुती अध्यक्ष निक्सन यांनी सांगितली –

‘अमेरिकेतील जनतेच्या निर्धारामुळे प्रतिष्ठा न गमावता शांतता आणणे शक्य झाले. दक्षिण व्हिएतनामी जनता व सरकारने दाखविलेल्या धैर्याने, स्वतःचे भवितव्य ठरविण्याचा मौल्यवान हक्क दक्षिण व्हिएतनामी जनतेला मिळाला.’

हनोई येथे उत्तर व्हिएतनामचे पंतप्रधान फाम-व्हान-डाँग यांनी त्यांना समजलेला मतितार्थ स्पष्ट केला –

‘लष्करी, राजनैतिक व राजकीय आघाड्यांवर दक्षिण व्हिएतनामी जनतेचा हा मोठा विजय आहे. समाजवादी राष्ट्रांच्या एकजुटीचा हा विजय आहे. दक्षिण व्हिएतनामची मुक्तता आणि व्हिएतनामच्या एकीकरणाचा लढा आम्ही पुढे चालवू.’

म्हणजे जो लढा बंद झाला असे रिचर्ड निक्सन सांगत होते, तो पुढे चालू आहे असे फाम-व्हान-डाँग निक्षून सांगत होते.

दक्षिण व्हिएतनामचे अध्यक्ष जनरल थियू याने प्रतिक्रिया सांगितली –

‘दक्षिण व्हिएतनामवर संमिश्र सरकार लादण्यात कम्युनिस्टांना अपयश आले. दक्षिण व्हिएतनामच्या भूमीवर, उत्तर व्हिएतनामचे अस्तित्व आम्ही मान्य केलेले नाही. युद्धबंदी

म्हणजे शांतता नव्हे. कम्युनिस्टांकडून मोडली जाणारी तात्पुरती शांतता नव्हे तर चिरस्थायी शांतता आम्हाला हवी आहे. कम्युनिस्टांना विजयी होऊ द्यावयाचे नाही, या उद्देशाने आपणास राजकीय लढा अजून द्यायचा आहे.'

निक्सन, फाम-व्हान-डाँग व थियू हे तिघे 'जितं मया' म्हणून सांगत होते. मग खरोखर विजय कोणाचा झाला? खरी गोष्ट अशी होती की दोन्ही पक्षांनी युद्धबंदी पत्करून बऱ्यावाईट हिशोबाने काही धोके पत्करले होते. युद्धतहकुबी करारात निरनिराळे अर्थ लावता यावे अशी सोय असल्याने, उभय पक्ष आपण कमीत कमी धोका पत्करल्याच्या समाधानात होते.

मग हा करार १९६९ सालीच उभय पक्षांना स्वीकारता आला नसता का? आणि चार वर्षे युद्ध चालू ठेवून अमेरिकेने काय मिळविले? डॉ. किसिंजर यांचे म्हणणे असे होते की व्हिएतनाम प्रश्नाची लष्करी व राजकीय अशी विभागणी करायला हनोई सरकार पूर्वी तयार नव्हते. हनोई सरकारने ही विभागणी अखेर स्वीकारली म्हणून समझोता होऊ शकला.

## अमेरिकेची सपशेल माघार

परंतु व्हिएतनाम प्रश्नाचा असा भागवार विचार करायला हनोई सरकार केव्हा तयार झाले? निक्सन यांचा हट्ट पूर्वी होता की उत्तर व्हिएतनामी सैन्य व अमेरिकन सैन्य, या सर्वच फौजा दक्षिण व्हिएतनाम बाहेर गेल्या पाहिजेत. करारात लाओस आणि कंबोडियातून फक्त सर्व परकीय सैन्य निघून जाईल असे म्हटले आहे. दक्षिण व्हिएतनाममध्ये उत्तर व्हिएतनामचे लष्करी अस्तित्वच, मग ते उत्तर व्हिएतनामी सैनिकांच्या स्वरूपात असो की व्हिएतकाँगी स्वरूपात असो, अमेरिकेने ते मान्य केले होते. १९६९ साली दक्षिण व्हिएतनाममध्ये अमेरिकेचे ५ लाख सैन्य होते. १९७३ च्या जानेवारीत ते फक्त २० हजार उरले होते. अशा परिस्थितीत सुद्धा १९७३ साली जर दक्षिणेतील उत्तर व्हिएतनामींचे लष्करी अस्तित्व अमेरिका मान्य करते, तर १९६९ साली ते मान्य करायला काय अडचण होती? तेव्हा व्हिएतनाम प्रश्नाचा जो लष्करी विचार होता, त्यावर अमेरिकेने सपशेल शरणागती दिल्यावरच या प्रश्नाची लष्करी बाजू वेगळी काढून ती विचारात घ्यायला उत्तर व्हिएतनाम तयार झाले.

दक्षिण व्हिएतनाममध्ये कोणती राज्यघटना असावी, हा चर्चेने व वाटाघाटीने सोडविण्याचा विषय आहे हे मान्य करून, अमेरिकेने दक्षिण व्हिएतनामचे राजकीय भवितव्य केवळ जनरल थियू सरकार ठरवू शकत नाही ही गोष्ट देखील कबूल केली. मुख्यतः लष्करी आणि राजकीय प्रश्नावर अमेरिकेने आपला हट्ट मागे घेतला, आणि यामुळे हनोई सरकारने काही तडजोडी स्वीकारल्या. हनोई सरकारने ज्या तडजोडी स्वीकारल्या त्याचे स्वरूप मात्र जुजबी होते. जनरल थियूने आधी राजीनामा द्यावा ही मागणी

व्हिएतकाँगींनी मागे घेतली. कारण जेव्हा निवडणुका होतील तेव्हा जनता कुणाच्या पाठीशी आहे हे आपोआपच आता सिद्ध होणार होते. थियूच्या तुरूंगातले सर्व राजकीय कैदी सोडावे ही मागणी देखील हनोई सरकारने पुढे रेटली नाही. कारण सायगाव सरकार उद्या लोकशाही मार्गाने व्हिएतकाँगींच्या हाती आले की राजकीय कैद्यांची सुटका करता येईल, ही गोष्ट आता त्यांच्या दृष्टिपथात आलेली होती. सर्वजण असे म्हणतात की दक्षिण व्हिएतनाममध्ये मुक्त निवडणुका झाल्या तर जनरल थियू काही अधिकारावर राहणार नाही. त्याच्या बदनाम राजवटीचा निवडणुकीत सपशेल पराभवच होईल.

या युद्धात कोणी माघार घेतली या प्रश्नाचा काथ्याकूट व्यर्थ आहे. कुठल्याही संहारक युद्धात संपूर्ण विजय कोणाचा होत असेल तर तो विनाशाचा होतो. जगातील आत्तापर्यंतच्या लढायात सर्वात दीर्घ चाललेल्या या युद्धात, उभय पक्षातील हानीचे आकडे पाहिले की मन उद्विग्न होते ते मृत्यूने केलेली अप्रतिहत घोडदौड पाहून! या युद्धात ४५,८८५ अमेरिकन सैनिक मेले. १,८१,९२० दक्षिण व्हिएतनामी मेले आणि उत्तर व्हिएतनामी व व्हिएतकाँगी मिळून मेलेल्यांची संख्या ९,००,९५० आहे. हा वेदनांतून सुटलेल्यांचा हिशेब! सुमारे तीन लाख अमेरिकन सैनिक आणि ४० लाख व्हिएतनामी नागरिक या युद्धात जायबंदी झालेले आहेत. युद्धाच्या जखमा मरेपर्यंत ते अंगावर मिरवणार आहेत.

हा एवढा अनर्थ घडूनही व्हिएतनाम युद्ध हे जगभर सर्वांनाच अधिकाधिक अर्थशून्य वाटू लागले होते, ही या युद्धाची खरी शोकांतिका आहे. दुसरे महायुद्ध हे हिटलरने जगावर लादले. हिटलरच्या हिंसक विस्तारवादाविरुद्ध इंग्लंड-अमेरिकेने लढाई केली. आणि म्हणूनच जेव्हा लढाई संपली, तेव्हा त्या विजयाचा निर्भेळ दैवी स्वरूपाचा आनंद जगातील लक्षावधी माणसांना अनुभवता आला. परंतु व्हिएतनाम युद्धाचा संदर्भच काळाच्या ओघात पुसला गेला होता. यामुळे अमेरिकेची लढाई गेल्या १० वर्षात तरी विदुषकी व हास्यास्पद ठरली होती.

## ध्येयवादाचे पहिले युद्ध

अमेरिका व्हिएतनाममध्ये गेली १० वर्षे कशाकरिता लढत होती? जगाचे साम्यवादापासून रक्षण करणारा ‘श्रीमंत गुरखा’ ही अमेरिकेची भूमिका. ज्यावेळी साम्यवादी राष्ट्रे व लोकशाही हे प्राथमिक मूल्य मानणारी इंग्लंड, फ्रान्स, अमेरिका आदी राष्ट्रे यांच्यातील सीमारेषा स्पष्ट होत्या, त्यावेळी ही भूमिका ठीक होती. यासाठी अमेरिकेचे सैन्य चीनमध्ये गेले, कोरियात गेले. तोपर्यंत या धावाधावीला थोडाफार अर्थ होता. परंतु १९६० नंतर म्हणजे जगाच्या राजकीय पटावर लाल चीनचा उदय झाल्यानंतर, आता ना साम्यवादी राष्ट्रांचा गट एकसंघ आहे, ना लोकशाही राष्ट्रांचा!

व्हिएतनाम युद्ध हे दोन्ही गटातील राष्ट्रांच्या शीतयुद्धाचेच एक रणांगण ठरवून अमेरिकेचे परराष्ट्रमंत्री डल्लेस यांनी या युद्धात अमेरिकेला हिरीरीने उतरविले. १९५४ च्या जिनिव्हा करारावर अमेरिकेने सही दिली नाही, याला कारण हीच हिरिरी. अल्लाउद्दीन खिलजी अथवा नादिरशहाच्या धर्मवेडासारखेच हे अमेरिकेचे महायुद्धोत्तर वेड होते. आणि ज्या माथेफिरूपणाने अल्लाउद्दीन आणि नादिरशहाने अघोरी अत्याचार केले, त्याच माथेफिरूपणाने अमेरिका हे नवे रणांगण झुंजवू लागली. म्हणजे हे युद्ध हो-चि-मिन्ह यांच्या लष्करी विस्तारवादाविरुद्ध नसून त्याच्या ध्येयवादाविरुद्ध होते!

या दृष्टीने पाहिले तर व्हिएतनाम युद्ध हे जगातील पहिलेच निखळ ध्येयवादासंबंधीचे युद्ध ठरते. त्याचे मूळ लष्करी नसून, राजकीय होते. मग १९७३ च्या पॅरीस करारात निर्लष्करी पट्टा ही उत्तर व्हिएतनामची दक्षिण सीमा नसून, ती केवळ तात्पुरती व्यवस्था आहे असा स्पष्ट उल्लेख आल्यावर अमेरिकेचे या युद्धातील 'ब्रह्मचर्य' ही गेले नाही का?

## 'ही आमची लढाई होती' – माओ

उत्तर व्हिएतनामी जे युद्ध लढले ते ध्येयवादी युद्ध होते, यावर माओत्से-तुंग याने बरोबर बोट ठेवलेले आढळते. पॅरीस येथे युद्धतहकुबी करारावर सह्या करून होताच उत्तर व्हिएतनामी नेते ले-डक्-थो, झु-ऑन-थुई आणि परराष्ट्रमंत्री त्रिन्ह हे माओच्या पेकिंगला गेले. १ फेब्रुवारीला माओबरोबर झालेल्या भेटीत माओने सांगितले –

'खरोखर हे युद्ध म्हणजे आमची देखील लढाई होती. परंतु ती तुम्ही एकटे धैर्याने लढलात, याबद्दल तुमचे आभार मानले पाहिजेत.'

माओला व्हिएतनाममध्ये कम्युनिस्ट विचारसरणीची राजवट हवी होती. उत्तर व्हिएतनामला यासाठी लाल चीनने मदतही केली. शस्त्रास्त्रे दिली, रणगाडे दिले. आपण मागे पडू या भीतीने रशियानेही मोठ्या प्रमाणावर साहाय्य केले. परंतु दुसऱ्या देशातील कम्युनिझमचे लढे हे चिनी सैन्य तिथे जाऊन लढू शकणार नाही, हा विवेक माओने दाखविला. साम्यवाद बाहेरच्या लष्करी बळाने लादता येत नाही ही गोष्ट माओ विसरला नाही. परंतु बाहेरून आयात केलेल्या लष्करी सामर्थ्याने साम्यवाद थोपवूनही धरता येत नाही, ही गोष्ट मात्र पैशाने अति श्रीमंत परंतु राजकीय विचाराने अप्रबुद्ध असलेल्या अमेरिकेने समजून घेतली नाही. अमेरिकेचे हे वैचारिक कोतेपण वारंवार प्रकट झालेले आहे. बांगलादेश संबंधात वेडेवाकडे पवित्रे घेऊन अमेरिकेच्या राजकारण्यांनी जे हसे करून घेतले, त्याचा इतिहास आपल्याला माहीतच आहे.

## निरर्थक युद्ध

सुप्रसिद्ध इतिहासकार टॉयन्बी यांनी अशा या अमेरिकेचे उत्तम वर्णन केले आहे. ते म्हणतात –

‘दुर्दैव आहे की अमेरिका ही आज भांडवलशाहीच्या संरक्षणासाठी जगात जे क्रांतीविरोधी लढे होत आहेत, त्यांची अध्वर्यू झालेली आहे. पूर्वी रोम ज्यासाठी प्रसिद्ध होते, ते कार्य आज अमेरिका करीत आहे. रोमने नेहमी जिंकलेल्या प्रदेशात गरीबांविरुद्ध श्रीमंतांची बाजू घेतली. पण जगात सर्वकाळी गरिबांची संख्या ही श्रीमंतांपेक्षा लाखोपटींनी अधिक असल्यामुळे, रोमचे हे धोरण नेहमीच विषमतेचा, अन्यायाचा पुरस्कार करणारे आणि बहुसंख्यांकांचे कमीत कमी सुख पाहणारे ठरले.’

शक्यता आहे की व्हिएतनाममधील सर्वविनाशक अशा या प्रदीर्घ युद्धाच्या एकंदर अनुभवाने, अमेरिकेतील जनतेचे डोळे उघडलेले आहेत. या सर्व अनर्थाचे पाप आपल्यावर आहे याची जाणीव, तेथील नव्या राजकारण्यांना झालेली आहे. एवढे जरी घडले तरी या अर्थशून्य युद्धाचा अंशतः तरी उपयोग झाला असे पुढील पिढ्या समजतील. अमेरिकेच्या इतिहासात मात्र या अनर्थकारी कालखंडाची नोंद, निरर्थक युद्ध अशीच होईल.

n

# २७ : पॅरीस करारानंतर – अखंड व्हिएतनामच्या दिशेने

इ. स. ११२९ मध्ये व्हिएतनामच्या ली राजाने एक घोषणा केली. ती अशी होती –

'मँडरीन मंडळीनी माझी गतकृत्ये व वागणूक तपासून पाहावी. जर त्यांना त्यात काही दोष आढळला, चुका आढळल्या तर त्या मी सुधारीन.'

राजाने असे म्हणावे असे घडले होते काय? तर पावसाची फेरी चुकली होती आणि अवर्षणाची सावली देशावर पसरलेली होती. समज असा असे की राजा जो निसर्गदेवतांचा प्रतिनिधी, तो जोपर्यंत परंपरागत विधिनियम पाळून सचोटीने व्यवहार करतो, तोपर्यंत निसर्गाचा कोप होत नाही. जर त्याच्या हातून काही चुका झाल्या तर निसर्ग कोपतो. व्हिएतनामी जनता ही अशी कमालीची परंपरानिष्ठ-कुटुंबाच्या परंपरा, राज्यकारभाराच्या परंपरा निष्ठेने जपल्या पाहिजेत, अशी रावापासून रंकापर्यंत सर्वांची पक्की धारणा असलेली पूर्वी होती.

## धर्माचे इहवादी रूप

परंतु व्हिएतनाममध्ये फ्रेंच आले आणि त्यांनी व्हिएतनामी सर्वसामान्य माणसाची जी परंपरागत जीवनपद्धती होती, ती विस्कटण्यास सुरुवात केली. फ्रान्स आणि इतर पाश्चात्त्य गौरकाय देशात, धर्म आणि राज्यव्यवस्था (रिलीजन अँड स्टेट) ही एकरूप धरली जात नाहीत. परंतु फ्रेंच येण्यापूर्वी व्हिएतनाममध्ये चर्चसारखी देशी संस्थाच नसल्याने, धर्माची आणि राज्यव्यवस्थेची अशी फारकत तिथे अजिबात नव्हती. व्हिएतनामी धर्म म्हणजे कनफ्युशिअस धर्म. टाओधर्म व बौद्धधर्म याचे एक सर्वसंग्राहक रसायन होते. लोकांच्या जीवनाचे नियंत्रण करणारी ही जी काही पद्धती तिथे पूर्वी होती, त्याचे स्वरूप आपण ज्या अर्थाने धर्म म्हणतो तसे अध्यात्मिक नव्हते. परंतु समग्र जीवन व्यापणारा, वर्तणुकीचे नियंत्रण करणारा तो एक बंदिस्त इहवादी धर्मच होता. फ्रेंचांच्या आगमनाबरोबरच या समाजरचनेवर आघात सुरू झाले. फ्रेंच हे राज्यकर्ते असल्याने व्हिएतनामी जनतेचा या गोष्टीपुढे नाईलाज होता. दुसऱ्या महायुद्धानंतर फ्रेंच ज्यावेळी निघून गेले, तेव्हा व्हिएतनाम नुसता राजकीयदृष्ट्या स्वतंत्र होत नव्हता, तर फ्रेंचांनी धुरकटलेली, अनोळखी केलेली स्वतःची इतिहासकालीन सौम्य प्रकृती अशी प्रतिमा प्रस्थापित करण्यासाठीही धडपडू लागला. मात्र मध्यंतरी जवळजवळ ७० वर्षे लोटली होती. नवे विचारप्रवाह जगात सुरू झाले होते. नव्या स्थानिक समस्या निर्माण झाल्या होत्या. या नव्या संदर्भातील सामाजिक शिक्षण झाल्याखेरीज या आलेल्या स्वातंत्र्याला अर्थ राहणार नव्हता.

## अमेरिकेची मोठी चूक

व्हिएतनाममध्ये सुरू झालेला संघर्ष ही दोन परस्परविरोधी ध्येयवादांनी भारलेल्या गटांमधील यादवी आहे, असे समजण्यात अमेरिकेने पहिली मोठी चूक केली. सोव्हिएट रशिया आणि रशियांकित पूर्व युरोपीय देश या ठिकाणच्या कम्युनिस्ट नेत्यांनी बौद्धिक स्वातंत्र्याची जी गळचेपी चालवली होती, त्याविरुद्ध अमेरिकेतील आणि जगातील बुद्धिवाद्यांचा असलेला तीव्र रोष, ही अमेरिकेच्या कम्युनिस्ट विरोधाची मुख्य गंगोत्री होती. अमेरिकेतील राजकारण्यांनी सोयीसाठी असे गृहीत धरले की सोव्हिएत रशियाचा कम्युनिझम आणि व्हिएतनाममध्ये येऊ पाहाणारा कम्युनिझम यांचा तोंडावळा एकच आहे! परंतु ज्या विचार स्वातंत्र्याच्या रक्षणासाठी अमेरिका या व्हिएतनाम संघर्षात उतरली, त्या व्हिएतनामी जनतेला मग ती उत्तर व्हिएतनामी असो वा दक्षिण व्हिएतनामी, विचारस्वातंत्र्याची कल्पना तरी होती काय? व्हिएतनाममधील युद्ध हे ध्येयवादाचे युद्ध आहे असे व्हिएतनामी जनतेला कधी वाटले नाही. त्यांच्या लेखी या झगड्याची पाळमुळे ध्येयवादात नसून ती दोन भिन्न संस्कृतीत होती!

## हे मूल्यच अगम्य होते

विचारस्वातंत्र्याचा जेव्हा प्रश्न उद्भवतो, तेव्हा तिथे वेगवेगळ्या दडपणांचे व तदनुषंगिक जीवनपद्धतीचे अस्तित्व गृहीत धरलेले असते. आईवडील, धर्मगुरु, शिक्षक, कलवंत, तंत्रज्ञ अशा वेगवेगळ्या दिशेने येणाऱ्या दडपणांची अनेकता जेव्हा अस्तित्वात असते, तेव्हा विचारस्वातंत्र्य या मूल्याला काही अर्थ असतो. व्हिएतनाममध्ये यातील काहीही नसताना या मूल्यांसाठी माणसे यादवी करतील कशाला? असे मानणे हे सर्वस्वी चूक होते. व्हिएतनामी लहान मुलांचे शिक्षण कसे होत असे? त्याला तत्त्वविचार शिकवला जात नसे. त्याला सांगितली जात ती फक्त नाती! आणि या नात्यातून येणाऱ्या जबाबदाऱ्या. मुलगा-बाप या नात्यात बापाचे मुलाने ऐकावे, नवरा-बायको या नात्यात नवऱ्याचे बायकोने ऐकावे आणि मँडारीन-राजा संबंधात मँडारीन मंडळींनी राजाचे ऐकावे. व्यक्तिस्वातंत्र्याचा विचार या संस्कृतीत प्रधान नव्हता. प्राधान्य होते ते नाते ठरल्यावर येणाऱ्या जबाबदाऱ्यांना! सामाजिक न्यायापेक्षा सामाजिक सौहार्द महत्त्वाचे. व्हिएतनामी भाषेत इंग्रजी भाषेतील 'आय' अथवा मराठी भाषेतील 'मी' या शब्दाला समानार्थी शब्दच नाही! बोलताना नाते सांगायचे तर ते असे –

'तुझा भाऊ तुला भेटायला आला आहे हो!'

'तुझ्या भाच्याला आज जेवण मिळेल ना?'

'तुझ्या मामाला आता घरी जावेसे वाटते.'

अशी शब्दरचना स्वतःसंबंधी बोलताना संभाषणातून करावयाची तिथे पद्धत आहे. मी भेटायला आलो आहे. मला जेवायचे आहे, मला आता घरी जावेसे वाटते, या सर्वांमधून

'मी' चे जे आक्रमक अस्तित्व जाणवते, तेच मुळी या सौम्य प्रकृती समाजाला अभिप्रेत नाही.

## चारित्र्यवान नेतृत्त्व हीच गरज

अशा या सामाजिक वातावरणात व्यक्तिगत नेतृत्वाची ओळख हीच निर्णायक महत्त्वाची ठरली तर नवल नाही. कारण सरकार विशिष्ट ध्येयवादाचे असावे, त्याचा कार्यक्रम समजून घ्यावा अशी जनतेची कोणतीही अपेक्षाच नव्हती. आपला पुढारी हा माणसाने वागावे कसे, बोलावे कसे, व्यवहार कसा करावा याचा उत्कृष्ट आदर्श आहे, हे एकदा का लोकांच्या मनावर ठसले की मग त्याच्यामागे जनता जाणार! जनतेचा असा सर्वांगीण विश्वास संपादन करणेच काय ते महत्त्वाचे होते आणि ही किमया हो-चि-मिन्ह याने घडवली! माणसे त्याच्यामागे जाऊ लागली. तो मार्क्सिस्ट-लेनिनिस्ट होता ही बाब दुय्यम होती. व्हिएतनामी सामान्य जनतेला याचे काही सोयरसुतकच नव्हते.

हो-चि-मिन्ह सामान्य शेतकऱ्यासारखा राहात नसे. अंगात कधी सैलशी अर्धी तुमान किंवा चोळणा आणि पायात रबराचे सँडल्स हा त्याचा नेहमीचा पोषाख होता. बोले तैसा चालणारे, सर्वांवर माया करणारे हे असे एक व्यक्तिमत्त्व आहे, हा माणूस खोटे बोलणार नाही, खोटे करणार नाही, दगा देणार नाही, व्यक्तिगत स्वार्थ याच्या मनाला शिवणार नाही असा स्वतः विषयीचा विश्वास हो याने जनतेत निर्माण केला. या त्याच्या यशात तो कम्युनिस्ट विचारसरणीचा आहे या गोष्टीला फारसे महत्त्व नव्हते. म्हणूनच या पुस्तकात हो-चि-मिन्ह याच्या जीवनाचा मागोवा विस्तृतपणे घेतला जाणे अपरिहार्यच होते.

## हो-चि-मिन्ह याचे कुशल नेतृत्व

व्हिएतनाममधील क्रांती समजून घ्यायची तर हो याचे जीवनचरित्र समजून घेणे; ही अगदी आवश्यक बाब ठरते. कारण हो-चि-मिन्ह याला आपली या क्रांतिकार्यातील भूमिका काय याचे यथार्थ भान होते. प्रयत्नपूर्वक त्याने स्वतःची प्रतिमा ही कुटुंबातील सर्वांचे हित जपणाऱ्या अनुभवी वृद्धाची वाटावी अशी घडवली. योद्धा म्हणून आणि राजकारणी म्हणून त्याने काही वेळा निष्ठुरपणे निर्णय घेतले असले, तरी राज्यप्रमुख म्हणून त्याने आपल्याविषयी जनतेत विलक्षण आदर व ममत्त्व उत्पन्न केले. १९५४ नंतर हनोई येथे लोकशाही प्रजासत्ताकाची स्थिर राजवट अस्तित्वात आल्याबरोबर हो याने राष्ट्रप्रमुख व पंतप्रधानपद ही स्थाने वेगळी केली. आतापर्यंत या दोन्ही स्थानांवर तोच काम पाहात होता. परंतु आता फक्त राष्ट्राध्यक्षाचे पद स्वतःकडे ठेवून त्याने दैनंदिन राज्यकारभारातून प्रत्यक्ष अंग काढून घेतले. ती सर्व जबाबदारी त्याने पंतप्रधान फाम-व्हान-डाँग, संरक्षणमंत्री जनरल जिॲप व परराष्ट्रमंत्री त्रिन्ह यांचेकडे सुपूर्द केली. मनात आणले असते तर हो हा

लहानसा दुसरा स्टॅलिनशहा देखील होऊ शकला असता. सत्तेने त्याला भ्रष्ट केले नाही. जर काही मतभेद निर्माण झाले, अडचणी उपस्थित झाल्या तरच फक्त हो अशा काही गोष्टीत सल्लावजा लक्ष घालीत असे. खऱ्या अर्थाने तो व्हिएतनामचा राष्ट्रपिता झाला. या अंशतः निवृत्तीचा परिणाम असा झाला, की हो याची प्रतिमा अबाधित राहिली व शिवाय गटबाजी टाळून राज्यकारभाराचा प्रवाह त्याला शुद्ध ठेवता आला. पक्ष संघटनेत हो-चि-मिन्ह याचे स्थान पवित्र दैवतासारखे होते. आपल्या या स्थानावर सुरुवातीपासूनच तो अढळ होता. स्वतःच्या कर्तृत्वाची त्याला यथायोग्य जाणीव होती. १९४६ साली जनरल सालान याचेबरोबर हो-चि-मिन्ह फ्रान्सला जायला निघालेला असताना, रंगून येथे एक रात्र मुक्काम होता. रात्री हो-चि-मिन्ह हा गप्पा मारण्यासाठी जनरलच्या खोलीत आला. गप्पांच्या ओघात जनरल सालानने त्याला विचारले – 'देश सोडून बाहेर जाताना तुम्हाला अशी काळजी कधी वाटत नाही का, की आपल्यामागे दुआँ, जिॲप, चिन्ह ही तरुण मंडळी काही विपरीत करतील?' हो याने सांगितले – 'माझ्याशिवाय त्यांचे पानही हलू शकणार नाही! या सगळ्यांना घडवले आहे कुणी? मीच तर त्यांचा मूर्तिकार आहे.' अंशतः निवृत्ती पत्करल्यानंतर तर त्याच्याविषयी अपार आदर सर्वांच्या मनात दृढ झाला. लेनिनची दृष्टी, इसापचे व्यावहारिक शहाणपण आणि गांधीजींचे दर्शनी साधुत्व या सर्व गुणांचा साक्षात्कार हो-चि-मिन्ह याचे ठिकाणी एकत्र घडत असे.

१९६९ मध्ये हो जेव्हा निधन पावला तेव्हा त्याने आपला अधिकार व पक्षात असलेला आदर ही संपत्ती आपल्या सहकाऱ्यांना अलगद बहाल केली. चतुराईतही तो कमी पडला नाही. एका युरोपियन पत्रकाराने जेव्हा विचारले की 'तुम्ही आपले विचार जनतेसाठी पुस्तकरूपाने का मांडीत नाही?' तेव्हा हो याने उलट प्रश्न केला, 'माओने आपल्या लेखनात जे सांगायचे ते सर्व सांगितले नाही का?' त्याने आपले मृत्यूपत्र लिहिले, त्यातही नम्रतापूर्वक कसले श्रेय स्वतःकडे न घेता एवढेच म्हटले की – 'जागतिक क्रांतीत व्हिएतनामने महत्त्वाची भर घालावी.'

हो-चि-मिन्ह याचे कुशल नेतृत्व होते, यामुळेच केवळ व्हिएतनामसारख्या चिमुकल्या आशियाई देशात मार्क्सवादी राज्यव्यवस्था रूजली असे नाही. व्हिएतनामी जनतेने मार्क्स-लेनिन यांच्या हो-चि-मिन्हद्वारे कळलेल्या शिकवणुकीला प्रतिसाद का दिला? याचाही उलगडा करायला हवा.

## वैचारिक जडणघडण

लेनिन हा पहिला युरोपियन नेता, की ज्याने मार्क्सवादाच्या आधारे आशियातील देशांचे युरोपियन सत्तांविरुद्धचे स्वातंत्र्यलढे पुरस्कारले. प्रत्येक देशातील कम्युनिस्ट क्रांतीचे प्रत्यक्ष स्वरूप हे त्या देशातील दडपशाहीचे रूप आणि देशातील सामाजिक

परिस्थिती यानुसार ठरवावे असेही लेनिन याने प्रतिपादन केलेले आहे. फ्रान्समधील वास्तव्यात हो-चि-मिन्ह याने लेनिनचा ‘थिसीस ऑन दी नॅशनल अँड कलोनिअल क्वेश्चन्स’ हा प्रबंध वाचला आणि हो-चि-मिन्ह याला आपली राजकीय दिशा गवसली. कारण या प्रबंधात लेनिनने वसाहतीतील राष्ट्रीय चळवळींना समाजवाद्यांनी पाठिंबा द्यावा असा स्पष्ट आदेश दिलेला होता.

मार्क्सवादाचा दरवाजा लेनिन याने हो-चि-मिन्ह याचेसाठी उघडला, आणि या दालनात एकदा प्रवेश केल्यानंतर हो याला संपूर्ण वैचारिक समाधान लाभले. पहिली गोष्ट, व्हिएतनामच्या स्वातंत्र्यलढ्याला आंतरराष्ट्रीय क्षेत्रात पाठिंबा प्राप्त झाला. हो-चि-मिन्ह याने स्वातंत्र्यलढ्याची तयारी करण्यासाठी अनेक वर्षे फ्रान्स, चीन व रशियात घालवली. त्याची अशी ठाम समजूत होती की व्हिएतनामचा स्वातंत्र्यलढा हा आंतरराष्ट्रीय राजकारणाचाच एक भाग आहे. जगातील विविध विचारप्रवाहांची ओळख करून घेऊनच हा लढा लढवला पाहिजे. म्हणून प्रथमपासून त्याचा आग्रह असे की आंतरराष्ट्रीय राजकारणातील घालमेलीवर लक्ष ठेवा.

दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे त्याला मार्क्सवादात जे अर्थरचनेचे विवरण गवसले, त्यानुसार व्हिएतनाममध्ये पावले टाकण्यास योग्य परिस्थिती निर्माण होते आहे आणि मार्क्सवादी मूल्ये आणि व्हिएतनामी शेतकऱ्याची जीवनपद्धती यात संघर्षस्थळे जवळजवळ नाहीत, ही गोष्ट हो याने तात्काळ हेरली.

भांडवल म्हणता येईल असा जादा पैसा पुरातनकाळापासूनच व्हिएतनाममध्ये नव्हता. शेती हा व्यवसाय निर्माण झालेला नाही. शिवाय समाजात पैशाला प्रतिष्ठाच नव्हती. चार पैसे जवळ असलेल्या माणसापेक्षा, चार पैसे गरजूंना वाटणारा मनुष्य व्हिएतनामी शेतकरी प्रतिष्ठावान समजत. उत्पन्नाच्या साधनांचे राष्ट्रीयीकरण करून निर्माण होणाऱ्या संपत्तीचे समान वाटप मार्क्सवाद्यांना अभिप्रेत असते. परंतु ही गोष्ट तर व्हिएतनामी शेतकऱ्याला मुळीच नवीन नव्हती. राजा हा सर्व शेतजमिनीचा मालक, आणि तो ज्याला जमीन नाही त्याला, ज्याच्याजवळ जास्त जमीन आहे त्याच्याकडून ती काढून वाटप करू शकतो, अशी समजूत कन्फ्युशिअसच्या शिकवणुकीतील एक महत्त्वाची शिकवणच होती.

## व्यक्तीपेक्षा समाज श्रेष्ठ

मार्क्सवादाप्रमाणेच कन्फ्युशिअसच्या शिकवणुकीतही व्यक्ती ही महत्त्वाची नसून, समाज हाच महत्त्वाचा धरलेला होता. यामुळे व्यक्तिस्वातंत्र्याची, विचारस्वातंत्र्याची परंपरा व्हिएतनाममध्ये कधी निर्माणच झाली नव्हती.

या सर्व पार्श्वभूमीवर दिसून येईल की व्हिएतनाममध्ये मार्क्सवाद रूजण्यात फार गंभीर अडचणी नव्हत्याच. तरीही कन्फ्युशिअसची शिकवण व मार्क्सची शिकवण यात एक महत्त्वाचा फरक मात्र होता. वंशजांचे परंपरागत ज्ञान यावर कन्फ्युशिअसची सर्व भिस्त होती, तर मार्क्सवादात हयात असलेल्या पिढीच्या कर्तृत्वावर व ज्ञानावर सर्व भर असतो. यामुळे मार्क्सवादाचा सर्वसामान्य व्हिएतनामी माणसाला पटेल असा नवा अन्वय लावून, तो परंपरागत कल्पनांशी जोडून देण्याचे काम हो-चि-मिन्ह याला करणे भाग होते. हो-चि-मिन्ह याचे सर्वात मोठे कर्तृत्व ते नेमके हेच होय.

## कम्युनिस्ट पक्षाचे विसर्जन

या दृष्टीने त्याने पहिले पाऊल टाकले, ते म्हणजे 'इंडोचायना कम्युनिस्ट पक्ष' त्याने विसर्जित करून टाकला. फ्रेंचांची वसाहतवादी भूमिका संपलेली होती. फ्रेंच निघून जाणार होते त्या सुमारास, हो याने 'व्हिएतमिन्ह' (व्हिएतनाम-डॉक-लॅप-डाँग-मिन्ह-होई यांचे संक्षिप्त रूप) ज्याला 'व्हिएतनाम इंडिपेडन्स लीग' असे इंग्रजीत म्हणता येईल असे पक्षाचे नवे नामकरण केले. पक्ष स्थापनेचा हेतू विशद करताना म्हटले होते, 'आपल्या देशाच्या मुक्ततेसाठी आणि जनतेच्या स्वातंत्र्यासाठी संपत्ती, वय, लिंगभेद, धर्मभेद अथवा राजकीय विचारसरणी या भेदाभेदांचा विचार न करता, सर्व देशभक्तांना एकत्र करून एकजुटीने काम करता यावे हा या पक्ष स्थापनेमागील हेतू आहे.' सोनेरी तारा अंगावर मिरवणारे लाल निशाण हा पक्षाचा ध्वज ठरवण्यात आला. अमुक एका राजकीय विचारसरणीला 'व्हिएतमिन्ह' पक्ष जन्मतःच बांधलेला नाही ही गोष्ट हो-चि-मिन्ह याने स्पष्ट केली. वर्गलढ्याची भाषा, फ्रेंच कम्युनिस्टांचे वर्चस्व या सर्व भानगडी त्याने फटक्यासरशी संपवून टाकल्या. क्रांतीचे पहिले पर्व हे राष्ट्रवादी लढ्याचेच राहणार होते. कामगारवर्ग असा व्हिएतनाममध्ये मोठ्या संख्येने नव्हता, तेव्हा या लढ्याचे नेतृत्व कामगारवर्गाकडेच राहावे असा हट्ट हो याने ठेवला नाही. उत्पादनाची साधने ताब्यात घेण्याचा तिथे प्रश्न नव्हता. साधनेच अजून निर्माण करायची होती! हो-चि-मिन्ह याने आपल्या राजकीय परिभाषेतून वर्गलढा, कामगारक्रांती वगैरे भाषाच बाद केली. तरीही अमेरिकन राजकारण्यांना हो-चि-मिन्ह याला कम्युनिस्ट म्हणून लेबल चिकटवण्यात सकृतदर्शनी फायदा होता. रशियातील कम्युनिझमच्या कुरूप तोंडावळ्याशी नाते जोडून दिले, की शीतयुद्धाला आधार मिळत होता. म्हणून अमेरिकनांनी उत्तर व्हिएतनामचे 'व्हिएतमिन्ह' भूमिगत चळवळे अथवा दक्षिण व्हिएतनाममधील 'राजकीय मुक्ती आघाडीचे सैनिक' या सर्वांनाच 'व्हिएतनामी कम्युनिस्ट' म्हणजेच 'व्हिएतकाँगी' म्हणून संबोधायला सुरुवात केली. 'व्हिएतकाँगी' हा शब्द दिएम याच्या कारकीर्दीत जन्माला आला होता तो याच हेतूने, की जी मार्क्सवादी भाषा हो याला अनावश्यक वाटत होती, ती त्याच्या

अनुयायांवर लादता यावी! हो-चि-मिन्ह याला आपला मार्क्सवादी मुखवटा लपवावयाचा होता म्हणून हो ही लबाडी करीत होता असे मुळीच नाही. परंतु ज्या देशात म्हणण्यासारखा कामगार वर्ग नाही, बुर्झ्वा या संज्ञेत अंतर्भूत करता येईल असा समाज नाही, तिथे मार्क्सवादाचा नवा अन्वय, नवी भाषा आणि नवा संदर्भ निर्माण करण्याचा प्रयत्नच महत्त्वाचा होता.

## पक्ष म्हणजे संस्कृती-सद्गुण-स्वातंत्र्य

म्हणजे एका दृष्टीने व्हिएतनामी समाजाचे पुनर्शिक्षण करण्याचीच जबाबदारी व्हिएतनाममध्ये हो-चि-मिन्ह याचेवर आली होती. हे शिक्षण म्हणजे मार्क्सवादाची तत्त्वे, धोरण याचे शिक्षण नव्हते! कारण व्हिएतनामी शेतकऱ्यांना (जे बहुसंख्य होते) या तऱ्हेचे शिक्षण हे दुय्यम महत्त्वाचे वाटणार होते. जो पक्ष राज्य करतो, जे नेते राज्य चालवतात ते आत्यंतिक प्रामाणिक आहेत, त्यांचे सामाजिक चारित्र्य संशयातीत आहे, एवढीच गोष्ट त्यांच्या दृष्टीने महत्त्वाची होती. नेतृत्व करणारी मंडळी जर या कसोट्यांना उतरली तर राजकारण योग्य मार्गालाच जाते, त्याची चिंता करण्याचे कारण नाही असा सर्वांचा समज होता. म्हणूनच हो-चि-मिन्ह याने आपल्या पक्षासंबंधी बोलताना एवढेच म्हटले –

'आमचा पक्ष हा सागरासारखा आहे. पर्वतासारखा आहे. आमचा पक्ष म्हणजे सद्गुण, आमचा पक्ष म्हणजे संस्कृती, ऐक्य, स्वातंत्र्य!... शांततापूर्ण आणि अयाचितपणे सर्वांना जगता येईल असे जीवन निर्माण करणारा आमचा पक्ष आहे.'

१९५३ ते १९५८ या काळात हनोई सरकारने उत्तर व्हिएतनामच्या जमिनीचे फेरवाटप केले. राज्यकर्ता जमिनीचे वाटप करू शकतो ही गोष्ट जनतेला परिचितच असल्याने अडचणी आल्या नाहीत. या उपक्रमात सुमारे १५,००० ते ६०,००० माणसे मारली असा एक प्रचार अमेरिकेने काही काळ केला. परंतु १९७२ मध्ये डी. पोर्टर नावाच्या एका अमेरिकेन अभ्यासकानेच हे सर्व आकडे खोटे असून, कमीतकमी ८०० व जास्तीत जास्त २००० माणसे या नवरचनेत हनोई सरकारने मारली असावीत असे जाहीर केले. एवढ्या मोठ्या उपक्रमात स्वार्थी, नतद्रष्ट आणि समाजद्रोही माणसांचे एवढे प्रमाण हे समजू शकते. जनतेचा विश्वास संपादन करून 'व्हिएतमिन्ह' पक्ष सत्ताधीश झाल्यावर, मार्क्सवादी अर्थरचना निर्माण करण्यात हनोई राजवटीला फारशा अडचणी का आल्या नाहीत हे व्हिएतनामच्या सामाजिक व सांस्कृतिक जीवनाचा संदर्भ ध्यानात घेतला की चांगले स्पष्ट होते.

## योजनापूर्वक विपर्यास

दक्षिण व्हिएतनाममध्ये 'राष्ट्रीय मुक्ती आघाडी' निर्माण झाली ती १९६० मध्ये. अमेरिकेने पुढे पाच वर्षांनी उत्तर व्हिएतनामवर बाँबवर्षाव सुरू केला, तेव्हा त्याच्या समर्थनार्थ फेब्रु. १९६५ मध्ये जी श्वेतपत्रिका प्रसिद्ध केली. त्यात 'राष्ट्रीय मुक्ती आघाडी (NLF)' ही संघटना उत्तर व्हिएतनामचे बाहुले असून, दक्षिण व्हिएतनामी जनतेची शांततापूर्ण, स्वातंत्र्यपूर्ण, वैभवशाली जीवनाची आकांक्षा चिरडून टाकण्यासाठी ती निर्माण झालेली आहे' असा आरोप केलेला होता. नायजेरियात किंवा पाकिस्तानात पुढे जशी यादवी झाली, तशी यादवी 'राष्ट्रीय मुक्ती आघाडीने' मांडली आहे अशी अमेरिका जगाची समजूत करू देऊ पहात होती.

परंतु हा वस्तुस्थितीचा विपर्यास होता. हो-चि-मिन्ह याच्या व्हिएतमिन्ह चळवळीने सगळा व्हिएतनामच १९५४ च्या पूर्वी व्यापलेला होता. या पक्षाचा जोर मुख्यतः हनोई परिसरात असला, तरी १७ व्या अक्षांश रेषेखाली पक्षाने अनेक खेडी व्यापून टाकलेली होती. जिनिव्हा परिषदेत १९५४ साली जो समझोता झाला, त्यानुसार प्रथमपासून 'व्हिएतमिन्ह' पक्षाचे परंतु दक्षिण व्हिएतनामी नागरिक असलेले सुमारे ९०,००० पक्षसैनिक जरी हनोई सरकारने उत्तर व्हिएतनाममध्ये परत बोलावले, तरी हजारो व्हिएतमिन्ह पक्षसदस्य हे दक्षिणेतच राहिले. या मागे राहिलेल्या पक्षसदस्यांत मार्क्सवादी कम्युनिस्ट म्हणता येतील असे फार जण नव्हते. परंतु काही काळ का होईना या सर्वांनी 'व्हिएतमिन्ह' पक्षाची राजकीय वाटचाल अनुभवली होती. उदाहरणार्थ, सायगावच्या पश्चिमेकडे आणि वायव्येकडील भागात अनेक खेडी ही 'व्हिएतमिन्ह' राजवटीचा चांगला अनुभव आलेली खेडी होती. फ्रेंचांबरोबर युद्ध संपले की दोन्ही व्हिएतनाम एक होतील, अशी त्यांची रास्त अपेक्षा होती. म्हणूनच ही अपेक्षा खोटी ठरून पुढे ६ वर्षांनी प्रामुख्याने पूर्वीच्या व्हिएतनाम पक्षसदस्यांतून जेव्हा 'राष्ट्रीय मुक्ती आघाडी' ही नवी लढाऊ संघटना निर्माण झाली तेव्हा ती 'व्हिएतमिन्ह'चेच कार्य पुढे चालवायला निर्माण झाली आहे, अशीच सर्वांची भावना होती.

'राष्ट्रीय मुक्ती आघाडी'चे नेते हनोईशी संपर्क ठेवून होते यात मुळीच संशय नाही. परंतु अमेरिकेचे सैन्य दक्षिण व्हिएतनाममध्ये येऊ लागेपर्यंत हनोई सरकारकडून 'राष्ट्रीय मुक्ती आघाडी' लष्करी मदतीची वा सैनिकी मदतीची अपेक्षा करीत नव्हती. उत्तर व्हिएतनामी सैनिक दक्षिणेत येऊ लागले ते अमेरिकेचे सैन्य दक्षिण व्हिएतनाममध्ये आल्यानंतर. तत्पूर्वी आज ना उद्या सार्वमत घेतले जाईल, व दोन्ही व्हिएतनाम एक होतील अशीच आघाडीला आशा वाटत होती.

## मुक्ती आघाडीने नेमके काय केले?

'राष्ट्रीय मुक्ती आघाडी'ने दक्षिण व्हिएतनाममधील लढ्याचे नेतृत्व १९६० मध्ये घेण्यापूर्वीच २-३ वर्षे दक्षिण व्हिएतनाममध्ये भूमिगत सशस्त्र चळवळ निर्माण होऊ लागली होती. याचे एक कारण दिएम व न्हू यांची अत्याचारी राजवट! जेव्हा पूर्वीच्या 'व्हिएतमिन्ह' पक्षसदस्यांचे जीवनच धोक्यात येऊ लागले, तेव्हा या हत्यारी प्रतिकाराला जोर चढला. गावोगावी भूमिगत चळवळीची केंद्रे उत्पन्न होत चालली. 'राष्ट्रीय मुक्ती आघाडी'ने या सर्व केंद्रामध्ये सुसूत्रता निर्माण केली. त्याला 'जनता मुक्ती सैन्य' (People's Liberation Army) असे नाव दिले. या सैनिकांना नागरिकांशी वागणुकीसंबंधी ज्या बारा सूचना दिल्या गेल्या होत्या, त्यातल्या महत्त्वाच्या अशा होत्या –

> 'नागरिकांशी वागताना प्रामाणिक रहा. न्यायी वर्तन ठेवा. कुणाकडून एक सुईदेखील फुकट मागू नका. गावकऱ्यांच्या घरात राहाताना घर स्वतःचे समजून स्वच्छ ठेवा. लोकांशी नम्रतेने वागा. त्यांच्यावर प्रेम करा. लोकांचे प्रेम हाच सन्मान समजा.'

म्हणजे दक्षिण व्हिएतनाममधील 'राष्ट्रीय मुक्ती आघाडी' आणि उत्तर व्हिएतनाममधील 'व्हिएतमिन्ह' या दोन्ही संघटनांचा मुख्य महत्त्वाचा राजकीय कार्यक्रम एकच होता, की लोकांचा संपूर्ण विश्वास प्रथम मिळविणे. जनतेच्या विश्वासावर आणि पाठिंब्यावर चळवळी आणि राज्यकारभारही चालतात ही गोष्ट अमेरिकेसारख्या, इंग्लंडसारख्या पुढारलेल्या देशातील जनतेला नवीन नसली, तरी व्हिएतनामी जनतेला हा नवीन अनुभव होता. पुरातनकाळी राजांना व्हिएतनामी जनतेने विश्वास दिला. बदल्यात बहुतेक वेळा चांगला राज्यकारभार लाभला. परंतु जेव्हा लाभला नाही, तेव्हा आपलेच काहीतरी चुकले असे जनता मानीत गेली. फ्रेंचांनी राज्य केले ते सैनिकांच्या आधारावर. हो-चि-मिन्ह व 'राष्ट्रीय मुक्ती आघाडी' हे पहिलेच असे राज्यकर्ते होते, की ज्यांनी सामान्य माणसाला खरोखर याचा प्रत्यय आणून द्यायला सुरुवात केली की, 'तुमच्या विश्वासावरच आम्ही राज्य करू शकतो.'

सायगाव राजवटीचा ओंगळ चेहरामोहरा, लाचखाऊ अधिकाऱ्यांची प्रभावळ, अमेरिकन पैशाने चढलेली मगुरी आणि जीवनाला सर्वांगाने वेटोळे घालू पाहाणारा सर्व थरातील भ्रष्टाचार, या पार्श्वभूमीवर प्रामाणिक जीवन जगू पाहाणाऱ्यांनी 'राष्ट्रीय मुक्ती आघाडी' ला दक्षिण व्हिएतनाममध्ये मोठ्या प्रमाणावर उचलून धरले यात आश्चर्य नाही!

## 'द्वेष' हेच पहिले शस्त्र

फ्रेंचांविरुद्ध लढा चालू असताना एका फ्रेंच अधिकाऱ्याजवळच वाटाघाटीत हो-चि-मिन्ह याने उद्गार काढले होते – 'माझ्याजवळ सैन्य नाही, पैसा नाही, शिक्षण देण्याचे

साधन नाही. मला फक्त तुमचा द्वेष करता येणे शक्य आहे. जोपर्यंत तुमच्यावर माझा विश्वास बसत नाही, तोपर्यंत मी द्वेष थांबवणार नाही.'

'द्वेष' हेच मोठाल्या क्रांतीचे सुरुवातीचे शस्त्र असते. 'व्हिएतमिन्ह' आणि 'राष्ट्रीय मुक्ती आघाडी' या दोघांनी व्हिएतनाम संघर्षात सायगाव राजवटीचा आणि त्या भ्रष्ट राजवटीला जिवंत ठेवणाऱ्या अमेरिकेच्या राजकारण्यांचा द्वेष, देशभर भिनवला यात चूक ती काय? व्हिएतनामी शेतकऱ्यांच्या अंगात असलेल्या सुप्त प्रतिकारशक्तीचे कोठार पेटवण्याचा हाच एक मार्ग होता.

## एकमेव गालबोट

असे असूनही हा द्वेष अन्याय्य पद्धतीने हाताबाहेर गेल्याचे एकच उदाहरण या प्रदीर्घ संघर्षात दिसते. हा प्रसंग म्हणजे १९६८ च्या जानेवारीतील हुए शहरावरील टेट् चढाईच्या वेळेचा. हुए शहरात राष्ट्रीय मुक्ती आघाडीने जवळजवळ तीन हजार नागरिक ठार केले असा पुरावा नंतर पुढे आला. हजाराहून अधिक प्रेते गाडलेली दोन स्थाने नंतर उघडकीला आली. एवढ्या मोठ्या प्रमाणावर राष्ट्रीय मुक्ती आघाडीने ही हत्या का केली यासंबंधी पुरेशी माहिती मात्र अजून पुढे आलेली नाही.

१९७३ च्या पॅरीस युद्धबंदी करारानंतर जनरल थियूचे सरकार व राष्ट्रीय मुक्ती आघाडी यांच्यात सशस्त्र संघर्ष सुरू राहिला. तेव्हा या आघाडीच्या रचनेसंबंधी काही सांगितले पाहिजे.

## खेडी अशी व्यापली

'राष्ट्रीय मुक्ती आघाडी'चा लहानात लहान गट (cell) हा तीन ते दहा माणसांचा असतो. ही सर्व माणसे शक्यतो एकाच व्यवसायातील व सारख्याच योग्यतेची धरली जातात. या गटाचा एक सभासद हा गावातल्या मध्यवर्ती मंडळाचा सभासद असतो. गावोगावच्या मध्यवर्ती मंडळातून जिल्ह्यासाठी एकएक सभासद निवडला जाऊन, जिल्हा मध्यवर्ती मंडळ तयार होते. सर्व प्रांतातून निवडून आलेल्या प्रतिनिधींची वरिष्ठ कार्यकारी समिती तयार होते. याचे ६४ सभासद असतात. या सभासदाहून कार्यकारी मंडळ निवडण्यात येते. हेच ते दक्षिण व्हिएतनामचे 'अस्थाई क्रांतिकारी सरकार' होय. अमेरिकेच्या शस्त्रसामर्थ्यालाही पराभूत केल्याने, आज या संघटनेचा दरारा आणि सामर्थ्य दक्षिण व्हिएतनाममध्ये विलक्षण वाढलेले आहे.

एखादे नवे खेडे आपल्या पंखाखाली आणायचे ठरले की राष्ट्रीय मुक्ती आघाडीचे होणारे प्रयत्न हे आखल्यासारखे सुरू होतात. प्रथम त्या गावातील चार-दोन कुटुंबात आघाडीचे स्वयंसेवक रात्रीच्या वेळी येऊन गप्पा मारता मारता चाचपणी सुरू करतात.

'राष्ट्रीय मुक्ती आघाडी' संबंधी पुरेशी सहानुभूती गावात निर्माण झाली, की मग एका रात्री 'राष्ट्रीय मुक्ती आघाडी'चे सैनिक खेड्याला गराडा घालून बसतात व आघाडीची सभा गावात घेतली जाते. या सभेला सर्व गावकऱ्यांना निमंत्रण जाते. या सभेत सायगाव सरकार हे बेकायदेशीर सरकार आहे, या आघाडीच्या भूमिकेला पुरेसा प्रतिसाद लाभला तर गावकऱ्यांना गावासाठी एक प्रशासक निवडण्यासाठी आवाहन केले जाते. हा प्रशासक गुणवान, प्रामाणिक व कर्तृत्ववान असावा एवढाच आग्रह ठेवला जातो. एवढे सर्व पचले की गावात निरनिराळी मंडळे स्थापन करण्याचा प्रयत्न सुरू होतो. शेतकरी सभा, युवक मंडळ, महिला सभा, वृद्धजन सभा अशा नावाखाली संघटना सुरू होते. या संपर्कातून आघाडीचे पुढारी मग गावात येऊन राजकीय शिक्षण देऊ लागतात. व्हिएतनाममधील संघर्षाचे स्वरूप स्पष्ट केले जाते. व्हिएतनाम अखंड होणे कसे इष्ट आहे हे मनावर बिंबवले जाते.

या हालचालीचा सुगावा लागताच, सायगाव सरकारचे अधिकारी पाळतीवर राहू लागतात. परंतु आघाडीच्या माणसांना आसरा देणे, लपवून ठेवणे या गोष्टी निर्माण झालेल्या संबंधापोटी गावकरीच तोपर्यंत करू लागलेले असतात. अशा सुमारास सायगाव सरकार एखादी चूक करीतच असते. गावात दडपशाही झाली किंवा विमानातून बॉंब टाकण्यात आले की गावकरी प्रतिकारालाही तयार होतात. धरपकड झाली तर बहुधा भलत्याच गावकऱ्यांना पकडले जाते किंवा भलत्याच माणसाचा संशयित म्हणून छळ होतो. या घटनातून सायगाव राजवटीविरुद्ध, द्वेषाचे भरघोस पीक गावात निर्माण होत जाते. मग अशी संधी साधून आघाडीचे सैनिक गावाचा कब्जा करून सायगाव राजवटीशी संबंध तोडून टाकतात!

'राष्ट्रीय मुक्ती आघाडी' दक्षिण व्हिएतनाममध्ये या मार्गाने जवळजवळ तीन चतुर्थांश खेडी कब्जात घेऊन बसली. आघाडीच्या कब्जात असलेल्या खेड्यातून शेतीला जोडउद्योग ठरणारे कुटीर उद्योग आघाडीमार्फत सुरू करण्यात आले. प्रत्येक खेडे स्वयंपूर्ण होईल असा प्रयत्न ठेवला गेला.

## अमेरिकेचा अडसर

दक्षिण व्हिएतनाममध्ये अमेरिका आल्याने तेथील परिस्थितीवर जे परिणाम घडले त्याची नोंदही महत्त्वाची आहे.

१) अमेरिकेला दक्षिण व्हिएतनाम लुटण्याची इच्छा नव्हती. उलट अमेरिकेनेच हजारो डॉलर्स तिथे ओतले. परंतु यातली बरीच रक्कम ही प्रामुख्याने अमेरिकन सैनिकांसाठी नाना प्रकारच्या सुविधा निर्माण करणे व दक्षिण व्हिएतनामी लष्कर उभे करणे याच

गोष्टीवर खर्ची पडली असल्याने उत्पादनक्षमता अशी मुळीच वाढली नाही. अमेरिकन सैन्य निघून जाताच ही पैशाची सूजही ओसरू लागली व बेकारीत प्रचंड वाढ झाली.

२) जे लोक खेडी सोडून संरक्षणासाठी शहरांकडे धावत आले ते शहरी जीवनाला सोकावले. त्यांच्या मुलाबाळांना तर पेरणी-कापणी-झोडणी ही कामे माहितदेखील नसत. या माणसांजवळ स्वतःचे भांडवल नाही, तांत्रिक ज्ञान नाही, शेताकडे जाण्याची इच्छा नाही. काहीबाही करीत ही माणसे शहरातच अर्धभुकेली वावरत असत.

३) दलात, बिन्ह-होआ अशा एखाद्या दक्षिण व्हिएतनाममधील शहराच्या जरा बाहेर पडताच लहान लहान गावातून एक ठराविक दृश्य प्रवाशांना दिसते. मध्यभागी एक झोपड्यांचा पुंजका. बाहेर दोनचार कोंबड्या जमीन उकरत आहेत. ही बहुधा गावातली प्रामुख्याने बौद्ध शेतकऱ्यांची वस्ती. दोन्ही अंगाला कॅथॉलिकांची सिमेंट काँक्रीटची घरे, घराभोवती व्यवस्थित कुंपणे, त्यात डुकरांचे कळप. गावात एक टुमदार चर्च. लहान लहान गावातून जी शिक्षित कॅथॉलिक मंडळी होती, त्यांना सायगाव येथे येणारा पैसा आपल्या गावाकडे खेचून तो कसा हस्तगत करावयाचा याचे 'भ्रष्टशास्त्र' अवगत होते. यामुळे सायगावला येणारी ही मदत प्रामुख्याने शेती करणाऱ्या गरीब जनतेपर्यंत कधी पोचलेलीच नसावी. मदतीपेक्षाही मदतीचे वाटप महत्त्वाचे असते आणि जोपर्यंत सायगावच्या कारभारातून लाचलुचपत नष्ट होत नव्हती तोपर्यंत याबाबतीत सुधारणा शक्य नव्हती.

४) दक्षिण व्हिएतनाममध्ये अमेरिकेने राजकीय स्थिरता आणण्यास मदत केल्याशिवाय राज्यकारभार सुधारणार नाही. परंतु युद्धबंदी होऊन सैन्य काढून घेतल्यावरही जर अमेरिकेचे राजकारणी जनरल थियु याला संघर्ष चालू ठेवायलाच प्रोत्साहन देतील, लष्करी मदत करतील तर दक्षिण व्हिएतनाममध्ये खऱ्या अर्थाने शांतता येणे कठीणच होते.

## खंडीत व्हिएतनाम हे अमेरिकेचे स्वप्न

सेक्रेटरी ऑफ स्टेट हेन्री किसिंजर हे प्रथमच जेव्हा निक्सन यांच्या सरकारात दाखल झाले, तेव्हा व्हिएतनाम संघर्षाबाबत त्यांनी म्हटले होते –

> 'It is beyond imagination that parties that have been murdering, betraying each other for 21 years, could work together as a team giving joint instructions to the country.' (एकवीस वर्षे परस्परांचे खून करणारे आणि दावा साधणारे दोन गट, एकत्र काम करतील व राज्य चालवतील ही गोष्ट कल्पनाशक्ती बाहेरची आहे.)

जवळजवळ दोन तपे परस्परांचे शत्रुत्व करणारे व्हिएतनामी एकत्र येणे ही गोष्ट अमेरिकन राजकारण्यांच्या कल्पनेबाहेरची असली तरी ती व्हिएतनामी जनतेच्या कल्पनेबाहेरची का असावी? हे जे परस्परांचे हत्याकांड सुरू आहे, त्याची प्रमुख जबाबदारी तर अमेरिकेवरच पडते हे कालांतराने शाबित होऊ नये, म्हणून जर अमेरिकेला अखंड व्हिएतनाम होऊ नये असे वाटत असेल, तर मात्र गोष्ट निराळी! परंतु दक्षिण व्हिएतनाममध्ये जनरल थियूचा पक्ष व 'राष्ट्रीय मुक्ती आघाडी'चे 'अस्थाई क्रांतिकारी सरकार' यांच्यात समझोता होऊन संयुक्त राजवट सायगाव येथे सत्तेवर आली व नंतर निवडणुका झाल्या तर चित्र पालटून जाणार होते. कालांतराने शत्रुत्व संपून शांततापूर्ण मार्गाने अखंड व्हिएतनाम साकार होण्याचा मार्ग मोकळा झाल्याशिवाय राहणार नव्हता.

### अस्तित्वाला अर्थ हवा : व्हिएतनाम अखंड हवा!

ही गोष्ट घडू नये म्हणून अमेरिका प्रयत्नशील राहिली तर सायगाव राजवटीचे मरण काही काळ फार तर पुढे ढकलले जाणार होते इतकेच. सायगाव राजवटीत झोपडय़ातून वाढणारी अर्भके आणि मवाल्यांचे अड्डे यांची फक्त वाढ होत असे. दक्षिण व्हिएतनाममधील शहरे काय, लष्कराचे तळ काय किंवा निर्वासितांच्या छावण्या काय माणसे आजचा दिवस उद्यावर ढकलीत होती एवढेच. त्यांच्या अस्तित्वाचा अर्थच हरवलेला होता.

खेडीपाडी सायगाव राजवटीने गमावलीच होती. सामाजिकदृष्ट्या शहरांचे हे वाढते बकाली आणि भकास रूप अधिकाधिक कुरूप होत होते. ही अवस्था भयावह होती. वेडय़ावाकडय़ा मार्गाने अधिक रक्तपात घडून ही अवस्था अखेर संपणार होती, कारण ही काही राज्यकारभाराची स्थिरावस्था असू शकत नाही. शक्यता अशीच होती की हो-चि-मिन्ह याच्या शिकवणुकीचा वारसा घेतलेल्या दक्षिण व्हिएतनाममधील 'राष्ट्रीय मुक्ती आघाडी' कडूनच सायगावच्या राजवटीला भडाग्नी दिला जाईल आणि एकदा हे घडले की हो-चि-मिन्ह याचे अखंड व्हिएतनामचे स्वप्न साकार व्हायला मुळीच विलंब लागणार नव्हता.

n

# २८ : सायगाव राजवटीचे अमेरिकेचे अभय संपले!

## १९७३ ते मार्च १९७५

पॅरिस शांतता करारानुसार, युद्धबंदी टिकवून धरण्यासाठी एक आंतरराष्ट्रीय देखरेख मंडळ (इंटरनॅशनल कंट्रोल कमिशन) निर्माण करणे हे पहिले काम होते. १९५४ साली जिनिव्हा करारानुसार असेच जे एक मंडळ निर्माण केले गेले; त्याचे सभासद होते कॅनडा, पोलंड आणि भारत. यापैकी कॅनडा दक्षिण व्हिएतनामचा मित्र, पोलंड हनोई सरकारचा पक्षपाती आणि भारत तटस्थ अशी वाटणी होती. परंतु हे मंडळ देखरेखही करू शकले नाही अथवा युद्धही थांबवू शकले नाही. भारताने हनोई सरकारला वकिलातीचा दर्जा दिला म्हणून जनरल थियू याने भारताच्या प्रतिनिधींना सायगावमधून हाकलूनच दिले. त्यानंतर या मंडळाचे देहावसान झाले, त्याची दखलदेखील कुणी घेतली नाही.

नंतर जे नवे आंतरराष्ट्रीय देखरेख मंडळ जानेवारी १९७३ मध्ये नेमण्यात आले त्याचे चार सभासद होते. कॅनडा, इंडोनेशिया हे दोन सायगाव राजवटीचे मित्र, पोलंड व हंगेरी हे दोन हनोई राजवटीचे मित्र. या मंडळाने कुठे कोणी युद्धबंदीचा भंग करीत नाही ना यावर लक्ष ठेवायचे व असे कृत्य आढळल्यास त्याचा एकमुखी अहवाल आणखी एका वरिष्ठ लष्करी मंडळाला द्यायचा अशी योजना. हे वरिष्ठ लष्करी मंडळ कुणाकुणाचे? तर त्यावर फक्त हनोई आणि सायगाव राजवटीचे प्रतिनिधी! म्हणजे आधी कॅनडा आणि इंडोनेशिया, पोलंड व हंगेरी या देशांच्या प्रतिनिधींचे ज्यावर एकमत होईल अशाच तक्रारी लष्करी मंडळाकडे जाणार आणि लष्करी मंडळात सायगाव प्रतिनिधी आणि हनोई प्रतिनिधी यांचे उपाय योजनेबाबत एकमत झाले तर उपाय योजले जाणार!

पहिल्या देखरेख मंडळाचा जसा बोजवारा झाला, तसाच या आंतरराष्ट्रीय नियंत्रकाचाही होणार ही दगडावरची रेघ होती आणि पुढे तसा अनुभवही येत गेला.

जानेवारी ७३ ते जानेवारी ७५ या दोन वर्षांत कागदोपत्री शांतता आल्यावरही व्हिएतनाममध्ये काय घडले हे सांगण्यापूर्वी लाओस व कंबोडियात या शांतता करारानंतर काय झाले ते पाहणे अगत्याचे आहे.

## लाओसमध्ये सलोखा

लाओसच्या पश्चिम सीमेवरून मेकाँग नदी वाहते. या नदीच्या काठाकाठानेच सर्व शहरे आहेत. प्रिन्स सुवाना फूमा हा व्हिएत शियान या मेकाँग काठच्या राजधानीच्या शहरातूनच राज्यकारभार करत होता. लाओसच्या लोकसंख्येचा दोनतृतीयांश भाग या मेकाँग

किनाऱ्यावर एकवटलेला आहे. प्रिन्स सुवाना फूमा याला लाओसच्या दोनतृतीयांश जनतेचा पाठिंबा आहे असे सांगितले जात असे ते यामुळेच. परंतु लाओसचा या हनोई राजवटीची मित्र म्हणवणाऱ्या साम्यवादी संघटनेच्या ताब्यात गेलेला होता. प्रिन्स सुफान वाँग हा सुवाना फूमा याचाच अर्धा भाऊ (दोघांचा बाप एक पण मातोश्री वेगळ्या होत्या) हा 'पॅथेलाओ' या संघटनेचा प्रमुख होता. याने लुआंग-प्रवांग येथे आपली राजधानी ठेवली होती.

लाओसची अशी दोन सत्तात फाळणी झालेली असल्यानेच हो-चि-मिन्ह मार्गाने उत्तर व्हिएतनामी निर्वेधपणे वाहतूक करू शकत होते. 'पॅथेलाओ' ना उत्तर व्हिएतनामी सैनिकांचे संरक्षण असे आणि या बदल्यात हो-चि-मिन्ह मार्ग त्यांना निर्वेधपणे वापरता येत असे.

पॅरीस शांतता करारात लाओसमधून सर्व परकीय सैन्याने ३० दिवसात बाहेर पडावे अशी अट असल्याने, उत्तर व्हिएतनामी सैनिक लाओसमधून आता जाणार होते. प्रिन्स सुवाना फूमा हा स्वतःला 'नॉन-अलाईन्ड' मानित असे व जर उत्तर व्हिएतनामी लाओसबाहेर गेले, तर पॅथेलाओबरोबर समझोता करायला त्याची हरकत नव्हती.

प्रिन्स सुफान वाँग हा 'पॅथे-लाओ' नेता हनोई-प्रेमी असण्याचे आणखी एक कारण म्हणजे त्याने एका उत्तर व्हिएतनामी मुलीशी विवाह केला होता. प्रिन्स सुफान वाँग याला हो-चि-मिन्ह याचे संबंधात आणण्याची महत्त्वाची कामगिरी त्याच्या या बायकोनेच केली होती. परंतु हे काही असले तरी लाओसमधील सत्तास्पर्धा ही अखेर दोन भावांचे भांडण होते आणि भांडण्याचे कारण दूर होताच दोन्ही भाऊ समेटाला तयार झाले. लुआंग-प्रवांग येथे राजवाड्यात वडिलांच्या समक्ष उभयतांची भेट झाली. 'पॅथे-लाओ' यांना लाओस सरकारात स्थान देण्याचे प्रिन्स सुवाना फूमा यांनी मान्य केले. वाटाघाटीचा घोळ काही महिने चालला परंतु अखेर १४ सप्टेंबर १९७३ ला लाओसमध्ये शांतता अवतरली. पॅथे-लाओ सैन्य हे सरकारी म्हणून व्हिएनशियान येथे दाखल झाले.

लाओसमध्ये शांतता आली ही गोष्ट दक्षिण व्हिएतनामच्या राजवटीला एका दृष्टीने उपकारक ठरली. पॅथे-लाओ यांच्या हनोई-प्रेमावर तटस्थ राहू पाहणाऱ्या प्रिन्स सुवाना फूमा याचे पंतप्रधान या नात्याने मोठेच दडपण राहणार होते. हो-चि-मिन्ह मार्गाचा उपयोग आता पूर्वीइतका करणे व्हिएतनामी सैनिकांना शक्य होणार नव्हते.

## कंबोडियात संहार चालूच

कंबोडियात स्थिती वेगळी होती. नॉमपेन्ह येथील जनरल लोन-नोल याचे सरकार कम्युनिस्टांच्या हाती पडणे, अमेरिकेला आणि जनरल थियू याला अत्यंत धोकादायक होते. कंबोडियाची दक्षिण बाजू हा समुद्रकिनारा आहे. यामुळे हो-चि-मिन्ह मार्गावर न

विसंबता समुद्रमार्गे दक्षिण व्हिएतनामवर लष्करी दडपण वाढवणे शक्य होणार होते. पॅरीस करार झाला तेव्हा व्हिएतकाँगीच्या मदतीने खमेर सैन्याने (कंबोडियातील कम्युनिस्टाचे सैन्य) नॉमपेन्ह ही राजधानी सर्व बाजूंनी वेढलेली होती. जनरल लोन-नोल हा पराजित झाला तर पेकिंगमध्ये परागंदा जीवन कंठणारा प्रिन्स नोरोदम सिंहनुक याला पाचारण होऊन कम्युनिस्ट सत्तेवर आले असते. कंबोडियाला अमेरिका लष्करी मदत करूशकते की नाही हा नाजूक वादाचा मुद्दा होता. दक्षिण व्हिएतनाम हे राज्य, सेटो संघटनेचे सभासद होते परंतु कंबोडिया कधीच सभासद नव्हता. यामुळे सेटो कराराची ढाल पुढे करून अमेरिका तिथे शहाजोगपणे येऊ शकत नव्हती. सिनेटर फुलब्राईट यांनी निक्सन यांना ठणकावले होते – 'मनात येईल त्याठिकाणी अमेरिकन सैन्य धाडायला अध्यक्ष स्वतःला जुन्या काळचे राजे समजतात की काय?'

कंबोडियातील परिस्थिती दिवसेंदिवस गंभीर होत चालली होती. दक्षिण व्हिएतनाममध्ये असलेले व्हिएतकाँगी सैन्य हे दक्षिण व्हिएतनामच्या 'अस्थाई क्रांतिकारी सरकारचे' (Provisional Revolutionary Govt.) सैन्य म्हणून जिंकलेल्या भूभागात आता पॅरीस करारानुसार उघडपणे वावरत होते. यामुळे कंबोडिया व दक्षिण व्हिएतनाम यांच्या सरहद्दीवर त्यांनी सर्वस्वी कंबोडियन कम्युनिस्टांच्या संपूर्णपणे अधिपत्याखाली असलेली मोठी भूपट्टीच निर्माण केली होती. इथे सुमारे ३६,००० व्हिएतकाँगी सैन्य कंबोडियातील खमेर कम्युनिस्टांच्या साहाय्यासाठी आता सतत तयारच होते. ३० मार्च १९७३ ला दक्षिण व्हिएतनाममधून शेवटची अमेरिकन सैन्य तुकडी मायभूमीकडे रवाना झाली. परंतु कंबोडियात जनरल लोन-नोल याच्या विनंतीवरून 'नॉम-पेन्ह' परिसरात अमेरिकेने आपले बाँबहल्ले मात्र जारी ठेवले. अमेरिकेची ही विमाने थायलंडमधील अमेरिकेच्या तळावरून येत होती. म्हणजे कंबोडियापुरता अमेरिकेने व व्हिएतकाँगींनी पॅरीस कराराला हरताळ फासला!

एप्रिल ७३ च्या पहिल्या आठवड्यात कंबोडियात कम्युनिस्टांच्या ताब्यातील प्रदेशात प्रिन्स नोरोदम सिंहनुक हा सहजपणे दौरा करून आला. यावरून तिथे कम्युनिस्टांनी किती पाय रोवले आहेत याची कल्पना सर्वांना आली. हनोईमध्ये पंतप्रधान फाम-व्हान-डाँग याच्या अध्यक्षतेखाली प्रिन्स सिंहनुक याचा जाहीर सत्कार झाला. आपल्या भाषणात सिंहनुक याने सांगितले –

'मी कंबोडियाच्या भूमीवर जाहीर सभा घेतली. त्याला १०,००० लोक हजर होते. बुद्ध भिक्षू, स्त्रिया, मुले व खमेर निर्वासित यांनी सर्व गर्दी केली होती. माझ्या नेतृत्वाखाली कंबोडियात १,२०,००० खमेर सैनिक लढत आहेत आणि अंतिम विजय मिळेपर्यंत लढण्याचा त्यांचा निर्धार आहे.'

वर्षभर कंबोडियात अधूनमधून नॉम-पेन्ह परिसरात चकमकी झडत होत्या. एक गोष्ट स्पष्ट झाली की नॉम-पेन्ह कब्जात घेण्याची खमेर बंडखोरांची इच्छा नाही. त्यांनी नॉम-पेन्हची फक्त सर्व नाकेबंदी चालवली. अमेरिकेची बॉंबर विमाने थायलंडमधून येत व बंडखोरांच्या सैन्यावर बॉंबवर्षाव करून जात. परंतु तरीही नॉम-पेन्हचा वेढा बंडखोरांनी आवळत आणलेला होता. डिसेंबर ७४ पर्यंत नॉम-पेन्हला फक्त मेकॉंग नदीचा जलमार्गच मोकळा राहिला होता. नॉम-पेन्हकडे येणारे बाकीचे सर्व पाची रस्ते बंडखोर खमेरांनी तोडलेले होते. १३ जानेवारी ७५ ला बातमी आली की मेकॉंग जलमार्गावरील महत्त्वाचे ठाणे निएक-लुऑंग याला आता बंडखोरांचा विळखा बसत आहे. हे ठाणे सर झाले की नॉम-पेन्ह फार काळ टिकाव धरणे कठीण होते.

नॉम-पेन्ह शहरात सर्वत्र मृत्यूचे थैमान सुरू झाले. बंडखोरांचे तोफगोळे पंधरा-पंधरा मिनिटांनी शहरात कोसळत आणि प्रत्येक आघातासरशी पंधरावीस माणसे मरत. शहरात सुमारे ३०,००० निर्वासित भुकेकंगाल स्थितीत वावरत होते. अमेरिकन विमाने पॅराशुटने जेवढे अन्नधान्य उतरवत, ते सर्व कंबोडियाचे कोंडले गेलेले सरकारी सैनिक फस्त करत. जखमी अवस्थेतील आणि भुकेमुळे अंगातील प्राण गेलेली माणसे रस्तोरस्ती विव्हळत. वेढा घालून बसलेल्या कम्युनिस्ट खमेर बंडखोरांना नॉम-पेन्ह शहर नको होते. त्यांना शरणागती हवी होती. जनरल लोन-नोल याची बिनशर्त शरणागती! तो क्षण नक्कीच जवळ येत होता.

## शांततेचे फसवे वर्ष

जानेवारी १९७३ मध्ये व्हिएतनाममध्ये युद्धबंदी झाल्यानंतर हनोई सरकारने आपल्या ताब्यातील ११६ अमेरिकन वैमानिकांची व युद्धबंद्यांची मुक्तता केली. मार्च ७३ अखेर सर्व अमेरिकन दक्षिण व्हिएतनाममधून बाहेर पडले. यानंतर वर्षभर दक्षिण व्हिएतनाममध्ये व्हिएतकॉंगी सैनिकांनी कसलीही लष्करी हालचाल केली नाही. पॅरीस कराराच्या राजकीय तरतुदी पाळल्या जाव्या यासाठी थियू राजवटीवर दडपण आणण्याचा राजकीय प्रयत्न सुरू ठेवला.

शांतता कराराने दक्षिण व्हिएतनाममध्ये दोन राजवटी, दोन सैन्ये, दोन प्रकारचे स्वतंत्र भूभाग आणि तीन राजकीय दले मान्य केली होती. व्हिएतकॉंगींचे 'अस्थायी क्रांतिकारी सरकार' (P. P. G. – प्रोव्हिजनल रेव्होल्युशनरी गव्हर्मेंट) व थियूचे सायगावस्थित सरकार, या दोन राजवटी आपल्या सैन्याच्या बळावर, ताब्यातील प्रदेशावर हुकूमत ठेवणार होत्या. दक्षिण व्हिएतनाममध्ये निवडणुकीनंतर जे संयुक्त सरकार येईल त्यासाठी तीन राजकीय दले झगडणार होती. थियूचा पक्ष, अस्थायी सरकारचा पक्ष आणि तटस्थ पक्ष.

ही जी तरतूद करारात होती ती सर्व 'अस्थायी सरकार'ला सर्वथैव फायदेशीर होती. यामुळे दक्षिण व्हिएतनाममधील युद्धबंदी पाळून निवडणुकीच्या दिशेने राजकारण ढकलणे हे 'अस्थायी क्रांतिकारक सरकार'चे आता मुख्य सूत्र होते. याउलट शांतता करार उधळला गेला व व्हिएतकाँगींना दोषी ठरवून पुनः युद्ध पेटले, तर ते जनरल थियू याच्या पथ्यावर पडणार होते. कारण असे काही झाले तर अमेरिकेची मदत त्याने गृहीत धरली होती.

## निक्सनना वॉटरगेटचा फास

पण निक्सनसाहेब तिकडे नव्याच खोड्यात अडकायला सुरुवात होत होती. अध्यक्षीय निवडणुकीतून 'वॉटरगेट' प्रकरण उद्भवले होते. अमेरिकेतील पत्रकार, सिनेटरमंडळी आणि जनता, निक्सन यांना अडचणीत टाकणारे प्रश्न रोज उपस्थित करीत होती. २६ जुलै ७३ ला आपल्या ताब्यातील टेप व कागदपत्रे अमेरिकेच्या सिनेटला देण्यास निक्सन यांनी नकार देताच या प्रकरणाने गंभीर वळण घेतले होते. गव्हर्नर असताना पैशाच्या मोठ्या गैरव्यवहाराचे एक प्रकरण अंगावर शेकल्याने, अमेरिकेचे उपाध्यक्ष ॲगन्यू यांनी १० ऑक्टोबरला राजीनामा दिला! निक्सन यांना हा मोठाच धक्का होता. परराष्ट्रमंत्री विल्यम रॉजर्स यांचे जागी डॉ. हेन्री किसिंजर यांची २१ ऑगस्ट १९७३ ला नेमणूक करून निक्सन हे आपले सर्व लक्ष 'वॉटरगेट' लफड्याकडे देऊ लागले. त्यांना स्वतःला जनरल थियूचे काय होते या प्रश्नात रस उरला नव्हता, कारण त्यांचे स्वतःचे आसनच आता हादरू लागले होते!

## पुनः युद्धाचे ढग

दक्षिण व्हिएतनाममधील बौद्ध जनतेचा थियू राजवटीला प्रथमपासून विरोध होताच. हुए येथील पूर्वीचा बौद्ध नेता थिक-त्रि-क्वांग याने पुनः बौद्धांच्या वतीने थियूला असलेला विरोध धारदार करायला सुरुवात केली. राष्ट्रीय मुक्ती आघाडीशी सहकार्य करून अखेर दोन्ही व्हिएतनामचे एकत्रीकरण करण्याला या मंडळींचा पाठिंबा होता. फादर लाँग या ख्रिस्ती माणसाने भ्रष्टाचारविरोधी आंदोलन आता सुरू केले होते. असे नानाविध नेते जनरल थियूच्या राजवटीला शांतता-करारानंतर उघड विरोध दर्शवू लागले होते.

थियू सरकारची आर्थिक स्थिती तर केविलवाणीच झाली. पिॲस्ट्रे या व्हिएतनामी चलनाचे आतापर्यंत ७ वेळा अवमूल्यन झाले असल्याने, आर्थिक यंत्रणा हास्यास्पद झाली. १९६५ साली एक डॉलरला ३५ पिॲस्ट्रे मिळत असत. १९७४ च्या जानेवारीनंतर एका डॉलरला ६३० पिॲस्ट्रे हा नवा दर जाहीर झाला! हा झाला सरकारी दर. काळ्या बाजारात डॉलर मिळवायचे तर डॉलरमागे ८०० पिॲस्ट्रे हाच दर चालू

होता. यामुळे साध्या शिक्षकाला १०,००० ते १५,००० पिअॅस्ट्रे पगार आणि हमालाला ९,०००! अशा या आर्थिक दिवाळखोरीमुळे बेकारी अफाट. फक्त दानांग शहरात १९७४ च्या मध्याला ९०,००० बेकार होते. गोद्या, कारखाने महिन्याचे फक्त १० दिवस चालू राहू शकत असत. इतकी सर्वत्र मंदी पसरलेली. थियू राजवटीची ही हलाखी आणि दैना व्हिएतनामला जाऊन आलेल्या असंख्य पत्रकारांनी वर्णन केलेली आहे.

राजवटीच्या या पार्श्वभूमीवर जनरल थियू याला पुनः लढाई हवी होती! पॅरीस करारानुसार राष्ट्रीय समझोता मंडळ निर्माण करून निवडणुका घेण्याच्या दृष्टीने हालचाल करण्याची जनरल थियू याची इच्छा नव्हती. ४ जानेवारी १९७४ रोजी त्याने आपल्या सैन्याला जाहीर आदेश दिला –

'आपल्या प्रदेशात आलेल्या शतूला तर गोळ्या घालाच परंतु जिथे शतू आज दबा धरून बसला आहे असे वाटते तिथे घुसूनही आघात करा.'

ऑक्टोबर ७३ मध्ये हुए, दानांग, न्हा-त्रांग, कान-थो आदी शहरांमधून 'पॅरीस कराराचे पालन करा' असे थियू सरकारवर दडपण आणण्यासाठी जनतेने मोठमोठे मेळावे भरवूनही, जनरल थियू आपल्या सुसज्ज सैन्याच्या बळावर युद्ध भडकवण्याचा उद्योग करू लागला. दक्षिण व्हिएतनाममध्ये व्हिएतकाँगींनी देखील चढाईचा पवित्रा घेतला.

जानेवारी ७४ ते ऑगस्ट ७४ या काळात दक्षिण व्हिएतनाममध्ये पुनः चकमकी सुरू झाल्या. सायगावच्या उत्तरेला बेन-कॅट भागात आणि दानांगच्या दक्षिणेकडील डोंगरदऱ्यांच्या भागात व्हिएतकाँगींनी चढाई सुरू केली.

या नव्याने सुरू झालेल्या झटापटीचे स्वरूप बरेच निराळे होते. सायगाव राजवट आणि व्हिएतकाँगी यांचा हा अंतर्गत संघर्ष आहे असेच याकडे पाहिले जाऊ लागले होते. अमेरिकेकडून मिळणारे पेट्रोल, दारूगोळा व शस्त्रास्त्रे यावर खूपच बंधने अमेरिकन सिनेटने आणल्यामुळे जनरल थियू हा मोठ्या प्रमाणावर चढाई करू शकत नव्हता. आणि जोपर्यंत पॅरीस शांतता करारात धुगधुगी आहे तोपर्यंत मोठ्या प्रमाणावर युद्ध करण्याची व्हिएतकाँगींची इच्छा दिसत नव्हती.

या झटापटी सुरू झाल्यानंतर आंतरराष्ट्रीय देखरेख मंडळाने काय केले? काहीही केले नाही! या मंडळाच्या निष्क्रियतेचा प्रत्यय येताच कॅनडा मंडळावरून ३० मे ७३ लाच दूर झाला. त्याची जागा इराणने घेतली. या मंडळींना प्रथमपासून काळजी आहे ती थकलेल्या पगार बिलांची! हे नियंत्रण मंडळ संयुक्त राष्ट्रसंघाचे नसल्याने, राष्ट्रसंघ एक छदाम देत नसे. हनोई सरकारने या नियंत्रण मंडळींशी आपला काही संबंध नाही असे सांगितले व व्हिएतकाँगींनी आपल्याजवळ पैसाच नसल्याचे सांगितले. जनरल थियूची आर्थिक अवस्था जगजाहीर! मग पगार देणार कोण? शेवटी अमेरिकेच्या गळ्यात हे लोढणे आले.

पहिल्या १९५४ च्या नियंत्रण मंडळाप्रमाणेच या मंडळाचे कामही बोंबलले. देखरेख शून्य! युद्ध पुढे चालूच!

सप्टेंबर १९७४ उजाडला आणि अमेरिकेत निक्सनसाहेब वॉटरगेट प्रकरणात गुन्हेगार ठरून, हाय खाऊन, सत्तेवरून दूर झाले. उपाध्यक्ष ॲग्न्यू यांचे जागी निक्सन यांनीच नेमलेले उपाध्यक्ष जेराल्ड फोर्ड हे निक्सननंतर अमेरिकेचे अध्यक्ष झाले. निक्सनबरोबर त्यांची व्हिएतनामविषयक नीतीही इतिहासजमा झाली. नवे अध्यक्ष जेराल्ड फोर्ड हे काही अमेरिकेच्या जनतेने निवडलेले अध्यक्ष नव्हते. यामुळे जनरल थियू उद्या कोसळू लागेल, तेव्हा त्यांच्या मदतीला ससैन्य पुनः जाण्याचे गैरसाहस ते करतील असे वाटत नव्हते.

## मादाम बिन्ह यांचा इषारा

तेव्हा दक्षिण व्हिएतनाममध्ये व्हिएतकाँगी सैनिक व जनरल थियूचे सैन्य यांच्यातील लढाया सतत चालूच राहाणार व त्याची दखल आता बाह्य जग घेणार नाहीसे दिसू लागले. अस्थाई क्रांतिकारी सरकारच्या परराष्ट्रमंत्री मादाम बिन्ह या सप्टेंबर ७४ मध्ये दारेसलाम येथे आलेल्या असताना त्यांनी आपल्या सरकारचे प्राप्त परिस्थितीत धोरण करीम इझॅक या पत्रकारापाशी स्पष्ट केले. त्यांनी सांगितले –

‘आमच्या प्रदेशातून अमेरिकेचे सैन्य निघून गेलेले आहे आणि आम्ही आज लष्करीदृष्ट्या मजबूत आहोत. अमेरिकेच्या आश्रितांच्या फौजा आज नैतिकदृष्ट्या खचलेल्या आहेत. त्यांच्या सैनिकांनाही शांतता हवी आहे. त्यांचे सैनिक पळून आम्ही मुक्त केलेल्या प्रदेशात येत आहेत.

‘तीन चतुर्थांश दक्षिण व्हिएतनामवर आज आमचे नियंत्रण आहे. आम्ही मुक्त केलेले प्रदेश हे १७ व्या अक्षांश रेषेपासून तो दक्षिणेत का-माऊ प्रांतापर्यंत विखुरलेले आहेत. आम्ही सायगावपासून २५ किलोमीटर अंतरावर आहोत असे पाश्चिमात्य म्हणतात, पण प्रत्यक्षात आम्ही त्यापेक्षाही सायगावच्या अधिक जवळ आहोत.

‘पॅरीस करार हे आमचे राजकीय व वकिली शस्त्र आहे. एक गोष्ट निर्विवाद की दक्षिण व्हिएतनाममधील सत्तातोल देशभक्तांकडेच दिवसेंदिवस झुकतो आहे.’

यापुढे तुमचे धोरण काय राहील असा प्रश्न या पत्रकाराने विचारताच मादाम बिन्ह म्हणाल्या –

‘आम्ही पॅरिस शांतता करार पाळीत आहोत. सायगावची आश्रित सत्ता व अमेरिका यांनीही तो पाळावा अशी आमची अपेक्षा आहे. पण जर जनरल थियू याला आम्ही मुक्त

केलेल्या प्रदेशांशी युद्ध करायचे असेल तर, आम्ही त्याला यथास्थित शासन घडवल्याशिवाय राहणार नाही.'

## मृत्यूघंटा वाजू लागली

जनरल थियू याच्या युद्धखोरीला अद्दल घडवायला आता सुरुवात झाली. ४ जानेवारी १९७५ ला दक्षिण व्हिएतनाममध्ये युद्ध उसळले. व्हिएतकाँगींनी कंबोडियाच्या सरहद्दीला लागून असलेल्या फूक-लाँग प्रांतात चढाई सुरू केली व या प्रांताची राजधानी फूक-बिन्ह हे नगर कब्जात घेतले. मे १९७२ मध्ये उत्तर व्हिएतनामींनी काँग-ट्री हे शहर ताब्यात घेतले होते. त्यानंतर व्हिएतकाँगींनी कब्जात घेतलेले हे दुसरे शहर म्हणता येईल. सायगावच्या उत्तरेस हे सुमारे १३५ किलोमीटर अंतरावर आहे. फूक-लाँग हा सर्वच प्रांत आता काँगींच्या कब्जात गेल्यासारखा झाला. सायगावच्या वायव्येला ताय-निन्ह प्रांतातही काँगींची चढाई सुरू झाली होती. दक्षिण व्हिएतनामी सैन्याने लढाई न करताच हुए शहर सोडून दिल्याचे वृत्त २० मार्च १९७५ ला आले. याचा अर्थ हुए ते कोंटुम हा सर्व मध्य व्हिएतनाम राष्ट्रीय मुक्ती आघाडीच्या कब्जात लवकरच येणार होता.

कंबोडियातील खमेर कम्युनिस्ट फौजांची नॉमपेन्हवरील चढाई आणि व्हिएतकाँगींची दक्षिण व्हिएतनाममधील मोहीम यात सुसूत्रता होती.

सायगावच्या दिशेने जनरल थियू याचा लष्करी मदतीसाठी वॉशिंग्टनकडे आक्रोश सुरू झाला. अमेरिकेची काँग्रेस जनरल थियू याच्या मदतीसाठी अध्यक्ष जेरॉल्ड फोर्ड यांना कदाचित पैसा उपलब्ध करू शकली असती, परंतु ज्यायोगे अमेरिका पुनश्च व्हिएतनाम संघर्षात अडकेल, असे अध्यक्षांनी काही करता कामा नये असे काँग्रेसचे मत होते. पॅरीस कराराची तरतूद अमलात आणण्यास जनरल थियू याने नकार दिला, यामुळेच शांतता धोक्यात आली हे सत्य अमेरिकेला नजरेआड करता येत नव्हते. 'नॅशनल कौन्सिल ऑफ रिकन्सीलिएशन' (राष्ट्रीय समझोता मंडळ) निर्माण करण्यासाठी अमेरिकेने जनरल थियूवर दडपण आणले पाहिजे व जर जनरल थियू हाच शांतता करार मोडू पाहातो आहे अशी अमेरिकेची खात्री झाली तर जनरल थियूला त्याचे हे पाप भोगावे लागेल, असे अध्यक्ष फोर्ड यांनी स्पष्टपणे जाहीर केले पाहिजे असे जनमत होते.

हे युद्ध घेऊन पुनश्च जनरल थियूची दक्षिण व्हिएतनाममधील भ्रष्टाचारी लष्करी राजवट अमेरिकेच्या दारात आली. आत्तापर्यंतचा; अनेक वर्षांचा हा निरर्थक युद्धाचा अनुभव लक्षात घेऊन अमेरिकेचे अध्यक्ष काळाचे काटे मागे फिरवण्याचा प्रयत्न करणार नाहीत अशी अपेक्षा होती. मृत्यूघंटा वाजू लागलेल्या सायगाव राजवटीला त्यांचा 'आशीर्वाद' असला तरी ते 'अभय' देणार नाहीत अशी अपेक्षा होती.

# २९ : सायगाव राजवटीचा अस्त

## सायगाव राजवटीचा अस्त : १ मे १९७५

दक्षिण व्हिएतनाममध्ये १९७५ च्या वर्षारंभाला जी लढाई उसळली तो व्हिएतनाम संघर्षातील अखेरचा संहार ठरणार आहे, याची कुणालाच कल्पना येऊ शकली नाही. याचे महत्त्वाचे कारण म्हणजे १९७२ च्या उत्तर व्हिएतनामी मोहिमेचा चतुर युद्धनेता जनरल जिॲप याचे नाव या चढाईच्या संदर्भात कुठे येत नव्हते, आणि लष्करीदृष्ट्या बरीच तयारी केल्यानंतर हा अखेरचा आघात लवकरात लवकर म्हटला तरी १९७५ च्या अखेरीस येईल, अशी सर्वसाधारण अपेक्षा होती.

परंतु व्हिएतनाम शोकांतिकेचा अखेरचा अंक १४ मार्च १९७५ च्या मध्यरात्री अचानक सुरू झाला.

मध्य पहाडी प्रदेशातील (Central Highlands) बान-मी-थो या शहराचा, राष्ट्रीय मुक्ती आघाडीने १३ मार्चला कब्जा घेतला. हे शहर सायगावच्या उत्तरेस परंतु कोन्टुम व प्लैकु या शहरांच्या दक्षिणेस आहे. बान-मी-थो हे शहर मुक्ती आघाडीच्या सैनिकांच्या ताब्यात येताच, मध्य पहाडी मुलुखातील जनरल फाम-व्हान-फू या दक्षिण व्हिएतनाम सेनानीचे सर्व लष्कर कोंडले जाण्याचा धोका निर्माण झाला. बान-मी-थो येथे तीनच दिवसापूर्वी सुमारे १०० ट्रक भरून जी लष्करी सामग्री आली होती, ती सर्व मुक्ती आघाडीच्या हाती पडली. आता दक्षिण व्हिएतनामी लष्करापुढे दोनच पर्याय होते. एक म्हणजे बान-मी-थो पुनः जिंकून घेणे आणि हे जमत नसेल तर समुद्रकिनाऱ्याच्या दिशेने पहाडी मुलुखातील सैन्य मागे घेणे. जनरल फू हा दिएन-बिएन-फू च्या लढाईत फ्रेंचांकडून लढलेला होता. या लढाईत त्याला व्हिएतमिन्ह सैनिकांनी पकडले होते व नंतर त्याची सुटका केलेली होती. उत्तर व्हिएतनामने तयार केलेले मुक्ती आघाडीचे सैन्य हा कसा दणका देऊ शकते याची त्याला अनुभवाने कल्पना होती. बान-मी-थो जिंकून घेणे हे त्याच्या कुवतीबाहेरचे होते. काय करावे या पेचात तो असतानाच १४ मार्चला सायगावहून जनरल थियू हा स्वतःच त्याच्या भेटीसाठी न्हात्रांग बंदराजवळच्या अमेरिकेने प्रदान केलेल्या काम-रान्ह लष्करी तळावर दाखल झाला. १३ मार्चला मध्यरात्रीच जनरल थियूने अमेरिकन विमानाने सायगाव सोडले होते व जनरल फू याला भेटीसाठी पाचारण केले होते.

## माघार कसली! पळापळच

अध्यक्ष थियू व जनरल फू यांच्या बोलण्यात दोन गोष्टींचा विचार झाला असावा. मध्य पहाडी मुलुखातून वेळीच माघार घेतली नाही, तर अमेरिकन शस्त्रांस्त्रांसह दक्षिण व्हिएतनामी सैन्य कोंडले जाणार होते आणि दुसरी गोष्ट, वेडावाकडा प्रसंग गुदरला तर यावेळी अमेरिकेची कसलीही मदत येण्याचा संभव नव्हता. अमेरिकेच्या काँग्रेसने अध्यक्ष फोर्ड यांना दक्षिण व्हिएतनामला मदत म्हणून शस्त्रास्त्रे वा पैसा देण्यास नकार दिला होता. तेव्हा दक्षिण व्हिएतनामी सैन्यशक्ती काहीही करून शाबूत ठेवायची, तर सरकफासाची दोरी आवळली जाण्यापूर्वी, मध्य पहाडी मुलुखातून मोठ्या प्रमाणावर प्रथम माघार घेणे हा एकच लष्करी पर्याय अध्यक्ष थियूपुढे होता. जनरल थियूबरोबर या बैठकीसाठी सायगाव राजवटीचा पंतप्रधान जनरल खिम व चीफ ऑफ स्टाफ जनरल व्हिएन हे दोघे होते. सर्वांनी मिळून निर्णय घेतला की मध्य पहाडी मुलुखातून दक्षिण व्हिएतनामी फौजा मागे घ्यायच्या!

हा निर्णय झाला आणि सर्वत्र गोंधळ माजला! जी शिस्तबद्ध लष्करी माघार असायला हवी, तिला भ्याडांच्या सार्वत्रिक पळापळीचे स्वरूप आले. पहाडी मुलुखातून सुमारे एक लाख दक्षिण व्हिएतनामी, समुद्रकिनाऱ्याच्या दिशेने वाट सापडेल तसे पळू लागले. हातातील शस्त्रे फेकून देऊन आणि सैनिकी गणवेश टाकून देऊन हजारो दक्षिण व्हिएतनामी सैनिकही या मानवी प्रपाताबरोबर पळत सुटले. पहाडी मुलुखातून स्त्रिया व अर्भकांसह, लाखाहून अधिक माणसांचा हा प्रचंड लोंढा चिरफाळ्या उडून, डोंगरदऱ्या उतरू लागला. ही सर्व माणसे न्हा-त्रांग बंदराच्या दिशेने निघालेली होती.

२३ मार्चला हुए शहरातून पळापळीला सुरुवात झाली. हुए आणि काँग-ट्री ही दोन्ही शहरे दक्षिण व्हिएतनामी सैनिकांनी लढाई न करताच २५ मार्चला सोडून दिल्याने, सुमारे चार लाख निर्वासितांचा लोंढा हुएच्या दक्षिणेस ८० किलोमीटर अंतरावरील दानांग शहरावर लोटला.

## दानांग येथील दाणादाण

माघारीच्या आदेशानुसार पहाडी प्रदेशातील प्लैकू व कोन्टुम ही दोन्ही शहरे देखील दक्षिण व्हिएतनामी सैनिकांनी लढाई न देताच सोडल्याने, दक्षिण व्हिएतनामी सैन्य आता कोठल्या ठिकाणी माघार थांबून लढाई देण्याचा पवित्रा घेणार याचा अमेरिकेच्या लष्करी नेत्यांना थांगपत्ता लागेना. अध्यक्ष फोर्ड यांनी अमेरिकेचे चीफ ऑफ स्टाफ जनरल वेयांड यांना सायगावला रवाना केले. अध्यक्ष थियु याने सैन्याला दानांग लढवण्याचा आदेश दिलेला आहे, असे वृत्त २९ मार्चला प्रसृत झाले, ते जनरल वेयांड व जनरल थियू यांच्या भेटीवर आधारलेले होते.

अर्थात यात फारसे तथ्य नव्हते ही गोष्ट काही तासातच स्पष्ट झाली. कारण दानांग बंदरातून अमेरिकेने मोठ्या प्रमाणावर नागरिकांना बाहेर काढण्यास सुरुवात केली. २८ मार्चला दानांगपासून २४ किलोमीटर अंतरावरचे होइ-आन हे शहर मुक्ती आघाडीच्या कब्जात जाताच, दानांगला पक्का शह लागला. दानांग हे सायगावच्या खालोखालचे सर्वात मोठे शहर आणि म्हणून त्याचे विशेष महत्त्व होते.

२९ मार्चला दानांग पडले. सायगाव राजवटीचा २० वर्षांच्या युद्धातील हा सर्वात मोठा पराभव होता. तेथील दक्षिण व्हिएतनामी सेनापती लेफ्ट. जनरल ट्रूआंग याने काहीसा प्रतिकार केला. परंतु अखेर सैन्य कोंडले जाईल या भयाने त्याने शहर खाली करून सैन्य मागे घेतले. दानांग शहर सोडताना पळणाऱ्या ४०० दक्षिण व्हिएतनामी वैमानिकांनी शहराबाहेर पडण्यासाठी विमानतळावर आलेल्या माणसांच्या झुंडीतून वाट काढताना पिस्तुले झाडली! अनेक स्त्रिया, मुले यामुळे मरण पावली व सर्वांच्या आधी विमाने गाठून हे बहाद्दर दानांगमधून निसटले. दानांगच्या दक्षिणेस २८० किलोमीटर अंतरावरील बंदर क्विन्हॉन हे एकेकाळी अमेरिकेचा मोठा लष्करी तळ होते. सुमारे दोन लाख वस्तीच्या या शहरावर कब्जा करण्यासाठी मुक्ती आघाडीचे सैन्य आता माघार घेणाऱ्या दक्षिण व्हिएतनामी सैनिकांच्या पाठलागावर निघाले.

बान-मी-थो च्या उत्तरेकडील जवळजवळ सर्वच मुलूख कब्जात येताच राष्ट्रीय मुक्ती आघाडीच्या सैनिकांचा दबाव आता प्रतिक्षणी वाढू लागला. कारण या सर्व प्रदेशात निरनिराळ्या ठिकाणी लढणारे त्यांचे सैन्यही आता मोकळे झाले होते. दानांगच्या परिसरात राष्ट्रीय मुक्ती आघाडीचे सैन्य घुसले, त्याच दिवशी म्हणजे २९ मार्चला कंबोडियाची राजधानी नॉमपेन्ह ही खमेर रूज सैनिकांनी तोफांच्या भडीमाराने चारी दिशांनी वेढल्याचे वृत्त आले.

२५ मार्चला सायगाव येथे अध्यक्ष थियू याच्या खुनाचा प्रयत्न झाला. परंतु तो फसला. ज्या व्यक्तीने गोळ्या झाडल्या तो माणूस सायगाव पोलीसाच्या हाती लागला नाही. दक्षिण व्हिएतनामचा भूतपूर्व पंतप्रधान एअर व्हाईस मॉर्शल की याने जनरल थियू याने देशाच्या भल्यासाठी राजीनामा द्यावा असे निवेदन ३० मार्चला प्रसिद्ध केले. या निवेदनाला जी बेफाम प्रसिद्धी देण्यात आली त्यावरून थियूला राजीनामा द्यायला लावून, राष्ट्रीय मुक्ती आघाडीबरोबरच काही समझोता करण्याचा प्रयत्न होतो आहे, असा अंदाज राजकीय निरीक्षकांनी केला. परंतु संपूर्ण लष्करी विजय हातातोंडाशी आला असताना या सापळ्यात राष्ट्रीय मुक्ती आघाडी अडकणार नाही हे स्पष्ट दिसत होते.

## कंबोडियातील अखेरचे रणकंदन

१ एप्रिल उजाडला तेव्हा कंबोडियातील युद्धाने अखेरचे निर्णायक वळण घेतलेले होते. प्रिन्स नरोदम सिंहनुकला पदच्युत करून, सत्ता बळकावलेला अमेरिकेचा हस्तक मार्शल लोन-नोल हा ३१ मार्चला पंतप्रधान बोरेट यांचेसह नॉमपेन्हहून परागंदा झाला! जाण्यापूर्वी काही लाख डॉलर रकमेच्या मोबदल्यात, त्याने सर्व सत्ता कंबोडियाच्या सिनेटचा अध्यक्ष जनरल खॉय याला सुपूर्द केली. मार्शल लोन-नोल याला इंडोनेशियाने आसरा दिल्याची बातमी नंतर प्रसिद्ध झाली. काही दिवसातच नॉमपेन्हवर खमेर रूज कब्जा करतील व कंबोडियात युद्ध समाप्ती होईल असा याचा स्पष्ट अर्थ होता.

इकडे दक्षिण व्हिएतनाममधील क्विन्हॉन हे शहर आचके देऊ लागले होते. क्विन्हॉनमधून सर्व अमेरिकन नागरिक व लष्करी सल्लागार ३१ मार्चला सायगावला निसटले. यावेळी दक्षिण व्हिएतनाममध्ये कोंडल्या गेलेल्या अमेरिकनांची संख्या सुमारे ६,००० होती.

नॉम-पेन्हहून पळालेला मार्शल लोन-नोल जाकार्ताला पोचण्यापूर्वीच, दक्षिण व्हिएतनामी सेनानी जनरल फू याने न्हा-त्रांग हे समुद्रकिनाऱ्यावरचे शहर खाली करून काम रान्हच्या दक्षिणेस आपले सैन्य मागे ओढले. राष्ट्रीय मुक्ती आघाडीच्या कब्जात आलेली ही पंधरावी प्रांतिक राजधानी होती. न्हा-त्रांग पडले याचा अर्थच त्यापूर्वी किमान २४ तास दक्षिण व्हिएतनामी सैनिकांनी क्विन्हॉन शहरही सोडून दिलेले होते. कारण न्हा-त्रांग हे सायगावच्या उत्तरेस २८८ किलोमीटर अंतरावर होते तर क्विन्हॉन हे सायगावच्या उत्तरेस ४०० किलोमीटर अंतरावर होते. सायगाव परिसरात आता फार मोठ्या संख्येने दक्षिण व्हिएतनामी सैन्य एकवटले गेलेले असल्याने या गतीनेच मुक्ती आघाडी पुढे रेटा देऊ शकेल असे कुणाला वाटत नव्हते. सायगाव परिसरात युद्ध यायला अजून बराच अवधी लागणार होता असा अमेरिकेतील लष्करी तज्ज्ञांचा कयास होता. अमेरिकेतील लष्करी निरीक्षक सांगत होते –

'सायगाव घ्यायला मुक्ती आघाडीला दोन महिने लागतील.'

## हादरलेला थियू बिथरलाही

अध्यक्ष फोर्ड यांचा चीफ ऑफ स्टाफ-जनरल वेयांड हा १ एप्रिललाच सायगावहून वॉशिंग्टनला जायला निघाला. त्याला पोचवायला विमानतळावर येण्याची तसदीही अध्यक्ष थियू याने घेतली नाही. अध्यक्ष थियू हा आता अमेरिकेवर चांगलाच बिथरला असावा, असा संशय यायला त्यामुळे सुरुवात झाली व हा संशय अंती खराही ठरला.

दक्षिण व्हिएतनाममधील पूर्वीचे अमेरिकन सैन्यप्रमुख जनरल वेस्टमोरलँड यांना कंठ फुटला. त्यांनी २ एप्रिलला पत्रकारांशी बोलताना जाहीरपणे कबुली दिली – 'अमेरिकेची व्हिएतनाममधील युद्धविषयक धोरणे ही चुकलेली होती आणि परिणामी फार मोठ्या

अमेरिकन मदतीच्या प्रयत्नावर अमेरिकेने वाजवीपेक्षा फाजील जोर दिला आणि अपेक्षित यशही पदरात पडू दिले नाही.'

सायगाव राजवट डचमळू लागल्याच्या बातम्या बाहेर येत होत्या. त्या खऱ्या ठरून ४ एप्रिलला पंतप्रधान जनरल खिम याने आपल्या सरकारचा राजीनामा अध्यक्ष थियूच्या हाती ठेवला. मध्य पहाडी प्रदेशातून अध्यक्ष थियू यांनी जी माघार घेतली त्यावर अध्यक्ष थियूच्या गोतावळ्यातील सैनिकी अधिकारी आता टीका करू लागले व चौफेर उडत असलेल्या दाणादाणीची सर्व जबाबदारी त्यांनी थियूच्या माथी फोडायला सुरुवात केली.

## राजभुवनावर बाँब पडले

८ एप्रिलला अध्यक्ष थियूच्या वधाचा दुसरा मोठा प्रयत्न झाला. थियू ज्या आलिशान स्वातंत्र्यभुवनात (Independence palace) राहात होता, त्या राजवाड्यावर एक सुपरसॉनिक सरकारी विमानानेच बाँबफेक केली. ही बाँबफेक थियूच्याच विमानदलातील एक लेफ्टनंट ट्रूंग याने केली होती. अगदी पहाटे झुंजुमुंजु होत असतानाच राजवाड्यावर त्याने चार बाँब फेकले. यातले दोनच बरोबर उडाले. राजवाड्याच्या माथ्यावर हेलिकॉप्टर उतरण्याची जी मोकळी जागा होती ती या बाँबफेकीत उद्ध्वस्त झाली. राजवाड्यावर फडफडणारे दक्षिण व्हिएतनामी निशाण नष्ट झाले. परंतु जनरल थियू वाचला! दोन तासानी सायगाव रेडिओवरून केलेल्या भाषणात जनरल थियू याने लोकांना सांगितले –

'माझी कुटुंबीय मंडळी व मी स्वतः सुरक्षित आहोत. माझ्या राजवाड्यावरचा हल्ला हा लष्कराने केलेला नसून, हे कृत्य त्याच माणसांचे आहे, की जे गेले काही दिवस मला सत्तेवरून दूर करून राजकीय समझोता करू पाहात होते.'

राजवाड्यावर बाँब फेकणारा लेफ्टनंट ट्रूंग हा आपले विमान घेऊन राष्ट्रीय मुक्ती आघाडीच्या ताब्यातील एका विमानतळावर उतरला व त्याने मुक्ती आघाडीत प्रवेश केला! सायगाव अपेक्षेपेक्षा खूपच लवकर राष्ट्रीय मुक्ती आघाडीच्या हाती पडण्याची चिन्हे दिसू लागताच, अमेरिकेचे अध्यक्ष फोर्ड यांनी अमेरिकेच्या सिनेटला व काँग्रेसला ११ एप्रिलला दूरचित्रवाणीवरील भाषणाद्वारे जाहीर विनंती केली – 'जर विपरीत तेच घडले, तर दक्षिण व्हिएतनाममध्ये कोंडून पडलेल्या अमेरिकन नागरिकांना आणि धोक्यात असलेल्या दक्षिण व्हिएतनामी लोकांना सोडण्यासाठी मला अमेरिकेचे लष्कर, वायुदल व आरमारी दल वापरण्याची मुभा मिळावी. ६,००० अमेरिकन नागरिकांव्यतिरिक्त तेथे असे लाखावरी दक्षिण व्हिएतनामी आहेत की ज्यांनी दक्षिण व्हिएतनाममध्ये अमेरिकेला सर्व प्रकारची मदत केलेली आहे. या लोकांना वाचवणे ही आपली नैतिक जबाबदारी आहे.'

## नॉम-पेन्ह शरण आले

अध्यक्ष फोर्ड हे अमेरिकेच्या लोकप्रतिनिधींना अशा प्रकारे एकीकडे आळवीत असतानाच, कंबोडियात नॉमपेन्हभोवतीचा खमेर रूज सैनिकांचा फास आवळला जाऊ लागला. अध्यक्ष मार्शल लोन-नोल परागंदा झाल्यानंतर, १ एप्रिलला अध्यक्षपद स्वीकारलेला जनरल खॉय हा १२ एप्रिलला सुमारे २०० अमेरिकन नागरिकांच्या जथ्याबरोबर हेलिकॉप्टरमधून नॉमपेन्ह बाहेर निसटला. सुमारे १८० अमेरिकन नाविकदलाचे सैनिक पाच हेलिकॉप्टर विमाने घेऊन रॉकेटचा मारा करीत नॉमपेन्हमध्ये उतरले आणि त्यांनी तेथील अमेरिकेच्या वकिलातील जमा झालेल्या सुमारे १५० अमेरिकन नागरिकांना नॉम-पेन्हबाहेर काढले. यात २६ अमेरिकन पत्रकार होते. या मंडळींबरोबरच अध्यक्ष खॉय हा बाहेर पळाला. अध्यक्ष खॉय बरोबरच सुमारे ४० कंबोडियन नागरिकही अमेरिकनांनी बाहेर काढले.

१५ एप्रिल १९७५ ला परागंदा कंबोडिया अध्यक्षांचा भाऊ जनरल लोन-नॉन याने नॉम-पेन्हची शरणागती जाहीर केली. खमेर रूज सैन्याचा प्रमुख खिऊ-संफान याने प्रिन्स नरोदम सिंहनुक याच्या पेकिंगस्थित कंबोडियाच्या सरकारच्यावतीने ही शरणागती स्वीकारली व अशा रितीने कंबोडियात अमेरिकेने निर्माण केलेली आश्रित राजवट इतिहासजमा होऊन, तिथे खमेर रूज सैनिकांची सत्ता प्रस्थापित झाली. या सैनिकात तीन प्रमुख गट होते. सर्व बंडखोर खमेर रूज सैनिकांचा सरसेनानी खिऊ संफान याचा गट हा डाव्या विचारसरणीचा कडवा गट समजला जातो. दुसरा गट हा राष्ट्रवाद्यांचा असून ते स्वतःला प्रिन्स नरोदम सिंहनुक यांचे प्रतिनिधी मानत असत. पेकिंग येथे प्रिन्स सिंहनुक यांचे जे अस्थायी सरकार होते, तेच कंबोडियाचे अधिकृत सरकार आहे असा या गटाचा आग्रह आहे. तिसरा गट हा हनोईहून आलेल्या कंबोडियन सैनिकांचा गट असून या गटाला हनोई सरकारशी निकटचे संबंध हवे आहेत. हे सैनिक १९५४ च्या जिनिव्हा करारानंतर उत्तर व्हिएतनामी सैनिकांबरोबर हनोईला गेले व तेथून येऊन ते कंबोडियाच्या स्वातंत्र्यासाठी सुरू झालेल्या संग्रामात दाखल झाले आहेत. या तीन गटांपैकी कोणता गट वरचढ ठरतो याचा अंदाज करायचा, तर सत्ता खिऊ-संफान यांच्याच हातात राहण्याची शक्यता, सर्वाधिक होती. प्रिन्स नरोदम यांना राष्ट्रप्रमुख राहू देण्यास या गटाची हरकत नव्हती. प्रिन्स सिंहनुक यांनी कंबोडियात सत्तेवर येणारे सरकार हे कम्युनिस्ट सरकार नाही, अशी आशा व्यक्त केली असली, तरी जोपर्यंत प्रिन्स सिंहनुक हा स्वतः नॉमपेन्ह येथे परतत नाही, तोपर्यंत त्याचा निवेदनाला की किंमत दिली जाईल हा एक प्रश्नच होता. नॉमपेन्हचा पाडाव होताच आपण तिथे का परतलो नाहीत याची कारणे सांगताना प्रिन्स सिंहनुक यांनी सांगितले ते असे – 'माझी आई राजमाता ही फार आजारी

आहे. तिचे वय सत्तरीच्या पुढे आहे. तिचा अंत अगदी जवळ आला आहे व लवकरच ती या जगातून निघून जाईल. तिच्या अंतापर्यंत तिच्याजवळ राहणे हे माझे कर्तव्य समजतो. त्यानंतर मी लगेच माझ्या देशवासियांच्यात राहण्यासाठी येईन.'

प्रिन्स सिंहनुक यांनी न परतण्यासाठी ही जी कारणे पुढे केली आहेत, ती पुरेशी समाधानकारक नाहीत. नॉम-पेन्ह येथे परतण्यास आता सिंहनुक यांना अडचण दिसत नव्हती. म्हातारी आई आणखी १५-२० वर्षे देखील जगेल! खरे कारण असे दिसते की नॉम-पेन्ह येथे निर्माण होणारी राजवट ही प्रिन्स सिंहनुक यांच्याबद्दल नेमकी काय भावना बाळगून आहे याबद्दल प्रिन्स सिंहनुक यांच्या मनात पुरेशी स्पष्टता नव्हती; आणि आपल्या भवितव्याची स्पष्ट कल्पना येईपर्यंत प्रिन्स सिंहनुक नॉमपेन्हला परतणार नव्हते. प्रिन्स सिंहनुक यांनी कंबोडियाला परतावे असा प्रयत्न नॉम-पेन्हची शरणागती होत असतानाच अमेरिकेने चालवला होता. अमेरिकेची ही सलगीच कदाचित सिंहनुक आणि खमेर रूज यांच्यात नवे संशय पेरीत होती. सिंहनुक नॉम-पेन्हमध्ये परतण्यात आता बाह्य अडचणी काहीच नसल्याने, त्या परतण्याला अथवा न परतण्याला फारसे महत्त्व नव्हते. कंबोडियात अधिकारावर जी सत्ता असेल, तिचा चेहरामोहरा हनोई राजवटीशी मिळताजुळता असेल यात मात्र शंका नव्हती.

## थियूला संदेश आला

सायगावपासून केवळ ६४ किलोमीटर अंतरावर असलेल्या झुऑन-लॉक या शहराजवळ दक्षिण व्हिएतनामी सैन्याने आठवडाभर नेटाचा प्रतिकार सुरू ठेवला होता. परंतु १८ एप्रिलला या शहराचा कब्जा मुक्ती फौजेने करताच सायगावमध्ये घबराट सुरू झाली. दक्षिण व्हिएतनामच्या अस्थायी क्रांतिकारी सरकारचे पॅरीस येथील प्रतिनिधी दिन्ह-बा-थी यांनी जाहीर केले – 'अध्यक्ष थियू याने राजीनामा दिल्याखेरीज आणि दक्षिण व्हिएतनाममधून सर्व अमेरिकन निघून गेल्याखेरीज, आम्ही शांततेची बोलणी आता करणार नाही.' अस्थायी सरकारच्या परराष्ट्रमंत्री मादाम बिन्ह या अल्जीअर्सच्या वाटेवर पॅरीस येथे थांबल्या होत्या. त्यांनी सांगितले – 'दक्षिण व्हिएतनाममधील लढाईमुळे निर्माण झालेल्या निर्वासितांचा प्रश्न फुगवून अमेरिका त्या प्रश्नाचा राजकारणी उपयोग करू पाहते आहे.'

सायगावमधील अमेरिकेचे वकील ग्रॅहम मार्टीन यांना पॅरीसमार्गे मुक्ती आघाडीच्या लष्करी प्रतिनिधींचा संदेश आला. हा संदेश अध्यक्ष थियूच्या कानावर घालण्यासाठी अमेरिकेचा हा वकील १९ एप्रिलला अध्यक्ष थियूच्या प्रासादात दाखल झाला. त्याचा चेहरा गंभीर होता. त्याने अध्यक्ष थियूला संदेश पोचवला –

‘रविवारी मध्यरात्रीपासून ४८ तासांच्या आत जर आपण राजीनामा दिला नाही, तर सायगाव शहराची राखरांगोळी सुरू होईल, असा संदेश मुक्ती आघाडीने आपल्याला दिला आहे.’

सायगाववर पाच अंगांनी मुक्ती आघाडीचे सैन्य लोटत असल्याच्या बातम्यांनी गांगरलेला आणि हादरलेला अध्यक्ष थियू या संदेशाने पुरता खचला. अमेरिकन वकील अधिक काही बोलत नव्हता. याचा अर्थ स्पष्ट होता. ज्या माणसाच्या आधारावर अमेरिकेने अनेक वर्षे व्हिएतनामची राजनीती बांधली, त्या माणसाला वाऱ्यावर सोडून, अमेरिकन देश सोडून निघाल्यासारखेच होते. सायगाव शहरातील एकत्र झालेले व्हिएतनाममधील सर्व अमेरिकन नागरिक बायकामुलांसह टॅन-सॉन-न्हूत या सायगावातल्या विमानतळाच्या दिशेने केव्हाच चालू लागले होते. हो-चि-मिन्ह याने ज्या गोष्टीचा आयुष्याचा अखेरीपर्यंत आग्रह धरला आणि त्याच्या मृत्यूनंतर ज्या गोष्टींचा हनोई राजवटीने घोषा धरला होता, त्या दोन्ही गोष्टी आता घडल्याशिवाय राहात नव्हत्या. अमेरिकन दक्षिण व्हिएतनाममधून निघून जात होते आणि हनोईच्या पसंतीचे सरकार सायगावला अधिकारावर येण्याला काही तासांचा फक्त अवधी दिसत होता.

लढाईचा रंग पालटण्याची आता सुतराम शक्यता नव्हती. सुमारे वीस वर्षांच्या अप्रबुद्ध व्हिएतनामी राजकारणानंतर अमेरिकेचे अध्यक्ष फोर्ड यांनी जाहीर केले होते, ‘अमेरिकनांपुरती तरी व्हिएतनाममधील लढाई आता संपलेली आहे.’

मुक्ती आघाडीची सैन्ये सायगावच्या सर्व अंगांनी राजधानीवर झडप घालण्याच्या पावित्र्यात येत होती. ४८ तासांचा अवधी देण्यात आला होता तो सायगाव शहरातील प्राणहानी आणि वित्तहानी टाळता येण्याची अखेरची संधी अध्यक्ष थियूला द्यावी म्हणून. अमेरिका मोठ्या प्रमाणावर पुनश्च या झगड्यात उतरेल ही अध्यक्ष थियूची आशा पुरती मावळली होती.

फान-रांग या शहराच्या परिसरात अध्यक्ष थियूचे मूळ गाव. तिथे त्याच्या वाडवडिलांची थडगी होती. फान-रांग मुक्ती आघाडीने जिंकले व पाठोपाठ अध्यक्ष थियूच्या वाडवडिलांची थडगी उद्ध्वस्त झाल्याचे वृत्त याच सुमारास आले. ही थडगी मुक्ती आघाडीने उखडली नव्हती, तर फान-रांग येथे जनरल थियूचे जे विश्वासातले सैन्य होते, त्यांनीच जनरल थियूवरील आपला संताप असा व्यक्त केला होता! ज्या व्हिएतनामी समाजात वाडवडिलांच्या स्मृती या अत्यंत पवित्र मानल्या जातात, त्याठिकाणी अध्यक्ष थियूच्या सैनिकांनी असे करणे ही सूडाची परमावधी होती. अध्यक्ष थियू यांचेवर हा अगदी मर्मप्रहार ठरला. ही बातमी कानावर आली आणि अध्यक्ष थियू निराशेने आणि दुःखाने

आपल्या प्रासादातील भूमिगत संरक्षण गृहात उतरला. चोवीस तास उलटले तरी तो त्या एकांतवासातून बाहेर पडेना.

दुसऱ्या दिवशी (२० एप्रिल) सायगावमधील दक्षिण व्हिएतनाम सैन्याचा लेफ्ट. जनरल तोआन हा अध्यक्ष थियूचा चीफ ऑफ स्टाफ जनरल व्हिएन याच्यासह हेलिकॉप्टरने प्रासादात आला. हे दोघे आल्याने अध्यक्ष थियू संरक्षकगृहातून बाहेर पडला. स्वागताचे शब्द अध्यक्ष थियूच्या तोंडून निघण्यापूर्वीच लेफ्ट. जनरल तोआन याने सांगितले –

'अध्यक्ष महाशय, आपला प्रतिकार संपुष्टात आलेला आहे!'

अध्यक्ष या वक्तव्याने पुरताच थिजला. झुऑन-लॉक शहराला मुक्ती आघाडीचे चार डिव्हिजन सैन्य सायगावच्या दिशेने वेढा देत होते आणि तीन डिव्हिजन सैन्य समुद्राच्या किनाऱ्याने त्यांच्या दिमतीला येत होते. मुक्ती आघाडी तर अध्यक्ष थियू अधिकारावर असेपर्यंत कोठलीही बोलणी करण्यास तयार नव्हती.

## थियूचा राजीनामा

ती रात्र अध्यक्ष थियू याने विचार करण्यात घालवली. सत्ता त्यागाशिवाय गत्यंतर नव्हते! सकाळी अमेरिकेच्या वकिलाला बोलावणे गेले आणि अध्यक्ष थियू याने आपण राजीनामा देत असल्याचा निर्णय त्याच्या कानावर घातला. व्हिएतनामबाहेर जिवानिशी कसे निसटायचे एवढाच विचार यानंतर त्याने प्रामुख्याने केला असावा.

रात्रौ ९ वाजता सायगावमध्ये सरकारने कर्फ्यु जाहीर केला आणि लगेचच दूरचित्रवाणीवर अध्यक्ष थियू याने आपले निरोपाचे भाषण प्रसारित केले. या त्याच्या भाषणात अमेरिकेला शिव्याशाप होते. अमेरिकनांनी केलेल्या विश्वासघाताची उजळणी होती – बराच त्रागा होता. अध्यक्ष थियू याने भाषणात म्हटले –

> 'अमेरिकनांनी आम्हाला वचन दिले होते. आम्ही विश्वास ठेवला. परंतु कबुल केलेली मदत त्यांनी दिली नाही. लढायचे म्हटले तर आम्हाला शस्त्रे हवी होती, दारूगोळा हवा होता. आम्ही टँकदल गमावलेले होते. तोफा गमावलेल्या होत्या. हे घडताच अमेरिकेने काहीतरी हालचाल करायला हवी होती. तुम्ही पॅरीस करारावर सही दिली होती. त्या करारात तुम्ही हे कराल असे अभिवचन होते. मुक्त जगाचे नेते म्हणवणाऱ्या निक्सननी मला आश्वासन दिले होते, की जर व्हिएतनाम तुमच्यावर आक्रमण करील तर अमेरिका लष्करी हस्तक्षेप करील. परंतु निक्सनचा शब्द अमेरिकेने पाळला नाही. आणि हे त्यांचे कृत्य त्यांना कमीपणा आणणारे आहे. ही अमानुषता आहे. हा विश्वासघात आहे. आपले सैनिक निष्कारण मरत असताना पाहाणे शक्य नसल्याने मी

राजीनामा देत आहे! मी सत्तेवरून दूर जातो आहे. माझ्या हातून सत्ता राबवताना ज्या काही चुका आजवर झाल्या असतील, त्याबद्दल सैनिकांनी आणि सर्व धर्मियांनी मला क्षमा करावी. मी आपला याबद्दल ऋणी राहीन. फार योग्यता नसताना आपण मला सांभाळून घेतलेत. मी राजीनामा देतो आहे परंतु मी तुम्हाला सोडून जाणार नाही.'

हे भाषण ऐकल्यावर एका पत्रकाराने थियू दूर झाल्याबद्दल निःश्वास टाकून उपरोधाने उद्गार काढले – 'गेल्या दहा वर्षातले अध्यक्षांचे हे सर्वात उत्तम भाषण आहे!'

१९७३ साली अखेरचा अमेरिकन सैनिक दक्षिण व्हिएतनाममधून बाहेर पडला तेव्हा अमेरिकनांनी अध्यक्ष थियूच्या ताब्यात अतोनात लष्करी सामग्री आणि शस्त्रास्त्रे ठेवलेली होती. ६०० बाँबर विमाने, ९०० हेलिकॉप्टर विमाने, हजारो टँक आणि अमेरिकन अद्यावत शस्त्रांनी मढवलेले ७०,००० दक्षिण व्हिएतनामी सैनिक! हा वारसा अध्यक्ष थियू याला मिळाला होता. एवढे सामर्थ्य दिमतीला असूनही सायगाव राजवट पत्त्याच्या बंगल्यासारखी कोसळली आणि तरीही आत्मसंशोधन करण्याचे सोडून हा नालायक लष्करी अध्यक्ष, अमेरिकेलाच शिव्यागाळी करीत होता!

हा माणूस इतकी वर्षे – जवळजवळ ८ वर्षे सत्तेवर राहिला तो अमेरिकेच्या संगिनींच्या पाठिंब्यावर. दुसऱ्या महायुद्धात तो फ्रेंचांकडून हो-चि-मिन्हच्या सैनिकांशी लढला होता. धर्माने कॅथॉलिक असल्याने दिएमच्या कॅथॉलिक धार्जिण्या राज्यकारभारात हा हळूहळू कसा महत्त्ववादी चढला हे मागील निवेदनात आलेले आहे. १९६३ साली दिएमचा काटा काढण्यात त्याचा हात होता व १९६७ सालापासून तोच सर्व सत्ताधीश झाला. कम्युनिस्ट विचारसरणीचे सर्व दक्षिण व्हिएतनामी ठार केले पाहिजेत असे तो म्हणे. याच सूत्रावर त्याने सायगावचा कारभार चालवला होता. दिएमप्रमाणेच या माणसालाही कसलाही विरोध सहन होत नसे. यामुळे त्याने असंख्य शत्रू निर्माण केले. आणि अखेरच्या क्षणी अमेरिकेचा आधार सुटताच तो स्वतःच उखडला गेला. जिवंत राहीला तो केवळ त्याच्या वधाचे दोन्ही प्रयत्न फसले म्हणून!

## थियू पळाला

दूरचित्रवाणीवरील आपल्या दीड तासाच्या अखेरच्या भाषणात या माणसाने जनतेला चक्क थापा मारल्या. त्याने सांगितले –

'या क्षणापासून मी स्वतःला माझ्या जागी येणाऱ्या नव्या अध्यक्षांच्या सुपूर्द करतो आहे. राष्ट्र संरक्षणाची लढाई खेळत असताना मी माझ्या लोकांना सोडून कुठेही जाणार नाही!'

शब्द! नुसते पोकळ शब्द! चार दिवस या माणसाने प्रासादात आवराआवरीत काढले. १५० टनाचे बोजे बांधले आणि पाचव्या दिवशीच एका अमेरिकन लष्करी विमानातून त्याने सामानासह पोबारा केला. त्याला ताईपे बेटावर आसरा दिला गेल्याचे वृत्त नंतर प्रसिद्ध झाले.

अमेरिकेला आता नकोसा झालेला थियू हा दूर जाताच अमेरिकेचे सेक्रेटरी ऑफ स्टेट डॉ. किसिंजर यांनी आशा व्यक्त केली 'अध्यक्ष थियूच्या राजीनाम्यामुळे शांततेच्या वाटाघाटीचा मार्ग मोकळा झाला आहे. इतर देशांच्या मध्यस्थीने काही चर्चा चालू आहे.'

१९७१ च्या निवडणुकीत दक्षिण व्हिएतनामचे उपाध्यक्ष झालेले ट्रॅन-व्हान-हुआँग हे थियू देश सोडून गेल्यानंतर आपोआपच अध्यक्ष झाले. ७१ वर्षाच्या या वृद्धाला धड दिसत नव्हते की ऐकू येत नव्हते. असे असले तरी जर या गंडांतरातून सायगाव राजवट वाचलीच, तर अध्यक्ष म्हणून मिरवण्याचे सुख त्याला हवे होते. २४ एप्रिलला या नव्या अध्यक्षाने जनरल मिन्ह या आजपर्यंत जनमानसात बराच सन्मान असलेल्या निवृत्त सेनापतीला पंतप्रधानपद स्वीकारण्याची विनंती केली. जनरल मिन्ह याने पंतप्रधानपद स्वीकारण्यास नकार दिला व 'द्यायचे असेल तर अध्यक्षपदच द्या' असा पेच टाकला! जनरल मिन्ह याने खुलासा केला – 'अध्यक्ष हुआँग हे जुन्या राजवटीचाच अंश आहेत. ते गेल्याखेरीज केवळ मी पंतप्रधान झाल्याने शांतता वाटाघाटी सुरू होणार नाहीत.'

आणि नेमके तसेच झाले. हुआँग याने हनोईला आपला एक दूत रवाना केला व वाटाघाटी सुरू करण्याचा प्रयत्न केला. परंतु हनोईने अशी चपराक दिली की त्याची दूताला कायमची याद राहील. ज्या विमानातून हुआँग याचा दूत हनोईला गेला ते विमानच हनोईने खाली उतरू दिले नाही. त्यांनी विमानाला संदेश दिला – 'सर्व अमेरिकन दक्षिण व्हिएतनाममधून गेल्याखेरीज आणि थियूच्या सरकारातील सर्वजण दूर झाल्याखेरीज आम्ही या बाबतीत काही करू शकत नाही. कृपया हनोईला पाय लावण्याची तसदीही घेऊ नका!'

अध्यक्ष हुआँग याने ही थप्पड मिळताच नॅशनल असेंब्ली सभासदांना पाचारण केले. निवेदनात तो म्हणाला –

'अमेरिकेने आपल्याला वाऱ्यावर सोडले आहे आणि इतर मित्रांचीही मदतीला येण्याची इच्छा दिसत नाही. वाटाघाटी सुरू करण्याखेरीज आपल्याला गत्यंतर नाही.'

असेंब्लीने बेरकी ठराव संमत केला. त्यात म्हटले होते. 'हुआँग यांनी शांततेसाठी प्रयत्न करावे याला आमची संमती आहे. परंतु जर त्यांना आपल्याजागी यासाठी दुसरा लायक माणूस निवडावासा वाटला तर त्यांनी तसे करण्यास हरकत नाही.'

जनरल मिन्ह हा सत्तेवर यावा अशीच सर्व असेंब्लीची इच्छा होती. कारण हनोईला व मुक्ती आघाडीला चालण्यासारखा हाच एक माणूस शिल्लक होता. १९६३ साली दिएम याला सत्तेवरून दूर करण्याच्या कटाचा हा प्रमुख सूत्रधार, नंतर स्वतः केवळ तीनच महिने सत्तेवर राहू शकल्याने फारसा बदनाम झालेला नव्हता. शेवटी सर्व सूत्रे जनरल मिन्हकडे येणार होतीच परंतु हुआँग हा आणखी चार दिवस अध्यक्षीय खुर्चीला लोंबकळत राहिला.

मध्यंतरीच्या काळात सायगावची स्थिती तासातासाला खालावत चालली होती. सर्व अमेरिकनांसह सुमारे दीडलाख दक्षिण व्हिएतनामी, सायगाव बाहेर काढण्याचा उद्योग अमेरिकेने सुरू केला होता. अमेरिकेच्या चाळीस युद्धनौका दक्षिण चिनी समुद्रात सुमारे ४० मैलांवर नांगरून तयारीत होत्या. शेकडो हेलिकॉप्टर विमाने जा-ये करीत होती. सायगावजवळच्या टॅन-सॉन न्हूत विमानतळावर भयभीत दक्षिण व्हिएतनामी माणसांची मांदियाळी उसळली होती. विमानात चढण्यासाठी अमेरिकनांना अग्रहक्क असला, तरी त्यांच्याबरोबर त्यांच्या दक्षिण व्हिएतनामी बायका, त्यांच्यापासून झालेली पोरे, त्या सोयरिकीतून वशिले लावून सायगाव बाहेर निसटू पाहाणारे नातेवाईक, असा संमिश्र घोळका प्रत्येक विमानात जागा मिळवण्यासाठी धडपडत होता. सुमारे दीड लाख माणसे या विमानतळावर लोटली होती. जी हजारावरी पोरकी पोरे अमेरिकेत आणण्याची खास कोशिस अमेरिका करीत होती, ती बहुतेक अमेरिकन सैनिकांचीच बेकायदेशीर पैदास होती! या पोरांचे दक्षिण व्हिएतनाममधील पुढचे अस्तित्व त्यांना त्रासदायक होईल, म्हणून त्यांना अमेरिकेत नेणे एवढाच काय तो माणुसकीचा विचार या सर्व व्यवहारात दिसत होता.

## भयानक अस्त्राचा वापर

दक्षिण व्हिएतनामचा सर्व किनारा मुक्ती आघाडीने चुटकीसरशी कब्जात घेतल्याने, एवढा मानवी समुद्र सायगाव बाहेर काढण्यासाठी सायगावचा विमानतळ काही काळ सुरक्षित ठेवणे जरूरीचे होते. हे कदाचित साधणार नाही, म्हणून यावेळी दक्षिण व्हिएतनामी सैनिकांकरवी अमेरिकेने एका भयानक अस्त्राचा वापर सायगाव परिसरात केला. अतिशय प्राणघातक असे श्वास कोंडवून टाकणारे 'डिप्रेशन बाँब' अमेरिकेने सायगाव कब्जात घेण्यासाठी पुढे येणाऱ्या मुक्ती आघाडीच्या सैनिकावर टाकले. हा बाँब जेथे पडतो त्याच्या भोवतालचा २५० मीटर त्रिज्येचा परिसर दीर्घकाळ प्राणवायुविरहित होतो आणि कोणताही प्राणी त्यात जगू शकत नाही. तसे सुमारे ३० बाँब वापरण्यात आले व परिणामी हजारो मुक्ती आघाडीचे सैनिक गतप्राण झाले. बिन्ह-होआ आणि हो-नाय या दोन ठिकाणी सर्व कॅथॉलिक समाज एकवटलेला होता. त्याच्या संरक्षणार्थच प्रमुखतः या भयानक बाँबचा वापर करण्यात आला.

एकीकडे दक्षिण व्हिएतनाममधील अनाथ अर्भकांना वाचवण्यासाठी अमेरिकेला जो पुळका आला होता, त्याची जाहिरात चालू असतानाच दुसरीकडे दक्षिण व्हिएतनामी सैनिकांकरवी अशा भयानक अस्त्रांचा वापर करून अमेरिका आपले पशुत्व प्रगट करीत होती. हे बॉंब टाकणारे हात दक्षिण व्हिएतनामी सैनिकांचे असले तरी त्यांच्या हातात हे बॉंब अमेरिकेनेच दिले होते. ज्यावेळी हे बॉंब वापरले गेल्याचे वृत्त आले, त्याचवेळी हे बॉंब काही हजारो सैनिकांवर केवळ पडलेले नसून ते पर्यायाने शांतता वाटाघाटीवर पडले आहेत, आणि सायगाव शहर आता धुळीस मिळाल्याशिवाय राहात नाही अशी निरीक्षकांची खात्रीच झाली. सायगावचे मरण या भयानक बॉंब वापरामुळे काही तास पुढे गेले आणि अमेरिकेला सायगावमधून लक्षावधी माणसे बाहेर काढायला थोडी उसंत मिळाली. या घटनांवरच केवळ अमेरिकेच्या या नीचतम कृत्याचे थोडेफार समर्थन-युद्धात काहीही क्षम्य असते – या तत्त्वानुसार झाले तर उद्या होईल.

## राजधानीचे मरण जवळ आले

२७ एप्रिलला बिन्ह-होआ या शहरावर मुक्ती आघाडीचे सैन्य घसरले. काही तासातच हे सायगाव नजिकचे २४ किलोमीटर अंतरावरचे शेवटचे शहर पडणार याची खात्री होताच सुमारे आठवडाभर अध्यक्षपदाला लोंबकळणारा हुआँग याने राजीनामा दिला! लगेच सायगावमधील १३४ सदस्यांच्या असेंब्लीने सर्व सत्ता जनरल मिन्ह याचे हवाली केली.

त्याच दिवशी पहाटे सायगाववर मुक्ती आघाडीच्या सैनिकांनी पहिला रॉकेटचा मारा चढवला. याचा अर्थ सायगाव आता माऱ्याच्या टप्प्यात आले होते. या रॉकेट हल्ल्यात चोलोन भागात आगी लागल्या. सायगावमधील मॅजेस्टीक हॉटेलचा पाचवा मजला उद्ध्वस्त झाला. सायगावमधील पोलिस ठाणे बेचिराख झाले.

१९७३ च्या शांतता करारानंतर भूतपूर्व मॅकव्ही संघटनेच्या आवारात सुरू झालेले अमेरिकेचे डिफेन्स ॲटॅची ऑफिस (D.A.O.) २७ एप्रिलला घाईघाईने बंद करण्यात आले. अमेरिकन वकिलातीत सर्व कागदपत्रे जाळायला पूर्वीच सुरुवात झाली होती.

सायगाववर मुक्ती आघाडीचा रॉकेटमारा सुरू झाल्यानंतर २४ तासाच्या आत वकिलातीतील आणि डिफेन्स ॲटॅची ऑफिसातील १,००० अमेरिकन घेऊन हेलिकॉप्टर विमाने सायगावबाहेर पडली. थियूचा चीफ ऑफ स्टाफ जनरल व्हिएन हा या अखेरच्या अमेरिकनांबरोबरच पसार झाला.

## सायगाव राजवटीला भडाग्नी

२८ एप्रिलला सत्ता हाती घेता क्षणीच जनरल मिन्ह याने शांतता वाटाघाटी सुरू करण्याची याचना केली. परंतु आता उशीर झाला होता! सायगाव रॉकेट माऱ्याखाली

धडाडू लागल्यानंतर वाटाघाटी सुरू करण्याचा मूर्खपणा कोण करील? जिथे शरणागती दृष्टिपथात असते तिथे वाटाघाटी होत नसतात. जनरल मिन्ह याने याचना केली होती – 'प्रतिपक्षाकडील माझ्या बंधूंनो! मला शांतता हवी आहे हे तुम्ही जाणताच. समझोत्यासाठी मी व माझे सरकार उत्सुक आहोत. आपण निराशा करू नका.'

याचना फुकट गेली! प्रतिसाद आलाच नाही.

जेमतेम ४८ तास जनरल मिन्ह याने दम काढला. ३० एप्रिलला सायगाव रेडिओवरून जनरल मिन्ह याने शरणागती जाहीर केली. त्याने सांगितले –

'अधिक रक्तपात टाळण्यासाठी आम्ही सत्ता अस्थायी क्रांतिकारी सरकारच्या प्रतिनिधींना सुपूर्त करण्यास तयार आहोत!'

एकीकडे ही घोषणा सुरू असतानाच पांढरी निशाणे मिरवणारे रणगाडे आणि लष्करी गाड्या पुढे घालून, शरण आलेले हजारो दक्षिण व्हिएतनामी सैनिक सायगावमध्ये गर्दी करीत होते. या सैनिकांबरोबर कोणीही महत्त्वाचा जनरल नव्हता. अध्यक्षीय प्रासादाच्या आवारात शरण आलेले सैन्य गोळा होत असताना अध्यक्ष मिन्ह हा ३० एप्रिल १९७५ ला बुधवारी सकाळी १०-३० वाजता आकाशवाणीवरून सांगत होता –

'सैनिकांनो लढाई संपली आहे. शांत रहा. शस्त्रे चालवू नका. रक्तपात न घडता सत्ताबदल कसा करायचा याचा विचार होऊ शकतो. सर्व सैनिकांनी आणि सेनाधिकाऱ्यांनी ते जिथे असतील त्याच ठिकाणी राहावे व लढाई बंद करावी.'

दक्षिण व्हिएतनामच्या क्रांतिकारी सरकारने शरणागतीसाठी तीन अटी २४ तास पूर्वी कळवल्या होत्या.

- सर्व अमेरिकनांना घालवून द्या.
- सायगाव सरकार रद्द करा.
- सायगावचे सरकारी सैन्य निःशस्त्र करा.

या सर्व अटी पुऱ्या होताच दक्षिण व्हिएतनाममध्ये शांतता अवतरू लागली. रॉकेटस्चे, तोफांचे आवाज बंद झाले. सायगाव पडल्यानंतर काही तासांच्या आतच जगातल्या महत्त्वाच्या देशांनी दक्षिण व्हिएतनामच्या नव्या क्रांतिकारी सरकारला मान्यता जाहीर केली. यात भारताने सर्वात आघाडी मारली ही विशेष कौतुकाची गोष्ट होय. किंग्स्टन येथे राष्ट्रकुल परिषदेला गेलेल्या पंतप्रधान गांधी यांनी तारेने सूचना पाठवताच भारत सरकारने नव्या क्रांतिकारी सरकारला ३० एप्रिल ७५ ला मान्यता जाहीर केली. त्याच दिवशी रात्रौ १२ वाजता म्हणजे १ मे उजाडता उजाडता क्रांतिकारी सरकारचे निशाण अध्यक्षीय प्रासादावर फडफडू लागले.

## हो-चि-मिन्ह नगराचा जन्म

१ मे १९७५ ची सकाळ झाली. राष्ट्रीय मुक्ती आघाडीच्या फौजा दैदिप्यमान विजय पदरात पाडून चहु अंगानी सायगावमध्ये शिरल्यावर, नव्या राजवटीने पहिली सूचक गोष्ट केली. ती म्हणजे सायगाव शहराचे नवे नामकरण करण्यात आले. यापुढे दक्षिण व्हिएतनामच्या नकाशात फ्रेंच आक्रमकांच्या आठवणी देणारे 'सायगाव' असणार नाही. या शहराचे नवे नामकरण झाले 'हो-चि-मिन्ह नगर'. उत्तर व्हिएतनामशी रक्ताचे आणि जिवाभावाचे भावनिक नाते प्रस्थापित करण्याचा हा पहिला डोळस प्रयत्न झाला. जी नावे देशाची इतिहासातील नाचक्की वा बदनामी जगजाहीर ठेवतात ती बदलायला देखील आपल्याकडील काही तथाकथित विचारवंत खळखळ करतात. भारतासारख्या देशात असे काही पाऊल उचलावे असे स्वातंत्र्यप्राप्तीनंतर कुणी जेव्हा म्हटले, तेव्हा अद्वातद्वा वक्तव्ये करणारी मंडळी सायगावचे नाव 'हो-चि-मिन्ह नगर' झाले तेव्हा या घटनेची मुक्त कंठाने स्तुती करताना आढळतात हा मात्र एक चमत्कारच होय!

दंडेलीने, अन्यायाने घडलेला इतिहास पुसावाच लागतो. इतिहास नवे कायदे करूनही पुसता येतो! त्याशिवाय नव्या प्रेरणा निर्माण होत नाहीत.

नव्या क्रांतिकारी सरकारने हो-चि-मिन्ह नगरात सत्ता हाती येताच, एक आठ कलमी आज्ञापत्र प्रसारित केले. बलात्कार, वेश्याव्यवसाय, लाचलुचपत, लुटालुट आणि खोट्या अफवा पसरवणे इत्यादी गुन्ह्यांना कडक शिक्षा ठोठावल्या जातील अशी समज सर्व जनतेला देण्यात आली. क्षणाचा विलंब न लावता दक्षिण व्हिएतनाममध्ये अनेक वर्षे माजलेल्या अनाचाराची सफाई सुरू झाली. वेश्यागृहे, नाईट क्लब, नृत्यगृहे बंद करण्यात आली.

हो-चि-मिन्ह नगरात अस्थाई क्रांतिकारी सरकारच्यावतीने दक्षिण व्हिएतनाममध्ये सत्ता स्वीकारणारा नवा शासक म्हणून जनरल ट्रान-व्हान-ट्रा या ५७ वर्षांच्या सेनानीचा परिचय अध्यक्षीय प्रासादासमोर भरलेल्या विजयी मेळाव्यात जनतेला करून देण्यात आला. व्यासपीठावर पाठीमागे राष्ट्रपिता हो-चि-मिन्ह याचे मोठे छायाचित्र होते. हो-चि-मिन्ह नगरात शरणागती दिल्यानंतर अटक केलेल्या जनरल मिन्ह याला मुक्त करण्यात आल्याचे या मेळाव्यात घोषित करण्यात आले. या कृत्याने नव्या सरकारविषयी लोकांच्या मनात आदराची भावना पसरायला सुरुवातच झाली.

दक्षिण व्हिएतनाममधील सरकारकडील अमेरिकेचा अखेरचा वकील ग्रॅहॅम मार्टीन, शेवटच्या अमेरिकन जथ्यातून सायगावबाहेर पडला. 'ब्ल्यू-रिज' या अमेरिकेच्या बोटीवर पोचताक्षणीच त्याने वार्ताहरांजवळ सांगितले – 'अमेरिकेने सायगाव राजवटीला मदत देण्याचे अभिवचन पाळायचे ठरवले असते, तर आम्हाला पळून जावे लागले नसते.' या

निवेदनात थोडे तथ्य असले, तरी या वक्तव्याचा अर्थ असा आहे की जबाबदार अमेरिकन नेते अजूनही व्हिएतनाममधील शोकांतिकेचा अर्थ मनात ठसवून घेण्यात खळखळ करीत होते. न्यूयॉर्क टाईम्सने सायगावची शरणागती जाहीर करताना आठ कॉलमी मथळा दिला होता – 'एक अध्याय संपला' (The end of the chapter) या पत्राने आपल्या अग्रलेखात म्हटले आहे –

'पराभवाच्या तप्तावस्थेत अनेक प्रश्न अनुत्तरीत राहिले आहेत, कितीतरी अधिक प्रश्न हे मुद्दामच नजरेआड केले जात आहेत. काही काळ, काही वर्षे हे चालू राहणार आहे. कारण उरलीसुरली प्रतिष्ठा सांभाळण्याचा आणि जी ध्येये सहजासहजी सोडणे शक्य नाही, ती सावरण्याचा हाच एक राजरोस मार्ग आहे!'

इंडोचायनातील तीन वर्षांचे युद्ध संपले! या युद्धात झालेल्या मानवसंहाराचे आकडे हे भयचकित करणारे आहेत. १९४५ ते १९५४ या काळात व्हिएतनाममध्ये फ्रेंचांबरोबरच्या झगड्यात एकंदर ५,७७,३३४ माणसे ठार झाली. यात ३२,८११ फ्रेंच होते. जानेवारी ६१ ते जानेवारी ७३ या कालखंडातील व्हिएतनाममधील लढाईत प्रामुख्याने अमेरिकन सैनिक लढले. या संघर्षात उत्तर व्हिएतनाममध्ये नागरिक व सैनिक मिळून १,००,००० माणसे ठार झाली. याच काळात दक्षिण व्हिएतनाममध्ये ६६,७१,१०६ माणसे ठार झाली आणि त्यात ९६,२०९ अमेरिकन आहेत. लढाईची शेवटची तिसरी फेरी जानेवारी ७३ ता एप्रिल ७५ ला झडली. या काळात युद्ध मुख्यतः दक्षिण व्हिएतनाममध्येच उसळले आणि आत्तापर्यंतच्या अंदाजानुसार यात १,२०,००० व्हिएतनामी ठार झाले आहेत. कंबोडियाच्या झगड्यात एकूण ७,००,००० आणि लाओसमध्ये ८०,००० मृत्यू झालेले आहेत.

## फाळणी मोडून व्हिएतनाम अखंड होणार

दक्षिण व्हिएतनामच्या नव्या सरकारला भारत, रशिया, चीन आदी ११ देशांनी लगेच मान्यता दिली. काही काल जरी दक्षिण व्हिएतनाम हा एक स्वतंत्र देश म्हणून नांदताना दिसला, तरी एक-दोन वर्षात दोन्ही व्हिएतनाम एक होतील आणि अध्यक्ष हो-चि-मिन्ह याचे अखंड व्हिएतनामचे स्वप्न साकार झालेले जगाला दिसेल याबद्दल कुणाच्याच मनात शंका नव्हती. अखंड व्हिएतनामची राजधानी हनोई राहील आणि आज हनोईत अधिकारावर असलेले सरकार हेच सर्व देशावर अखेर राज्य करील.

'उत्तरेतील व दक्षिणेतील आपले सर्व राष्ट्रभक्त एकाच छपराखाली लवकरच नांदू लागतील.' हा दिवंगत राष्ट्रपिता हो याने आपल्या मृत्यूपत्रात व्यक्त केलेला निर्धार त्याच्या मृत्यूनंतर केवळ सहा वर्षात प्रत्यक्षात उतरल्याचे दृश्य, आता जगाने पाहिले. आणि

आशियातील एका चिमुकल्या देशाच्या शूर देशभक्तानी आपल्या नेत्याला वाहिलेली ही श्रद्धांजली अजरामर ठरणारी आहे.

n

(हो-चि-मिन्ह यांना ७८ व्या वाढदिवसानिमित्त १९ मे १९६८ रोजी अनेकांचे शुभसंदेश आले होते. उत्तर म्हणून हो-चि-मिन्ह यांनी जी कविता सर्वांना पाठवली तिचा अनुवाद)

हे मानले : मी ७८ वर्षाचा झालो,

तरीही म्हातारा झालोसे वाटत नाही!

घेतला आहे खांद्यावर

माझ्या देशाचा भार;

आमचे कृतसंकल्प लोक

मोठ्या गौरवाने आगेकूच करताहेत;

प्रत्येक गावावर

विजयश्री त्यांचेच चरण चुंबीत आहे

आम्ही आमच्या नव्या पिढीसोबत, लोकहो;

पुढे-सदैव पुढेच-चाललो आहोत!

हो-चि-मिन्ह



फ्रेंच समाजवादी परिषदेत बोलताना हो-चि-मिन्ह (१९२०)
'आमच्या देशात शाळांपेक्षा तुरुंग अधिक आहेत.'



जनरल लेकलेर्क, हो-चि-मिन्ह व जीन सेंटनी फ्रेंच क्रूझरवर बोलणी करताना
(२४ मार्च १९४६)



हो-चि-मिन्ह कम्युनिस्ट काँग्रेसमध्ये, मॉस्को १९२२



जॉर्जेस बिडॉल्ट व हो-चि-मिन्ह पॅरीस वाटाघाटी (२ जुलै १९४६)



हो-चि-मिन्ह : पुन्हा वनवासात. (२० डिसेंबर १९४६)



लेदुआँ : लाओ डाँग पक्षाचा सरचिटणीस



'दिएन - बिएन - फू'वर व्हिएतमिन्हचा कब्जा (७ मे १९५४)



नेहरू - हो-चि-मिन्ह भेट : १९५८



आयसेनहॉवर, डल्लेस व दिएम, वॉशिंग्टन भेट १९५७



थिक-क्वांग-डक् या बौद्ध भिक्षूचे आत्मदहन (११ जून १९६३)



दिएम व हेन्री कॅबट लॉज : अखेरचे प्रीतीभोजन ( २७ ऑक्टोबर १९६३ )



अध्यक्ष दिएम यांचा अंत : सायगाव (२ नोव्हेंबर १९६३)



पोटावर सुरी रोखून व्हिएत काँगोची जबानी (१९६२)



मादाम न्हू व कन्या (१९६३)



मादाम न्हू हिचा अमेरिका भेटीसाठीचा सोज्वळ चेहरा




उत्तर व्हिएतनामवर, अमेरिकेचे अध्यक्ष जॉन्सन यांनी बी-२ विमानाचे हल्ले सुरू केले. (१९६४)



जनरल की व जनरल थियू : वैरी मित्र झाले (जानेवारी १९६५)


अमेरिकेचा बॉम्बवर्षाव आता नेहमीचाच झाला (१९६५)



'बॉम्बवर्षावापासून माझ्या बाळाला कसे वाचवणार?'



ट्रँग-बांग गावात, अमेरिकेच्या नॅपलाम बॉम्बचा हाहा:कार.
पळणारी नग्न मुलगी किम फ्यूक : वय वर्षे ९ (१९६६)



ले-डक थो



जनरल की व कॅबट लॉज : होनोलुलू शिखर परिषद (फेब्रुवारी १९६६)



लाओस प्रमुख : प्रिन्स सुवाना फुमा



जनरल विल्यम वेस्टमोरलँड : 'आपले यश दृष्टीच्या टप्प्यात आले आहे' (१९६७)



जनरल जिॲप व हो चि मिन्ह
तुयेन त्वांगच्या जंगलात.



अमेरिकेच्या विनाशिका उत्तर व्हिएतनामवर भडिमार करताना (१९६७)



जॉन्सन, जनरल वेस्टमोरलँड, क्लिफोर्ड व डीन रस्क : अमेरिकेचे निर्णयाधिकारी



टेट् चढाईत उद्ध्वस्त झालेले सायगाव शहर (जानेवारी १९६८)



टेट् चढाईतील सायगावमधील धावपळ (३० जानेवारी १९६८)




टेट् चढाईत सायगावच्या अमेरिकेच्या वकिलातीवर हल्ला करणारा एक व्हिएतकाँगी पकडला गेला. (मार्च १९६८)



टेट् चढाईचा मुख्य बळी :
अध्यक्ष लिंडन जॉन्सन
(मार्च १९६८)



जनरल जिऑप



दूरचित्रवाहिनीवर अमेरिकेच्या जनतेने पाहिलेले आत्मदहन : सायगाव (१९६८)



हुए शहरात कम्युनिस्टांनी कत्तल केलेल्या ४५० पुरुष-मुलांना श्रद्धांजली वाहताना शोकाकुल नातेवाईक (१९६८)



अमेरिकेच्या बॉम्बपासून संरक्षणासाठी हनोईत उघडलेली मॅन होल्स (१९६८)



हुए येथील कम्युनिस्टांच्या कत्तलीत मारल्या गेलेल्या नवऱ्याच्या शवापाशी विलाप करणारी पत्नी (फेब्रुवारी १९६८)



माय-लाय गावात अमेरिकन सैन्याने केलेली गावकऱ्यांची भीषण हत्या (मार्च १९६८)



प्रिन्स नोरोदम सिंहनुक



किम फ्यूक नवन्यासह (१९९८)




इंडो चायना १९५४ व १९७२



उत्तर व्हिएतनाम
निर्लष्करी पट्टा
गिओ लिन्ह
क्वाँग-ट्री
लाओ-बाओ
हुए
दानांग
होई-आन
हो-चि-मिन्ह मार्ग
ताम-की
लाओस
बन हेत
फू-कात
कोंट्म
प्लेकू
डक-को
हो-चि-मिन्ह मार्ग
निन्ह-होआ
बानमी-थो
ना-त्रांग
दलात
फान रांग
कंबोडिया
ॲन-लॉक
बाओ-लॉक
झा-मात
बेन कात
बिन्ह होआ
फान-थिएत
तान-आन
सायगाव
मी-थो
व्हुंग-ताउ
त्रि-तॉन
व्हिन लाँग
कान-थो
व्हि तान्ह
कान्ह हुंग
कुआन-लॉग
सयामचा उपसागर
दक्षिण व्हिएतनाम



हो चि मिन्ह मार्ग
हानोई
हैफांग
लुआंग प्रबांग
मेकाँग नदी
विन्ह
हैनान
(चीन)
स या म
डाँगहोओ
सावन्न खेत
कम्युनिस्टांच्या ताब्यातील भाग
द. व्हिएतनामच्या ताब्यातील प्रदेश
गनिमाच्या हालचालीचा प्रदेश
क्वांगत्रि
जिओलिन्ह
हुए
दनांग
कोटूम
अंकोर्वत
कं बो डि या
काम्पोंगथास
काम्पोंगचाम
नॉमपेन
सिंहनुक व्हिल
सायगाव
मेकाँगचा त्रिभुज प्रदेश
स्केल
० १६०

